

# विहिरीतला निधी

सोनूशेट मोठा सावकार होता. त्याच्या घरात अलोट पैसा आणि दागदागिने आहेत असे लोक म्हणत. ते ऐकून एका चोराच्या मनात त्याच्या घरात चोरी करायचा विचार आला. आपले काम सोपे जावे यासाठी चोर साधूचे सोंग करून सोनूशेट सावकाराच्या घरी गेला.

सोनूशेटला साधू व संन्यासी यांच्यावर फार श्रद्धा व भक्ती असे. त्यांच्या बोलण्या-वरही त्याचा फार विश्वास होता. त्याने ढोंगी साधूचा गौरव व सत्कार केला.

चोर आपल्या खोट्या दाढीवर हात फिरवीत म्हणाला–"तू माझी जी सेवा करीत आहेस त्याबद्दल मी तुझी करीन तेवढी वाखाणणी थोडीच म्हणावी लागेल. मी त्याबद्दल तुझं एक भलं करावे म्हणतो. तुझ्या घरी लवकरच एक मोठी चोरी होणार आहे. आपलं धन सुरक्षित रहावं असं तुला वाटत असेल तर ते सर्व कोण-त्यातरी पेटीत ठेवून तुझ्या परसातल्या पडक्या विहिरीत टाकून दे. एका महिन्यानी पुन्हां ती पेटी घरात आणून ठेव."

सोनूशेटने होकारार्थी मान हलविली. व साधू निघून गेल्यावर त्याविषयी बायको-जवळ बोलला. साधू, म्हणाला तसंच करण्याचा सल्ला तिने ही दिला.

सोनूशेटच्या घरात त्याच्याशिवाय आणखी कोणाला माहीत नसलेली एक गुप्त जागा एका भितीत होती. म्हणून पैसे चोरीला जाण्याची भीती त्याला असण्याचे कारण नव्हते. म्हणून त्याने आपले धन भितीत लपवून ठेवून एक रिकामी पेटी विहिरीत टाकून आणि त्या पेटीत सर्व पैसा अडका ठेवला असल्याचे बायकोला सांगितले.

सोनूशेटच्या बायकोच्या तोंडात कोणती-ही गुप्त गोष्ट रहात नसे. त्याने सर्व पैसा अडका विहिरीत एका पेटीत टाकून ठेवला असल्याची गोष्ट गावभर पसरली.



दुसऱ्याच दिवशी रात्री चोर आवाराची भित ओलांडून आला आणि सोनूशेटच्या विहिरीजवळ पोचतांच त्याला तिघेजण वादविवाद करीत असलेले दिसले. ते तिघे ही चोरच होते. सोनूशेटने आपला पैसा अडका विहिरीत टाकला असल्याचे ऐकून कोणाला सांगितल्याशिवाय एकेक करून तिथे निरनिराळे आले होते व त्यांचे भांडण चालू होते.

"मुळात मीच तर सोनूशेटला विहिरीत पैसा अडका टाकण्याचा सल्ला दिला होता!" चवथा चोर म्हणाला. नंतर त्याने इतर तिघांना समजावून सांगितले की भांडल्याने कोणाचाच फायदा होणार नाही, तिघांनी मिळून या पैशाचं काय करायचं हे मागाहून पहायचं.

"खूप पैसेवाला असल्या कारणाने सोनू-शेटने विहिरीत बरेच पैसे टाकून ठेवले असतील. आपण ते सारखेसारखे वांटून घेऊ या म्हणजे झालं!" असं त्यांच्यापैकी सर्वांत मोठा चोर म्हणाला.

या गोष्टीस सर्वांनी आपली सहमती दर्शविली. चोर बरोबर दोऱ्या घेऊन आले होते. त्यांपैकी एका दोरीच टोक विहिरीला लागून असलेल्या झाडाला बांधले व दुसरे टोक विहिरीत सोडले. ती दोरी धरून एक चोर विहिरीत उतरला.

विहीर बरीच खोल होती. आत पाण्या-वर एक पेटी तरंगत असलेली चोराला दिसली. त्याने दोरीच्या एका टोकाला ती पेटी बांधली व दोरी धरून वर चढून आला. नंतर चौघांनी मिळून ती पेटी बाहेर काढली.

पेटीला कुलूप लावलेले होते. एका चोराला कसले ही कुलूप असे द्या ते कसे उघडायचे यात प्रवीण होता. त्याने क्षणा-र्धात ते कुलूप उघडले. सर्वांनी उत्साहपूर्वक पेटी उघडली. त्या पाठोपाठ एक भूत पेटीतून बाहेर आले.



भुताला पाहतांच चौघांच्या छातीत धडकीच बसली.

"भ्यायचे कारण नाही रे, पोरांनो!" भूत म्हणाले.

त्यांना भीती वाटली की नाही कोण जाणे, पण एवढे खरे की, चोरांच्या पायात पळून जायची शक्तीच उरली नव्हती. भूत शांतपणे म्हणाले—"काल रात्री ही पेटी विहिरीत पडली. बरं झालं बुवा असे समजून मी तिच्यात शिरून झोपलो. प्रत्यु-पकार करणार आहे. बोला काय हवे ते!" भूत त्यांच्याकडे पहात म्हणाले.

ते ऐकून चोरांपैकी एकाला धीर झाला बोलायला. तो भुताला म्हणाला—"परंतु प्रथम हे सांग की तू कोण? या विहिरीत कां रहात होतास? आणि इतके दिवस या विहिरीतून बाहेर पडण्याचा प्रयत्न तू कां केला नाहीस?"

तो प्रश्न विचारणाऱ्या चोराकडे पहात भूत म्हणाले—"ती एक कथा आहे. चोर शब्दात सांगतो. सोनूशेटच्या आजोबांच्या काळात आम्ही त्यांचे शेजारी होतो. आमच्या आजोबांनी या विहिरीत पैसे लपवून ठेवले आहेत अशी किंवदंती होती. एक दिवशी रात्री कोणाला सांगि-तल्याशिवाय मी या विहिरीत उडी मारली. विहिरीत अगदी तळाला निधी होता. एक पेटीभर हिरे व माणिक्ये होती. पण ती घेऊन बाहेर कसे यायचे? मी तेथेच मेलो व भूत झालो. किती प्रयत्न केला तरी दहा फुटावर येणे शक्य झाले नाही. कित्येक वर्षे या विहिरीतच पडून होतो. इतक्या वर्षानंतर तुम्ही सर्वांनी मिळून मला बाहेर काढलंत! म्हणून तुमच्यावर प्रत्युपकार करावा म्हणतो आहे! हीच माझी कथा आहे!"

"तू आम्हांला कोणत्या स्वरूपाची मदत करू शकणार?" एका चोराने विचारले.

"तुम्हांला कोठूनही काही ही पाहिजे असेल तर ते मी आणून देऊ शकेन." भूत म्हणाले.

"तरमग विहिरीतला ठेवा तू आणू शकशील का?" एका चोराने विचारले.

"तुम्ही विहिरीत उतरून निधी ठेवला आहे ती पेटी दोरीने बांधा. ती किती जड असली तरी ती मी काढू शकेन!" भूत म्हणाले.

विहिरीत निधी खराच आहे की खोटा हे पाहून घ्यावं म्हणून एक चोर विहिरीत उतरला व त्याने बुडी मारून शोधून पाहिले. त्याला एक मोठी पेटी हाताला लागली. त्याने ती पाण्यावर काढून पाहिली तर त्यात हिरे माणिक्ये भरलेली होती व चकाकत होती. त्याला एकट्याने ती पेटी उचलून पाण्यातून बाहेर काढणे जमले नाही.

तो चोर दोरी धरून विहिरी बाहेर आला व त्याने विहिरीत पाहिले ते इतर तिघांना सांगितले. भूत कितीही वजनदार वस्तू असली तरी विहिरी बाहेर काढू शकेल म्हणून चौघांनी विचार केला की चौघांनी विहिरीत उतरून ती पेटी पाण्याबाहेर काढून तिला दोरी बांधायची.

चौघे चोर त्याप्रमाणे विहिरीत उतरू लागले. तेव्हां भूत म्हणाले—"एक हिरा विकून जी किंमत येईल त्या रकमेवर तुम्हां सर्वांचे जीवित आयुष्यभर सुखाने चालेल!



मग त्या पेटीतले सर्व-हिरे व माणिक्ये काढण्याची गरजच काय?"

"पैशाची चव तुला काय रे कळणार? ते पहात राहिले तर युगे क्षणासारखी निघून जातात!" चोर म्हणाले.

चौघेही विहिरीत उतरतांच भुताने दोऱ्यांचे तुकडे तुकडे करून टाकले व म्हणाले—"तुम्हांला लोभ फार, म्हणून मी तुम्हांला सांगितले ते ऐकले नाहीत. म्हणून मी आपल्या वाटेने निघून जातो आहे. तुम्ही तुमची गती काय आहे ती तुम्हीच पहा!" असे सांगून तळ्याच्या काठी जे ताडाचे वन होते तिकडे भूत निघून गेले.

जे घडले त्यावर विचार करून चारही चोर घाबरून गेले. विहिरीत त्यांना एवढा मोठा ठेवा सापडला असूनही तो काढून बाहेर यायचा उपाय त्यांना सुचेना.

"आपण भुताने सांगितलेला सल्ला ऐकला नाही व या संकटांत सापडलो. आतां कोणीतरी येऊन आपल्याला सहाय्य केल्याशिवाय बाहेर निघणे शक्य नाही. नाहीतर आपणही भूत होऊन जाणार." असे त्यांच्यातला सर्वात मोठा चोर म्हणाला.

त्यानंतर लगेच ज्या चोराने सोनूशेटला सर्व धन विहिरीत टाकून द्यायचा सल्ला दिला होता, तो अंगातली सर्व शक्ती एक वटून ओरडला–"वांचवा, हो! वांचवा!"

तो आवाज ऐकून सोनूशेटबरोबर जवळपासचे इतर लोकही विहिरीजवळ धावून आले. त्यांनी विहिरीत वांकून चोरांना पाहिले आणि म्हणाले–"काय रे, तुम्ही या पडक्या विहिरीत उतरलातच कशाला? प्रथम हे खरे खरे सांगा. नाहीतर तुम्हांला बाहेर काढणार नाही!"

लगेच सर्व चोर म्हणाले–"अहो, येथे मोठी निधी ठेवलेली एक मोठी पेटी आहे!" तुम्ही विहिरीत दोरखंड सोडलेत म्हणजे ते धरून बाहेर येऊ."

सांठा असल्याची गोष्ट ऐकतांच तेथे जमलेल्या पैकी एकजण धावत जाऊन गाव प्रमुखाला बोलावून घेऊन आला. त्याने सांगितल्याप्रमाणे दोरखंड सोडून चोरांना बाहेर काढले. त्यांनी आणलेला पेटीतला ठेवा पाहून सर्व लोक थक्क झाले

सोनूशेट त्या ठेव्याकडे लोभीपणाने पहात काही म्हणणार, इतक्यात गांवप्रमुख म्हणाला–"हा निधी सर्व गावाच्या मालकीचा आहे. या गावाची सुधारणा करण्यासाठी या निधीचा उपयोग करू या. चोरांना कोणती शिक्षा करावयाची, याचा विचार मागाहून करू. सांठा असलेला निधी व चोरांना गावाच्या मुख्य कचेरीवर घेऊन या." असे सांगून तो निघाला.






[१३]

[नरवाहन व भिल्लांच्या मध्ये झालेल्या युद्धात नरवाहनच्या सैन्याने भिल्लांच्या नायकांचा वध केला आणि पडका किल्ला सर केला. शिवदत्त आपल्या अनुयायांसह समुद्र मार्गे निघाला. वाटेत त्याला मंदरदेव भेटला. काही अंतरावर त्यांना दिव्यांचा उजेड दिसला. त्या दिशेने त्यांचे पडावे निघाले. पुढे–]

डोळे रोखून तीक्ष्ण दृष्टीने पाहिले तरी काही दिसणार नाही अशा त्या दाट अंधारात मंदरदेव व शिवदत्त होते ती दोन्ही जहाजे तो प्रकाश दिसत होता त्या दिशेने चालू लागली. गेले दोन तीन दिवस झोप नाही, काही खायला नाही अशा स्थितीत त्या महासागरावर ते दोघे आपल्या सहा अनुयायांसह जात होते. अर्थातच ती जहाजे मंदगतीने चालत होती.

"शिवदत्ता, मला कमालीची भूक लागली आहे रे!" असे म्हणत मंदरदेव शिवदत्ताकडे पाहून पुढे म्हणाला–"आपले अनुयायी ही त्याच स्थितीत आहेत. तो उजेड दिसतो आहे, ते कोणते तरी बेट असावे, यात मला तरी कोणतीच शंका नाही. परंतु तेथे आपल्या सारखे सभ्य लोक राहण्यालायक आहे की नाही हेच पहावयाचे आहे."



"माझ्या मनात सुद्धां तीच शंका आहे!" असे म्हणत शिवदत्त थोडा हसत पुढे म्हणाला–"कोठेतरी कसेतरी पोट भरणे हेच आपल्या आयुष्यात लिहिलेले नाही ना, असा एक विचार मनात येऊन जातो. तुम्ही मराळ राज्याचे पदच्युत महाराज. मी सेनापती समरसेनाचा एक अनुयायी! आपण एक क्रूर व भयंकर अशा एकाच व्यक्तीच्या मुळें या दाट अंधारात पुढे भविष्य दिसत नसतां समुद्रात भटकत आहो!"

शिवदत्त म्हणाला त्याचे उत्तर मंदरदेवाने काहीच दिले नाहीत त्याच्या मानस पटलावर मराळ द्वीप तेथील प्रजा आणि तो आपले राज्य कसें घालवून बसला, ते घटनाचक्र सर्वं एकाएकी येऊन नाचू लागले. आणि तो विचारमग्न झाला.

"शिवदत्ता, तुम्ही म्हणालात त्या गोष्टी माझ्या लक्षात आल्या. किती भयंकर असले तरी त्या बेटावर पाऊल टाकायला मी भीत नाही. शिवाय माझ्या जिवात-जीव असे पर्यंत मी नरवाहनने माझ्याशी केलेली लबाडी मी कदापि विसरणार नाही. परत आपले राज्य मिळविण्यासाठी मी आपले सर्वस्व पणाला लावणार आहे!" मंदरदेव म्हणाला.

मंदरदेव म्हणाला ते ऐकून शिवदत्ताला अत्यानंद झाला. नरवाहनने त्याच्याशी जो दगा केला तो विसरणे त्याला शक्य नाही, हे त्याने ओळखले. तो काही बोलणार तितक्यात वल्हवणारे एकदम मोठ्याने ओरडले.

"हा सगळा प्रदेश डोंगराळ व खडकाळ आहे. आपण कोणत्या तरी बेटावर येऊन पोंचलो आहो. या काळोखात हे खडक चुकवून जहाजं पुढे नेणे शक्य नाही."

शिवदत्ताने जहाजे आहेत तेथेच थांबवायला सांगितले. त्याने लक्षपूर्वक समोर पाहिले तेव्हां त्याला सर्व किनाराभर, बेटावर गडद झाडी दिसली. आपण कोणत्या तरी द्विपावर पोंचलो आहो, त्यांत शंका नाही. परंतु खडकांतून वांचवून पडाव किनाऱ्यावर नेणें मात्र शक्य नाही. असे तो म्हणाला.

तो सर्वं प्रदेश–समुद्रातून बाहेर वर आलेल्या पर्वत शिखरांनी भरलेला दिसला. लाटांच्या मुळे वहात जाऊन पडाव कोणत्यातरी खडकांवर आदळून फुटण्याची शक्यता सुद्धा होती.

शिवदत्त म्हणाला–"मंदरदेवा, आपला समुद्रप्रवास संपला समोर एक रांगेने झाडंच-झाडं दिसत आहेत का? या काळोखात खडकां मधून धोक्याशिवाय आपल्या नावा किनाऱ्याला लावणे शक्य नाही, असे मला वाटते.

"म्हणजे, सूर्योदय होईपर्यंत आपण येथेच वाटपहात रहावयाचे आहे?" मंदरदेव विचारू लागला.

शिवदत्त मान हलवून म्हणाला–"ते ही बरोबर होईलसे मला वाटत नाही. समजा, हे बेट जंगली जातीच्या क्रूर माणसांचे असेल तर ते आपल्याला दिवसा ढवळ्या आपली शिकार करायला मागे पुढे पाहणार नाहीत. म्हणून आपण उजाडायच्या आत किनाऱ्यावर जाऊन तेथील परिस्थिती कशी आहे, हे पाहून समजून घेणे बरोबर होईल. यदा कदाचित आपल्यावर कोणी चालून येत असल्याचे आपल्याला आढळले तर काळो-



खात पळ काढून निसटून येणे जास्त सोपे आहे."

शिवदत्ताचा सल्ला मंदरदेवाला सुद्धा पसंत पडला. म्हणून दोन्ही नावा खडकांना बांधून ठेवायचे ठरले व किनाऱ्यापर्यंत न नेतां किनाऱ्यापासून दूर काही अंतरावरच ठेवण्यात आल्या. आतां किनाऱ्यावर जायचे म्हणजे पुरुषभर पाण्यात पोहोतच किनाऱ्यावर जायचे. किनाऱ्यावर मोठमोठ्या लाटा येत होत्या. म्हणून किनाऱ्यापर्यंत पोहोत पोचणे सुद्धा धोक्याचे आहे, हे सर्वांना कळत होते.

काही वेळ विचार विनिमय करीत राहल्यावर सर्वांनी कंबरा बांधल्या व

पाण्यात उड्या घेतल्या. मोठमोठ्या लाटा त्यांना खडकावर ढकलून ठार करणार की काय, अशी नित्य भीती वाटत होती. म्हणून फार सावधगिरी बाळगून हुशारीने सर्वजण पोहोत किनाऱ्यावर आले. ओले कपडे काढून एका बाजूला ठेवले व गाठोड्यात बांधून आणलेले कोरडे कपडे त्यांनी अंगात घातले. तरी सर्वजण थंडीमुळे थरथर कांपत होते.

"या थंडी पासून वांचायचं म्हणजे शेंकोटी करून शेक घेणे हा एकच उपाय आहे. तर मग वाळक्या काटक्या व पाचोळा गोळा करू म्हणतां का?" एका सैनिकाने शिवदत्ताला विचारले.

"करा, करा! होऊ दे जाळ. या बेटावर नरमांस खाणारे जंगली लोक रहात असले तर याच शेकोटीत आपणां सर्वांना भाजून ते खातील!" असे म्हणत शिवदत्त जोराने हसला.

"आपल्या सर्वांच्या हातात तलवारी व धनुष्यबाण–" असे काही मंदरदेव म्हणतच होता, तेवढ्यात शिवदत्ताने त्याला अडविले व म्हणाला–"मंदरदेवा! तुम्हांला असल्या बेटांची माहिती व त्यांवर राहणाऱ्यां रानटी जातीच्या लोकांच्या राहणीची माहिती मुळीच दिसत नाही. हे जंगली लोक कसे असतात याची माहिती नसल्यामुळे तुम्ही असे बोलतां आहां! तुमची त्यांच्यापैकी एखाद्याला कापील त्या पूर्वीच ते पाठी मागून येऊन पांच सहा जणांना गारद करतील.

मध्यंतरी सैनिकांनी काटक्या पाचोळा गोळा केला आणि शेकोटी पेटविली. सर्व शेकोटी भोवती बसून शेक घेऊ लागले. शिवदत्ताच्या मनात विचार चालू होते– आपण कशा तऱ्हेच्या बेटात येऊन पोंचलो आहो? आपल्यावर कशा स्वरूपाची संकटे ओढविण्याची शक्यता आहे? मंदरदेवाच्या मनात तशातऱ्हेचे विचार येतच नव्हते. सूर्योदय झाला तर त्या प्रकाशात हे बेट कसे आहे, हे स्पष्ट होईल असे त्याला वाटत होते.

अशा परिस्थितीत कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज सर्वांना ऐकू आला. शिवदत्तासह सर्वजण एकाएकी दचकले आणि कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज आला होता त्या दिशेला पाहू लागले.

मंदरदेव सुद्धा त्या दिशेने काही वेळ पहात राहल्यावर शिवदत्ताकडे वळून म्हणाला.

"शिवदत्ता, आपल्याला भीती वाटत होती तसे हे बेट असभ्य जंगली जातीच्या लोकांची वस्ती असलेले असावेसे मला नाही वाटत कुत्री पाळणे व त्यांच्या उपभोग करून घेणे हे सभ्य लोकांचेच एक लक्षण आहे!"

"मंदरदेवा! तुमची ही फार चुकीची समजूत आहे!" असे म्हणत शिवदत्त थोडा हसला. "मी स्वत:च्या डोळ्यांनी





चित्त्यांना कुत्र्यांसारखे पाळणारे लोक पाहिले आहेत. ते त्यांचा उपयोग शिकार करण्यासाठी करतात. ती गोष्ट मी तुम्हांला नुकतीच सांगितली होती, नाही का? आतां आपण कुत्र्याचे भुंकणे ऐकलं ते एखाद्या जंगली जातीच्या कुत्र्याचं ही असू शकेल. सूर्योदय झाल्यावरच..."

शिवदत्ताचे ते वाक्य पुरे व्हायच्या आंतच झाडाच्या फांद्याना चाटून एक मोठा दगड जोराने येऊन शेकोटीच्या समोर शेक घेत असलेल्या एका सैनिकाच्या पाठीत बसला. तो दगड लागताच तो सैनिक मोठ्याने कळवळून ओरडला व तोंडघशी पडला. लगेच मंदरदेवाने एक बाण धनुष्यावर चढवून दगड आला त्या दिशेला सोडला.

तत्क्षण शिवदत्ताला सुद्धा भयभीत करून सोडणारी माणसाची किंकाळी ऐकू आली सर्वजण परस्परांची तोंडे थक्क होऊन पाहू लागले. ते बेट निर्जन नाही तर! या बेटावर क्रूर मानवजातीचे जंगली रहात आहेत तर! त्याचे प्रमाण म्हणूनच तो माणसाची किंकाळी त्यांना ऐकू आली होती.

मंदरदेव तलवार उपसून पुढे निघाला व इतरांना त्यांच्याबरोबर पाठीमागून यायला त्याने खूण केली. परंतु शिवदत्त त्याला



अडवून म्हणाला—"मंदरदेवा! आपण करीत आहां ते काय फार धोक्याचे आहे. एकतर काळोख आहे आणि ही जागा आपल्या परिचयाची नाही. कोणत्या झाडावर कोणत्या झाडीत कोणता धोका दडून बसला आहे, आपल्याला माहीत नाही." तरी आपण न जाणे योग्य.

"तो दगड फेकणारा कोणी ही असो त्याला माझा बाण लागला आहे. माझा बाण लागताच त्याने कशी किंकाळी फोडली? यदा कदाचित तो अजून जिवंत असेल तर त्याच्याकडून या बेटावरची बरी-वाईट परिस्थिती विचारून घेतां येईल!" मंदरदेव म्हणाला.

शिवदत्ताला मंदरदेव म्हणाला ते मुळीच पटले नाही. आताच्या परिस्थितीत तुमचा बाण लागून तो जखमी अजून जिवंत आहे की मेला, जिवंत असला तर तेथेच पडून आहे की पळून गेला आहे, हे आपल्याला माहीत नाही. तो एकटाच आहे की त्याच्या बरोबर आणखी लोक आहेत, ते किती आहेत. आपल्याला कल्पनेनेही कळणे शक्य नाही. म्हणून मी म्हणतो की सूर्योदय होई-पर्यंत थोडी काळजी घ्यावी व आपण आहो ती जागा सोडून कोठे न जाणेच श्रेयस्कर होईल, असे मला वाटते."

शिवदत्त म्हणाला ते बरोबर असल्या बद्दल सर्वांनी होकारार्थी माना हलविल्या. त्यानंतर काही लोक जे पेंगत होते, ते झोप-ण्याच्या तयारीला लागले. शिवदत्त एकटा एका सैनिका बरोबर पाहारा देत जागा राहिला.

पूर्वेकडे अरुणोदयाची वेळ झाली आणि आकाशावर लाली दिसू लागली. तोंपर्यंत कोणतीही उल्लेखनीय घटना घडली नाही.

चांगले उजाडल्यावर मंदरदेवाने व इतर सैनिकांनी डोळे उघडून पाहिले. ते होते तो प्रदेश म्हणजे एक दाट अरण्य असल्याचे त्यांना स्पष्टच दिसत होते. गगनचुंबी वृक्ष व त्यांच्या बुंधाजवळ वाढलेली झाडे झुडपे आणि त्यांच्यावर उड्या मारणारी माकडे आणि निरनिराळे आवाज काढणारे पक्षी पाहून सर्वांच्या मनात भयाबरोबर उत्साह ही वाढत होता. सर्वजण आश्चर्याने इकडे तिकडे पाहू लागले.

"मंदरदेवा, आतां आपण रात्री सोडलेले काम सुरू करायला हरकत नाही. तुमचा बाण कोणत्या दिशेने जाऊन कोठवर गेला असेल व किंकाळी फोडणारा आहे की नाही हे तुम्हांला नक्कीच आतां सांगतां येईल, नाही का?" शिवदत्त म्हणाला.

मंदरदेव पुढे निघाला. वाटेतल्या झाडा-झुडपांतून वाट काढीत सर्वजण शे दोनशेच पावले चालून आले असतील, त्यांना तेथे पाल्या पाचोळ्यावर रक्ताचे डाग दिसले.

(क्रमशः)



# योग्य सेनापती

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुझा निश्चय व कार्य-सिद्धीसाठी तुझ्या मनातील निष्ठा पाहिली तर तू कोणी ज्ञानसंपन्न व कसा पंडित आहेस, हे समजून घ्यायचे कुतूहल मला वाटतं आहे. तू एखाद्या मोठ्या राजासाठी किंवा कोणत्या तरी मोठ्या चक्रवर्तींच्या आज्ञा पालनार्थ तू इतकी मेहनत करीत असशील तर कार्यसिद्धी अनुकूल झाल्यानंतर ते तुझ्या शक्ति सामर्थ्याचा कसा अंदाज लावतील हे सांगणं कठीण आहे. अशा बाबतीत प्रथमच सावध राहण्यासाठी तुला सूचना म्हणून तुला वीरकेतू व अमरसेन या नांवाच्या दोघां क्षत्रिय तरुणांची गोष्ट

सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पुष्पक नावाच्या देशाचा गरुडवर्धन नावाचा एक राजा होता. त्याच्या वडिलांच्या काळापासून सैन्याचा प्रमुख व हेरखात्याचा प्रमुख म्हणून अनुक्रमे प्रचंडसेन व बलवतवर्मा नावाचे दोघे वृद्ध झाले तेव्हां त्या पदावर दोघां योग्य व्यक्तीस नेमण्याचा विचार राजाच्या मनात आला.

राजाने चवकशी केली तेव्हां दरबारची नोकरी करीत असलेले वीरकेतू व अमरसेन दोघे बहादूर व विश्वासपात्र तरुण असल्याचे कळले. गरुडवर्धनने त्या दोघांपैकी कोणाला कोणत्या पदावर नेमावे या विषयी आपले प्रधान मुकुंद वर्मा यांचा सल्ला घेतला.

प्रधान म्हणाला–"महाराज, वीरकेतू व अमरसेन दोघां तरुणांना सहा सहा महिने नेमून पहावे, ते ज्या योग्य असतील त्या पदावर नेमावे. वीरकेतू सेनापतीच्या पदावर काम करील. तेवढा काळ अमरसेन हेरांचा प्रमुख म्हणून काम करील. सहा महिने झाल्यावर अमरसेनला सेनापतीच्या पदावर नेमावे आणि वीरकेतूला हेरांच्या खात्याचा प्रमुख म्हणून नेमावे. आपापल्या पदावर काम करीत असतां दोघांची जी योग्यता दृष्टोत्पत्तीस येईल त्याप्रमाणे दोघांना योग्य त्या पदावर कायम करावे." गरुडवर्धनला तो सल्ला पसंत पडला. त्याने वीरकेतूला बोलाविले आणि सहा महिने सेनापती म्हणून काम करण्यास आज्ञा केली. त्याच प्रमाणे राजाने अमरसेनला बोलावून त्याला हेरखात्यांचा मुख्य अधिकारी नेमले.

वीरकेतू सेनापती झाल्यावर त्याने पहिले काम केले ते त्याने आपलं घोडेस्वारांचे सैन्य व गजसैन्य वाढविले आणि युद्ध चालू असतां व्यूह रचना व युद्धातील डांवपेंच हे जुन्या काळापासून चालत आले होते त्यांत बदल करून काही परकीय पद्धती अवलंबिल्या. त्याच सुमारास गांधार, कामरूप प्रदेशातील घोडे, हत्ती, वगैरे उत्तम प्रतीचे निवडून आणविले. शिवाय परदेशातून अत्याधुनिक शस्त्रास्त्रे व इतर युद्ध सामुग्री चांगल्या व्यापाऱ्यां करवी मागविली.

सहावा महिना संपतांच त्याच्या सेनापतित्व पदावरील नेमणुकीचा अवधी संपला. गरुडवर्धन राजाने त्याला हेरांच्या खात्याचा मुख्य अधिकारी म्हणून नेमले. त्याप्रमाणे अमरसेनाला हेरांच्या खात्याच्या अधिकार पदावरून बदलून सेनापती पदावर नेमले.

अमरसेनाने सेनापती पदावर येतांच परदेशांतून घोडे, हत्ती वगैरे आणावयाचे बंद केले. शस्त्रास्त्रे, व युद्ध सामुग्रीसुद्धा परदेशातून आणायचे बंद करून युद्ध पद्धतीत सुरु केलेली नवी धोरणें बंद करून पुन्हां जुन्या पद्धतींवरच अवलंबून रहायचे ठरविले. कोणत्याही परिस्थितीत परदेशांचे अनुकरण करणे म्हणजे स्वदेशाची मान खाली करण्यासारखं आहे असे त्याचे ठाम मत होते.







तो सेनापती होऊन जेमतेम तीन महिने लोटले असतील, पुष्पक राज्यावर शेजारच्या जयपूर राज्याच्या अधिपतीने स्वारी केली. अमरसेनाने शौर्याने व फार चातुर्याने युद्ध करून जयपूरच्या सैन्याला पळवून लावले.

तो सेनापती पद संभाळून आणखी एक महिना लोटला असेल नसेल विदर्भ राजाने पुष्पक देशावर स्वारी केली. विदर्भ देशाचे सैन्य पुष्पक देशात शिरले. भयंकर युद्ध झाले. सैन्याचे फार मोठे नुकसान झाले असले तरी अमरसेनाच्या पराक्रमामुळे व त्याने दर्शविलेल्या चातुर्यामुळे पुन्हां पुष्पक देशच विजयी झाला.

हे सर्व झाल्यावर प्रधान मुकुंद वर्मा राजाच्या दर्शनाला गेला व म्हणाला–"महाराज, वीरकेतू व अमरसेन या दोघांना आपण जो सहा सहा महिन्यांचा अवधी दिला होता तो सोडून न देऊन आपण वीरकेतूलाच सेनापती पदावर तावडतोब नेमावे. तोच त्या पदावर काम करण्यास सर्व तऱ्हेने योग्य आहे."

"मला देखील तसेच वाटत आहे. एवढ्यात आपल्यावर दोघे शत्रू चालून आले. आतां गौरदेशाच्या राजाने यापुढे आपल्यावर स्वारी केली तर अमरसेनाच्या हाती तो आपले प्राण गमावून बसेल. परंतु तसे झाल्याने आपण निश्चिंत झालो असे मानणे बरोबर होणार नाही." असे म्हणत राजा थोडा हसला ही.

त्यानंतर एक आठवडा देखील लोटला नाही आणि एका चांगल्याशा मुहूर्तावर राजाने वीरकेतूला सेनापती म्हणून व अमरसेनाला हेरांच्या खात्याचा मुख्य अधिकारी म्हणून नेमून त्यांना मोठमोठी बक्षिसेही दिली आणि त्यांचा सत्कार केला. त्यांची त्या पदावर नेमणूक केली.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून राजाला विचारले–"राजा, अमरसेनाने त्याच्या देशावर चालून आलेल्या दोन दोन स्वाऱ्या यशस्वीपणाने परतवल्या आणि सेनापती म्हणून स्वतःची योग्यता सिद्ध करून दाखविली होती, नाही का? तर मग गरुडवर्धन राजाने त्याला सेनापती पदावर कायम न करतां वीरकेतूला सेनापती पद देऊ केले हा त्याचा अविवेकीपणा म्हणावयाचा की फक्त ती त्याची द्वेषबुद्धी म्हणावयाची?"

विक्रमादित्य म्हणाला–"राजांत तू म्हणालास तसा एकही दुर्गुण नव्हता. उलट तो फार विवेकशीलच व राजनीति निपुण होता म्हटल पाहिजे. सेनापतीत फक्त देशभक्ती व देशाभिमान असला म्हणजे पुरत नाही. त्याची नजर सतत शेजारच्या राज्यातील सैन्यशक्ती व शस्त्रास्त्र शक्तीवर असावी लागते. शत्रूपेक्षा आपल सैन्य जास्त सुशिक्षित व उत्तमोत्तम शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असावे लागते. वीरकेतू तसाच सर्वदा सावध राहणारा होता. म्हणून तो सेनापती असेपर्यंत इतर देशांच्या राजांने पुष्पक देशावर वांकडी नजर फिरवायची हिंमतच होणे शक्य नाही. अमरसेन सेनापती झाल्यावर याच्या ठीक विरुद्ध गोष्ट घडली. म्हणून पुष्पक देशाच्या सैन्याची भीती न बाळगून इतर सैन्य स्वारी करायला धजली. युद्धात नुकसान सहन करून कसा तरी जय मिळविण्यापेक्षा, मुळांत शत्रूची हिंमतच न होण्यालायक परिस्थिती निर्माण करण्याचे शक्ति सामर्थ्य असणारा वीरकेतूच योग्य सेनापती अमरसेन त्या बाबतीत अयशस्वी ठरला. तरी अमरसेनात जी देशभक्ती व देशभिमान दिसला त्याला अनुकूल असे हेरांच्या खात्याचे मुख्य अधिकाऱ्याचे पद होते. म्हणून त्याला ते दिले, तेव्हां दोघांना योग्य स्थानीच नेमणूक मिळाली. त्यात दुष्ट बुद्धी वगैरे व अविवेक वगैरे दुर्गुणांचा प्रश्नच उद्‌भवत नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व पुन्हां प्रेतासह झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# विदूषकाचे प्रश्न

उज्जयनीचा राजा माधव वर्मा याच्या दरबारात फार प्रसिद्ध असे विद्वान पंडित अनेक होते. एकदां दरबार भरला असतां काशाची घंटा वाजवीत एक मध्यम वयाची व्यक्ती दरबारात प्रवेश करती झाली.

कोणत्याही प्रकारचे निमंत्रण वगैरे नसतां दरबारात आलेल्या त्या व्यक्तीकडे आश्चर्याने राजा पाहू लागला, तेव्हां ती व्यक्ती म्हणाली–"महाराजा माझे नाव सोमशेखर, मी कलिंग देशाचा राहणारा आहे. गेली दहा वर्षे देशाच्या काना-कोपऱ्यात फिरत मी अनेक दरबारातील पंडितांचा शास्त्रार्थ करून पराभव केला आहे. आपल्या दरबारात थोर पंडित असल्याचे ऐकून येथे आलो आहे."

राजा माधववर्माने आपल्या दरबारांतील पंडितांकडे एकदां पाहिले व सोमशेखरला म्हणाला–"आपण म्हणालात त्या शास्त्रार्थाचे नियम व रीत काय? तें सांगावे!" आम्हांला कळावे हे बरे.

"कोणीही सुशिक्षित असो की अशिक्षित मला कोणताही प्रश्न विचारावा, मी त्या प्रश्नाचे सयुक्तिक उत्तर देऊ शकलो नाही, तर मी ही काशाची घंटा फोडून टाकून प्रश्न विचारणाऱ्या व्यक्तीची आयुष्यभर दास म्हणून चाकरी करीन. तसे न होतां प्रश्न विचारणारी व्यक्ती हारली तर तिने माझ्या पायांवर मस्तक ठेवून मी मोठा पंडित असल्याचे मान्य केले की पुरे!" सोमशेखर म्हणाला.

राजसभेतील पंडितांनी ती अट मान्य केली.

त्यानंतर सोमशेखरला पंडितांना षड्शास्त्रातील अनेक प्रश्न विचारले. सोमशेखरने सर्व प्रश्नांची बरोबर उत्तरे देऊन त्या सर्वांचा पराभव केला व आपण सर्व पंडितांच्या पेक्षा विद्वान आहोत हे सत्य पटवून दिले.



आपल्या दरबारी पंडितांचा अशातऱ्हेने पराभव झालेला पाहून राजा चिंतामग्न झाला. कारण त्याला आपल्या दरबारांतील पंडितांच्या विद्वत्तेबद्दल फार अभिमान वाटत असे.

सोमशेखरने आपल्या विजयाची सूचक म्हणून घंटा वाजविली व घमेंडीत म्हणाला–"महाराज, माझे शास्त्रार्थाचे नियम व रीत वगैरे मी पहिल्यानेच निवेदन केले होते. आपल्या दरबारातील सर्व पंडित पूर्णपणे पराभूत झाले आहेत, आणखी एका दर-बारात जायची मला घाई आहे, तेव्हां आपल्या दरबारातील पंडीतांनी माझ्या पायावर नतमस्तक व्हावे. तेथील पंडि-तांच्या माना अपमानानें खाली झाल्या. ते सोमशेखरच्या पायांवर आपले मस्तक ठेवण्या साठी पुढे होऊ लागले तेवढ्यात दरबारातील विदूषक पुढे येऊन सोमशेखरला म्हणाला–"मी पंडित किंवा विद्वान नाही, सामान्य मूर्ख नागरिक आहे. माझ्या प्रश्नांचे आपण उत्तर द्याल का?"

सोमशेखर स्मित करून म्हणाला–"तू पंडित नाहीस, हे तुझ्या वेषभूषेवरूनच कळत आहे! मी महाराजाजवळ प्रथमच निवेदन केले होते की तशा मूर्ख लोकांच्या प्रश्नांचे उत्तर ही मी देईन! तसे झाले नाही तर आयुष्यभर त्याच्या पायाजवळ चाकरी करीन!"

"तर मग, माझा प्रश्न ऐका! दोघे मूर्ख वाटेने जात असतां गटारीत पडले. एकाच्या आंगभर चिखल लागला. आणखी एकाला मुळीच लागला नाही. त्यांच्या-पैकी कोणी आंघोळ केली?" विदूषकाने विचारले.

"आंगभर चिखल लागला, त्यानेच केली!" सोमशेखर म्हणाला.

"नाही, मी पाहिल्यानेच सांगितले होते ना की दोघे मूर्ख होते! आंगभर चिखल

लागला तो दुसऱ्याकडे पाहून आपल्या अंगाला चिखल लागला नाही असे मानतो आणि समोरच्याच्या अंगाला चिखल लागलेला पाहून दुसरा आंघोळ करतो!" विदूषक म्हणाला.

ते उत्तर सयुक्तिक असल्या कारणाने सोमशेखर निरुत्तर झाला.

विदूषकाने उत्साहपूर्वक आणखी एक प्रश्न विचारला—"दोघे हुशार मित्र वाटेने जाताना रस्त्याच्या काठावरच्या गटारीत पडले. एकाच्या अंगाला चिखल लागला. दुसऱ्याच्या अंगाला लागला नाही. त्यांच्या पैकी कोणी चिखल काढून टाकण्यासाठी स्नान केले?"

विदूषकाने विचारलेला पहिला प्रश्न आठवून सोमशेखर म्हणाला—"अंगाला ज्याच्या चिखल लागला नाही त्याने!"

विदूषक खदखदा हंसून म्हणाला—"मी पहिल्यानेच सांगितले होते की ते दोघे हुशार व बुद्धिमान होते, म्हणून! त्यामुळे चिखल ज्याच्या अंगाला लागला होता त्यानेच आंघोळ केली!"

राजसभेत हजर असलेल्या सर्वांनी आनंदाने टाळ्या वाजविल्या. आपण दुसऱ्यांदा हारल्याचे पाहून त्याचा गर्वभंग झाल्यामुळे किंकर्तव्यविमूढ होऊन इकडे तिकडे पाहू लागला.

विदूषक त्याच्याजवळ जाऊन म्हणाला—"दोघे मित्र वाटेने जात असतां रस्त्याच्या बाजूच्या गटारीत पडले तर एकाच्या अंगाला चिखल लागला व दुसऱ्याच्या अंगाला मुळीच लागला नाही हे म्हणणे किती वेडेपणाचं आहे, हे तुमच्या सारख्या घंटा वाजवून विद्वत्तेची ग्वाही देणाऱ्याच्या लक्षात येऊ नये, हे कसं काय?"

सोमशेखरने विदूषकाच्या पायांजवळ आपली घंटा नम्रपणे ठेवून दिली.

राजा माधववर्माला त्याचा आणखी जास्त अपमान करणे रास्त होणार नाही असे वाटले व त्याने सोमशेखरला दरबारातून जायला परवानगी दिली.





# आंधळा न्याय

बगदाद शहरात तिघे आंधळे भिकारी परस्परांबरोबर राहून काळ कंठीत होते. ते तिघे दिवसभर भिक्षा मागत फिरत व जी मिळकत होई तिच्यातील पोटापुरता खर्च करून बाकी रक्कम ते रहात त्या घरात एका जागी सुरक्षित ठेवून देत, अशा तऱ्हेने त्यांनी बाराशे दीनार जमविले.

एकदां त्यांच्यापैकी एकाने एका गल्लीत जाऊन एका घराच्या दाराची कडी वाजविली.

घरातून घरमालकाने विचारले—"कोण आहे?" परंतु आंधळ्याने उत्तर दिले नाही व पुन्हां दाराची कडी वाजविली. आपण भिकारी असल्याचे सांगितले तर घरातले लोक दार उघडल्या शिवायच "आतां काही नाही, जा!" म्हणतील ही गोष्ट आंधळ्या भिकाऱ्याला चांगली माहीत होती.

घरमालकाने "कोण ते?" असे दोनदां विचारले तरी उत्तर न आलेले पाहून दार उघडले व समोर आंधळ्या भिकाऱ्याला पाहून विचारले—"कोण तू?"

"मी आंधळा आहे, मालक! मेहरबानी करावी गरिबावर" आंधळा म्हणाला.

लगेच घरमालकाने हात पुढे करून भिकाऱ्याचा हात धरला व म्हणाला—"माझा हात धरून आत ये!"

आपला डाव साधला, असे वाटून भिकारी घर मालका बरोबर वाड्यात जिना चढून तिसऱ्या मजल्यावर गेला.

"येथे बसून तू तुला काय हवं ते सांग" घर मालक भिकाऱ्याला म्हणाला.

"भुकेने जीव कासावीस झाला आहे. दोन घास जेवायला वाढलेत तरी चालेल. नाही तर चार पैसे दिलेत तरी चालेल." भिकारी म्हणाला.










"अस्सं! येथे काही नाही. तू पुढल्या घरी जा." घर मालक त्याला म्हणाला.

"या कृपेसाठी इतक्या पायऱ्या चढून याव्या लागल्या ना मालक? ही गोष्ट आपण खालीच सांगितली असतीत तरी चालले असते." भिकारी म्हणाला.

"मीं तुला कितिदां विचारले की "कोण?" पण तू उत्तर कां नाही दिलेस?" घर मालकाने रागाने विचारले.

"बर तर आतां आपला काय हुकूम आहे?" भिकाऱ्याने परत विचारले.

"तुला द्यायला माझ्याजवळ फुटकी कवडी सुद्धा नाही! जास्त बड-बड न करतां चालू लाग!" घरमालक म्हणाला.

"तर मग मला खालपर्यंत पोंचवा" भिकारी म्हणाला.

"मला एवढेच काम आहे का? आपल्या वाटेने तूच जा कसा!" घरमालक म्हणाला.

भिकारी श्वास सोडून उठला चांचपडत जिन्याजवळ गेला. जिना अर्धा उतरून गेल्यावर त्याचा पाय चुकला व त्याचा पाय मुरगळला. बिचारा कसाबसा उठला आणि जिना उतरून लंगडत कण्हत कसा-तरी रस्त्यावर आला.

बरोबर त्याच वेळी उरलेले दोघे आंधळे भिकारी समोर आले. तिसऱ्याला त्याच्या कण्हण्याच्या आवाजावरून ओळखून जवळ येऊन त्यांनी विचारले—"कायरे झाले?"

पाय मुरगळलेला आंधळा घडलेले सर्व वृत्त सांगून म्हणाला—"आज मी हिंडू फिरू शकणार नाही. तुमच्या जवळ एक दिनार असेल तर द्या. दुकानात जाऊन काही तरी खाऊन पिऊन घेतो."

"आज आमच्यावर ही दुर्दिन पाहायची पाळी आली आहे. काही मिळाले नाही. घरी जाऊ या." दोघे आंधळे तिसऱ्याला म्हणाले.

भिकाऱ्यांचे ते सर्व बोलणं घर मालकाने ऐकलं. तो एक अट्टल चोर होता. त्याच्या घरी आलेल्या आंधळ्या भिकाऱ्याच्या पाठोपाठ तो आला होता आणि त्या भिकाऱ्यांच्या निवाऱ्याच्या जागी त्यांच्या पाठोपाठ निघाला.

थोड्याच वेळाने तिघे भिकारी ते रहात त्या जागी येऊन पोचले. त्यांनी कुलुप काढले व आत जाऊन लगेच दारबंद केले. परंतु त्या आधी चोर सुद्धा आत पोचला होता.

आंधळ्यांनी आपली पेटी उघडली व आपली सर्व ठेव मोजून पाहिली. बाराशे चांदीचे दिनार होते. त्यातला एक काढून एक आंधळा रोटी व भाजी दुकानातून विकत घेऊन आला. तिघे जेवायला बसले त्यांच्याच शेजारी बसून चोर सुद्धा खाऊ लागला.

"चौघे जेवत असल्याचा आवाज होतो आहे. चवथा कोण? चोर?" एक आंधळा म्हणाला. लगेच सर्व 'चोर चोर' म्हणून





ओरडू लागले. तो ओरडा ऐकून चारचौघे लोक जमा झाल्याचे पाहून तो चोर सुद्धा एक आंधळा असल्याचं सोंग करण्यासाठी डोळे मिटून बसून म्हणाला–"अहो, मालक हो! चौघांना कोतवाल साहेबांकडे घेऊन चला. त्यांना एक गुपित सांगावयाचे आहे!"

लगेच तिकडे जमलेले लोक त्या चौघां आंधळ्यांना घेऊन कोतवालाच्या चावडी-वर घेऊन गेले.

"हे कोण आहेत? तुम्ही सर्व इकडे कशाला आलां आहां?" कोतवालाने विचारले.

तेव्हां आंधळ्यांपैकी एकजण म्हणाला–"साहेब! आम्ही तिघे आंधळे भिकारी आहों. कोणी तरी चोर आमच्या घरात शिरला आणि आम्ही कष्टाने मिळविलेली मिळकत पळवून नेण्याच्या प्रयत्नात होता.

"तो चोर कोठे आहे, खरे बोला." कोतवाल दरडावून म्हणाला.

"छडी पडली की आम्ही खरे सांगू साहेब!" डोळे मिटून आंधळ्याचे सोंग करणारा चोर म्हणाला.

"याला खरे बोलेपर्यंत फटके मारा." कोतवालाने शिपायांना आज्ञा केली.

दोन फटके पडले असतील नसतील, चोर डोळे उघडून म्हणाला–"माफ करा, कोतवाल साहेब! मी खरं ते सांगतो. मला सोडा. आम्ही चौघेही आंधळ्याचं सोंग करून गांवभर भीक मागतो आहो आणि आम्ही बाराशे दिनार आजपर्यंत मिळविले आहेत." मी खरं बोललों म्हणून मला मिळावयाची रक्कम मला देण्याची कृपा करावी. जोराने चार फटके बसले की ते सुद्धां खरं बोलतील.

कोतवालाने तो म्हणाला ते खरे समजून त्याला तीनशे दिनार दिले. नंतर त्याने इतर तिघांना किती फटके मारले तरी त्यांनी डोळे उघडले नाहीं तेव्हां कोतवालाने त्यांना सोडले आणि त्यांनी जमवून संभाळून ठेवलेले पैसे स्वतःच्या खिशात टाकले.





# अमृतसिद्धी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्यकरीत असतां सामंतराजा चिरायू याच्या पदरी नागार्जुन नामे बोधिसत्व प्रधान म्हणून काम करीत होते.

प्रधान नागार्जुन दयाळू व दानशील व रसायनशास्त्रात व औषधे तयार करण्यात निपुण म्हणून प्रसिद्ध होता. त्याने रसायन-शास्त्रात प्रयोग करून एक गुप्त औषध व रसायन तयार केले व ते खाऊन त्याने स्वतःला व आपल्या राजाला जरामरणा-पासून मुक्त करून घेतले होते.

त्याने त्या औषधाचा व रसायनाचा शोध लावला त्याच्या मुळाशी त्याच्या मुलाचा मृत्यू होता. एकदां त्याच्या मुलांपैकी त्याचा सर्वात जास्त लाडका सोमदेव नावाचा मुलगा मरण पावला. नागार्जुनाला अर्थातच त्याचे फार दुःख झाले स्वभावेच दयाळू नागार्जुनाने विचार केला की जगात कोणाला मरणच येऊ नये व मरणामुळे कोणाला शोक करण्याचे कारणच राहू नये.

"रसायनच तयार करावयाचे झाले तर त्याला फार जास्त खर्च होणार. म्हणून जनसामान्याला सुद्धा झेपेल अशी औषधी वनस्पती वापरून अमृत तयार केले पाहिजे." नागार्जुनाच्या मनात असा विचार होता.

त्या प्रमाणे तो औषध वनस्पतींचा शोध काढू लागला. त्याला जेवढे आयुर्वेद शास्त्राचे ज्ञान होते त्याचा पूर्ण उपयोग करून अनेक प्रयोग सुरु केले. अनेक क्रिया प्रक्रिया करून यश मिळण्याची चिन्हें दिसू लागली आणि शेवटचा टप्पा गाठायची वेळ आली. 'अमृतकला' नावाची एक विशिष्टमुळी त्यात मिळविली की प्रयोग पूर्ण होणार होता.

इतक्यात ही गोष्ट इंद्राला कळली. त्याने लगेच अश्विनी कुमारांना बोलाविले आणि त्यांना आज्ञा केली–"तुम्हीं लगेच भूलोकात निघा आणि नागार्जुन ते जो 'अमृत योग' सिद्ध करण्याचा प्रयोग सुरु केला आहे त्यात विघ्न आणा.

अश्विनी कुमार वेष पालटून भूलोकी आले व नागार्जुनाला भेटून कुशल प्रश्न विचारु लागले. म्हणाले–"मंत्रि पुंगवा! राज्य कशी उलटून पाडायची यात आपण निष्णात व चतुर आहांत. आपणांस माहीत नाही असे या जगात काय आहे? पण आपण ब्रह्मदेवाचा संकल्पच उलटून टाकण्याच्या प्रयत्नात आपण व्यस्त दिसतां आहां, हे काय? ब्रह्मदेवाने कपाळावर लिहून ठेवले आहे तेच उलटून टाकण्याच्या प्रयत्नात आपण गुंतुन राहिलात तर जगाचं रहाट गाडगं कसं चालायच? अमृत सिद्धी झाल्याने सृष्टीचे पालन करणेंच देवांना अशक्य होईल. आपल्याला आपल्या प्रयोगात यश आले तर देव आणि मानव यांत भेद तो काय राहणार? आपला लाडका मुलगा गेला त्याचा आपण एवढा धसका घेतला व ब्रह्मदेवाची सृष्टीच बदलून टाकायचा निर्णय घ्यावा हे बरोबर नाही. आपला मुलगा भूलोक सोडून निघाला पण तो स्वर्गसुख उपभोगीत आहे!".

परंतु त्या सर्व उपदेशाचा नागार्जुनाच्या मनावर फारसा परिणाम झाला नाही. आपण करतो आहे ते काम चूक आहे की बरोबर या विचारात तो गढून गेला. त्याचवेळी चिरायू सामंतराजाचा मुलगा जयसेन याच्या राज्याभिषेकाची जय्यत तयारी चालू होती. शुभमुहूर्त जवळ येऊ लागला तसतसे दरबारला उत्सवाचे रूप येऊ लागले. मध्यंतरी वृद्ध ब्राह्मण रूप घेऊन इंद्र भूलोकात आला व जयसेनाला भेटून म्हणाला–"नागार्जुनाने जे रसायन तयार केले आहे ते प्राशन करून माझे वडील जरामरणाच्या भयातून मुक्त झाले आहेत हे तुला माहीत नाही वाटत? म्हणजे तुला आयुष्यभर युवराज रहावे लागणार, सिंहासनारूढहोण्याचे भाग्य लाभणार नाही."

ते ऐकून जयसेन विचारात पडला. तेव्हां तो वृद्ध ब्राह्मण त्याला म्हणाला–"बाबारे, यासाठी एवढं दुःखी होऊन हातपाय गाळून बसण्यात काय अर्थ आहे? तुझी इच्छा पूर्ण होण्यास सोपासा उपाय आहे, दररोज नागार्जुन जेवणापूर्वी कोणी काही मागितले तर ते तत्काल देतात. उद्या तू त्यांच्या जेवणापूर्वी जा आणि मागेपुढे न पाहतां म्हण–"मला तुमचे मुंडके हवे आहे!" इंद्राने जयसेनच्या मनात चांगले विष ओतले.

राज्याकांक्षा असल्यामुळे जयसेन दुसऱ्याच दिवशी नागार्जुनाच्या जेवणाच्या वेळी गेला आणि वृद्ध ब्राह्मणाने सांगितले होते तसेच म्हणाला. नागार्जुनाने कोणताही संशय न दर्शविता आपली तलवार उपसून जयसेनाच्या हातात दिली व





म्हणाला–"बाबारे! माझें मुंडकें कापून घे!" जयसेनानें अनेक वेळा तलवारीनें वार केले परंतु तलवार 'खणकन' वाजे मात्र, परंतु डोकें काही कापलें जात नव्हतें. कारण 'अमृतसिद्धी' रसायनाच्या प्रभावानें देह वज्रदेह झाला होता.

ही गोष्ट जिराथू राजाच्या कानावर हांहां म्हणता गेली. तो धावतच तेथे आला मुलगा करत होता ते बरोबर नाही असे त्याला समजावून सांगू लागला.

तेव्हां नागार्जुन राजाला म्हणाला–"महाराज, हे युवराज मारीत कां आहेत याची पूर्वापर कथा मला माहीत आहे. ते निमित्त मात्र आहेत. म्हणून त्याला अडवू नये. आतांपर्यंत मी पूर्व जन्मी 'नको' न म्हणतां नव्याण्णव वेळा आपलें डोकें कापू दिलें आहे. आज शंभरावी वेळ आली आहे. मी हा जो वेष धारण केला आहे त्याला अपकीर्ती येतां काम नये, यासाठी मी वचन दिल्याप्रमाणे ते पूर्ण करण्याची जबाबदारी माझ्याइतकी आपणांवरही आहे." असे सांगून नागार्जुन राजाला अगदी शेवटचा म्हणून कडकडून भेटला.

त्यानंतर त्याच्या जवळच्या मुळ्यांतली एक मुळी काढून ती तलवारीवर घासून तलवार जयसेनाला देत म्हणाला–"बाबा रे, आता वार कर!"

जयसेनानें यावेळी वार करतांच नागार्जुनाचें डोकें, कमळ देठ कापताच जसे जमिनीवर पडते तसे पडलें.

ते दृश्य पाहू न शकल्यामुळे राजा स्वत: आत्महत्त्या करायला तयार झाला.

त्या वेळी नागार्जुनाचं खाली पडलेलें डोकें बोलू लागलें–"चिंतामग्न होऊ नकोस. तू किती जन्म घेतलेस तरी मी नित्य तुझ्या बरोबरच राहीन." असे म्हणत प्राणत्याग केला. राजाला जिवाचा वीट आला. त्याने तत्क्षण मुलाचा राज्याभिषेक करून दिला व तपश्चर्या करण्यासाठी वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला.

अशा प्रकारे जयसेनाला राज्यलाभ झाला. देवेंद्राची इच्छा पूर्ण झाली.





# मुहम्मद-बिन-तुघलक

दिल्लीच्या गादीवर १३२० इ.स. या वर्षी तुघलक वंशाची सत्ता स्थापन करणारा ग्यासुद्दीन तुघलक हा आला. तो गादीवर आला तेव्हांच फार वृद्ध होता. तो बंगालच्या स्वारीवरून परत येत असतां त्याच्या स्वागतासाठी दिल्लीच्या सरहद्दीवर एक सुंदर तोरण उभारण्यात आले होते.

ग्यासुद्दीन येत असल्याचे कळतांच निजामुद्दीन नांवाचा फकीर म्हणाला–"दिल्ली दूर अस्ता!" म्हणजे दिल्ली पुष्कळ दूर आहे! ती गोष्ट अक्षरश: सत्य झाली.





ग्यासुद्दीन त्या स्वागत तोरणाखाली आला नेमके त्याचवेळी ते तोरण त्याच्या डोक्यावर आवळले आणि सुलतान तत्काळ मरण पावला. अपघातानें सुलतान वारल्याचे कळल्यावर त्याचा मुलगा उलूघखान याचाच तो कट असल्याचे सर्वांना वाटले.



उलूघखान महम्मद-बिन-तुघलक या नावें गादीवर बसला. चंचल स्वभावाच्या सुलतान तुघलकाने दिल्लीहून राजधानी देवगिरीला न्यायचे ठरविले. देवगिरीला दौलताबाद हे नाव देण्यात आले. ही राजधानी दिल्लीहून सातशे मैल दूर होती. तेथे एक किल्ला व अनेक इमारती बांधण्यात आल्या.

फक्त सरकारी दफ्तरेच नव्हे तर दिल्लीच्या सर्व रहिवाशांना सुद्धां दौलताबादला जावे लागेल असा सुलतानाने हुकूम काढला. सुलतानाचा हुकूम झाला तरी पिढ्यान् पिढ्या दिल्लीला राहणाऱ्या रहिवाशांना आपलं सर्व बिऱ्हाड उचलून नेणं मान्य नव्हतं.





हुकुमाची परवा न करणाऱ्या सर्व नागरिकांना धमकावून देवगिरीला जावयास लावले. आंधळ्या लंगड्या पांगळ्या नागरिकांना सुद्धा वगळले नाही आणि सैनिकांनी सर्वांना पिटाळून हाकून देवगिरीला आणलं. म्हणून कित्येक वाटेतच प्राणांस मुकले प्राचीन दिल्ली-शहर निर्जन झाले.

परंतु देवगिरीला राहणं दिल्लीच्या नागरिकांना तसं सुखाचं वाटलं ही नाही. अधिकारी वर्गाला सुद्धा दिल्ली-वास सुखाचा वाटत होता. शेवटी सुलतानाला सुद्धा नवी राजधानी नावडेनाशी झाली. म्हणून त्याने परत दिल्लीला जायचा हुकूम काढला. सगळ्यांना ते मान्य होते, परंतु सुलतानाच्या चंचल स्वभावाचा त्यांना राग आला.





परत जाण्याचा कार्यक्रम योजल्याप्रमाणे उरकला गेला नाही. इतक्या दूरचा प्रवास करणे शक्य न झाल्याने अनेक प्राणांस मुकले, वाटेत कित्येकांना डाकू व लुटेऱ्यांनी लुटून 'नको जीव' केले. उरलेले नागरिक दिल्लीला पोंचले. परंतु तेथील घरे दारे पडून गेली होती. सरकारचंच दिवाळं निघालं म्हणून सुलतानाने प्रजेजवळ जे उरलंसुरलं होतं तेही लुटलं.

सरकारी खजिना रिकामा झाल्यावर सुलतानाने सोन्याच्या व चांदीच्या नाण्यांऐवजी तांब्याची नाणी काढली. तेव्हा काही लोकांनी त्यांच्या जवळ जी तांब्याची भांडी होती ती वितळवून त्यांची नाणी घरीच काढली. आर्थिक अराजक माजल्यावर सुलतानाने प्रजेवर जास्त कर बसविले. जे लोक कर भरूं शकले नाहीत त्यांच्यावर अनेक प्रकारे अत्याचार झाले.















सुलतानाने राज्यविस्तार करण्याचेही ठरवून तीन लक्ष सत्तर हजाराचे सैन्य उभे केले. पहिल्याने त्याने इराण देशा-वर स्वारी करण्याचे ठरविले. परंतु तो विचार नंतर त्याने बदलला आणि खुमान प्रांतातील लहान लहान राज्ये जिंकून आपल्या साम्राज्यात आणण्याच्या हेतूने तो डोंगराळ प्रदेशांतून आपले सैन्य घेऊन निघाला.

परंतु त्या प्रयाणातही त्याला यश आले नाही. बर्फाने थंड वारे त्याच वेळी सुरु झाले. बर्फाची तुफाने येऊन डोंग-राचे कडेच्या कडे कोसळू लागले व शेकडो सैनिक त्याखाली चिरडून मेले. वाटेत जी लहान मोठी राज्ये होती त्यांच्या सैनिकांनी या शत्रुसैन्यावर छापे मारुन त्यांची दाणादाण उडवून दिली. अशातऱ्हेने शेकडो सैनिक प्राणास मुकले.





त्याच्या साम्राज्यात सर्वत्र बंडाळी मोडून टाकण्यासाठी सुलतान मुहम्मद बिन-कासिम स्वतः गेला असतां त्याला विषमज्वर झाला व तो इ. स. १३५१ साली मरण पावला. लहान लहान सामंत राजे स्वतंत्र झाले आणि तुघलकाचे साम्राज्य छिन्नभिन्न होऊन गेले.

# शठे शाठ्यम्

सिंहपुरी व वज्रगिरी ही दोन्ही एकाला एक लागून अशी राज्ये होती. सिंहपुरीशी तुलना करून पहिले तर वज्रगिरी राज्य फारच दुर्बळ राज्य होते. परंतु तेथील राजा कालकेतु हा फार महत्वाकांक्षी राजा होता. त्याने कित्येकदां सिंहपुरीचा राजा वीरसिंह यांच्याशी युद्ध करून स्वतःचा पराभव करून घेतला होता.

काही तरी लबाडी करून वीरसिंहाला कैद करून आणायचा कालकेतूने विचार केला. त्याने आपला एक दूत वीरसिंहाकडे पाठवला. दोन्ही राज्यात कायमचे सख्य करून घेण्याच्या हेतूने बोलणी करण्यासाठी वीरसिंहला आपल्याकडे येण्याची विनंती केली. वीरसिंहाने त्या गोष्टीस होकार दिला.

चार दिवसांनी मोजक्या अंगरक्षकांसह आलेल्या सिंहपुरी राजाच्या सन्मानार्थ कालकेतूने एक मोठ्या मेजवानीची 'तयारी केली. आतां सिंहपुरीच्या राजाला कैदकरणे सोपे आहे असे कालकेतूला वाटले. त्याने वीरसिंहला थट्टेथट्टेत विचारले–"एका राजाने आपल्या शत्रूच्या मनात विश्वास, उत्पन्न करून त्याला मेजवानी दिली व 'तुला आतां कैद करतो' म्हटले तर त्या राजाची परिस्थिती कशी होईल ?"

"शत्रू राजा बुद्धिमान असेल तर मेजवानीला जाणारच नाही !" सिंहपुरीचा राजा म्हणाला. ते उत्तर ऐकून कालकेतूला संशय आला व त्याने दरडावून विचारले– "मग तू कोण आहेस ?"

"मी वीरसिंह महाराजांचा मुख्य अंगरक्षक आहे !" असे सांगून त्याने आपला वेष काढून फेंकून दिला आणि म्हणाला–"कालकेतु, आमच्या महाराजांनी युद्धांत तुझा अनेक वेळ पराभव केला असूनही तुला जिवंत सोडला व तुला आपला सामंत करून घेतले नाही आतां आमचे सैन्य तुझ्या सरहद्दीवर उभे आहे व स्वारीला तयार आहे.





# नृत्य स्तुती

लक्षण नावाच्या देशात चूडामणी नावाची एक नर्तकी होती. तिने अनेक दरबारात आपले नृत्यनैपुण्य दाखवून सर्वांकडून तिच्यासारखी तीच असल्याची प्रशंसा मिळविली होती.

एकदा तिने मालव देशाच्या दरबारात आपल्या नृत्यकलेचे प्रदर्शन केले. तिचे सुंदर नृत्य पाहून राजाबरोबर सर्व दरबारी मुग्ध होऊन गेले.

राजा तिचा सत्कार करण्यासाठी तिला मोठे इनाम देऊ लागला तेव्हां ती म्हणाली– "महाराज, नृत्यशास्त्रावरचा प्रामाणिक ग्रंथ लिहिणारे ललिताचार्य यावेळी आपल्या दरबारात आहेत ना! त्यांनी माझ्या नृत्याविषयी आपले विचार व्यक्त करावे. याशिवाय मला कोणतेही पारितोषिक नको!"

राजा, चूडामणीचा नम्रपणा पाहून थक्क झाला. त्याने ललिताचार्यांना चार शब्द बोलावे म्हणून विनंती केली ललिताचार्य आपल्या उन्नत आसनावरून उठून उभे राहिले–"चूडामणी ही नृत्यकलेत परिपूर्णता प्राप्त करण्याच्या महत्वाकांक्षेने प्रयत्न करीत आहे. त्यासाठी तिला मार्गदर्शन म्हणून मी काही सूचना करणार आहे." असे सांगून नृत्यकलेविषयी काही मुख्य बाबी सांगू लागले. परंतु त्यांनी चूडामणीने त्या पूर्वी जे नृत्य केले त्याविषयी एक शब्दही बोलले नाहीत.

दुसऱ्या दिवशी ललिताचार्यांकडे चूडामणीने पाठविलेला एक नोकर आला व त्याने त्याच्या मालकिणीने द्यायला सांगितले आहे असे सांगून एका पत्राबरोबर एका रेशमी रूमालात सुवर्ण तबकात बांधून दिलेली एक वस्तु ललिताचार्यांना दिली.

ललिताचार्यांनी पत्र उघडून वाचले. त्यातील मजकूर असा होता. "अनेक राजा महाराजांच्या हातीं माझा सन्मान सत्कार झाला आहे व मी नृत्यकलेत प्रवीण असल्याची प्रशंसापत्रे मिळविली आहेत. अशी मी नृत्यकलेत सव्यसाची म्हणून प्रसिद्ध असलेल्या तुमच्यासारख्यांना काहीतरी भेट दिल्याशिवाय मी हा देश सोडून जाणे मला योग्य वाटले नाही. आपणांस आठवण रहावी या आशेने मी ही भेट आपणांकडे पाठवीत आहे."



ललिताचार्यांनी रेशमी रुमाल सोडून पाहिला व आश्चर्यचकित झाले. कारण त्यात कचऱ्या कोंड्याशिवाय काही नव्हते. क्षणभरच ते चूडामणीच्या अहंकाराबद्दल आश्चर्यचकित झाले असले तरी स्वतःला सावरून त्यांनी तिला हे पत्र लिहिले.

"तू पाठविलेली भेट पोचली. ती बांधून ज्या रेशमी रुमालात तू पाठविली होतीस तिच्यासारखीच तुझी वस्त्राभरणे होती व त्यांतील तुझे मन कसे असू शकेल हे आतली भेट पाहून कळले. तू देऊ शकशील अशाच व तुझ्या शक्तीलायकच वस्तू तु माझ्याकडे भेट म्हणून पाठविल्यास. तू पाठविलेली भेट पहिल्यावर तुझी आठवण कायम राहणार नाहीतर काय?"

नोकराने ती चिट्ठी चूडामणीला नेऊन दिली. ती वाचल्यावर तिला तिने केवढी मोठी घोड चूक केली ते कळले. ती स्वतः ललिताचार्यांकडे गेली व त्यांच्या पायांवर डोके ठेवून त्यांची माफी मागितली.

ललिताचार्यांनी तिला उठविले व म्हणाले–"तू चांगली नृत्यांगना आहेस. या गोष्टीची शंका केव्हाही नव्हतीच."

चूडामणी चकित होऊन म्हणाली– "आपण हीच गोष्ट काल दरबारात सूचना म्हणून जरी केली असतीत तर मी ही चूक करायला धजले नसते. कदाचित तुम्ही माझ्या सारख्यांच्या मनात जो थोडा गर्व असतो तो नाहीसा व्हावा, म्हणून कदाचित तुम्ही हे केले असावे!"

ते ऐकून ललिताचार्य थोडे हसले व म्हणाले–"नृत्य करण्यात तुझी बरोबरी

करू शकेल अशी दुसरी कोणी नाही, असा अहंकार होता, यात शंका करण्यासारखं काही नाही. राजसभेत मी आपला अभिप्राय द्यायला हवा होता, या म्हणण्यात तुझा काय हेतू होता तो मला कळला. नृत्यकलेचे मर्म समजणाऱ्या माझ्यासारख्याकडून प्रशंसा मिळवून तिला आतापर्यंत जी कीर्ती व प्रतिष्ठा मिळाली होती ती कांकणभर आणखी वाढेल असे तुला वाटत होते, होय ना?"

चूडामणीने ललिताचार्यांना नमस्कार करून होकारार्थी मान हलविली.

"मी एखाद्या सामान्य प्रेक्षका प्रमाणे तुझ्या अंगविक्षेपावर चालणाऱ्या तुझ्या पावलांवर नजर ठेवून टाळ्या वाजवणार नाही, कळलं का! त्याचं कारण मला शास्त्राची माहिती आहे. एक नृत्याचार्य म्हणून तुझ्या नृत्यकलेत वृद्धी व्हावी याची जबाबदारीसुद्धा स्वतःवर घेऊन तुला माहिती नसलेल्या उच्चतर नृत्यकलेच्या मर्माविषयी मी माहिती पुरविली."

"गुरुवर्य, मी आपल्या अज्ञानामुळे आपला उद्देशही समजू शकले नाही."

"चूडामणी, हे तुझे केवळ अज्ञानच होते असे नाही, त्यात घाईही होती. नृत्यातील अत्यंत उन्नत अशी तत्वे काय आहेत ती तुझ्याशिवाय त्या सभेत इतरांना समजून घेण्याची गरज नव्हती. नृत्य हे महासागरासारखं गंभीर आहे. त्यांतील तुला माहीत नसलेल्या काही गोष्टी मी ओळखून तुला सांगाव्या हे मनात योजून सांगू लागलो म्हणजे तुझी नृत्यकला चांगली कळली आहे, असे मी समजत होतो, हाच अर्थ निघतो ना? कोणत्याही तऱ्हेने विचार करून पाहिले तर सभेत मी म्हणालो. त्यावरून तुझ्या नृत्यकलेची मी प्रशंसाच केल्याचे प्रगट होते, त्याच्या विरुद्ध बोलल्याचे सिद्ध होत नाही.

त्यानंतर चूडामणीने तिला माहीत नसलेल्या काही गोष्टी ललिताचार्यांच्या जवळ राहून शिकून घेतल्या व त्यांचा आशीर्वाद घेऊन स्वदेशी निघून गेली.





# हुंडयाचे वेड

मुलगा रघुनाथ लग्नाचा मुहूर्त गाठायला म्हणून निघाला तेव्हां पार्वतीबाई बरं नाही, असं सांगून खाटेवर मुटकुळं करून पडून होती. रघुनाथाला काय करावे, सुचेना. आईला काही सुद्धा झालं नाही, हे त्याला चांगले माहीत होते. सासूचे मानपान, कोडकौतुक रीती प्रमाणे व्हायला पाहिजे, तसं झालं नाही, याचा तिला राग होता.

रघुनाथाने आईला अनेक प्रकारे समजावून सांगून पाहिले. सगळ्याचं ती एकच उत्तर देई–"मला बरं नाही रे. सून म्हटली की ती येणार नाही का, की मी तिला पाहणार नाही?" अशी वांकडी उत्तरे देऊ लागली.

पार्वतीकाकूंना रघुनाथ हा एकुलता एकच मुलगा. तो गेली तीन वर्षे आणखी एका गावी राहून नोकरी करीत होता. ते भाड्याच्या घरात राहात त्याच्या शेजारी एक गरीब कुटुंब रहात असे. ललिता लहान असतांनाच तिची आई वारली, तेव्हां पासून आपल्या भावंडांची जबाबदारी तिच्यावर आली. वडिलांची मिळकत अगदी बेताची. परंतु ललिता तेवढ्यावरच सर्व कुटुंबाचा खर्च भागवीत असे. ती तशी सुंदर नसली तरी तिचा शांत सोशिक स्वभाव आणि घरकामातले नैपुण्य पाहून रघुनाथाचे मन तिच्याकडे आकर्षिले.

ललितासारखी बायको मोठ्या भाग्याने मिळते, असे त्याला वाटले. तिची संमती मिळाल्यावरच तो आईवडिलांना तिच्या घरी घेऊन गेला होता.

पंचवीस हजार रुपये हुंडा दिला तर या मुलीला सून करून घ्यायला तयार असल्याचे पार्वतीबाईंनी सांगितले, परतायच्या वेळी गाडीत बसतांना.



रघुनाथ आश्चर्यचकित होऊन म्हणाला– "आई, ललिताच्या वडिलांना पंचवीस रुपये सुद्धा देणे अशक्य आहे!"

पार्वतीबाई कपाळाला आंठ्या घालून म्हणाल्या–"तरमग, असल्या दरिद्र लोकांशी आपल्याला संबंध हवा कशाला?" रघुनाथ हिरमुसल्यासारखा होऊन म्हणाला–"आई, पैसेच का सर्व असतात? मी लग्न करायचं झाल तर ललिताशीच करणार!"

रघुनाथचे वडील कोणाच्या ही बाजूने बोलणे शक्य नसल्याने तटस्थासारखे गप्प राहिले.

"त्यांना हुंडा देणे शक्य नसेल तर सामच्या मानपानसाठी म्हणून निदान पांच हजार तरी घायला हवेत!" पार्वतीबाई म्हणाल्या.

"आई, या मानपानाच्या गोष्टी सुद्धा विसर! लग्नाच्या! खर्चासाठी मीच ललिताच्या वडिलांना काही रक्कम देणार आहे!" रघुनाथ म्हणाला.

त्यानंतर लग्नासाठी व्हावयाची सर्व तयारी तिला विचारल्या शिवाय झाली. दुसऱ्याच दिवशी लग्न होते.

त्या प्रमाणे सर्व नातेवाईकांसह चार गाड्या निघाल्या. पार्वती तब्येत बरोबर नाही असे सांगून बापलेकांना निरोप देऊ लागली.

"त्या गावात वैद्य काही थोडे थोडके नाहीत. मी तुझी पेटी तयार करून काकांच्या बरोबर गाडीत पुढे पाठविली आहे." असे म्हणत रघुनाथ आईला निघायला घाई करू लागला.

सर्वलोक ललिताच्या गावी नदीकाठी पोचेपर्यंत रात्र झाली होती. म्हणून इतर गाड्या नदीपार करून गेल्या होत्या. रघुनाथ वगैरेची गाडी आली तोपर्यंत नदीत बरेच पाणी वाढल होतं. पुलावरून पाणी वाहू लागल होत.

"पूर ओसरे पर्यंत आपणा सर्वांना या काठावरच रहावे लागणार!" गाडीवान म्हणाला.

तो पुढे म्हणाला–"सांगता येत नाही, मध्यरात्र उलटल्यावर उतरेलही. नाही तर तीन चार दिवसही लागतील!"

ते ऐकून पार्वतीबाई उत्साहाने गाडीत उठून बसल्या इतक्यात सोसाट्याचा वारा सुटला. नदी काठावर जवळच निवाऱ्याला म्हणून एक कौलारू घर होते. गाडीवाला त्या घराजवळ आपली गाडी घेऊन गेला.

रघुनाथाने दारावर थाप देताच एका मध्यम वयाच्या माणसाने येऊन दार उघडले व विचारले–"कोण तुम्ही? काय पाहिजे?"



रघुनाथाने सर्व परिस्थिती त्याला समजावून सांगितली व म्हणाला–"बाहेर काळोखा बरोबर सोसाट्याचा वाराही सुटलेला आहे. नदीचे पाणी ओसरे पर्यंत तुमच्या घरात निवाऱ्यासाठी टेकावं म्हणतो."

"आमचं घर म्हणजे आपलंच आहे. तुम्ही आमच्या घरात लग्न उरकायचं ठरविलंत तरी आम्हांला हरकत नाही." असं हसत म्हणत तो आतल्या बाजूला वळून मोठ्याने म्हणाला–"अग, रागिणी! आपल्या घरी पाहुणे मंडळी आली आहेत!"

घरातून रागिणी नावाची मुलगी बाहेर आली व तिने रघुनाथच्या आई वडिलांना नमस्कार केला. तिचे वय वीस वर्षांहून जास्त नसावे. नक्षत्रासारखी होती ती मुलगी.

पार्वतीबाईंनी 'नकोनको' म्हणत असतां त्या मुलीने तिकडे लक्ष न देतां तिने पिठलं भात करून सर्वांना जेवायला वाढले. एका मोठ्या खोलीत सर्वांना अंथरूणे घालून दिली. कोणत्याही प्रकारे भीड संकोच मनात बाळगू नका. काही जरूर लागली तर हांक मारा, मी शेजारच्या खोलीतच आहे." असे सांगून निघून गेली.

पार्वतीबाईंना रागिणीला पाहिले तेव्हांपासूनच त्यांच्या मनात नवे विचार घोळू लागले, सुंदर मुलगी आहे या घराच्या मालकाची एकुलती एक मुलगी आहे. या



मुलीला सून करून घेतले तर सुंदर सुने बरोबर नदी काठावरचा हा सुंदर बंगला सुद्धा आपला होईल!

"नदीला पूर आला तो आपल्या भल्यासाठीच तर आला!" पार्वतीबाई उत्साहाने म्हणाल्या.

"म्हणजे! पूर सकाळच्या आत ओसरला तर आपण मुहूर्तावर गावी पोहोच!" रघुनाथ म्हणाला.

"त्याच मुहूर्ताला रागिणीच्या गळ्यात मंगळसूत्र बांधलं की झालं!" पार्वतीबाई म्हणाल्या.

"तुला भ्रम तर झाला नाही, आई!" तो रागाने म्हणाला.

पार्वतीला पण राग आला. ती म्हणाली– "ही मुलगी सुंदर आहे, आल्या गेलेल्यांची विचारपूस कशी करावयाची तिला चांगली माहीत आहे. काही हुंडा देण्यालायक लोक दिसत आहेत!"

"लग्न म्हणजे हुंडा वसूल किती होतो हेच ना? बाबांना आजोबांनी किती हुंडा दिला होता हे मी ऐकलं आहे!" रघुनाथ म्हणाला.

रघुनाथचे वडील कुशी बदलून पहात थोडे हसले. पार्वतीबाई दचकल्यासारख्या होऊन म्हणाल्या–"ते दिवस निराळेच होते. मी उजाडल्यावर रागिणीच्या वडिलांशी बोलतेच आणि या लग्नाला त्यांचा होकार मिळवितेच! नाही जमलं तर पुरात उडी घेते!"

हा नवीन प्रश्न कसा सोडवायचा रघुनाथला कळेना. तो विचारात गढून गेला आणि त्याला काही वेळाने झोपही लागली. पुन्हां त्याची झोप मोडली तों पर्यंत उजाडू लागल होते. नदीचं पाणी ओसरल्याच पुलावरून येजा सुरू झाल्यावरून स्पष्ट कळत होत.

त्या पूर्वीच जाग्या झालेल्या पार्वतीबाई रघुनाथला म्हणाल्या–"आतां पुढला प्रवास येथेच थांबवू या. ते लग्न काही जमणार नाही. तुझं लग्न रागिणीशीच झाल पाहिजे!" असे म्हणत त्या रागिणीला हाक मारीत घरात गेल्या.

त्यानंतर एक दोन मिनिटेच गेली असतील, पार्वतीबाईंच्या ओरडण्याचा आवाज ऐकून रघुनाथ व त्याचे वडील तिकडे धावत गेले. सर्व घर निःशब्द होते. घराच्या मागच्या बाजूचे दार सताड उघडे होते. त्यांनी बरोबर आणलेली पेटी त्यांनी ठेवलेल्या जागेवर दिसली नाही. थरथरत असलेल्या पार्वती बाईच्या हातात एक कागदाचा तुकडा होता. तो घेऊन रघुनाथ वाचू लागला. त्यातला मजकूर असा:

"**हे घर आमचे नाही.** या घरचे लोक तीर्थयात्रेला गेले असल्याचे कळल्यावर आम्ही एका किल्लीन या घराच्या दारा-वरचे कुलूप उघडले. त्यात आम्हांला एकही मूल्यवान वस्तू सापडली नाही. लग्नाला जात असलेल्या तुम्हां लोकांच्या पेटीत किंमती वस्तू असणार हे आम्हाला माहीत होते. पेटीचे कुलूप फोडून तुमची झोप-मोड कशाला करायची असा विचार करून पेटीच उचलून घेऊन जात आहो! इतर सामान सुद्धा नेत आहोत! पूर आला तो आमच्या भल्यासाठीच!"

डबडबलेल्या डोळ्यांनी पहात असलेल्या आईला रघुनाथ म्हणाला–"आई, वाईट वाटून घेऊ नकोस! तुझे दागिने, कंबर पट्टा सर्व काकांच्या वाडीत पुढे पाठविले आहेत. तुला हवी होती ती सुंदर सून सासरी आल्या आल्याच घर सर्व लुटून पळून गेली."

आपले दागिने, पैठणी वगैरे चोरीला गेले नाहीत याबद्दल आनंदाने म्हणाली– "मोठा यमगंडच टळला म्हणावयाचा. याबरोबर माझं हुंड्याचं पिसं सुद्धा गेलं! निघा तर, मुहूर्त गाठला पाहिजे! माझ्या होणाऱ्या सुनेला सर्व दागिने घालून नटविले पाहिजे."

आईत झालेला बदल पाहून रघुनाथ बरोबर त्याच्या वडिलांना सुद्धा अत्यानंद झाला.





# महाराजांची मेहेरनजर

पुष्पगिरी नावाच्या एका गावी धनंजय व गोपीनाथ नावाचे दोन व्यापारी बाजार पेठेत राजरस्त्यावर दुकाने काढून सुगंधी द्रव्यांचा व्यापार करीत असत.

एके दिवशी राजाचा एक शिपाई धनंजय-कडे आला आणि "तुम्हांला महाराजांनी आज संध्याकाळी त्यांच्या खास महालात भेटीला यायला सांगितलं आहे," असे सांगून निघून गेला. संध्याकाळ झाल्याबरोबर धनंजय राजाच्या दर्शनाला गेला आणि काही वेळाने आपल्या दुकानात परत आला.

गोपीनाथाला, धनंजयला राजाकडून निरोप आल्यावर तो जाऊन भेटून आल्याचे कळले. त्याने त्याला तसे विचारले व म्हणाला—"महाराजांनी तुला बोलविले होते, म्हणे? कशाला ते?"

"महाराज व मी आपसात पुष्कळ गुप्त गोष्टी बोललो. आतां ते सर्व मी तुला सांगू म्हणतोस?" असे थोडयाशा उच्च स्वरातच धनंजयने गोपीनाथला विचारले. बिचारा एवढंसं तोंड करून निघून गेला.

त्यानंतर ही कित्येकदां दर आठवडयाला महाराजांकडून धनंजयला निरोप आला व तो संध्याकाळी महाराजांकडे जाऊन आल्याचे गोपीनाथने प्रत्यक्ष पाहिले.

गोपीनाथच्या मनात कालवाकालव होऊ लागली. त्याने पुष्कळ विचार करून पाहिला परंतु धनंजय राजाकडे कां जातो हे गुपित त्याला मुळींच कळले नाही. एके दिवशी त्याने बायकोला ती गोष्ट सांगितली. म्हणाला—"मी किती डोकं फोडून पाहिलं, परंतु या मागचं गुपित काही कळलं नाही. तू सुद्धा थोडा विचार करून पहा!"

तेव्हां बायको नवऱ्याकडे विचित्र तऱ्हेने पहात म्हणाली—"या एवढयाशा गोष्टी-साठी विचार करू म्हणता? तो धनंजय दर आठवडयातून एकदा राजाच्या दर्शनाला जाऊन येत आहे, असे समजावयाचे!"

गोपीनाथाला तेच असले पाहिजे या गोष्टीची खात्री झाली. त्याने बायकोच्या हुशारीची खूप वाखाणणी केली.

"तुम्ही माझी एवढी वाखाणणी करून तुम्हांला काय मिळणार आहे? राजाची मेहेरनजर मिळविणाऱ्या धनंजयाशी चांगले संबंध ठेवा. कदाचित पुढे कधी आपल नशीब उघडेल!" गोपीनाथची बायको म्हणाली.



दुसऱ्याच दिवशी गोपीनाथाने बायको कडून चार चांगलीशी पक्वान्ने करवून घेतली व बाजारातून फळफळावळ आणून ती टोपलीत भरून धनंजयकडे घेऊन गेला.

आपल्या घरी कधी पाऊल ही न टाकणारा गोपीनाथ आपल्या घरी मिठाई व फळफळावळ घेऊन आलेला पाहून धनंजयने आश्चर्य चकित होऊन त्याला विचारले—"अरे, असे यायचे काय कारण झाले रे? आणि हे सर्व कशासाठी?"

"तुमच्या घरी यायचा विचार कित्येक दिवसांपासून करीत होतो; आजच थोडा वेळ मिळाला. ही फळफळावळ आणि मिठाई वगैरे म्हणाल तर मुलांसाठी! एवढा खर्च करण्याची शक्ती नसण्या इतकी गरीबी अजून तरी आली नाही!" गोपीनाथ म्हणाला.

त्यानंतर तो धनंजय बरोबर बराच वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारून घरी परतला. त्या दिवसा पासून गोपीनाथ धनंजयच्या घरी नेहमी जाई येई. प्रत्येक वेळी मिठाई व फळफळावळ घेऊन जाई.

काही दिवसांनी राजाचा कर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्या कडून गोपीनाथकडे एक शिपाई आला आणि वृत्ती कर म्हणून शंभर मोहोरा खजिन्यात भराव्या असा एक खलिता देऊन गेला.

त्याच्या दुसऱ्याच दिवशी गोपीनाथ दुकानात निघताना बायकोला म्हणाला—

"मी आज संध्याकाळी कर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्याकडे कर देऊन येणार आहे. म्हणून संध्याकाळी घरी यायला थोडासा उशीर होईल."

बायको चकित होऊन विचारू लागली– "तुम्ही राजदरबारात कर भरणार, म्हणजे?"

बायकोच्या प्रश्नाचा अर्थच कळला नाही, म्हणून म्हणाला–"तू जरा मला कळेल अशा शब्दात सांगितलेस तर?"

"तुमच्या बरोबरीचा व्यापारी धनंजय हा तुमचा मित्र. त्याच्यावर महाराजांची मेहर नजर आहे. मग तुमच्यावर कर कसा लावला जातो आणि तो अधिकारी तुमच्या विरुद्ध काय करू शकणार हो? माझ्या म्हणण्याचा अर्थ थोडक्यात असा आहे की तुमच्यावर कोणत्याही प्रकारचा कर दरबाराकडून लागताच कामा नये." बायको म्हणाली.

गोपीनाथला बायको म्हणाली ते छान पटल. त्याने कर भरला नाही. एका आठवड्यानंतर गोपीनाथकडे राजाचा शिपाई आला व म्हणाला–"महाराजांनी तुम्हांला आज संध्याकाळी येऊन भेटून जायला सांगितल आहे!"

धनंजयाच्या कृपेमुळेच आपल्यावर महाराजांची मेहेरनजर होत आहे असा विचार करून अत्यंत आनंदाने गोपीनाथ महाराजांच्या दर्शनाला संध्याकाळी गेला.

राजा त्याला पाहताच म्हणाला–"मी तुला कां बोलाविले, कळले का? माझा हा खास महाल तुझ्याकडून झाडून स्वच्छ करवून घेण्यासाठी. गेल्या आठवड्या-पर्यंत हे काम धनंजय नावाचा व्यापारी करीत होता. या आठवड्यापासून हे काम तू करीत जा. तुला या गोष्टीची आठवण करून देण्यासाठी माझा शिपाई दर आठ-वड्यातून एकदा येत जाईल. कर भरायची टाळाटाळ करणाऱ्या तुमच्या सारख्या व्यापाऱ्यांना हीच योग्य शिक्षा आहे!"

त्या दिवसापासून राजाचा वाडा झाडून साफसूफ करण्याची जबाबदारी गोपीनाथवर येऊन पडली.





# गणेश पुराण

आवारात इतकी गडबड होत होती तरी गडी घोरत पडलेला होता. शेजारीच पत्रीफुलांखाली गणेशाची मूर्त होती. उसाचा रस पीत असतां जमिनीवर जो गळला त्या-मुळे चिखलच झालेला होता. पाहरेकऱ्यांना बोलावून त्यांना विचारले तर ते म्हणाले– "बरीच रात्र उलटली, गडी घोरत पडलेला होता, आम्ही सुद्धा पेंगू लागलो. इतक्यात हत्तीचा चीकार ऐकू आला आणि डोळे उघडून पाहिले, काळोखात एक मोठा हत्ती दिसला, ऊस ओढून ओढून खात होता आणि चरकातून उसाची ताटं बाहेर येऊन पडतात तशी ताटे टाकीत होता. आम्हांला फार भीती वाटली. आम्ही तेथून पायच काढला!"

जमिनदाराचे मन पार बदलून गेले. तो तसाच निघाला आणि गड्याच्या पायां पडत असल्यासारखा त्याने साष्टांग नमस्कार घातला. गड्याची झोप मोडली तो उठून उभा राहिला. जमिनदार त्याच्या पायांवर डोके ठेवून त्याचे पाय घट्ट धरून पडूनच होता.

जमिनदाराच्या बायकोने गणेशाच्या मूर्तीला नमस्कार केला व म्हणाली–"प्रभो! तू इतक्या दिवसांनंतर का होईना आमच्या वर अनुग्रह केलास. आम्ही धन्य झालो!" असे म्हणत तिने रात्री घडलेले वृत्त गड्याला सांगितले.

ते अद्भुत वृत्त ऐकून लोकांचे थवेच्या-थवे ते दृश्य पहायला तेथे जमले. सर्व आवार माणसांनी भरुन गेले. जमिनीवर



हत्तीच्या पायांनी खड्डे खड्डे झालेले स्पष्ट दिसत होते. त्यांत उसाचा रस साठलेला होता. तोच तीर्थ म्हणून सर्व प्राशन करू लागले आणि उसाचा चोथा गणेशाचा प्रसाद म्हणून उचलून घेऊन जाऊ लागले.

गडी, त्याची बायको व मुलगा सर्वांनी मिळून गणेशमूर्तीला नमस्कार केला व निवेदन केले–"देवा, आम्ही पन्नीपाचोळा वाहून सुद्धा तुझी कधी पूजा केली नाही, तुझ्यासाठी म्हणून पाठविलेला ऊस सुद्धा तुला अर्पण केला नाही आणि तू आमच्यासाठी एवढे कष्ट कशाला उपसलेस? तू हत्तीच्या रूपे इतरांना दर्शन दिलेस आणि आम्हांला कां दर्शन दिले नाहीस? मी घोरत पडलो होतो!" असे म्हणत गडी लहान मुलासारखा रडू लागला.

तेव्हां मूर्तीच्या जागी गणपती स्वतः हातात ऊस घेऊन बसलेला गड्याला साक्षात्कार झाला. गड्याने मुलाला देऊन जो ऊस पाठविला होता. तोच गणेशाच्या हातात होता.

गणपतीने आपल्या सोंडेने गड्याला जवळ ओढून घेतले व त्याच्या डोक्यावर अभय हस्त फिरवीत म्हणाला–"बाबा रे! कूल, जाती व आचार वगैरे हे मी निर्मिलेले नाहीत. सर्व माणसांनीच कल्पनेने निर्मिले आहेत. माझ्या जवळ लहान मोठा, गरीब श्रीमंत हा भेद नाही! म्हणूनच तुला दर्शन दिले." असे म्हणत असतांच अंतर्धान पावला.

लोक हात जोडून गड्याला म्हणाले–"बाबा रे, तुझ्या भक्ति प्रसादानेच आम्हांला गणेशदर्शनाचे भाग्य लाभले.

"ईक्षु म्हणजे ऊस सहस्र ईक्षु गणपती नामे गणपती प्रसिद्ध झाला. हातात ऊसाचं कांडे करून बसलेल्या गणपतीच्या मूर्तीची प्रतिष्ठा करण्यात आली. तेथे एक मोठे देऊळ बांधण्यात आले." इतके सांगून पावन मिश्राने कथा पूर्ण केली.

देवळाच्या मंडपातल्या चित्रांच्या कथा पावनमिश्राने सांगितल्या, परंतु मंडपाच्या मुखद्वारावर जे चित्र होते त्याची कथा राहिलीच होती. ते चित्र फारच सुंदर होते. चित्रकाराची प्रतिभा स्पष्ट प्रगट होत होती. दररोज ते चित्र फार लक्षपूर्वक फारवेळ पहात राहणाऱ्या एका तरुणाने पावनमिश्राला नमस्कार करून विचारले–"पंडित प्रवर! या देवळातली सर्व चित्रे कोणी हो काढली? त्या चित्रकाराचं चरित्र आपणांस माहीत असल्यास सांगण्याची कृपा करावी. मुखद्वारावर जे चित्र आहे ते चित्र जणुंकाही माझ्या मनावरच कोरले गेले आहे. त्या चित्राची काय गाथा आहे.

पावनमिश्रांनी त्या तरुण मुलाकडे प्रेमादराने पाहिले व म्हणाले–"बाबा रे! तुला पाहिले की तू स्वतः एक चित्रकार असावासा वाटते आहे! मुखद्वारावर जे चित्र आहे, ते मलासुद्धा फारच आवडले आहे. त्याची गाथा शेवटी सांगून गणेशचरित्र संपूर्ण करतो! तुला सुद्धा ते ऐकण्याची उत्सुकता आहे, तरमग तू ते ऐकच!" असे म्हणत त्यांनी काही वेळ डोळे मिटले व काही वेळ काही तरी आठवीत असल्या सारखे दिसले.

वातापी नगराला, साधूंच्या बरोबर सुमारे चवदा वर्षाचा एक तरुण मुलगा आला आणि वातापी गणपतीच्या देवळातच कायम राहू लागला. तो राहणारा कोठला,



त्याच्या गावाचे नाव काय, त्यालासुद्धा माहीत नव्हते. त्याच्या कपाळावर मोठी जखम लागल्याचा एक वण पाहून बिचाऱ्याच्या डोक्याला कसली तरी मोठी जखम झाल्यामुळे त्याची स्मरणशक्तीच गेली की काय असे सर्वांना वाटले. तो मुलगा मुका बोलतो किंवा आवाज काढतो तेवढा सुद्धा बोलत नसे. भितीवर चित्रे काढीत असे. मंडपाच्या भितीवर जमिनीवर तो चित्र काढी त्यावेळी त्याचा चेहरा पूर्णचंद्रासारखा जणु काही चकाकत असे, म्हणून त्याला विघ्नेश्वराची चित्रें काढणारा चित्रकार म्हणून–अक्षरे लुप्त होऊन फक्त 'वि-चित्र' या नावानेच लोक त्याला हाक

मारू लागले. ते विचित्र हेंच नाव त्याला शेवटपर्यंत राहून गेले.

तोंपर्यंत गजानन पंडित बरेच वृद्ध झाले होते. ते मुलांना आपल्या घरी गणपतीच्या गोष्टी सांगत विचित्र त्या कथा श्रद्धाभक्ति पूर्वक एकाग्र चित्ताने ऐकत असे. कथा ऐके त्याच्या दुसऱ्याच दिवशी त्या कथेतील सारांश भिंतीवरच्या कोणत्या तरी दगडावर चित्रित झालेले असे.

गजानन पंडितांचे विचित्रावर फारच प्रेम होते. ते त्याला आग्रह करून घरात येऊन बसायला सांगत, परंतु तो उंबरठ्या बाहेरच बसून कथा ऐके व म्हणे– "आजोबा! इकडे बसून ऐकत असतां तुम्ही मला एकट्यालाच ती कथा सांगता आहां असे अगदी चांगले ऐकू येते." विचित्र गणेशाची चित्रे काढी ती पाहून गजानन पंडित देहभान विसरून जात व गणेशाविषयीची अनेक आख्याने त्याला म्हणून निराळी सांगत.

विचित्राच्या मागे मागे नेहमी मुलांचे थवेच्या थवे असत. तो चित्रें काढी तेव्हां मौनपणे पाहून आनंदित होऊन तशीच लहान लहान चित्रे ती मुले काढीत. अशातऱ्हेने गावातल्या मुलांना अनायासे चित्रकलेचे लेणे प्राप्त झाले.

विचित्र दिवसभर रस्त्यांवर भिंतीवर गेरूने किंवा खडूनें खुज्याच्या दगडाने चित्र काढी आणि वातापि गणपतीचा जो प्रसाद वगैरे मिळे त्यावर आपली भूक भागवी आणि देवळाच्या पायऱ्यांवर किंवा आठवडाभर गावातल्या बाहेर कोठल्या तरी घराच्या ओसरीत झोपत असे.

गावाच्या बाहेर कुंभार, लोहार, चांभारांची आणि महारवाडा होता. विचित्र म्हणजे त्यांना जीव की प्राण वाटे. तो रात्री अपरात्री केव्हांही आला की त्याच्यासाठी ठेवलेली मीठ भाकर त्याला खायला घालीत व त्याला झोपायला सतरंजी घोंगडी, हातरी काहीतरी अंथरून देत आणि मग स्वतः निजत.



तो कोण कोणाचा हे तो विसरून गेला असला तरी विचित्रला भावंडे व आईवडील सर्व होते.

वातापी नगरापासून थोड्या अंतरावर असलेल्या एका गावात मध्यमवर्गीय कुटुंबात विचित्राचा जन्म झाला. वडिलांच्या हाताखाली त्याला लहानपणीच चित्र काढण्याचा नाद लागला. जन्मतःच त्याला येत नव्हती. भाऊभावजयांनी त्याच्याशी दुर्व्यवहार करून त्याला घराबाहेर हाकलले. त्या मुलाला गणपती म्हणजे सर्वस्व वाटे. तो वातापि नगराला निघाला. वेळेवर खायला प्यायला नाही, म्हणून अशक्त झाला व आजारातच हिंडू फिरू लागला. तसाच जात असतां घेरी येऊन तो एका दगडावर पडला. तो बेशुद्धावस्थेत पडला असतां साधूंची एक टोळी जात होती त्यांनी पाहिले व त्याचा औषधोपचार करून त्याला बरे केले. त्यांच्याबरोबरच तो वातापी शहरी आला. हेच थोडक्यात विचित्राचे बालचरित्र. त्या वर्षी वातापी नगरात गणेश चतुर्थीच्या दिवशी एक प्रदर्शन करायचे ठरले.

गणपतीची पुरुषा एवढी उंच मूर्त करून ती विभिन्न रंगांनी रंगवून प्रदर्शनात ठेवण्यासाठी चढाओढ लागली. सर्वांत मोठी व सुंदर ठरेल ती मूर्त एक हजार सुवर्णमुद्रा देऊन खरेदी केली जाईल असे जाहीर झाले. नगराध्यक्ष चित्रकाराला रत्नखचित सुवर्णकंकण इनाम म्हणून देणार असल्याचे ही जाहीर झाले. त्या प्रदर्शनाच्या चढाओढीला दरबारी चित्रकार व मोठमोठे प्रसिद्ध चित्रकार तयार झाले. त्यांनी उत्तमोत्तम रंग खूप पैसे खर्च करून मागविले. त्यांनी सोनेरी रंग आणविले निरनिराळ्या रंगांचे वरख मागविले आणि अशातऱ्हेने विद्युत प्रकाशासारखे गणपती तयार करून प्रदर्शनात ठेवले.

विचित्राचा एक कुंभार मित्र होता. त्याने विचित्राने सांगितल्याप्रमाणे चिकणमातीचा एक गणपती तयार केला. विचित्राने चुना, कोळसा, शेंदुर गेरू, हळद वगैरे रंग वापरून त्याला सुंदर रंग दिला.










विचित्राने रंगवून तयार केलेली गणपतीची मूर्त चित्रकार प्रमुखांनी प्रदर्शनात ठेवायला परवानगी दिली नाही. तो प्रदर्शनाच्या व्यवस्थापकांना भेटला व म्हणाला— "मालक, प्रदर्शनात अगदी टोकाला तरी माझी ही मूर्त ठेवायला परवानगी द्या! मी सारीच्या भक्ति भावनेने मला जमले तसे रंग एकत्र करून ही मूर्त रंगविली आहे. ती चांगली कलापूर्ण आहे की नाही हे पाहणारांना ठरवू द्या. उत्तमोत्तम कलाकारांच्या मूर्तीमध्ये आपली ही मूर्त ठेवली जावी, अशी माझी फार फार इच्छा आहे. मला बक्षिसाचा मोह नाही. तरी माझी एवढी विनंती मान्य करावी."

परंतु ते म्हणाले—"तुझं कुळगोत्र, नाव गाव काहीं नाही. खालच्या जातीच्या लोकांच्या वस्तीत तू राहतोस. अशा व्यक्तिच्या हातून तयार झालेली मूर्त, प्रख्यात वंशात जन्मलेल्या सुप्रसिद्ध चित्रकारांच्या मूर्तीबरोबर ठेवणे आम्हांला योग्य वाटत नाही." असे निष्ठुरपणे उत्तर देऊन व्यवस्थापक मोकळे झाले. विचित्र फक्त रडलाच नाही, परंतु त्याला फार फार वाईट वाटले.

त्याचा कुंभार मित्र त्याला म्हणाला— "आपल्याला ही मूर्त प्रदर्शनातल्या मंडपात ठेवतां येणार नाही. ते जाऊ दे! आपण ही दुसऱ्या जागी ठेवूं, चल!" असे सांगून विचित्राच्या मनाचे त्याने सांत्वन केले आणि जेथे प्रदर्शन होणार होणार होते त्याच्या जवळच एक केळ्याची बाग होती तीत ती मूर्त ठेवली व विचित्राला आपल्याबरोबर तेथे बसवून घेतले.

मोठेमोठे लोक प्रदर्शन पहायला आले. पाहणारांची मोठी गर्दी जमली. कोणत्या गणपतीला कोणकोणते रंग कोठून व किती किंमत देऊन आणले याची वर्णने चालू होती व लोक कौतुक करीत होते. चित्रकार कोण त्यांचे कुळ गोत्र काय याची चवकशी सुद्धा होत होती. परंतु मुलं मात्र विचित्राने केलेल्या गणपतीकडे येऊन तो

गणपती पहात होते व टाळचा वाजवून गणपतीच्या सौंदर्याचे कौतुक करीत होती.

त्याच वेळी आकाशातून घसरून पडलेल्या विद्युत पुत्रीं सारख्या दोन सुंदर तरुणी प्रदर्शन होते त्या मंडपात आल्या. त्यांच्या अंगावरच्या रत्नखचित दागिन्यामुळे वीज चमकल्या सारखा वारंवार भास होत होता.

त्यांना पाहून लोक आश्चर्यचकित झाले असतां मोठी म्हणाली—"कलानंद नगर हे आमचे गाव. आम्हांला आवडेल ती गणपतीची मूर्त विकत घेण्यासाठी आम्ही दहा हजार वराह सुवर्ण नाणी आणली आहेत. असे म्हणत तिने तिच्या हातात असलेली पिशवी हलवून दाखविली. तेथे जमलेले चित्रकार मूर्तिकार धावत जाऊन आपापल्या मूर्तीजवळ जाऊन उभे राहिले.

"आमची अक्का प्रसन्नवदना ही गायन कलेत निष्णात आहे. एवढेच नव्हे, ती खूप खाते ही. भरपूर नैवेद्य खाल्यावर शरीर प्रकृति चांगली राहते व गायन कलेत ही नैपुण्य लाभते. पोट सुटले तर गाणे कठीण, याचे उत्तर पाहिजे असेल तर आमच्या अक्का प्रसन्नवदनाला पहा!" असं म्हणत धाकटी पुढे निघाली तिने जणुंकाही सर्वांवर संमोहनास्त्रच टाकलं, तिचे चालणं बोलणं सर्वच डौलदार होतं.

"आमची धाकटी बहीण मोहना फार गरिष्ट त्याहून जास्त म्हणजे उत्तम नर्तकी! दिसायला ती लहान चिटुकली असली तरी मला उचलून गरगर फिरवू शकेल! इतकी शक्ती आहे तिच्या अंगात. नृत्यात तिचे नैपुण्य अद्वितीय आहे." प्रसन्नवदना म्हणाली.

"आमच्याकडून गाणे म्हणवून घेणे, नृत्य करवून घेणे इंद्राला किंवा कुबेरालाहि शक्य नाही. तशा तऱ्हेचे नृत्य व संगीत आम्हांला आवडेल त्या मूर्तीसमोरच होऊ शकेल असे आम्ही व्रतच घेतले आहे." मोहना म्हणाली.

त्यांच्या बोलण्यावर परवश झाल्यासारखे लोक मंत्रमुग्ध होऊन बाजूला सरकले आणि त्यांना वाट दिली.





# उलटलेले निवाडे

**फार** पूर्वी सिंहल द्वीपात एक व्यापारी रहात असे. त्याने दर्यापार व्यापार करून लक्षावधी रुपये संपादन केले. वार्धक्य आल्यावर अगदी शेवटच्या क्षणी त्याने आपल्या मुलाला जवळ बोलाविले आणि त्याचा सर्व व्यापार त्याला समजावून सांगून म्हणाला—"बाबा रे, तू सुद्धा समुद्रपार व्यापार चालू ठेव, परंतु चुकून सुद्धा वंचक महापट्टणाला जाऊ नकोस गेलं तर काय होणार आहे, पाहूया तरी असे कुतूहल त्याला होऊ लागले. तो हुशार होता कोणी आपल्याला फसवील असे त्याला वाटत नव्हते. कारण कोणी काही कपट केले तर आपण दुप्पट कपट करून आपला बचाव करू असा आत्मविश्वास त्याला होता. म्हणून तो आपल्या चारही नौका घेऊन त्या वंचक महा पट्टणाला गेला. तो पोचला ती सूर्योदयाची वेळ होती. नौका घाटाला बांधून ठेवून जयपाल आपला धनुष्यबाण घेऊन समुद्र किनाऱ्याकिनाऱ्याने चालत शिकार करण्याच्या हेतूने निघाला. एका जागी त्याला एक बगळा दिसला. तो निश्चेष्ट उभा राहून कोठे मासा दिसतो का, पहात होता. जयपालने भात्यातून एक बाण काढून धनुष्यावर चढविला आणि त्या बगळ्याला मारला. त्या एका बाणानेच तो बगळा समुद्राच्या पाण्यात मरून पडला.

तेथे जवळच एक कोळी मासे पकडीत होता. त्याने बगळ्याला मरून पडलेला पाहिले आणि पळत जयपालाजवळ जाऊन म्हणाला—"कोण रे तू? माझ्या वडिलांचा खून केलास! मी तुझ्या विरुद्ध राजाच्या दरबारांत फिर्याद करतो, पहा!"

"तो बगळा तुझा बाप होता का?" आश्चर्यचकित होऊन जयपालने त्या कोळ्याला विचारले.

२५ वर्षांपूर्वीची चांदोबातली गोष्ट



"होय. गेल्या जन्मी तो माझा बाप होता. आता बगळयाला जन्म देऊन मला मासे पकडायला मदत करतो आहे!" कोळी म्हणाला.

जयपालला राग आला. "चालता हो, तुला काय वाटेल ते कर!" असे म्हणत तो पुढे जाऊ लागला.

नंतर तो गावात गेला. रस्त्याने चालत असतां एक माणूस आडवा येऊन त्याला म्हणाला–"किती दिवसांनी भेटलात हो? कित्येक दिवसांपूर्वी मी आपला उजवा कान तुमच्या वडिलांकडे गहाण ठेवून दहा रुपये कर्जाऊ घेतले होते. ते कर्ज मी आज परत करतो माझा कान मला परत दे!"

जयपाल थक्कच झाला आणि त्या माणसाकडे पाहू लागला. त्याला फक्त डावा कानच होता. उजवा कानच नव्हता. "माझ्या वडिलांनी तुझ्या काना विषयी मला काहीच सांगितले नाही." जयपाल त्याला म्हणाला.

"माझा कान तू दिला नाहीस तर मी तुझ्या विरुद्ध राजदरबारात फिर्याद करीन!' असे सांगून तो निघून गेला.

जयपाल आणखी थोडे अंतर चालून गेला असेल, एक बाई त्याला भेटली व म्हणाली–"हे पहा रे, बाबा! सोळा वर्षां पूर्वी तुझे बाबा आमच्या या गावी आले होते त्यांनी माझ्याशी लग्न करून माझ्याबरोबर संसार केला आणि काही दिवसांनी निघून गेले! मला पोटगी म्हणून दहा हजार रुपये द्यायचे त्यांनी वचन दिले होते. ही रक्कम तू देतोस की फिर्याद करू, म्हणतोस?"

जयपालला तिच्या या अगाऊपणाचा भयंकर राग आला. "चालू लाग, तुला मी फुटकी कवडीसुद्धा देणार नाही!" असे म्हणत तो आपल्या नौकांजवळ आला. त्याला तेथे किनाऱ्यावर एक न्हावी भेटला. त्याने विचारले–"हजामत करणार का?"

जयपालने विचारले–"तू काय घेणार?"

"माझ्या मनाचं समाधान होईल असे काहीही द्या!" न्हावी म्हणाला.

जयपालानें बरं म्हणून त्याच्याकडून हजामत करवून घेतली आणि एक रुपया काढून दिला. न्हाव्याने तो घेतला नाही. पांच रुपये दिले तरी त्याने नकार दिला. जयपालला आतां मात्र राग आला. म्हणाला–"तर मग मी तुला काही एक देत नाही. तुला वाटेल त्याच्याकडे जाऊन सांग!"

कोळी, कान नसलेला माणूस, ती बाई आणि न्हावी चौघे ही राजसभेत गेले आणि त्यांनी जयपाला विरुद्ध आपापली फिर्याद नोंदविली. जलपालला राजसभेत हजर होण्यास हुकूम सुटला. सुनावणी सुरू झाली. सर्वप्रथम कोळी राजाला म्हणाला–"महा-राज, माझे वडील वारल्यावर बगळयाच्या रूपे जन्मले आणि मला कित्येक दिवस मासे पकडायला मदत करीत होते आणि या माणसाने त्या बगळयाची शिकार करून त्याला ठार केले. त्यामुळे माझे कधी भरून न येणारे नुकसान झाले."

राजा जयपालकडे वळून म्हणाला–"या कोळयाला नुकसान भरपाई म्हणून तू आपली एक नौका दे!"

नंतर कान नसलेल्या माणसाने फिर्याद केली. म्हणाला–"महाराज, या माणसाच्या वडिलांजवळ मी आपला उजवा कान गहाण ठेवला होता आणि त्याबद्दल दहा रुपये कर्ज फेडायला तयार आहे. माझा



कान द्यायला मी याला सांगितलं तेव्हां हा म्हणाला–"तू जाऊन वाटेल त्याच्याकडे तक्रार कर!"

महाराजाने निवाडा दिला कीं जयपालाने कानाच्या बद्दल कान नसणाऱ्याला एक नौका द्यावी.

त्यानंतर त्या बाईने जयपाल विरुद्ध फिर्याद केली. नंतर–"महाराज, याने माझ्या कडून हजामत करवून घेऊन माझं समाधान होईल असे काही देण्याचे वचन दिले. याची एक नौका मला देवविलीत तर माझ्या मनाचे समाधान होईल. त्याहून काही कमी मिळाल्यास मात्र माझ्या मनाचे समाधान होणार नाही."



"न्हावी म्हणतो आहे, ते बरोबरच दिसते आहे. म्हणून जयपालने न्हाव्याला एक नौका दिलीच पाहिजे!" राजाने आपला निवाडा दिला.

जयपालाच्या गळ्यातल्या रत्नहारा-शिवाय त्याची म्हणून जी संपत्ती होती ती अशा तऱ्हेने तो घालवून बसला. आतां पुढे काय? या पेच प्रसंगातून कशी सुटका करून घ्यायची?" असा तो विचार करीत असत: राजसभेत सोळा वर्षांच्या युवराजाने प्रवेश केला.

जयपालने तत्काळ आपल्या गळ्यातल्या रत्नहार काढून युवराजाच्या गळ्यात घातला. राजसभेत हजर असलेल्या सर्वांनी टाळ्या वाजवून आपला आनंद व्यक्त केला.

राजानेसुद्धा आपल्या मुलाला जवळ बोलावून त्याच्या गळ्यातला रत्नहार पाहिला व त्याचे कौतुक करू लागला.

जयपाल सर्व दरबाऱ्यांकडे वळून म्हणाला–"मी युवराजांना हा रत्नहार दिल्याबद्दल कोणाला आनंद झाला नाही असा कोणी आहे का?"

"नाही, नाही! आम्ही सर्व खूष आहों!" सर्व आनंदाने म्हणाले.

जयपाल न्हाव्याकडे वळून म्हणाला–"काय रे, तुझं काय म्हणणं आहे? तुझ्या मनाचे सुद्धा समाधान झाले का?

न्हाव्याला समाधान झाले असे म्हणण्या व्यतिरिक्त दुसरा मार्गच नव्हता. जयपाल राजाला म्हणाला–"महाराज, मी न्हाव्याच्या मनाचे समाधान केले. तेव्हां मी त्याला नौका देण्याची गरज नाही, असे मला वाटते."

"बरोबर!" राजा म्हणाला.

नंतर जयपाल त्या बाईकडे वळून म्हणाला–"बाई! तू आपल्या पोटगी विषयी एक गोष्ट सांगितली पाहिजे! तुला मी ती पोटगी द्यायला तयार आहे. परंतु एक अट आहे! आमच्या देशाच्या रीती प्रमाणे पत्नी ही पतीच्या मागे सहगमन करते. दुर्दैवाने माझे वडील एका वर्षाखालीच वारले. म्हणून तू त्यांच्या चिते सारखी चिता रचून तिच्यात उडी घ्यावी. म्हणजे तुझे जे वारस असतील त्यांना मी दहा हजार रुपये देतो!"

"मी अशी जबरदस्ती मरायला तयार नाही!" ती बाई म्हणाली.

तेव्हां जलपाल राजाला म्हणाला–"महाराज, तरमग मी हिला नुकसान भरपाई देण्याचे कारण नाही, असे मला वाटतं!" राजाने ती विनंती मान्य केली.

नंतर जयपाल कान नसलेल्याला म्हणाला–"बाबा रे! तुझा कान घ्यायला माझी मुळीच हरकत नाही. आमच्या वडिलांच्या कारकीर्दीत कित्येक हजार लोकांनी आपले कान आमच्याकडे गहाण आणून ठेवले आहेत आणि तुझ्यासारखेच कर्जाऊ पैसे मागून घेऊन गेले आहेत. त्यांत तुझा कान ओळखून आणायचा झाला तर तुझा डावा कान काढून दे. त्याच्यासारखा असलेला कान शोधून शोधून आणुन तुला देतो."

त्या गोष्टीस कान नसलेल्याने होकार दिला नाही. त्याला नुकसान भरपाई देण्याचे कारण नाही असा निवाडा राजाने दिला.

त्यानंतर जयपाल राजाला असे म्हणाला–"महाराज, माझे बाबा वारल्यावर मासा होऊन मला नौका चालविण्यास सहाय्य करीत होते. त्याच वेळी ह्या कोळ्याचा बाप बगळ्याच्या रूपे येऊन माझ्या बापाला गिळायला धावला. म्हणून मी त्या बगळ्याला ठार केले. माझे बाबा अशातऱ्हेने वारले नसते तर मला तुमच्या या राज्याच्या बाजूला येण्याचे कारणच नव्हते."

राजाने ते ऐकून आनंदाने कोळ्याला नुकसान भरपाई म्हणून काही देण्याची गरज नसल्याचा निवाडा दिला.

त्यानंतर जयपाल एक आठवडाभर राजाचा पाहुणचार उपभोगून व त्याच्याकडून काही भेट वस्तू घेऊन आपल्या चारही नौकांसह स्वदेशी परतला.





# अदृश्य भूत

गोपु दररोज सकाळी आपल्या गावाहून कचेरीच्या गावी कामावर जात असे आणि संध्याकाळी घरी परत येई. त्याच्या वाटेवर एक लहानसे जंगल होते. एकदां तो त्या जंगलाच्या पाऊल वाटेने जात असता त्याला पाऊलवाटेच्या दोन्ही बाजूला झाडांवर माकडं बसलेली दिसली. माकडांची दंगामस्ती चालू होती. गोपू थोडा भ्याला आणि त्याच मन:स्थितीत पाऊलवाट चुकला. तो अगदी अनोळखी जागी पोचला तो पर्यंत काळोख पडू लागला होता.

एकाएकी त्याची नजर एक जुनाट कर-पून गेलेल्या डहाळ्या फांद्या वगैरे नसलेल्या बोडक्या खुंटावर पडली. तो खुंट त्याला भुतासारखा वाटला. त्याला भुतांची फार भीती वाटे, परंतु काही भुते माणसांना मदत ही करतात असे त्याने ऐकले होते. गोपूला वाटले त्या खुंटावर एखादा मुंजा असावा. तो विचार मनांत येताच गोपू घाबरून गेला व हात जोडून म्हणाला– "अरे मुंजा, तू माझ्या मानगुटीवर बस-लास तर तुला काही मिळणारच नाही, याउलट तू मला गरिबाला थोडा हातभार लावलास तर आयुष्यभर मी तुझे उपकार मानीन."

त्याचे बोलणे पुरे व्हायच्या आताच त्या खुंटाच्या ढोलीत धपकन पडल्यासारखा कसला तरी आवाज झाला. गोपूने धाडस-करून त्या पोकळीत वांकून पाहिले व आश्चर्याने त्याचे डोळेच फिरले. ढोलीत सोन्याच्या नाण्यांचा ढीग होता.

गोपूने, त्याला नेता आली तेवढी नाणी आपल्या पंचात बांधून घेतली व घरी आला. बायकोने दार उघडले आणि विचा-रले–"असं काय हो, काय होतं इतकी रात्र उलटल्यावर घरी परतलात?"

"मी सांगतो सर्व प्रथम प्यायला पाणी घेऊन ये!" गोपू चिडक्या स्वरात म्हणाला.

गोमती सैपाक घराकडे वळली. गोपू विचार करू लागला, बायकोच्या पोटात कोणती ही गुप्त गोष्ट रहात नाही. म्हणून त्याने मोहरांचे गाठोडे माळ्यावर टाकले आणि पाणी पिऊन बायकोला जेवायला वाढायला सांगितले. जेवून खाऊन तो खाटेवर पडला, परंतु त्याला झोप आली नाही.



बायकोने त्याला विचारले–"काय हो, असे गप्प का? काही विशेष घडले का?"

"काही झालं नाही, तू मुकाट्याने जाऊन झोप कशी!" गोपाळ चिडक्या स्वरात म्हणाला.

गोपू बायकोला कधी तोडून बोलत नसे, आज करड्या स्वरात नवऱ्याला बोलतांना ऐकून ती रडू लागली.

उजाडल्यावर गोपू कचेरीच्या गावी गेला. तेथे चारचौघां ओळखीच्या लोकांना भेटला आणि निरनिराळ्या वस्तूंच्या व्या-पारा संबंधी चवकशी करू लागला. सर्व-जण त्याला सांगू लागले, बाबारे, व्यापार करणं सोपं आहे का? केवढं भांडवल गुंत-वावं लागतं? परंतु तोच विचार त्याच्या मनात घोळत होता आणि तो आठवडाभर नोकरीवर गेलाच नाही. शेवटी त्याने मनाशी ठरविले की व्यापारच करावयाचा व त्यासाठी पैसे जमवायचे.

एके दिवशी संध्याकाळी गोपू पुन्हां त्याच जंगलात गेला आणि मुंजा बसत असलेल्या त्या झाडाच्या खुंटाजवळ जाऊन हात जोडून म्हणाला–"मुंजा, तू मला जे धन दिलेस त्याच्या विचारात मी गेला आठवडाभर कचेरीत गेलोच नाही आणि रजा काढण्यासाठी अर्ज ही केला नाही. माझी नोकरी गेली. मला आणखी थोडे पैसे दे, म्हणजे मला स्वत:च्या पायावर उभे राहतां येईल."

असे म्हणत गोपूने झाडाच्या ढोलीत वांकून पाहिले. या खेपेस त्याला तेथे पहिल्यापेक्षा



थोडे म्हणजे अर्धाच ढीग दिसला. त्याने ते उचलले व बायकोच्या नजरेस पडू न देतां त्याने मोहरांचे गाठोडे माळघावर टाकून दिले. गोपूच्या मनात एकूण किती मोहरा आपल्याला मिळाल्या हे पाहून घेण्याची तीव्र उत्कंठा उत्पन्न झाली. परंतु बायको घरात होती व तिच्या नजरेआड ते काम त्याला करावयाचे होते. तशी संधी मिळेना. काय वाटेल ते करून मोहरा मोजून आपल्याला व्यापार सुरू केलाच पाहिजे असे मनाशी ठरवून तो बायकोला म्हणाला—"तू उद्यां माहेरी जा कशी!"

ते ऐकून त्याची बायको रडूच लागली. म्हणाली—"गेले काही दिवस तुम्हांला काय झालं आहे, हेच मला कळत नाही. एखादं भूत पिशाच तर तुमच्या पाठीशी लागलं नाही ना?"

गोपूला काय करावे, सुचेना त्याच विचारात त्याला रात्रभर झोप लागली नाही. तीन प्रहर रात्र उलटल्यावर त्याचा डोळा लागला तर त्याला असं भासलं की खोलीत कसली तरी खुडबुड चालू आहे. अचानक समोर त्याला चार भुते दिसली.

"तू आमच्या मित्राकडून बरेच पैसे घेऊन आला आहेस. तो ऐन वेळी हजर झाला नाही. आतां तूच आमच्या जेवणाखाण्याची नाही तर, चांगल्याशा मेजवानीची तयारी कर." भुतं त्याच्यावर बळजबरी करू लागली.

गोपू संतापून म्हणाला—"कसली रे मेजवानी? तोंडे बंद करा, आणि चालू लागा! माझ्या बायकोला भुताची भीती वाटते! जातां की नाही!"

ते उत्तर ऐकून भुते चिडली आणि घरातले सामानसुमान उचलून आदळ आपट करू लागले. नंतर माळघावर चढून दोन्ही गाठोडी सोडून त्यांनी सर्व मोहोरा घरभर उधळल्या आणि नाहीशी झाली तत्क्षण प्रत्येक मोहरेतून विंचू किंवा साप निघून गोपूला चावायला धावले. ते पाहून गोपू किंचाळला. गोपूच्या बायकोची झोप मोडली व म्हणाली—"काय हो, तुम्ही एखादं वाईट स्वप्न तर नाही पाहिलंत? मी घरात असेपर्यंत तुम्हांला शांतपणे झोप लागणार नाहीसे मला वाटू लागलं आहे. मी उद्यांच माहेरी जाते!" असे म्हणत तिने पाणी आणून गोपूला प्यायला दिले.

ते वाईट स्वप्न पाहिल्याने गोपू नखशिखांत हादरला होता. त्यानंतर तो थोडा सावरला, परंतु त्याला झोप मात्र आली नाही. आपल्या मनात एवढी अशांती होण्याचे मूळ कारण आपणांस मिळालेले फुकटचे धन आहे. ते भुताचे भुताला परत दिले तरच आपल्या मनाला शांती मिळेल. अशी त्याच्या मनाची खात्री झाली.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी गोमती पाणी आणायला तळ्यावर गेली तेव्हां गोपू माळघावरची दोन्ही गाठोडी घेऊन जंगलात त्या मुंजाच्या खुंटाकडे गेला.

या खेपेस हातवगैरे जोडल्या शिवायच तो मोठ्याने ओरडून म्हणाला—"हे उदारहृदयाच्या मुंजा! हे घे, तू मला जे धन दिले होतेस ते मी सर्वच्या सर्व परत करीत आहे. मला आतां हे चांगले कळले आहे की, मेहनती शिवाय फुकट मिळालेल्या पैशावर कोणी माणूस सुखी होणे शक्य नाही." असे म्हणत त्याने मोहरांची दोन्ही गाठोडी झाडाच्या ढोलीत टाकली.



दुसऱ्या क्षणाला ढोलीतून एक किंकाळी ऐकू आली—"आईआई ग! कोण आहे ते?"

गोपूने चकित होऊन ढोलीत वाकून पाहिले. एक काळाकभिन्न दाणगा माणूस डोके धरून उठत असलेला दिसला.

आतां काय करावे, गोपू या विचारात असतां त्या प्रदेशातल्या जमिनदाराचे दोघे नोकर तेथे धावत येऊन दाखल झाले. त्यांनी त्याला विचारले—"कोण तो ओरडणारा माणूस?" नंतर ढोलीकडे पाहून व त्या माणसाला ओळखून म्हणाले—"ओहो! तूच वाटते बेरडा दगड्या! तू जमिनदाराच्या घरातून जे काही चोरून आणलेस ते कोठे ठेवले आहेस?" असे म्हणत

दोघांनी त्याची मानगुटी धरून त्याला बाहेर काढले.

त्याच वेळी ढोलीच्या पाठीमागच्या एका बिळातून एक घूस बाहेर आली आणि झाडीत पळून गेली.

गोपू ती घूस पाहून चकित झाला आणि जमिनदाराच्या नोकरांना म्हणाला–"आत्तां मला कळलं की तिच्या बिळाला एकीकडून बंद करणाऱ्या मोहोरा घूस आपल्या बिळात घेऊन चालली आहे. मला वाटत होते की हे सर्व कोणत्या तरी भुताचे काम असावे."

ते ऐकून नोकरांपैकी एकजण रागाने गोपूचा खांदा धरून गदगदा हालवीत म्हणाला–"कायरे, तू एखादी कपोलकल्पित गोष्ट रचून तू येथून पळ काढायच्या विचा-रात आहेस वाटतं? जमिनदार साहेबांची तिजोरी फोडून तू आणि या बेरडाने ह्या ढोलीत सर्वधन लपवून ठेवलं होतंत! चला तर, जमिनदार साहेबांकडे!"

जमिनदार साहेबांच्या नोकरांनी ढोलीत पाहिलं, त्यांना मोहरां व्यतिरिक्त काही मूल्यवान दागिने सुद्धा मिळाले. जमिन-दाराने त्या बेरडाला तुरुंगात पाठवून दिले आणि गोपाळकडून त्याचा सर्व वृत्तांत विचारून घेतला. नंतर जमिनदार त्याला म्हणाला.

"ऐक, गोपाळ! तुझ्यामुळेच माझं चोरीला गेलेलं धन व दागिने वगैरे सर्व परत मिळालं. म्हणून यापैकी तुला ज काही व जेवढे हवे असेल, घे!" जमिनदार म्हणाला.

गोपू म्हणाला–"जमिनदार साहेब! व्यक्तीच्या मनात पैशाचा लोभ नांवाच एक अदृश्य भूत घर करून बसलेलं असत मला आतां जो अनुभव आला त्यावरून मी एक धडा घेतला आहे, तो म्हणजे त्या भुताला कसं काबूत ठेवायचं! तुम्ही मला कृपा करून एखादी नोकरी आपल्या पदरी दिलीत तर मी आपला फार ऋणी होईन.'

ते उत्तर ऐकून जमिनदार खूप झाला. त्याने गोपूला आपल्या घरी हिशोब लिहि-णारा कारकून म्हणून नेमले.






[ १४ ]

[शिवदत्त व मंदरदेव जात होते ते पडाव कोणत्यातरी बेटाला जाऊन लागले. कोठून तरी एक दगड अकस्मात आला आणि एका सैनिकाला लागला. त्या दिशेने मंदरदेवाने एक बाण सोडला. त्या पाठोपाठ एक किंकाळी ऐकू आली. उजाडल्यावर पाहतां त्या बाजूच्या झाडाच्या पानांवर लाल रक्ताचे डाग दिसले. पुढे–]

शिवदत्त व मंदरदेवाबरोबर सैनिकांनी सुद्धा पानांवर लाल रक्ताचे डाग पाहिले व थक्क झाले. रात्री जी किंकाळी त्यांनी ऐकली होती ती कोणत्या तरी माणसाचीच होती ह्या गोष्टीची सर्वांना खात्री पटली.

"हे माणसाचेच रक्त आहे, यात मला तरी शंका नाही!" शिवदत्त म्हणाला. रक्ताचे डाग जास्त लक्षपूर्वक पहात शिवदत्त म्हणाला–"मला वाटले होते तो माणूस घायाळ झाला आहे, मेला नाही. तो इकडून पळून गेला असावा यातही काही शंका करण्याचे कारण नाही.

तै काही असो आपण आसपासचा प्रदेश हिंडून पाहू या माझ्याबरोबर सर्वजण चला!"

मंदरदेव व तीन सैनिक एका बाजूला गेले आणि शिवदत्त उरलेल्या तिघांसह

दुसऱ्या बाजूला गेले. मंदरदेव काही अंतर चालून गेल्यावर समोरच्या झुडपात काही तरी हालत असल्यासारखे भासले. लगेच त्याला, तो शोधत होता तो शत्रू सांपडल्यासारखे वाटले आणि त्याने पुढे उडी मारली. परंतु हालला डुलला तो माणूस नव्हताच, एक रानटी डुक्कर होते. तो गुरगुरत मंदरदेवाला आपल्या सुळ्यांनी फाडायला त्याच्या अंगावर धावून गेला. मंदरदेव आश्चर्यचकित झाला, परंतु त्याने डुक्कर ढुशी देणार, त्याच्या आत तलवार उपसून डुकराच्या पोटात भोसकली. डुक्कर कळवळून ओरडले, परंतु मेले नाही आणि मंदरदेवावर धावले. तितक्यात मंदरदेवाच्या एका सैनिकाने आपला भाला भोसकून त्याला मारले. काही वेळाने तडफडून ते मरण पावले.

इतक्यात शिवदत्त आपल्या सैनिकांसह तेथे आला. त्याला ते रक्तबंबाळ झालेले डुक्कर व बाजूला उभा असलेला मंदरदेव दिसले. शिवदत्त स्मित करून म्हणाला—"आरडा ओरडा ऐकून मी धांवलो की शत्रूने अचानक हल्ला तर केला नाही!" परंतु हा प्रकार पहिल्यावर माझ्या जिवात जीव आला.

मंदरदेव म्हणाला-"आपल्याला अकस्मात ईश्वर कृपेने आहार मिळाला आहे. आपल्यावर दगड फेंकणारा माणूस कोण, त्याचा शोध आपण मागाहून काढू! प्रथम याचा फराळ करू या."



सैनिक वाळलेल्या काटक्या व पाचोळा आणायला धावले. मंदरदेव व शिवदत्त विस्तव पेटवून जाळ करण्यात गर्क झाले इतक्यात कानाचे पडदे फाटतील इतकी कर्कश किंकाळी ऐकू आली. सर्वजण घाबरून गेले.

ती किंकाळी ऐकून शिवदत्त व मंदरदेव चटदिशी उभे राहिले आणि आपापल्या तलवारी उपसून तो आवाज आला त्या दिशेने धावले. थोडे अंतर गेल्यावर त्यांना जे दृश्य दिसले ते पाहून त्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला.

मध्यंतरी काही सैनिक 'वनमाणूस' 'वनमाणूस' असे ओरडत त्याच बाजूला धावले.

काटक्या गोळा करायला जे सैनिक धावले होते त्यांपैकी एकाचा गळा पाठी मागून येऊन बलदंड हाताने कोणी दाबीत होता. तो सैनिक स्वतःची सुटका करू न शकल्याने मोठ्याने ओरडला होता. ती किंकाळी सर्वांनी ऐकली.

"हा वनमाणूस असला पाहिजे, यात मला तरी शंका वाटत नाही." असे म्हणत मंदरदेव त्याला तलवार भोसकायला पुढे सरसावला. परंतु तेवढ्यात शिवदत्त त्याला सावध करीत ओरडला—"मंदरदेव, थांब!" त्याचवेळी गळा दाबणारा प्राणी पाठीमागे वळून पाहून पळून जाण्यास वळला. परंतु तीन सैनिकांनी त्याला धरले व जंगली वेलांनी त्याचे हात पाय बांधले.





"हा वनमाणूस नसून आपल्यासारखाच माणूस आहे. दुर्दैवाने तो ह्या स्थितीत आपल्याला आज आढळला आहे." शिवदत्त म्हणाला.

त्याच वेळी एक सैनिक चकित होऊन त्याच्याकडे पहात म्हणाला—"शिवदत्त प्रभू आपण लक्षपूर्वक पहावे, याच्या हाताला केवढी मोठी जखम आहे ती! जखमेतून रक्त प्रवाह चालू आहे.

मंदरदेवाने त्या विचित्र माणसाचा हात जवळ जाऊन पाहिला व म्हणाला—"शिवदत्त, आपल्यावर दगड फेंकणारा प्राणी तो हाच! येऊन पहा, माझा बाण याला या जागी लागला आहे. तू म्हणालास तसा हा वनमाणूस नसून आपल्यासारखाच एक प्राणी आहे!"

तो जखमी माणूस कण्हत म्हणाला—"मी तुमच्यासारखाच एक माणूस आहे. या भयंकर देशात गेली बारा वर्षे मी काढली आहेत. मी एकटा आहे, म्हणूनच माझी ही दशा झाली आहे!"

"तुझं नाव काय? तुला गेली बरा वर्षं या बेटावर कां काढावी लागली? आणि तुला या स्थितीत राहण्याची गरज कां पडली?" शिवदत्ताने विचारले.

शिवदत्त म्हणाला ते ऐकून तो माणूस, काहीतरी आठवित असल्यासारखा अभिनय करून थोडावेळ काही बोललाच नाही. नंतर स्वतःला सावरून म्हणाला—"मालक, मला वज्रमुष्टी म्हणून माझे आई वडील व लोक म्हणत. मी शमन बेटावरचा राहणारा आहे. मला अठरावे वर्ष लागले तेव्हां पासून मी समुद्रकेतू नावाच्या एका क्रूर चांच्या बरोबर राहू लागलो. चांचेगिरी करणे हेच काम आमचे सर्वांचे होते. आम्ही समुद्र काठच्या गांवावरही हल्ले करून लुटीत होतो.

काही दिवसांनी आमच्या नायकाशी माझे काही कारणावरून भांडण झाले. म्हणून मला या बेटावर टाकून तो येथून निघून गेला.

"तू शमन द्वीपाचा रहिवाशी आहेस का?" असा प्रश्न करून शिवदत्त काही काळ चकित होऊन विचारमग्न झाला. शमन द्वीपाबरोबर शिवदत्तला शाक्तेय व त्याची चंडीदेवी आठविली. त्या देवीला प्रसन्न करण्यासाठी तिचे देऊळ बांधण्याच्या हेतूने शाक्तेय जवळपासच्या प्रदेशावर हल्ले करीत होता. ही गोष्ट ही आठविली. शिवदत्ताने विचार केला की शमन द्वीपाचा शोध काढण्यासाठी व त्या देशाच्या राजाची माहिती काढण्यासाठी या माणसाचा उपयोग होऊ शकेल. परंतु त्याने विचार केला की या सर्व गोष्टींची माहिती काढण्यास ती वेळ योग्य होणार नाही. तूर्त आपण ज्या बेटावर आहों त्या बेटाची माहिती व परिस्थिती कळली की पुरे.

तो विचार मनात आल्यावर शिवदत्तने वज्रमुष्टीला विचारले—"वज्रमुष्टी, तू या बेटावर गेली बारा वर्षे राहातो आहेस ना? मग तुला या बेटावरच्या रहिवाशांच्या राहाणी व आचार विचारांची चांगली माहिती नक्की असणार?"

वज्रमुष्टीने निराश होऊन उत्तर दिले—"मालक, मी या बेटावर बारा वर्षे झाली राहतो आहे, हें खरें. परंतु मला या बेटा संबंधी फारशी माहिती नाही. कारण माझा बराचवेळ आपल्या उदर निर्वाहा-



साठी शिकार करण्यात आणि येथील हिंस्र पशूंपासून स्वतःचे रक्षण करण्यातच गेला. एवढे खरे की मी समुद्रकेतूची गलबते या बेटाजवळून जातां येतां एक दोनदां पाहिली आहेत. या व्यतिरिक्त या बेटा विषयी मला काहीच माहीत नाही.

"या बेटावर तुला दुसरा कोणी माणूस दिसला किंवा भेटला नाही का?" शिवदत्ताने विचारले.

वज्रमुष्टी काही तरी आठवत असल्यासारखे करून होकारार्थी मान हलवीत म्हणाला—"या गेल्या बारा वर्षांत मी फक्त चारदां किंवा पांचदां माणसांना अवश्य पाहिले आहे. ते उंच आजानुबाहू होते













आणि शिकारीपण होते. त्यांनी डोक्यावर शिंगे लावलेले मुकुट घातले होते. परंतु ते जवळपास कोठे रहात असतीलसे मला वाटत नाही. शिकार करून ते कोठे तरी निघून जातात.

शिवदत्त मंदरदेवाकडे अर्थपूर्ण दृष्टीने पाहू लागला. मंदरदेव हंसत म्हणाला–"शिवदत्त, ते काही असो. आपल्याला काही काळ तरी या बेटावर काढावी लागणारच आहेत. म्हणून आपण जवळपासचा प्रदेश हिंडून पाहिले पाहिजे की आपण आहो, तो भाग कसा काय आहे? मनुष्य वस्तीस धोक्याचा तर नाही? काळोख पडायच्या आत आपण कामाला लागून पाऊस व वारा यांच्या पासून स्वरक्षणासाठी निवाऱ्या करिता लहान लहान झोपड्या बांधून तयार केल्या पाहिजेत." लवकर कामाला लागु या.

शिवदत्तने होकारार्थी मान हलविली. नंतर आपल्या सैनिकांकडे वळून वज्रमुष्टीला सोडण्यास खूण केली. बंदी मुक्त होतांच वज्रमुष्टी मंदरदेव व शिवदत्त दोघांना प्रणाम करून म्हणाला–"मालक, मलासुद्धा आपल्या सेवेस राहायला परवानगी देण्याची कृपा करावी." मी आपला एक स्वामिभक्त नोकर म्हणून आपली चाकरी करीन. माझ्यावर संशय करू नका." मी पाहिजे ती मदत आपल्यावरोबर करीन.

तेव्हां शिवदत्ताने आपल्या अनुयायांकडे सार्थक दृष्टीने पाहिले. त्या सर्वांनी होकारार्थी माना हलविल्या. त्यांच्यापैकी दोघां तिघांनी वज्रमुष्टीच्या खांद्यावर हात ठेवून त्याला तो त्यांचा मित्र असल्याचे सुचविले.

"आतां सर्वांत आधीं आपण सर्वांनी आपली भूक भागविली पाहिजे. त्यानंतरच हा प्रदेश कसा आहे याची माहिती काढू या." मंदरदेवने सुचविले.

शिवदत्ताने मान हलवून होकारार्थी सूचना दिली. सैनिकांनी वाळक्या काटक्या व पाचोळा जमा करून विस्तव केला आणि त्यात त्या रानटी डुक्कराला टाकले. वज्रमुष्टी काही वेळ भाजून निघत असलेल्या त्या डुक्कराकडे काही वेळ पहात राहिला. नंतर म्हणाला–"या एकट्या जनावरांवर आपली सर्वांची भूक भागणे शक्य नाही. आपण मला परवानगी दिलीत तर मी काही मिनिटांतच आणखी एखादे जनावर धरून घेऊन येईन.

मंदरदेव व शिवदत्ताची परवानगी मिळतांच वज्रमुष्टी बरोबर दोघे तिघे सैनिक तीरकमान घेऊन निघाले. थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना जंगलात एका जागी चार पांच हरणे चरत असलेली दिसली सैनिकांनी धनुष्यावर बाण चढविला परंतु वज्रमुष्टी त्यांना खुणेने थांबायला सांगून म्हणाला–"या लहानशा निरूपद्रवी जनावरांना धरायला तुम्ही आपल्या बाणांचा, पाऊस पाडायची गरज काय? तुम्ही येथेच थांबा. मी जातों व एका दोघां जनावरांना धरून आणतो." असे म्हणत तो दाट झाडीत शिरला व मांजराच्या पावलांनी पुढे जाऊ लागला.

सैनिक सुद्धा वज्रमुष्टीच्या पाठोपाठ चाहूल दिल्या शिवाय चालू लागले. वज्रमुष्टी थोडे अंतर चालून गेल्यावर हरणांचा कळप होता त्याच्या जवळच्या एका झाडावर चढला. सैनिकांना तो काय करणार हे कळत नव्हते. म्हणून ते आश्चर्याने त्याच्याकडे पहात उभे राहिले. वज्रमुष्टी हळूहळू कळपावर लोंबणाऱ्या फांदीवर सापासारखा सरपटत पुढे सरकला व त्याने हरणांवर एकदम उडी टाकली.




हरणे तत्काळ उड्या मारून पळाली. तरी एक हरण वज्रमुष्टीच्या बळकट हातात सांपडलेच. त्याने निसटण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु व्यर्थ. त्या हरणाला वज्रमुष्टीने आपल्या खांद्यावर टाकले व म्हणाला–"गेली बारा वर्षे मी आपली भूक भागविण्यासाठी हाच धंदा केला. मी धनुष्य बाण कोठून आणणार? एकदोनदां तर वाघ व अस्वलाशी सुद्धां मला झुंज द्यावी लागली होती, स्वतःचा जीव



पोंचला. सर्व गांव निद्रामग्न होते. राजा एका घरासमोर उभा राहिला व दाराची कडी वाजवू लागला.

"तू कोणी परदेशी दिसतो आहेस! त्या घराच्या दाराची कडी कशाला वाजवितो आहेस?" असं कोणी म्हणत असल्याचे राजाने ऐकलं.

राजाने मागे वळून पाहिलं. पंचवीस एक वर्षाचा एक माणूस कुतूहलपणे राजाकडे पहात होता.

"तू कोण रे बाबा?" राजाने त्याला विचारले.

"मी गावातला पाहारेकरी आहे. रात्र भर पाहारा देतो. तू कोणी परदेशी आहेस की चोर आहेस, ही शंका आली. तू परदेशी असशील तर तुला मी एक सूचना म्हणून करतो आहे. ती तू नीट ऐकून घे." तो पाहारेकरी म्हणाला.

"ऐकू दे तरी?" राजाने विचारलं.

"त्या घराचा मालक म्हणजे पराकाष्ठेचा लोभी आहे. रात्री हा तुला फुकट राहू देणार नाही. तसा फुकट आश्रय देणारे गावात पुष्कळ लोक आहेत. हेच तुला सांगावयाचे आहे मला." पाहारेकरी म्हणाला.

राजाला वाटले की हा कितपत लोभी आहे, हे पाहून तरी घ्यावे. म्हणून त्याने जोर जोराने दारावर थाप दिली. लगेच आतून आवाज आला–"आलो हां! थांब जरा."

राजाला आश्चर्य वाटले की, अर्धी रात्र लोटली असतां दारावर थाप देतांच दार उघडणारी व्यक्ती चिक्कू लोभी कशी काय असू शकेल? एका मधल्या वयाच्या माणसानें दार उघडले.

राजा नम्रपणे म्हणाला–"आपण फार उदार व दयाळू आहां, असे ऐकतो. मी एक परदेशी आहे. आजची रात्र मला तुमच्याकडे काढतां येईल का?"

"तुम्ही माझ्या विषयी काही तरी चुकीचे ऐकले आहे. माझ्या मनात दयेचा लवलेशही नाही. मी परदेशियांना मुळीच आश्रय देत नाही." लोभी म्हणाला.

"सर्व मला असे सांगत होते की पाहुण्यांचे स्वागत करायला आपण रात्रं दिवस वाट पहात बसतां, म्हणे! मी दारावर थाप देतांच आपण 'आलों!' म्हणालात, तेव्हां याहून जास्त प्रमाण काय पाहिजे सांगा?" राजा म्हणाला.

"अस्सं होय! घरातली चीजवस्तु चोर घरात शिरून नेतील, म्हणून मला दिवसां किंवा रात्री झोप येत नाही. म्हणून आपण दार वाजविल्या बरोबर मी 'ओ' दिली. तुम्ही पुन्हां पुन्हां दार वाजविलेत तर दार घासून जाईल व मोडेलही. म्हणूनही लगेच 'ओ' दिली. बरं तर आतां तुम्ही चालू लागा!" तो लोभी म्हणाला

"या मध्यरात्रीच्या वेळी मी कोठे जाऊं म्हणतां? पैसे घ्या पाहिजे तर, पण मला रहायला जागा द्या." असे म्हणत राजाने त्या लोभ्याला सोन्याचं एक नाणे दिले.

ते नाणे हातात पडतांच लोभ्याने राजाला अंथरुणापांघरुणाची व्यवस्था करून दिली. दुसऱ्या दिवशी तो लोभी ज्या तऱ्हेने आयुष्य घालवीत होता ते पाहून राजाला फार वाईट वाटले.

त्या लोभ्याच्या परसात फळझाडे होती. त्याच्याकडे दोन गाई व दोन म्हशी होत्या.



तरी सैंपाकापासून सर्व घरातली कामे तो स्वत: करीत असे.

तो व्याजाने लोकांना पैसे देई. फळे व दूध वगैरे सर्व विकून टाकी. एक क्षणभरही विश्रांती घेतल्याशिवाय खूप अंग मेहनत करी. रात्री या भीतीने त्याला झोप लागत नसे की रात्री त्याच्या घरात केव्हां चोर शिरले.

हा दिवसभरात एकदां तरी पोटभर जेवतो का, पाहण्याची इच्छा राजाच्या मनात उपजली. त्याने त्याला एक सोन्याचे नाणे देऊन म्हटले–"तुम्ही दोघांच्या जेवणाची व्यवस्था करा." त्या लोभ्याने आश्चर्य चकित होऊन विचारले–"दोघे कोण?"

      



पोंचला. सर्व गांव निद्रामग्न होते. राजा एका घरासमोर उभा राहिला व दाराची कडी वाजवू लागला.

"तू कोणी परदेशी दिसतो आहेस! त्या घराच्या दाराची कडी कशाला वाजवितो आहेस?" असं कोणी म्हणत असल्याचे राजाने ऐकलं.

राजाने मागे वळून पाहिलं. पंचवीस एक वर्षाचा एक माणूस कुतूहलपणे राजाकडे पहात होता.

"तू कोण रे बाबा?" राजाने त्याला विचारले.

"मी गावातला पाहारेकरी आहे. रात्र भर पाहारा देतो. तू कोणी परदेशी आहेस की चोर आहेस, ही शंका आली. तू परदेशी असशील तर तुला मी एक सूचना म्हणून करतो आहे. ती तू नीट ऐकून घे." तो पाहारेकरी म्हणाला.

"ऐकू दे तरी?" राजाने विचारलं.

"त्या घराचा मालक म्हणजे पराकाष्ठेचा लोभी आहे. रात्री हा तुला फुकट राहू देणार नाही. तसा फुकट आश्रय देणारे गावात पुष्कळ लोक आहेत. हेच तुला सांगावयाचे आहे मला." पाहारेकरी म्हणाला.

राजाला वाटले की हा कितपत लोभी आहे, हे पाहून तरी घ्यावे. म्हणून त्याने जोर जोराने दारावर थाप दिली. लगेच आतून आवाज आला—"आलो हां! थांब जरा."

राजाला आश्चर्य वाटले की, अर्धी रात्र लोटली असतां दारावर थाप देतांच दार उघडणारी व्यक्ती चिक्कू लोभी कशी काय असू शकेल? एका मधल्या वयाच्या माणसानें दार उघडले.

राजा नम्रपणे म्हणाला—"आपण फार उदार व दयाळू आहां, असे ऐकतो. मी एक परदेशी आहे. आजची रात्र मला तुमच्याकडे काढतां येईल का?"

"तुम्ही माझ्या विषयी काही तरी चुकीचे ऐकले आहे. माझ्या मनात दयेचा लवलेशही नाही. मी परदेशियांना मुळीच आश्रय देत नाही." लोभी म्हणाला.

"सर्व मला असे सांगत होते की पाहुण्यांचे स्वागत करायला आपण रात्रं दिवस वाट पहात असतां, म्हणे! मी दारावर थाप देतांच आपण 'आलों!' म्हणालात, तेव्हां याहून जास्त प्रमाण काय पाहिजे सांगा?" राजा म्हणाला.

"अस्सं होय! घरातली चीजवस्तु चोर घरात शिरून नेतील, म्हणून मला दिवसा किंवा रात्री झोप येत नाही. म्हणून आपण दार वाजविल्या बरोबर मी 'ओ' दिली. तुम्ही पुन्हां पुन्हां दार वाजविलेत तर दार घासून जाईल व मोडेलही. म्हणूनही लगेच 'ओ' दिली. बरं तर आतां तुम्ही चालू लागा!" तो लोभी म्हणाला

"या मध्यरात्रीच्या वेळी मी कोठे जाऊं म्हणतां? पैसे घ्या पाहिजे तर, पण मला रहायला जागा द्या." असे म्हणत राजाने त्या लोभ्याला सोन्याचं एक नाणें दिले.

ते नाणे हातात पडतांच लोभ्याने राजाला अंथरुणापांघरुणाची व्यवस्था करून दिली. दुसऱ्या दिवशी तो लोभी ज्या तऱ्हेने आयुष्य घालवीत होता ते पाहून राजाला फार वाईट वाटले.

त्या लोभ्याच्या परसात फळझाडे होती. त्याच्याकडे दोन गाई व दोन म्हशी होत्या. तरी सैंपाकापासून सर्व घरातली कामे तो स्वत: करीत असे.



तो व्याजाने लोकांना पैसे देई. फळे व दूध वगैरे सर्व विकून टाकी. एक क्षणभरही विश्रांती घेतल्याशिवाय खूप अंग मेहनत करी. रात्री या भीतीने त्याला झोप लागत नसे की रात्री त्याच्या घरात केव्हां चोर शिरले.

हा दिवसभरात एकदां तरी पोटभर जेवतो का, पाहण्याची इच्छा राजाच्या मनात उपजली. त्याने त्याला एक सोन्याचे नाणे देऊन म्हटले—"तुम्ही दोघांच्या जेवणाची व्यवस्था करा." त्या लोभ्याने आश्चर्य चकित होऊन विचारले—"दोघे कोण?"



"तुम्ही व मी! राजघराण्यात जन्मलो आहे. कधी एकट्याने खायची मला संवय नाही." राजा म्हणाला. रात्री एका मोठ्या मेजवानीची तयारी झाली. परंतु तो लोभी राजाबरोबर जेवला नाही. त्याने आणखी एका परदेशी माणसाकडून पैसे वसूल केले व त्याला राजाबरोबर जेवायला वाढले.

जेवण झाल्यावर राजाने त्या लोभ्याला विचारले—"काय हो, माझी इच्छा तुमच्या बरोबर जेवायची होती, परंतु तुम्ही परक्याच एकाला माझ्याबरोबर बसविलेत, ते कां?"

हे पहा, पोटभर जेवलो तर गाढ झोप लागेल आणि रात्रभरात माझं घर लुटले जाईल." लोभी म्हणाला.

राजा चकित होऊन म्हणाला—"मी आजपर्यंत तुमच्यासारखा माणूस पाहिला नव्हता. तुम्हांला कळावे म्हणून सांगतो आहे, मी या देशाचा राजा आहे. तुम्ही माझ्याबरोबर राजधानीत चला. राजधानीत जर हे सिद्ध झाले की तुमच्या इतका लोभी दुसरा कोणी नाही, तर मी तुमच्याजवळ आज जेवढे धन आहे, त्याच्या दुप्पट धन देईन."

धनलोभाने तो लोभी राजाबरोबर राजधानीत जायला तयार झाला. तेव्हां राजाने गांवच्या पाटलाला बोलवून आपली ओळख दिली व त्या लोभी माणसाच्या घरावर कडक पाहारा ठेवायला सांगितले. नंतर राजा त्या लोभी माणसाला बरोबर घेऊन राजधानीला गेला.

राजाने आपल्या प्रधानाला त्या लोभी माणसाचा लोभीपणा वर्णन करून सांगितला व लोभी माणसांच्या लोभीपणाची चढाओढ लावण्याची तयारी करावयास सांगितले.

प्रधान म्हणाला—"अशा तऱ्हेच्या चढाओढीतून निष्पन्न काय होणार? मनोरंजन व करमणुकीचे साधन म्हणूनसुद्धा काही मर्यादा हवीच!"

राजा म्हणाला—"ही चढाओढ संपल्यावरच उपयोग काय हे स्पष्ट होईल!"

प्रधानाने एका आठवड्याच्या अवधीत काही लोभी माणसांना एकत्र केले.

चढाओढ या गोष्टीची होती की लोभी माणसांपैकी कोणी एकाने दुसऱ्या लोभी व्यक्तीजवळ दान मागावे. ते धन राजा लोभी माणसाच्या हाती देणार. त्यानंतर अशी अट होती की लोभी माणसाने ते दान करावे किंवा दान न करतां पंचवीस फटके खाऊन ते पैसे स्वत: घ्यावे. लोभी माणसाजवळ दान मागूनही ज्या दुर्दैवी लोभ्याला दान मिळणार नाही त्याला एक फटकाच सहन करावा लागेल.

कित्येक लोभी राजाकडून मिळालेले धन स्वतःकडे ठेवून घेऊन फटके खायला तयार झाले. परंतु काही जण फटके सहन न करू शकल्यामुळे ते धन दान करायला तयार झाले. शेवटी राजा गावाहून आलेल्या लोभ्याची पाळी आली. त्याच्याजवळ दान मागायला कोणी लोभी आला नाही.

राजाने त्या लोभ्यांकडे आश्चर्यचकित होऊन विचारले—"आतापर्यंत या चढाओढीत भाग घेणाऱ्या प्रत्येकाला थोडाफार फायदा झालाच. आता तर एकच जण उरला आहे. त्याच्याजवळ मागा दान."

तेव्हां सर्व लोभी एक स्वराने म्हणाले—"महाराज, या माणसाचे तोंड पाहिल्यावर असे वाटते की, याचा जीव गेला तरी हा



दान कदापि देणार नाही. दान मागितल्यावर व ते न मिळाल्यावर आम्हांला विनाकारण एक फटका सहन करावा लागेल की नाही?"

तेव्हां राजाने आपल्याबरोबर गावाहून आलेल्या लोभ्याला सर्वात मोठा लोभी म्हणून जाहीर केले. नंतर त्याला एका मोठ्या वाड्यात बोलावून घेऊन गेला. त्या वाड्यात राजघराण्यातल्या मूल्यवान वस्तूंचा संग्रह केलेला होता. संगमरमरी दगडाच्या मूर्ती, हिरे, माणिक्ये वगैरे रत्नांनी मढविलेल्या मुठी असलेल्या तलवारी, सोन्याच्या तारेने विणलेली वस्त्रे आणि सोन्याचांदीची भांडी सुद्धा होती.

त्या सर्व वस्तू पाहून लोभी माणसाला आश्चर्य वाटले. राजा म्हणाला–"मी तुला हा महाल देतो, तू यांत राहशील का?"

राजाच्या तोंडी ते ऐकून लोभी माणूस चकितच झाला. नंतर स्वतःला सावरून म्हणाला–"महाराज, याहून मोठे भाग्य ते काय असणार? परंतु माझे सर्व वैभव माझ्या गावी राहून गेले आहे ना?"

"त्यात काय झालं? तुझे घर व घरातलं सर्व सामान सोन्यात बदलून मी याच वाड्यात पोचते करवितो." राजा म्हणाला.

लोभी आनंदाने त्या गोष्टीस तयार झाला. राजाने लोभ्याच्या जवणाची व्यवस्था करून दिली.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला–"राजा, वज्रपुरीच्या राजाहून मूर्ख राजा दुसरा कोणी असेल का? कित्येक पिढ्यांपासून त्याच्या पूर्वजांनी जमा केलेले वैभव त्या मूर्ख लोभ्याला देऊन टाकण्यात किती मूर्खपणा आहे! असा राजा चांगला शासक कसा होऊ शकेल? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"तुला वाटते तसा मी त्याला मूर्ख मानीत नाही. त्याने त्या लोभ्याची पद्धतशीर परीक्षा घेतली व तो पहिल्या नंबरचा लोभी असल्याची खात्री करून घेतली. लोभ्याला "धन मूलं इदं जगत!" असते तो धन खर्च न करता ते संभाळून राखून ठेवतो. कित्येक वर्षे सांठवलेल्या वैभवावर कित्येकांची बारीक नजर असणारच. त्यांच्यापासून त्या वैभवाचे संरक्षण करायला एक पाहारेकरी हवाच! ते काम करायला या लोभ्या व्यतिरिक्त योग्य कोण असू शकणार या विचाराने राजाने त्या मूर्ख लोभ्याला पाहारेकरीच नेमले होते, समज!"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# सोनाराची निवड

अंबरपुरीचा जमिनदार जगन्नाथ याने आपली दुसरी मुलगी सुंदरी हिचा विवाह करण्याचे ठरविले. तिच्या लग्नासाठी त्याने निरनिराळ्या तऱ्हेचे व नवीन दागिने करविण्याचे योजले. त्यासाठी एका विश्वासपात्र सोनाराची निवड करण्याचे काम दिवाणाला सोंपविले.

काही वर्षांपूर्वी जमिनदाराने आपल्या थोरल्या मुलीच्या लग्नासाठी जे दागिने करविले होते ते करणाऱ्या सोनाराने सोन्यात तांबे व पितळ मिसळून नकली सोन्याचे दागिने करून दिले होते. ती गोष्ट कित्येक दिवसांनंतर उघडकीला आली. म्हणून जमिनदार जास्त सावधगिरी बाळगीत होता.

सुंदरीचे लग्न ठरल्याचे गांवभर पसरले तेव्हां गावातले सर्व सोनार जमिनदाराकडे धावले. चढाओढच लागली त्यांची, परंतु जमिनदाराचा दिवाण हुशार होता. बरेचसे सोनार लबाडच होते, म्हणून त्याने त्या सर्वांना कोरेच पाठवून दिले.

अंबरपूरला नवीन धंदा सुरू करणारे तीन नवीन सोनार नुकतेच आले होते. त्यांची नावे अनुक्रमे सोनोबा, बिठोबा व लखोबा अशी होती. या तिघांपैकी एकाकडे सर्व दागिने घडवायचे काम द्यावे असे दिवाणाने ठरविले. त्या तिघांच्या हातात चांगले कसब असल्याचे दरबारात काम करणाऱ्या अनेक अधिकाऱ्यांकडून दिवाणाने ऐकले होते.

दिवाणाने तिघांना बोलविले आणि जमिनदाराच्या थोरल्या मुलीचे दागिने दाखवून त्यांची कसोटीवर परीक्षा करून खरंखोटं सोनं किती प्रमाणात आहे विचारले. दुसऱ्या दिवशी तिघे सोन्याची पारख करून दिवाणाला भेटायला आले. त्यावेळी

जमिनदार स्वत: हजर होता. सोनाबा जे दागिने घेऊन गेले होते ते दाखवून दिवाणाला म्हणाले–"मालक, हे दागिने कोणी केले आहेत, हे आपणांलाच चांगले माहीत असणार, यात दोन भाग तांबे व एकच भाग सोन्याचा आहे."

विठोबा त्याने नेलेले दागिने परत करीत म्हणाले–"मालक, हे दागिने ज्या कोणी केले असतील चांगला वस्ताद आहे, बघा! यात एक भाग तांबे, एक भाग पितळ आणि एक भाग सोने आहे."

लखोबा दागिने परत करीत म्हणाला–"मालक, यात फक्त एक भाग सोने आहे आणि बाकी तीन भाग मिसळ आहे."

त्यानंतर दिवाणाने तिघांना निरोप दिला व ज़मिनदाराला म्हणाला–"प्रभो, आपण नि:संकोच लखोबालाच हे काम द्यावे."

जमिनदार आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"या तिघांपैकी लखोबाच जास्त इमानदार आहे हे तुम्ही कसे ओळखलेत?"

दिवाण म्हणाला–"सोनाबा व विठोबांना सोन्यात तांब्या पितळेची मिसळ करण्याची संवय आहे. म्हणून त्यांनी सर्वांत प्रथम दागिन्यात ज्या धातूंची मिसळ करतात त्यांचीच नांवे सांगितली आणि नंतरच खऱ्या सोन्याचे प्रमाण किती आहे हे सांगितले. परंतु लखोबाना तशी मिसळ करण्याची वाईट संवय असेलसे वाटत नाही. कारण त्यांनी दागिन्यात सोने किती प्रमाणात आहे, हे प्रथम सांगितले आणि त्यानंतर इतर धातू किती प्रमाणात मिसळले आहेत हे सांगितले. त्यावरून मला त्याचे बोलणे जास्त खरे असावेसे वाटले. लखोबाच जास्त विश्वासपात्र आणि इमानदार असावा असा माझा अंदाज आहे."

तेव्हां जमिनदार जगन्नाथ याने दिवाणाच्या हुशारीची स्तुती करून आपल्या मुली करितां करावयाचे दागिने लखोबाला दिले. माझ्या मतें आपण मुली करितां सर्व दागिने याच्या कडूनच करवून घ्यावेत.





# हेवामत्सर

सिद्धपूर नावाच्या गावी भास्कर व नारायण नावाचे दोघे तरुण युवक रहात होते. भास्करची जंगलाला लागून चार एकर जमीन होती. तो तीत पीक काढून त्यावर स्वत:चा व स्वत:च्या कुटुंबाचा उदर निर्वाह चालवी. त्याला तशी कोणत्याही गोष्टीची कमतरता नव्हती. परंतु नारायणला शेतीभाती नव्हती. तो जंगलात मिळणाऱ्या उपयोगी वस्तू आणून किंवा लाकडे तोडून आणून गावात विकी व त्यावर त्याचा उदर निर्वाह चाले.

भास्कर व नारायण दोघेही लाठीकाठीच्या खेळात निष्णात असल्याची गावभर व जवळपासच्या गावांत ख्याती होती. दसऱ्याच्या उत्सवात दाणपट्टा, लाठीकाठी वगैरेचे खेळ होत. त्यात दोघेही भाग घेत. दरवर्षी साधारणपणे नारायणच पहिले बक्षिस पटकावी व भास्करला दुसरे बक्षिस मिळे. पहिलं बक्षिस पटकावले म्हणून पारितोषिकाबरोबर नारायणाचा सत्कारही होई.

परंतु भास्करला तो मान कधीच मिळाला नाहीं. म्हणून भास्कर मनातल्या मनात जळफळे. हळू हळू मत्सर इतका वाढला की भास्करने नारायणचा, काय वाटेल ते करून, काटा काढण्याचे ठरविले.

एकदा एक दक्षिणेकडचा साधू उत्तरेकडे तीर्थयात्रेला जात असतां जंगलाबाहेर भास्करचे शेत होते त्याच्या जवळच आसऱ्याची जागा करून घेऊन उतरला. भास्करला वाटले की त्या साधूजवळ काही गुप्त मंत्रविद्या वगैरे असणार. म्हणून तो त्या साधूला फळफळावळ आणून देऊ लागला व त्याने त्या साधूची मर्जी संपादन केली.

साधू काही दिवस त्या गावानजिक राहिला आणि पुढल्या प्रवासाला निघण्या-



पूर्वी भास्करला म्हणाला–"तू वयाने तसा लहान आहेस, परंतु साधूसंतांवर तुझी श्रद्धा व भक्ती पाहून मला तुझे कौतुक वाटले. तुला माझ्याकडून कोणत्याही मदतीची गरज असेल तर तू निस्संकोच विचारून मागून घे."

भास्कर अशाच संधीची वाट पहात होता. त्याने प्रथमच नारायणचा कांटा काढण्याची युक्ती योजून ठेवली होती. तो साधूला म्हणाला–"बुवा, या जंगला-जवळच्या शेतातल्या पिकाचे रक्षण करणे मला फार कठीण जाऊ लागलं आहे. रानटी डुकरे व इतर जनावरे येऊन पिकाची नासधूस करतात. म्हणून त्यांना भीती दाखविण्यासाठी मला असा काही मंत्र शिकवा की मला कोणत्याही हिंस्र जना-वराचे रूप घेता यावे. मला त्या रूपात पाहून ती जनावरे भीतीने पळून जातील."

साधू भास्करच्या तोंडाकडे खोल दृष्टीने काही वेळ पहात राहून हंसू लागला. नंतर आपल्या पिशवीतून तीन मुळ्या काढून भास्करला देत म्हणाला–"या मुळ्यांचा उपयोग तुला फक्त एक एकदांच करतां येईल. या पैकी एक मुळी तोंडात धरून चावली की तुला ज्या प्राण्याचे रूप धारण करण्याची इच्छा असेल त्याचे रूप तत्काळ प्राप्त होईल. ते रूप धारण केल्यावर त्या प्राण्याच्या जिवाला काही धोका असेल किंवा तुला स्वस्वरूप हवे असेल तर ते प्राप्त होईल."

त्या दिवसापासून भास्कर नारायणला आपल्या वाटेतून कायमचा बाजूला सारण्याचा विचार करू लागला. एकदा दुपारी भास्करने नारायणला रानात जातांना पाहिले. लगेच तो नारायणच्या पाठोपाठ त्याला चाहूल दिल्याशिवाय निघाला. काही अंतर चालून गेल्यावर एका झाडाखाली उभा राहून त्याने एक मुळी तोंडात टाकून ती चावली आणि इच्छिल्या-प्रमाणे त्याला अस्वलाचे रूप प्राप्त झाले. नारायण परतेल तेव्हां एकाएकी त्याच्यावर झडप घालून त्याला ठार करायचा विचार त्याच्या मनात होता.

सूर्यास्त व्हायच्या थोडा आधी नारा-यणला झाडीतून बाहेर येतांना अस्वलाच्या रूपात असलेल्या भास्करने पाहिले. लगेच तो झाडाच्या आड लपून उभा राहिला आणि नारायण जवळ येणार व तो झडप मारणार इतक्यात एकजण झाडाआडून एकदम बाहेर येऊन आपले जाळे फेकीत ओरडला–"नारायणा, तू बाजूला सरक, आज मी जंगलात आलो तो सुमुहूर्तावरच आलों. एक अस्वल हाती लागले आहे."

तो ओरडणारा माणूस त्या गावचा शिकारी होता. तो जंगली जनावरांना पकडून मोठ्या शहरांत नेऊन त्यांना विकी. भास्कर व नारायण त्याला चांगले ओळखत असत.

शिकाऱ्याला पाहून भास्कर स्वतःचा जीव वांचविण्यासाठी झाडीत शिरला व पळून गेला आणि त्याने आपले स्वस्वरूप चिंतिले. इतक्यात शिकारी व नारायण तेथे आले व त्यांनी त्याला विचारले–"काय रे, तू इकडून आतां आतां गेलेले अस्वल पाहिलेस का?" भास्कर काही माहीत नसल्याचे सोंग करून म्हणाला–"नाही बुवा!" त्यानंतर निराश होऊन तो घरी परतला.



अशातऱ्हेने साधूने दिलेल्या तीन मुळ्यां-पैकी एक निरुपयोगी ठरली. दुसऱ्या दिवशी भास्करने मुळी चावून रानटी रेड्याचे रूप घेतले आणि नारायणाला धुशी देऊन पाडून त्याला पायांखाली तुडवून ठार करायचे ठरविले. रेड्याच्या रूपात भास्कर नारा-यणाच्या शोधार्थ हिंडत होता, तेव्हां एका वाघाने त्याला पाहून एक डरकाळी फोडली. म्हणून घाबरून जाऊन भास्करने तत्काळ स्वस्वरूप चिंतले व त्या धोक्यातूनही तो वांचला आणि चटदिशी झाडावर चढून बसला.

दुसरी मुळीसुद्धा फुकट गेल्यामुळे भास्कर फार निराश झाला. तरी मनाचा हिय्या

करून तिसऱ्या वेळेस त्याने वाघाचे रूप धारण करण्याचे चिंतून तिसरी मुळी चावली आणि झाडाआड दबा धरून नारायणाची वाट पहात बसला. थोड्या वेळाने नारायण कुऱ्हाड घेऊन लाकडे तोडायला येत असलेला दिसला.

वाघाच्या रूपात असलेला भास्कर झाडीतून डरकाळी फोडीत बाहेर आला. डरकाळी ऐकून नारायण घाबरला आणि त्याने मागे वळून पाहिले. घाबरल्यामुळे त्याच्या खांद्यावरची कुऱ्हाड सरकून खाली पडली. म्हणून तो धावरून जाऊन एका तलावाच्या काठाने धावू लागला. त्याला पकडण्याच्या घाईत वाघाच्या रूपात असलेला भास्कर जवळच्या वाटेने निघाला आणि चिखलात रुतला. चिखलातून बाहेर निघण्यासाठी तो धडपड करू लागला आणि जास्त जास्त खोल रुतत गेला. म्हणून जीव धोक्यात असल्याचे ओळखून तो ओरडला व स्वस्वरूप चिंतून माणूस झाला आणि ओरडू लागला–"नारायणा, वांचव!"

भास्करचा आवाज ओळखून नारायणने मागे वळून पाहिले व तो चकितच झाला. त्याने आपल्या उपरण्याचे एक टोक नारायणाकडे फेंकले. भास्करने ते घट्ट धरतांच नारायणाने दुसरे टोक घट्ट धरून ओढले नारायणने त्याला विचारले–"काय रे, तू वाघ कसा झालास व माझ्या पाठीस कशाला लागला होतास?"

भास्करने लाजेने नारायणाचे पाय धरले व त्याची माफी मागून सर्व कथा सांगितली.

नारायण भास्करचे सांत्वन करीत म्हणाला–"नारायणा! हेवामत्सराने माणूस एक हिंस्र वाघासारखा क्रूर जनावर होतो. झाले गेले विसरून जा. तू त्या ओढ्यावर जाऊन प्रथम आंघोळ करून घे. नंतर आपण घरी जाऊ." असे सांगून तो भास्करला ओढ्यापर्यंत हात धरून घेऊन गेला. हेवामत्सर करून माणसाला काही मिळत नाही, उलट तोच स्वतःची इभ्रत घालवून बसतो.





# विचित्र जन्मकुंडली

कलिंग देशात अनेक लहानमोठी राज्ये होती. दांतिपुर त्यांपैकीच एक होते. दांतिपुरच्या राजाला कलिंग म्हणत. त्याला दोन मुलगे होते. मोठ्याला थोरला कलिंग व धाकट्याला धाकटा कलिंग म्हणत. त्या दोघांच्या जन्मकुंडल्या पाहून ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले की पित्याच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्रच राजा होईल. परंतु धाकट्याची जन्मकुंडली विचित्र व अपूर्व अशी होती. कुंडलीप्रमाणे तो स्वतः साधूसंन्याशासारखा आयुष्य काढील, पण त्याचा मुलगा गादीला वारस होईल.

काही वर्षांनी कलिंग राजा निवर्तला. अर्थातच त्याच्या थोरल्या मुलाला गादी मिळाली. धाकट्याला राजप्रतिनिधीचे पद मिळाले. परंतु त्याच्या मनांत ज्योतिष्याचे भविष्य कोरले गेले होते की त्याच्या मुलाला गादी मिळणार आहे. म्हणून तो आपल्या थोरल्या भावाचे मुळीच ऐकत नसे व उर्मटपणाने वागे. थोरल्या भावाने धाकट्या भावाला कैद करून तुरुंगात टाकायला सांगितले.

त्यावेळी बोधिसत्व कलिंग महाराजांच्या काळापासून मंत्री होते. थोरला कलिंग गादीवर आला तेव्हां बोधिसत्वांचे वय फार झाले होते. राजाच्या कुटुंबाचे हितचिंतक अशा त्या वृद्ध मंत्र्याने गुप्तपणे धाकट्या कलिंगला त्याच्या भावाने काढलेला हुकूम कळविला. धाकट्याला तो हुकूम अपमानकारक वाटला. तो वृद्ध मंत्र्याला म्हणाला–"प्रधान, आपण सर्व प्रकारे माझे हितैषी आहां. आपणाला ज्योतिष्याने वर्तविलेले भविष्य माहीतच आहे. त्यात काही तथ्य असेल तर आपण मला थोडी मदत करावी. ते भविष्य खरे करण्याची जबाबदारी आपणांवर आहे. ही



घ्या माझी मुद्रा असलेली अंगठी, माझी शाल व माझी तलवार. पुढे कधी काळी जो कोणी या तिन्ही वस्तू आणून आपणांस दाखवील तो माझा मुलगा असे समजावे. आपण त्याला शक्य असेल ती मदत करावी." असे वृद्ध प्रधानाला सांगून धाकटा कलिंग जंगलात निघून गेला.

त्याच्या काही वर्षे आधी मगध राजाला एक मुलगी झाली होती. तिची जन्मकुंडली पाहून ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले की तिची जन्मकुंडली विचित्र असून ती आयुष्यभर साधू संन्यासिनीसारखी राहील, परंतु तिच्या पोटी जन्मलेला मुलगा राजा होईल." ते कळल्यावर तिच्याशी लग्न करण्यासाठी कित्येक तरुण राजकुमारांत चढाओढ लागली. तिला मागण्या घालणाऱ्या राजकुमारांकडे पाहून राजा काळजीत पडला. त्यांपैकी कोणा एकाशी राजकन्येचा विवाह करून दिल्यास इतर सर्व राजकुमार आपल्या जावयाशी वैर धरतील. म्हणून राजा विचार करून सपत्नीक कोणाला काही कळविल्याशिवाय जंगलात निघून गेला.

एका नदीच्या काठी एक झोपडी बांधून राजा व राणी राहू लागली. त्या झोपडीपासून थोड्याच अंतरावर धाकट्या कलिंगाची झोपडी होती.

एके दिवशी मगध राजा राणीसह कंद मुळे व फळे वेचण्यासाठी राजकन्येला झोपडीत सोडून जंगलात गेला. तेव्हां राजकन्येने निरनिराळी फुले आणून एक सुंदर हार केला आणि नदीकाठावर फिरू लागली. काठावर एक आंब्याचे झाड होते. ती त्या झाडावर चढून बसली. तेथून ती हार पाण्यात फेंकून ती गंमत पहात बसली.

तो हार वहात जाऊन धाकटा कलिंग नदीत स्नान करीत होता त्याच्या डोक्याला लागू लागली. तो हार हातात घेऊन धाकटा कलिंग विचार करू लागला—"किती सुंदर हार आहे? ह्याच्यात निरनिराळ्या रंगांची सुवासिक फुले ओवलेली आहेत. कोणी तरुण युवतीने ही ओवली असतील. या भयंकर जंगलात ती कशाला बरे आली असावी?" असे अनेक विचार करीत छोटा कलिंग प्रवाहाच्या उलट्या दिशेने चालू लागला.

तो जंगलात नदीच्या काठाकाठाने चालत जात होता. त्याच वेळी त्याला दूर कोणीतरी किरट्या आवाजात गात असल्याचे ऐकू आले. तो थांबून, आवाज कोणत्या दिशेने येत होता याचा अंदाज पाहू लागला व त्या दिशेने तो चालत जात त्या आंब्याच्या झाडाखाली आला. त्याला एका फांदीवर बसलेली मगध राजकन्या दिसली.

राजकन्येला पाहतांच धाकट्या कलिंगचे मन तिने हिरावून घेतले. तरी स्वतःला सावरून त्याने तिची चवकशी केली. दोघांचे संभाषण चालू असतां धाकट्या कलिंगने स्वतःचा परिचय देऊन तिच्याशी तो लग्नाला तयार असल्याचे सांगितले. तेव्हां ती तरुण राजकन्या म्हणाली—"परंतु तुम्ही तर कोणी साधू किंवा संन्यासी दिसतां आहां? आम्ही क्षत्रिय आहो, आपला विवाह कसा काय होणार?"

धाकट्या कलिंगाने तो देखील क्षत्रिय असल्याचे सांगितले आणि आपली पूर्व कहाणी सुरवातीपासून शेवटपर्यंत सांगितली. तेव्हां राजकन्येने देखील आपल्या राजघराण्यातील गुप्त गोष्टी निवेदन केल्या. त्यानंतर दोघे राजकन्येच्या आईवडिलांना भेटायला गेले. राजाने सर्व वृत्तांत ऐकल्या-



वर विचार केला की आपल्या कन्येला या राजकुमाराहून चांगला वर कोठे मिळणार ?

त्यानंतर धाकटा कलिंग व मगध-राजकन्या यांचा विवाह सुमुहूर्तावर पार पडला.

एका वर्षानंतर त्यांना एक मुलगा झाला. सर्व राजलक्षणांनी युक्त अशा त्या मुलाचे नांव विजय कलिंग असे ठेवण्यात आले. तो मुलगा लाडात वाढू लागला.

काही वर्षे लोटल्यावर धाकट्या कलिंगने जन्मकुंडल्या काढल्या व त्यांची ग्रहदशा संपली असल्याचे गणितावरून कळले. ज्योतिर्गणितावरून हे देखील कळले की थोरल्या कलिंगाचे आयुष्यही संपुष्टात येऊ लागले आहे.

तेव्हां त्याने विजय कलिंगला बोलावून समजावून सांगितले की तो कलिंग राज्याचा कसा वारस आहे. तो म्हणाला–"विजय, तुला आपले आयुष्य या जंगलात कंठण्याची गरज नाही. माझा थोरला भाऊ कलिंग देशाचा राजा आहे. त्याचा मृत्यू जवळ येऊन ठपला आहे. म्हणून तू लवकर दांति-पुरला जाऊन आपला राज्याभिषेक करून घे." असे सांगून त्याने त्याला वृद्ध प्रधाना-विषयी सर्व गोष्टी समजावून सांगितल्या आणि ओळख पटावी म्हणून अंगठी वगैरे सुवर्णाच्या तीन वस्तू त्याच्या हातात दिल्या. सर्वांचा आशीर्वाद घेऊन युवराज विजय निघाला.

विजय दांतिपुरला पोचतांच वृद्ध प्रधा-नाला भेटला व सुवर्णाच्या तिन्ही वस्तू दिल्या.

तोंपर्यंत धाकट्या कलिंगाच्या अंदाजा-प्रमाणे थोरल्या कलिंगाचा स्वर्गवास झाला होता. दांतिपुरात अराजक माजण्याची स्थिती उत्पन्न झाली होती.

वृद्ध मंत्र्याने दरबार भरवून विजय कलिंगाची ओळख करून दिली. त्याचा जन्मवृत्तांत ऐकून सर्व सभासद चकित झाले व त्यांनी विजयचा जयजयकार केला.

त्यानंतर विजय कलिंगचा राज्याभिषेक झाला व तो वृद्ध मंत्र्याच्या सल्ल्याप्रमाणे राज्य करू लागला.



## तैमूरलंगाची स्वारी

समरकंदचा अमीर तैमूरलंग याने भारताची समृद्धी व वैभवाविषयी अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. व्या-पाऱ्यांनी भारतातून आणलेल्या मूल्य-वान व सुंदर वस्तू पाहून तो आश्चर्य-चकित झाला. तेव्हांपासून तो भार-तावर स्वारी करून तेथील संपत्ती लुटून नेण्याची स्वप्ने पाहू लागला.



एक मोठे सैन्य उभे करून तैमूरलंगने इ. स. १३९८ मध्ये भारतात शिरून सरळ दिल्लीवर स्वारी केली. वाटेत जे जे गाव व शहर लागे ते लुटीत गेला व त्याने सहस्रावधी लोकांना अटक करून त्यांना आपल्या सैन्याबरोबर पायी प्रवास करायला लावले.





त्यावेळी दिल्लीच्या गादीवर तुघलक वंशाचा शेवटचा वारस महमूद राज्य करीत होता. महमूदने तैमूरलंगच्या स्वारीला शौर्याने तोंड दिले. परंतु त्याचे सैन्य लहान होते, म्हणून तैमूरच्या धाडीसमोर ते टिकाव धरून उभे राहू शकले नाही. म्हणून तैमूरने सहजी राजधानी काबीज केली.



सुलतान महमूद गुजरातकडे पळून गेला. तैमूरलंग आपल्या बरोबर एक लाख बंदी घेऊन आला होता. परंतु त्याने ते बंड करतील या भीतीने त्यांची कत्तल केली. दिल्ली शहरात रक्ताचे ओहोळ वाहू लागले. प्रजा भयकंपित झाली.

एके दिवशी तैमूरलंग विश्रांती घेत असतां संधी साधून दिल्लीचे काही प्रमुख नागरिक मूल्यवान वस्तू भेट म्हणून बरोबर घेऊन तैमूरशी मैत्री करण्याचे सोंग करून भेटीला आले.





परंतु तेथील परिस्थिती एकाएकी बदलली. तैमूरचे दोन सैनिक दारू पिऊन झिंगून धिंगाणा घालू लागले. तेव्हां एका व्यापाऱ्याने त्या सैनिकांच्या मुस्कुटात एकेक भडकावली. ही बातमी तैमूरच्या कानावर गेली.



हे मिष तैमूरला पुरले. त्याने दिल्लीच्या नागरिकांवर वाटेल तो अत्याचार करायला सैनिकांना प्रोत्साहन दिले. सैनिकांनी घरदार, मंदिर, मशीद कशाचाही भेदभाव न मानून दिल्ली शहरच लुटले.

तेवढ्यावर सैनिक थांबले नाहीत. त्यांनी जे घर किंवा देऊळ लुटले त्याला आग लावली. सहस्रावधी लोक आगीत होरपळून निघाले. कित्येक लोक निवाऱ्याशिवाय रस्त्यावर हिंडू फिरू लागले. दिल्ली शहरावर तो जो प्रसंग ओढवला तो त्यांनी पूर्वी कधी पाहिला नव्हता की ऐकला नव्हता.





सहस्त्रावधी लोक प्राणास मुकले. सहस्त्रावधी कैद झाले. कोणी हूं का चूं केले किंवा पळून जाण्याचा प्रयत्न केला तर त्यांची कत्तल केली. लागोपाठ पंधरा दिवस दिल्ली शहराला नरक-यातना भोगावी लागली.

दिल्लीचे शेकडो कारागीर तैमूरचे कैदी झाले. तो त्यांना घेऊन व अपार संपत्ती घेऊन स्वदेशी जाण्यास निघाला. परतीच्या वाटेवर तो मीरत, कांग्रा, जम्मू वगैरे शहरे लुटीत व सर्वनाश करीत निघाला.





तैमूर निघून गेल्यावर दिल्ली शहरावर भयंकर दुष्काळ व संसर्गजन्य रोगाचे सावट आले. म्हणून जे लोक उरले होते त्यांच्यापैकी अर्धेअधिक प्राणास मुकले. सुंदर दिल्ली शहर भूतनगरी सारखे ओसाड झाले.

आपल्या बरोबर ज्या कारागिरांना तैमूर घेऊन गेला होता, त्यांच्या मदतीने त्याने एक भव्य मशीद समरकंद येथे बांधली. त्या मशिदीमुळे तेथील शिल्पकलेत एक नवीन क्रांतीच घडली. भारतावर स्वारी केल्यानंतर दहा वर्षांनी इ. स. १४०३ मध्ये तैमूरलंग मरण पावला.





# खरी मानप्रतिष्ठा

थोर संगीत विद्वान म्हणून ख्याती मिळविल्यानंतर चंडप्रचंड नावाचा एक गवई धर्मपूरला आला. तो अनेक देश फिरला, राजामहाराजांकडून त्याचा सत्कार झाला, त्याने अलोट धन संपत्ती मिळविली आणि शेवटी धर्मपूरला कायम राहण्यासाठी म्हणून आला.

धर्मपूरचा जमिनदार विद्वानांचा आदर करी. आपल्या गावी इतका थोर विद्वान येऊन राहू लागल्याचे ऐकून जमिनदाराने त्याचा गौरव करून त्याला आपल्याच घरी रहायला विनंती केली व त्याचा अतिथि सत्कार केला.

जमिनदाराला चार मुलगे होते. त्या मुलांना संगीत शिकायची फार इच्छा होती. शिवाय जमिनदाराच्या नातेवाइकांची आणखी सहा मुलं होती. म्हणून जमिनदाराने त्या सर्वांना संगीत शिक्षण देण्यासाठी शेजारगांवच्या एका संगीत विद्वानाला शिक्षक म्हणून नेमले. या गुरुशिष्यांची संगीत-साधना एकदा चंडप्रचंडने ऐकली व जमिनदाराला म्हणाला—"या जगात इतके संगीत विद्वान आहेत, पण आपल्याला या शिक्षका-खेरीज आणखी कोणी मिळाला नाही का? हा शिक्षक तुमच्या मुलांना चुकीचे शिक्षण देत आहे."

चंडप्रचंड म्हणाला ते ऐकून जमिनदार स्मित करून गप्प राहिला. त्याने त्या शिक्षिकाला बदलले नाही. काही दिवसांनी चंडप्रचंडाने एक नवीन घर विकत घेऊन त्यात राहू लागला. काही दिवस गेल्यावर कां कोणास ठाऊक, शेजार गांवच्या संगीत शिक्षकाने धर्मपूरला येणे बंद केले.

धर्मपूरला संगीताची आवड असणारी मोठी मंडळी नव्हती. म्हणून एकटयाने बसून संगीत साधना करायला चंडप्रचंडला





उत्साह वाटत नसे. जमिनदाराने विचारले तर त्याच्या मुलांना संगीत शिकविण्याची इच्छा त्याच्या मनात होती. परंतु जमिनदाराने त्या गोष्टीचा उल्लेख केला नाही.

काही दिवस वाट पाहिल्यावर चंडप्रचंड जमिनदाराला म्हणाला–"आपल्या गावात संगीत शिकण्याची इच्छा असणाऱ्या सर्वांना निःशुल्क संगीत शिकवावे असे मनात आहे."

तो म्हणाला त्याच्या दुसऱ्याच दिवशी शंभर जण संगीत शिकायला आले. चार दिवस चंडप्रचंडने त्यांना शिकविण्याचा खूप प्रयत्न केला. जमिनदाराच्या घरच्या मुलांना सोडून इतर मुलांना आज शिकविलेला पाठ दुसऱ्या दिवशी आठवत नसे. पहिल्या दिवशी आलेला एखादा मुलगा दुसऱ्या दिवशी येत नसे. अशा शिष्यांना कशी शिस्त लावायची चंडप्रचंडने या विषयी स्वतः जमिनदाराला सल्ला विचारला.

जमिनदार म्हणाला–"तुम्ही फुकट शिकवितां म्हणून आवड नसणारे सुद्धा संगीत शिकायला येतात, म्हणून तुम्ही संगीत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांकडून थोडी फी वसूल करीत जा."

म्हणून चंडप्रचंडने प्रत्येक विद्यार्थ्याकडून फक्त एक रुपया फी घेतली, जाईल असे जाहीर केले. त्या बरोबर संगीत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या शंभरावरून विसावर आली. त्यांपैकी दहा जण तर जमिनदाराचीच किंवा त्याच्या नातेवाईकांची मुले होती. उरलेली दहा इतर गावकऱ्यांची.

चंडप्रचंड फार प्रेमाने त्या मुलांना शिकवी. सर्व मुले आपल्यासारखी संगीत शास्त्रात विद्वान व्हावीतसे त्याला वाटे. तसा तो प्रयत्नही करू लागला. परंतु जमिनदाराचा तुटकपणा त्याला आवडला नाही.

इतर मुलांचे आईवडील चंडप्रचंडकडे येऊन त्याच्या विद्वत्तेची व औदार्याची स्तुती करीत, मुलांची फी दरमहा एकादशीलाच, फार झाले तर पौर्णिमेला आणून देत. जमिनदाराने मात्र कधी चंडप्रचंडाची स्तुती केली नाही की कधी नियमित फी आणून दिली नाही. कधीकधी तर चंडप्रचंडलाच मुलांना फी घेऊन यायला सांगावे लागे.

एक वर्ष असेच लोटले. आपण फी घेऊन मुलांना शिकवितो, म्हणून जमिनदाराच्या मनात आपला आदर कमी झाला की काय? असा एक संशय चंडप्रचंडच्या मनात आला.

तो एके दिवशी जमिनदाराला भेटला व म्हणाला–"माझी प्रकृती हल्ली बरी नसते. म्हणून आपण आपल्या मुलांना गाणं शिकवायला आणखी एखाद्या शिक्षकाला नेमून घ्यावे."

"आपल्या प्रकृतीपेक्षा जास्त महत्वाची अशी कोणती गोष्ट असू शकेल? आपण विश्रांती घेणेच श्रेयस्कर!" जमिनदार थंडपणे म्हणाला.

त्यामुळे चंडप्रचंडला जमिनदाराचा फार राग आला. इतर मुलांना पाहिजे तर नका शिकवू, माझ्या मुलांना तरी शिकवा, असे जमिनदार म्हणेल असे चंडप्रचंडाला वाटले होते. परंतु तसे झाले नाही.

एका आठवड्यातच गावात दुसरा एक संगीत शिक्षक आला. जमिनदार दर महिन्याला चुकल्याशिवाय नियमित फी देऊ लागला. दररोज त्या शिक्षकाशी बोले व मुलांची प्रगती चांगली होत असल्याचे सांगून शिक्षकाची स्तुती करी व त्याला प्रोत्साहन देई.

या नव्या शिक्षकाचे नाव विश्वनाथबुवा असे होते. आपल्याला येत आहे तेवढे ज्ञान आपण आपल्या विद्यार्थ्यांना शिकवायचे आणि आपले ज्ञान वाढावे म्हणून थोर गायक विद्वन्मंडळीं जवळ शिकायचे असे विश्वनाथबुवांना वाटे. चंडप्रचंडच्या विद्वत्तेविषयीं ऐकल्यावर विश्वनाथबुवा त्याला भेटायला गेले.

चंडप्रचंड विश्वनाथबुवांशी प्रेमाने बोलले आणि जमिनदार त्यांच्याशी चांगले बोलतो वगैरे ऐकून चकित झाले.

ते विश्वनाथबुवांना म्हणाले–"मला संगीत शास्त्राचे जेवढे ज्ञान आहे ते सर्व मी तुम्हांला शिकवीन. परंतु जमिनदार तुमचा जेवढा आदर करतो तेवढा माझा करीत नाही. मी म्हणतो आहे म्हणून नव्हे तुम्ही स्वतःच विचार करून चवकशी करून पहा की जमिनदाराची माझ्याशी अशी वागणूक करण्याचे कारण काय? मी एवढ्या साठी हे सर्व म्हणतो आहे की माझ्यात काही दोष असेल तर तो सुधारण्यास मला संधी मिळेल."

ते ऐकून विश्वनाथबुवांना आश्चर्य वाटले. ते जमिनदाराला भेटले व त्यांनी विचारले–"जमिनदार साहेब, आपली माझ्यावर नेहमी कृपा असते. परंतु पूर्वी आपल्या मुलांना संगीत शिकवीत त्या चंडप्रचंड संगीत विद्वानाला आपण वेळेवर फी सुद्धा देत नव्हतात, म्हणे. असे मला काही लोकांकडून कळले. त्यांच्याहून जास्त आपल्या आदराला पात्र मी कशामुळे झालो, हे कळावे म्हणून मी विचारले."

"मी सांगितले तर तुम्ही मनाला लावून घेणार नाही ना?" जमिनदार स्मित करीत म्हणाला.

"त्यात मनाला लावून घेण्यासारखं काय आहे हो?" विश्वनाथबुवांनी विचारले.

"तुम्ही धनार्जनासाठी संगीत शिक्षण देत आहां. ते हौशी खातर देत होते. त्यांना महिन्याची फी द्यायची म्हणजे, इतके शिकविले तर इतकी फी अशी किंमत म्हणजे मजुरी दिल्यासारखं होईल. समोर दिसलेच तर त्यांची स्तुती प्रशंसा वगैरे केली तर त्यात कृत्रिमता होईल. राजा महाराजांकडून ज्यांना सत्कार मिळाला त्यांची स्तुती मी काय करणार? तुम्ही उदरनिर्वाहार्थ संगीत शिकविता आहां. तुमच्या सारखाच व्यवहार त्यांच्याशी करणं बरोबर कसे होईल?" जमिनदार म्हणाला.

हे कळल्यावर चंडप्रचंड जमिनदाराविषयी गैरसमज करून घेतल्याबद्दल पश्चात्ताप करू लागला. त्यानंतर जमिनदाराने सुवर्णकंकण बांधून चंडप्रचंडचा सत्कार केला.





# व्यर्थ निवाडा

नागपट्टणचा राजा शक्तिसिंह याच्या दरबारात त्याचे अत्यंत प्रियपात्र असे दोघे जण होते. त्यांपैकी एक सूर्यवर्मा नावाचा सामंत राजा होता. त्याचे राजघराण्याशी नातेसुद्धां होते. त्याला सीमंतिनी नांवाची लग्नाचे वय झालेली एक मुलगी होती.

राजाला त्याच्या प्राणांपेक्षांही प्रिय अशी दुसरी व्यक्ति म्हणजे चंद्रपाल नावाचा एक तरुण शूर सरदार होता. तो राजाचा मुख्य अंगरक्षक ही होता. राजा कधी युद्धाला जाई तेव्हां चंद्रपाल सुद्धां राजाबरोबर जाई आणि राजावर तसेच काही संकट आले की स्वतःचा जीव धोक्यात घालून तो राजाचे रक्षण करी.

त्याने राजाचा जीव युद्धात कितीदां वांचविला त्याचा हिशोब करणेंच कठीण. म्हणून राजाचे त्याच्यावर पुत्रापेक्षांही अधिक प्रेम होते. राजाच्या सैनिकांपैकी प्रत्येक जण त्याला देवासारखा मानी. सूर्यवर्माची मुलगी सीमंतिनी हिने चंद्रपालला फार पूर्वीच मनाने वरले होते. म्हणून तिने योग्य संधी साधून त्याला भेटायला बोलाविले. दोघे परस्परांशी बोलले. दोघांचे परस्परांवर प्रेम होते, म्हणून दोघांनी विवाह करून घ्यायचेही ठरविले.

चंद्रपालने ती गोष्ट महाराजांना सांगितली. राजाने सूर्यवर्माला मुद्दाम भेटायला बोलावून ती गोष्ट सांगितली. म्हणाला–"तुझी मुलगी सीमंतिनी चंद्रपालवर प्रेम करते आहे, असे मी ऐकतो. तर दोघांचा विवाह करून देऊया का?"

ते ऐकतांच सूर्यवर्माचा चेहरा संतापाने लाल झाला. म्हणाला–"मी तसे कधी होऊ देणार नाही! ते मला आवडत ही नाही. शिवाय माझ्या मुलीचे प्रेम चंद्रपालवर



असेल, हे मी मानायलाच तयार नाही!" घरी आल्यावर सूर्यवर्माने आपल्या मुलीला विचारले. सीमंतिनीने, तिचे प्रेम चंद्रपालवर असल्याचे मान्य केले. ते कळल्यावर सूर्यवर्मा संतापला व मुलीला खूप बोलला.

ही गोष्ट घडल्यानंतर सीमंतिनी सर्वांची नजर चुकवून दुसऱ्या दिवशी घरातून पळून गेली आणि चंद्रपालला जाऊन भेटली. एका पुरोहिताने दोघांचे शास्त्रोक्त पद्धतीने लग्न लावून दिले. त्यानंतर ती दोघं एका जंगलात जाऊन राहू लागली.

ते जंगल चंद्रपालचेच होते. काही दिवसांपूर्वी राजाने चंद्रपालाला नगराबाहेर थोडीशी जमीन इनाम म्हणून दिली होती. त्या जमिनीत जंगलाचा एक भाग होता. त्या भागात फक्त अशोकाची झाडेच लावलेली होती.

एके दिवशी सूर्यवर्मा राजाला भेटून म्हणाला—"महाराज, मी आतां दुसऱ्याला तोंड दाखविण्यालायक सुद्धा राहिलो नाही. आपण चंद्रपालला जर आज्ञा केलीत की त्याने माझ्या मुलीला मुकाट्याने माझ्याकडे पोचते करावे तर तो तुमचे ऐकेल."

राजा म्हणाला—"मी त्याच्याकडे निरोप पाठवितो." परंतु राजाने निरोप पाठविला नाही.

त्यानंतर राजा करवीच आपले काम साध्य व्हावे यासाठी सूर्यवर्माने एक युक्ती योजली. भरल्या दरबारात उभा राहून त्याने राजासमोर निवेदन केले की, महाराज, माझ्या मुलीला चंद्रपाल पळवून घेऊन गेला आहे आणि जंगलात राहातो आहे. आपण मेहरबानी करून माझ्या मुलीला सोडवून आणावे आणि त्या दुष्टाला योग्य तो दंड करावा."

आता राजाला नाइलाजाने चंद्रपालाविरुद्ध काही कारवाई करणे भाग पडले. त्याने आपल्या नोकरांना हुकूम दिला—"तुम्ही जंगलात जाऊन चंद्रपालला कैद करून हजर करा आणि सीमंतिनीला आणून सूर्यवर्माच्या घरी पोचती करा."

-राजाचे शिपाई अशोकवनाकडे निघाले. सूर्यवर्मा सुद्धा सशस्त्र त्यांच्या पाठोपाठ निघाला.

राजाचे शिपाई चंद्रपालला आपल्या प्राणाहून जास्त मानीत. त्यांच्यापैकी कोणाच्याही मनात चंद्रपालशी युद्ध करण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्यांनी दोघां शिपायांकरवी चंद्रपालला प्रथमच सर्व बातमी देऊन ठेवली होती.

चंद्रपालला सूर्यवर्मा राजाच्या शिपायांना घेऊन येत असल्याचे कळतांच त्याने सीमंतिनीला दुसऱ्या एका सुरक्षित जागी नेऊन ठेवले आणि स्वत: एकटा आपल्या झोपडीत येऊन बसला. त्यानंतर थोड्याच वेळाने सूर्यवर्मा शिपायांसह तेथे आला. त्याने शिपायांना झोपडीच्या चारही बाजूंना उभे करून स्वत: दार वाजविले.

चंद्रपालने दार उघडले व सूर्यवर्माला पायापासून डोक्यापर्यंत पहात विचारले—"आपले शौर्य व साहस कोठे लयास गेले? मला धरायला एवढे सैन्य बरोबर आणायची गरजच काय? मी आपल्याला द्वंद्व युद्धास आव्हान करतो." असे म्हणत त्याने तलवार उपसली.

"तुझ्या बरोबर द्वंद्व युद्ध करण्याची मला गरजच काय?" असे म्हणत त्याने राजाच्या शिपायांना चंद्रपालला कैद करण्यास खूण केली. म्हणाला—"या नीच माणसाला कैद करा." परंतु शिपायांपैकी कोणीही जागचा हलला नाही. तेव्हां





चंद्रपालने पुन्हां सूर्यवर्माला द्वंद्वयुद्धास आव्हान केले. परंतु तो त्या गोष्टीस तयार झाला नाही. ते पाहून सर्व शिपायांच्या मनात सूर्यवर्मा विषयी घृणाभाव उत्पन्न झाला. हा स्वतःला वीर म्हणून उगाच गिरवितो आहे तर! असे शिपायांना वाटले.

"ठीक आहे, तर मला कैद करा!" असे म्हणत चंद्रपाल राजाच्या शिपायांची फळी फोडून जंगलात पळून गेला. शिपायांनी बाजूला सरकून निसटून जायला त्याला वाट दिली व कैद केले नाही. सूर्यवर्मा शिपायांवर चिडला. परंतु त्याला करता येणे शक्यच नव्हते. तो झोपडीत शिरला खरा, परंतु त्याला कोठेही सीमंतिनी दिसली नाही. सूर्यवर्माने इतक्या मेहनतीने घातलेला घाट फसला.

आतां महाराजांवर अवलंबून राहून काही फायदा होणार नाही, असा विचार करून त्याने आणखी एक युक्ती योजली. त्याने काही कवी व गायक बोलावून आणले आणि त्यांना पुष्कळ पैसे चारून समजावून सांगितले की त्यांनी अशोकवनात जाऊन चंद्रपालच्या शौर्याची व सौंदर्याची स्तुती करून कविता रचून म्हणाव्या म्हणजे तो बाहेर येईल व त्याला कैद करतां येईल.

त्याची ती युक्ती उपयोगी पडली. कवी आणि गायक चंद्रपालची स्तुती करून गाऊ लागले तेव्हां सूर्यपालाच्या शिपायांनी त्याला चटदिशी कैद केले आणि सूर्यवर्मा समोर हजर केले. त्यानंतर सूर्यवर्मा चंद्रपालला घेऊन दरबारात गेला आणि राजासमोर निवेदन केले–"महाराज, मी अपराध्याला कैद करून घेऊन आलो आहे, तेव्हां आपण काय तो न्याय निवाडा करावा."

राजाने चंद्रपालला विचारले–"तू सीमंतिनीला पळवून घेऊन गेला आहेस, असे मी ऐकतो. हे खरे आहे का?"

"महाराज, माझ्यावर हाच आरोप असेल तर मी अगदी निर्दोष आहे. सीमंतिनीने स्वतःच माझ्याशी विवाह करण्याची इच्छा व्यक्त केली व आम्ही विवाह केला."

चंद्रपाल उत्तरला. सूर्यवर्मा चिडून म्हणाला– "मी कन्यादान केलेले नाही. म्हणून सीमंतिनीचा बाप म्हणून माझा तिच्यावर पूर्ण अधिकार आहे. हा विवाह कायद्या-विरुद्ध आहे!"

राजाने दोघांमध्ये समेट करण्याचा प्रयत्न करून पाहिला, परंतु सीमंतिनीवरचा अधिकार सोडायला सूर्यवर्मा तयार नव्हता व चंद्रपाल तर नव्हताच. शेवटी राजा कंटाळून जाऊन म्हणाला–"तर मग माझा निवाडा ऐका. सीमंतिनी दोघांकडे राहील. हिवाळ्यातली पाने गळू लागेपर्यंत ती आपल्या पतीकडे राहील व झाडे पर्णपुष्प-विहीन उघडी झाल्यावर आपल्या वडिलां-कडे जाईल. पुन्हां पालवी फुटू लागली की ती आपल्या पतीकडे जाईल."

हा निवाडा सूर्यवर्माला मुळीच आवडला नाही. चंद्रपालला सुद्धा आवडला नाही. परंतु तो दोघांना मानावा लागला.

काही दिवसांनी शिशिर ऋतू आला. झाडांची पाने गळू लागली. राजाने शिपा-यांना चंद्रपालकडे पाठवून सीमंतिनीला घेऊन यायला सांगितले. त्याच्या मनात मुलीला एकदा आणून घरात कैद करून ठेवायचे व परत पाठवायचेच नाही, असे होते.

सूर्यवर्माचे दूत सीमंतिनीकडे गेले व त्यांनी राजाने दिलेला न्यायनिवाडा तिला सांगितला. सीमंतिनीने शांतपणे सर्व ऐकून घेतले व म्हणाली–"झाडांची पाने गळून जेव्हां झाडे पर्णपुष्पहीन होतील तेव्हां ना मला वडिलांकडे जावयाचे आहे? परंतु अद्याप झाडांची पाने गळून गेलेली नाहीत. झाडे पर्णपुष्पहीन झाली की मी स्वतःच बाबांना भेटायला येईन." असे सांगून तिने आपल्या झोपडीच्या चारी बाजूच्या अशोक वृक्षांकडे बोट दाखविले. तेव्हां सूर्यवर्माचे दूत निराश होऊन परतले.

अशोक वृक्षाची पाने गळली तरी तो वृक्ष पर्णपुष्पहीन होत नसतो. म्हणून सीमंतिनीला कधी बापाकडे जावे लागले नाही.





# आयुष्याचा वीट आला

दगडू नांवाच्या एका भिकाऱ्याला त्याच्या आयुष्याचा वीट आला व तो आत्महत्या करण्याच्या हेतूने निघाला. तो जंगलातील एका डोंगराच्या टोकाला जात होता. वाटेत त्याला अनंत नावाचा एक माणूस भेटला. त्याला देखील आयुष्याचा वीट आला होता. दोघे डोंगराच्या कड्यावर पोचले. ते त्या कड्यावरून खाली उडी मारून जीव देणार इतक्यात एका गुहेतून एक राक्षस बाहेर आला व त्याने दोघांना धरले.

परंतु ते दोघेही भ्याले नाहीत. उलट अगदी निर्भयपणे म्हणाले–"आम्ही दोघे जीव द्यायला डोंगराच्या कडा गाठायला निघालो होतो."

त्या दोघांचे बोलणे ऐकून राक्षस चकित झाला व म्हणाला–"परंतु मला हे नाही कळत की तुम्हांला जिवाचा इतका वीट येण्याचे कारणच काय?"

दगडू म्हणाला–"मी एक भिकारी आहे. माझे वडील व आजोबासुद्धा भिकारीच होते. परंतु मी ज्या ज्या वेळी भीक मागायला जातो, तेव्हां तेव्हां प्रत्येक माणूस आमच्याकडे पाहून हसतो व विचारतो तू अंगाने चांगला धष्टपुष्ट आहेस, मग काही कामधाम कां नाही करीत? म्हणून मला आयुष्याचाच वीट आला."

त्यानंतर राक्षसाने अनंतला सुद्धा तोच प्रश्न विचारला. अनंतच्या चेहऱ्यावर काळजी दिसत होती. तो म्हणाला–"मी आपली दशा काय सांगू? माझ्याजवळ थोडी फार जमीन आहे. परंतु माझ्या बायकोला दागिन्यांचे इतके वेड आहे की ती नित्य नवीन दागिने करून द्या म्हणून माझा जीव घेते. मी तिला किती सांगून पाहिलं की हे माझ्या शक्ति सामर्थ्याच्या बाहेरचे काम आहे. पण ती ऐकलं तर शपथ. मी जिवाला अगदी कंटाळलो आहे."

दोघे म्हणाले ते ऐकून राक्षस गुहेत निघून गेला आणि दोन पिशव्या भरून सोने घेऊन आला. एक पिशवी प्रथम दगडूच्या हातात देत म्हणाला–"लोक तुला भीक घालीत नाहीत व शिव्या देतात तर त्यात त्यांचा दोष नाही. तुला मेहनत करता येईल व धनार्जन करता येईल. पण तू आळशी आहेस. तुझा हा आळशीपणा दूर होईपर्यंत तू या पैशाचा उपयोग करून व्यापार धंदा कर. बरोबर एका वर्षाने मला येऊन येथेच भेट!

त्यानंतर दुसरी थैली अनंतसमोर ठेवून राक्षस म्हणाला–"तू हे धन घेऊन बायकोला दागिने करून दे आणि तिला सांगून टाक, तिला यानंतर एकही दागिना मिळणार नाही.

तुला स्वत:च्या आयुष्याचीच भीती वाटत नाही, मग बायकोला भितोस?" नंतर राक्षसाने त्याला देखील एका वर्षाने येऊन भेटायला सांगितले.

एका वर्षाने दगडू गुहेजवळ आला. पैशाची पिशवी राक्षसाच्या पायासमोर ठेवीत म्हणाला–"बाबा रे, तू माझे डोळे उघडलेस. काहीतरी मेहनतमजुरी करून जगण्यात जो आनंद मिळतो ते गुपित मला ज्या दिवशी कळले त्याच दिवसापासून मी भीक मागायची सोडली. तू आपले धन परत घे!"



राक्षसाने दगडूची पाठ थोपटली आणि पैशाची पिशवी गुहेत फेंकली.

इतक्यात तेथे अनंत आला. त्याच्या-बरोबर एक बाईसुद्धा आली होती. तिच्या अंगावर एका मंगळसूत्राशिवाय एकही दागिना नव्हता.

राक्षस व दगडू आश्चर्यचकित होऊन त्या बाईकडे पहात होते. तेव्हां अनंत म्हणाला—"बाबा रे!" ही माझी बायको असे म्हणत त्याने राक्षसाच्या पायांवर त्याने दिलेली पैशाची पिशवी ठेवली.

राक्षस प्रेमळ दृष्टीने त्यांच्या कडे पहात म्हणाला—"तू म्हणाला होतास की तुझी बायको दागिन्यांच्या नांवाने तुझा जीव खाते. पण तिच्या अंगावर तर एक-ही दागिना दिसत नाही. तिचा हा वेड-पणा काढून टाकण्यासाठी तिला मारहाण तर केली नाहीस?"

त्याचे उत्तर अनंत देणार, इतक्यात त्यांची बायको म्हणाली—"दादा, तुझं रूप राक्षसाचं असलं तरी तुझं मन देवासारखं प्रेमळ व उदार आहे. या डोंगराळ मुलखात माझा नवरा आला, त्याला पाहिल्यावर तू त्याला जो सल्ला दिलास तो मी सुद्धा ऐकला. माझ्या पतीच्या मनात संसाराचा वीट उत्पन्न करणारं माझ्या मनात दागिन्यांच जे वेड होतं, ते मी मनांतून काढून टाकलं. त्याचं प्रमाण म्हणून दागिन्यांनी भरलेली ही थैली मी तुला देते आहे ती घे!" असे म्हणत त्या स्त्रीने दागिन्यांची पिशवी राक्षसासमोर ठेवली.

राक्षस आनंदाने खदखदां हसला आणि गुहेत निघून गेला. नंतर त्याने पैशाची पिशवी आणून दगडूला आणून दिली व नंतर पैशाची व दागिन्यांची पिशवी अनंतला देत म्हणाला—"तुम्हां तिघांच्या स्वभावात इतका बदल घडल्यानंतर तुमच्या जवळचे हे पैसे व दागिने तुमचे कोणत्याही प्रकारचे नुकसान करणार नाहीत! म्हणून हे धन तुम्ही आपल्याच जवळ ठेवा!"





# गणेश पुराण

प्रसन्नवदना व मोहना या दोघी बहिणी अनुक्रमाने मूर्ती पहात पुढे गेल्या. शेवटी त्या निराश होऊन परत फिरण्याच्या बेतात होत्या. इतक्यात बाहेर मुलांचा ओरडा ऐकून दोघी जागच्या जागी थबकल्या.

त्याचवेळी त्यांना कोणीतरी म्हटल्याचे ऐकू आले—"तिकडे स्वस्तातल्या रंगांनी रंगविलेली एक मूर्त आहे ती कां नाही पहात?"

ते ऐकून मोहना म्हणाली—"चल ना, अक्का! ती मूर्त कदाचित स्वस्तात मिळेल." असे म्हणत प्रसन्न वदनाचा हात धरून तिकडे निघाली. तेव्हां ते प्रदर्शन पहायला आलेला प्रेक्षकवर्ग त्या बाजूला निघाला. प्रसन्नवदनाने सुवर्णमुद्रांची थैली मूर्ती समोर ठेवली व आपल्या गळ्यातला पाचू-मण्यांचा रत्नहार काढून मान खाली करून बसलेल्या विचित्राच्या हातात कंकणासारखा तो बांधला.

ते दृश्य पाहून लोक चकित होऊन आपसात बोलू लागले—"ह्या दोघी मुलींना वेडबीड तर नाही लागले? नाही तर तेथे ठेवलेल्या एकीहून एक सुंदर मूर्ती सोडून येथे ठेवलेल्या सामान्य मूर्तीवर आपले सर्व वैभव अशा तऱ्हेने उधळले नसते!"

ते ऐकून प्रसन्न वदना त्या लोकांच्या मनातली शंका दूर करण्यासाठी म्हणाली—येथे स्थापना केलेल्या मूर्तीत जे वैशिष्टच पाहून अबोध मुले मुग्ध होत आहेत, तेच वैशिष्टच पाहून आम्ही या मूर्तीकडे आकृष्ट



झाली. मुलं अबोध असतात म्हणून त्यांची मनें देवासारखी निर्मळ व पवित्र असतात त्यांचे आशीर्वाद म्हणजे ब्रह्मदेवाचाच आशीर्वाद असवा असे समजावे. म्हणून आम्ही त्यांची निवडच पसंत केली."

मोहना म्हणाली—"मातीच्या मूर्तीत जे रूप व सौंदर्य प्रतिबिंबित होऊ शकलं नाही ते चुना, कोळसा, गेरू इत्यादी रंगांच्या सहाय्याने मूर्तीमंत करणाऱ्या चित्रकाराची मूर्त अपूर्व आहे. या सुंदर प्रतिमें करितां आम्ही दिलेले पारितोषिक कमी उणेंच म्हटले जाईल."

त्याच वेळी विचित्राचे वृद्ध आईवडील तेथे आले. ते म्हणाले—"बाळा, पावन, वातापी गणपतीच्या कृपेने आमचा प्रयत्न यशस्वी झाला. तू इतका मोठा झाल्यावर आम्हांला भेटलास" असे म्हणत त्यांनी आपल्या मुलाला पोटाशी धरले. त्यांच्या डोळ्यांतून पुत्र वात्सल्याचे अश्रू गळू लागले. त्यांचे भूतकाळातील सर्व आयुष्य आठवले. खरे मूळ नावही आठवले.

मायलेकांची कित्येक वर्षानंतर भेट झाल्याबद्दल प्रसन्नवदनाला फार आनंद झाला आणि म्हणाली—"आतां आतांच आमच्या मनातली इच्छा पूर्ण झाली. आपला नवस आम्ही आज पुरा करणार."

त्यानंतर थोड्याच वेळात लोकांनी मांडव उभा केला. प्रसन्नवदना गणेश मूर्ती समोर बसून तालदेत गाणे म्हणू लागली— "तांडवनृत्य करी गजानन..." ती हे भक्तिगीत म्हणत असतां मोहना विद्युलते सारखी नृत्य करू लागली. ते दृष्य पाहून प्रजा तन्मय होऊन आनंद सागरात जणू बुड्या मारू लागली.

प्रसन्न वदनाचे गायन गजानन पंडिताने ऐकले. त्यावेळी गजानन पंडिताचे वय पूर्ण आयू शंभर वर्षांचे झाले होते. त्यावेळी घराबाहेर पडण्याची शक्ती ही त्यांच्या अंगात नसून ही त्यांच्या अंगात एकाएकी कोठून बळ आले, कोणास ठाऊक, ते धांवतच मांडवात आले. प्रसन्नवदनाला हात जोडून त्यांनी नमस्कार केला आणि ध्यानमग्न झाले.

नृत्य करीत असतां मोहनाने तन्मय होऊन ती विनायकाची भव्य मूर्त सहजी उचलून आपल्या खांद्यावर घेतली. प्रजा ते दृश्य थक्क होऊन पाहू लागली. बायका म्हणू लागल्या—"मुली तुला एवढे वजन पेलणार नाही!" त्याच्या उत्तरा दाखल मोहना म्हणाली—"हे मी कांही नव्याने करीत नाही!" असे म्हणत ती मूर्त तशीच खांद्यावर राहून देऊन ती मग्न होऊन नृत्य करीत तेथून निघाली. सर्व प्रजा तिच्या बरोबर निघाली. त्या गडबडीत प्रसन्नवदना कोठे अदृश्य झाली, कोणाला कांहीच कळले नाही.

ध्यान मुद्रेतून गजानन पंडित जागे झाले. समोर मूर्तीच्या जागी सुवर्ण मुद्रांनी भरलेली मखमली थैली दिसली. त्यांच्या पायांजवळ मूर्तीकार विचित्र गुडघे टेकून बसला होता.

त्याला पाहून गजानन पंडित म्हणाले— तू देवळाच्या सभामंडपांतील भिंतींवर गणेशलीला काढ. त्यासाठी आवश्यक धन प्रसन्नवदना ने गणपतीला अर्पिलेले धन गणपतीने दिलेच आहे."

त्यानंतर गजानन पंडित उठून उभे राहिले आणि विचित्र बरोबर मिरवणुकीत



चालू लागले. मोहना ती मूर्त घेऊन देवळाच्या कुंडा जवळ गेली.

कुंडाच्या पायऱ्या उतरत असतां एका-एकी अदृश्य झाली आणि तिच्या जागी एक उंदीर ती मूर्त आपल्या पाठीवर घेऊन पाण्यात शिरला. त्याच दिवशी सर्व मूर्तींना पाण्यात उतरून स्नान करावयाचे ठरले होते.

ती मूर्त कुंडाच्या मध्यभागी पोचल्या वर सहस्रावधी दीपमालिकांच्या प्रकाशा सारखा प्रकाश सर्वत्र पसरला. त्या प्रकाशाच्या मध्य भागी अभयहस्त मुद्रेत गणपतीने सर्वांना दर्शन दिले आणि अंतर्धान पावला.



गजानने पंडिताने विचित्राला पोटाशी कडकडून आवळून धरले व म्हणाले– "बाळा पावना तुझ्या मुळेच या वातापी नगरीला पवित्रता लाभली. म्हणून तुला आजपासून पावन मिश्रा हे नांव लाभेल." एवढे बोलून पावन मिश्र पुढे म्हणाले– "गर्भगृहाच्या मुख द्वारावर महाभारताची रचना स्वरूप जे चित्र आहे..." पावन मिश्रांचे ते वाक्य पुरे होण्या पूर्वीच तरूण चित्रकार म्हणाला–"गुरुदेव!" आणि पावन मिश्रांच्या पायांवर मस्तक ठेवून म्हणाला–"आपले पावन चरित्र ऐकून मी धन्य झालो. माझे नाव आनंद आहे. आपल्या पावन नावातील पहिली दोन अक्षरे बदलून मी यापुढे "व पानंद" नावे ओळखला जाईन. हा सभामंडप म्हणजे पावन चित्रालय आहे. या पावन मंडपातील चित्रांची हुबेहुब रचना मी करीन पुढल्या पिढ्यांसाठी आपण ज्या कथा सांगितल्या आहेत, त्या मी त्यांना सांगेन. आपला अनुग्रह माझ्या मस्तकावर रहावा!" असे म्हणत तो त्यांचे चरण धरून बसला.

वृद्ध पावन मिश्रांनी त्या तरूणाच्या मस्तकावर हात ठेवून आशीर्वाद देत मंदहास्य वदनाने म्हणाले–"व्यासमुनी महाभारताची जी कथा सांगणार होते, ती लिहिण्याचे सामर्थ्य कोणात आहे, असा ते विचार करू लागले त्याच वेळी ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन दर्शन दिले गणेशाला आपला लेखक म्हणून नेमायला सांगितले. ब्रह्मदेवाच्या आज्ञे प्रमाणे व्यास मुनींनी गणनायकाचे स्मरण करून त्याला प्रार्थना केली.

गणपतीने तात्काळ दर्शन देऊन म्हटले– "व्यासमुने आपण कथा प्रारंभ करावी, आपण बोलत रहावे, मी लिहीत जाईन. परंतु एक अट आहे, आपण चुकून सुद्धा माझ्याकडे पाहतां कामा नये." असे उत्तर देऊन गणपती महाभारत कथा लिहायला बसला. गणपतीने आपल्या दांताच्या तुकड्याची लेखणी करून सतत लिहीत राहिला. व्यास मुनी अर्ध निमीलित



नेत्रांनी, म्हणजे डोळे अर्धे मिटून ध्यान मग्न झाले आणि धाराप्रवाहा सारखी महाभारत कथा सांगू लागले.

समोर हिमालयाच्या शिखरातून गोमुखीतून जल प्रपात गंभीर स्वरतालावर चालू होता. त्या संगीता बरोबर देवदारू वृक्ष डोलत होते. महाभारताची कथा चालू होती.

जन्मांध धृतराष्ट्र हस्तिनापुराच्या गादीवर बसला. त्याचा धाकटा भाऊ पांडू राजा साम्राज्यचे संरक्षण करीत राज्य विस्तार करण्यात मग्न होता. कालांतराने पांडूला पांच मुलगे झाले आणि धृतराष्ट्राला शंभर पुत्र. बालपणापासूनच कौरव व पांडव यांच्यात परस्पर मत्सर व द्वेष वाढत गेला.

व्यासमुनी कथा सांगत होते आणि गणपती कथा लिहीत होता. सभापर्वाचा प्रसंग चालू झाला.

मयसभेत अपमानित झाल्यामुळे दुर्योधनाने सूड भावनेने द्यूतात पांडवांना व द्रौपदीला जिंकले आणि द्रौपदीचे चीरहरण करण्याचे ठरविले.

तेव्हां संतापून भीमाने दुर्योधनाची मांडी व दुःशासनाची छाती फोडून त्यांचे रक्त भीषण प्रतिज्ञा केली.

पांडव बारा वर्षे वनवास पूर्ण करून विराट राजाच्या दरबारात अज्ञातवासाच्या काळात वेश पालटून राहू लागले. द्रौपदी सैरंध्री रूपे विराट राजाच्या राणी बरोबर अंतःपुरात दासी म्हणून राहू लागली. कीचकाने तिचा अपमान केला. म्हणून भीमाच्या हाती तो आपले प्राण गमावून बसला. उत्तर गोग्रहणात बृहन्नलेच्या रूपात राहणाऱ्या अर्जुनाने कौरवसैन्याची धूळदाण उडवून दिली.

त्यानंतर अभिमन्यु व उत्तराचा विवाह झाला. कृष्णाने शिष्टाई करून पांडवांसाठी पांच गावे मागितली. परंतु दुर्योधनाने 'सुईच्या टोका इतकीही जमीन मिळणार नाही,' असे गर्वोक्ती करून उत्तर दिले.

शेवटी युद्धाची वेळ येऊन ठेपली. कृष्णाने अर्जुनाचे सारथ्य करण्याचे कबूल केले आणि त्याला गीतोपदेश केला. भीष्म शरशय्येवर पडल्यानंतर द्रोणाने चक्रव्यूहाची रचना केली. सर्व कौरवांनी मिळून अधर्म युद्ध करून अभिमन्यूचा वध केला. सुभद्रा पुत्रशोक करू लागली.

अर्जुनाने आपले शौर्य व प्रताप दर्शवून जयद्रथाचा वध केला. धृष्टद्युम्नाने द्रोणाचार्यांचा वध केला. तिकडे दुर्योधनाला कर्णाच्या शौर्य व प्रतापाचा आधार वाटला. परंतु त्याच्या मृत्यू नंतर तो देखील हताश झाला. भीमाने प्रतिज्ञेप्रमाणे दुःशासनाचा वध केला आणि दुर्योधनाची मांडी फोडून दोघांचे रक्त प्याला.

द्यूतात पराभव झालेल्या युधिष्ठिराला आपल्या भावांच्या मदतीने भयंकर युद्ध करून जय मिळाला आणि त्याची विजय दुंदुभी चतुर्दिक वाजली.

श्रीकृष्णाने आपला अवतार संपविला. परिक्षिताचा राज्याभिषेक करून पंच पांडव द्रौपदीसह महाप्रस्थानाला निघाले.

धर्म कधी मरत नाही व शेवटी धर्माचाच जय होतो. हे सत्य जाहीर करण्या साठीच जणु काही युधिष्ठिर मेरु शिखरावर चढून गेला.

हिमालयाच्या शिखरावरून जलप्रवाहाचा घवघवा मंद पडत चालला. हे सांगणे कठीण आहे की व्यासमुनी सांगत होते ती कथा



गणपती लिहीत होता की गणपती लिहीत होता ती कथा व्यासमुनी सांगत होते. इतक्या वेगाने महाभारताची रचना चालू होती.

तिकडे ब्रह्मलोकात ब्रह्मदेव पद्मासनावर बसून आनंदाने हसत सार्थक दृष्टीने सरस्वतीकडे पहात होता. दुसऱ्या क्षणाला सरस्वतीने वीणेच्या तारा जुळवून झंकार केला आणि श्रीराग वाजवू लागली.

महाभारताची कथा संपूर्ण होत आली होती. शेवटच्या पर्वाची रचना चालू होती.

सरस्वतीच्या हाती वीणावादना बरोबर ब्रह्मलोकांतून श्रीरागचे स्वर व्यास महर्षींच्या कानावर येत होते. त्यामुळे व्यास मुनींच्या

रचना कार्यात विघ्न उत्पन्न होऊ लागले.

कथा अद्याप पूर्ण झाली नव्हती. व्यास मुनींनी अन्य मनस्क होऊन लेखकाकडे, म्हणजे गणपतीकडे, पाहिले. दुसऱ्या क्षणाला गणपती अंतर्धान पावला.

महाभारत ग्रंथावर अक्षतांसारखी आकाशांतून सुमन वृष्टी होऊ लागली.

व्यास मुनींनी ग्रंथ उघडून आतुरतेने पाने चाळून पाहिली. त्यांना जो काही कथा भाग सांगावयाचा उरला होता तो सर्व लिहिला गेला होता. व्यास मुनींच्या डोळ्यांतून कृतज्ञतेचे अश्रू वाहू लागले. त्यांचे सर्वांग आनंदाने पुलकित झाले. त्याच वेळी वीणेवर सरस्वतीने हंसध्वनी राग वाजवायला सुरवात केली.

नारदमुनींनी प्रवेश करून व्यासांना विचारले–"महर्षे, महाभारताची रचना करणाऱ्या महामुने, तुमच्या डोळ्यात आश्चर्य झळकते आहे कारण काय?"

व्यासांनी सर्व उघड सांगितले. ते ऐकून नारदमुनी म्हणाले–"याचा अर्थ असा की तुम्ही जे काही सांगायचे म्हणून योजीत होता ते सांगण्यापूर्वीच लेखक लिहीत होता, म्हणावयाचा!"

"होय, नारदा! तू म्हणतोस खरे आहे. आयुष्यभर तपश्चर्या करूनही कोणाला असा लेखक लाभणे शक्य नाही. मी धन्य झालो. माझा संकल्प पूर्ण झाला, म्हणून मी महाभारताला 'जय' असे ही नाव देईन." असे म्हणून व्यासमुनींनी हात जोडून गणपतीचे ध्यान केले.

महाभारता जवळ एक ज्योतिर्वलय दिसू लागले. तिच्यातून दर्शन देऊन गणनायक म्हणाला–"व्यास महर्षे! आपले महाभारत पंचमवेद म्हणून आणि एक अपूर्व काव्य या नावे सर्वत्र व सर्व काळ प्रशंसेला पात्र होईल." असा आशीर्वाद देऊन गणपती अंतर्धान पावला.

विघ्नाश गणनायकाने आपल्या दाताने लिहिलेले महाभारत युगेयुगे साहित्य क्षेत्रात नक्षत्र मंडळात चंद्रासारखा आपला प्रकाश देत चिरस्थायी झाला. (संपूर्ण)





# भोळा बाब्या

लेबनान देशातल्या एका गावी हनीफ व मरियम नावाचे नवराबायको रहात होते. हनीफ स्वभावाने चांगला होता, परंतु कमालीचा मंदबुद्धीही होता. तसा तो आळशी व कामचोरही होता. परंतु मरियम फार हुशार व चांगली कर्तबगार बाई होती. ती श्रीमंत लोकांच्या घरी झाडलोट भांडी घासणे व कपडे धुणे वगैरे कामे करून स्वतःचा व नवऱ्याचा उदर निर्वाह चालवी. ती मधून मधून नवऱ्याला प्रोत्साहन देऊन कामावर पाठवी. परंतु हनीफ आइद्यासारखा पडून राही आणि तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करी.

एकदां मरियम अचानक आजारी पडली, म्हणून कामावर गेली नाही. त्या दिवशी तिला हनीफचा अतोनात राग आला. ती त्याला हाक मारुन म्हणाली–"तू काही मोलमजुरी करून चार पैसे मिळवून आणले नाहीस तर आपणां दोघांना उपाशी रहावे लागेल. गांवच्या चौधरीकडे जाऊन गाढवं हाकायचं काम तरी कर. त्यांच्या कामासाठी तुला गाढवावर बसून जावे लागेल.

दुसऱ्या दिवशी उठतांच हनीफ चौधरीकडे गेला. चौधरीला हनीफचा भोळसटपणा चांगला माहीत होता. त्याच बरोबर बायकोच्या मेहनतीवर हनीफचं पोट भरतं आहे हे देखील चौधरीला माहीत होते. हनीफकडे पाहून चौधरीला त्याची कींव आली. त्याने त्याला मदत करण्याच्या हेतून त्याच्या हातात एक दीनार देऊन एक गाढव विकत घेऊन यायला सांगितले. हनीफ बैरुटला जाऊन एक चांगलं दणकट गाढव तेथल्या बाजारात विकत घेऊन आला. त्या दिवसापासून तो त्या गावच्या चौधरीकडे कामाला लागला. मालक



त्याला दरदिवसाची मजुरी संध्याकाळी देऊ लागला.

एके दिवशी चौधरी हनीफला म्हणाला— "तू बैरूटला जाऊन तेथल्या महंमद अलीच्या दुकानातून एक पोते तांदूळ विकत घेऊन ये."

हनीफला ते दुकान माहीत होते. परंतु हनीफला त्या दिवशी आळसटपणामुळे बैरूटला जावयाचे नव्हते. तरी त्याला वाटले की मालकाचे काम झाले पाहिजे. तांदूळ आणायला एकट्या गाढवाला पाठविलं तर काय हरकत आहे? मालकाचं काम होईल व आपल्याला पायपीटी करावी लागणार नाही.

असा विचार करून तो गाढवाला म्हणाला—"हे पहा, आपल्याला बैरूटचा जो दुकानदार नेहमी तांदूळ देतो, त्याच्याकडे जाऊन एक पोते भरून तांदूळ विकत घेऊन ये." गाढवाने आपल्या संवयी प्रमाणे मान हलविली. परंतु हनीफला गाढवाचा होकार वाटला व गाढवाच्या हुशारीचे तो कौतुक करू लागला. त्याने गाढवाच्या डोक्याला एक पागोटे बांधले व त्याच्या एका घडीत मालकाने दिलेला दीनार खोचून ठेवला. नंतर गाढवाला बैरूटच्या वाटेवर सोडले आणि गाढव दिसेनासे होईपर्यंत त्याच्याकडे पहात उभा राहिला. नंतर तो घरी परत आला. बऱ्याच उशिरां गाढवा शिवाय घरी परतलेल्या नवऱ्याला पाहून मरियमला आश्चर्य वाटले आणि तिने आश्चर्यचकित होऊन विचारले—"तू बैरूटला कां नाही गेलास? आणि आपलं गाढव कोठे आहे?"

"मी गाढवाला एकट्याला बैरूटला पाठविले आहे. मी त्याला विचारले की एकट्याने जाऊन मालकासाठी पोते भरून तांदूळ आणशील का? त्याने होकारार्थी मान हलविली आणि लगेच निघाला." हनीफने आपल्या बायकोला गाढवाच्या हुशारीचे वर्णन करून सांगितले.

"तू तर अगदी भोळा बाव्याच आहेस रे! आपले गाढव आणि एक दीनार फुकटात दोन्ही आपण घालवून बसलो. लवकर जा आणि पहा कोठे सापडते का! आपलं गाढव. बैरूटच्या वाटेने ताबडतोब नीघ, परंतु एक गोष्ट लक्षात असू दे गाढव आणि तांदुळाशिवाय घरी परत येऊ नकोस." मरियमने त्याला धमकीच दिली.

हनीफ घरून पळतच निघाला आणि बैरूटच्या वाटेने पळत राहिला. दम लागल्यामुळे त्याला थांबावे लागले तेव्हांच थांबला. परंतु त्याला त्याचे गाढव कोठेही दिसले नाही.

हनीफ बैरूटला पोचला आणि महंमद अलीच्या दुकनात जाऊन त्याने दुकानदाराला विचारले—"काय हो, माझ्या गाढवाने तुमच्या दुकानातून तांदूळ विकत घेतले का? अजून ते परतले नाही, म्हणून विचारतो."

दुकानदाराने हनीफकडे पाहिले व हा कोणी वेडा पीर दिसतो आहे हे ओळखले. त्याची थट्टा करण्यासाठी म्हणाला—"तू म्हणतोस ते बरोबर आहे, तुझे गाढव आलं होतं हे खरं आहे. परंतु त्याला आमच्या दुकानातले तांदूळ मुळीच पसंत पडले नाहीत' म्हणून ते लगेच दुसऱ्या दुकानात गेले.', असे म्हणत त्याने आणखी एका दूकानाकडे बोट दाखविले.

तेव्हां हनीफ त्या दुकानात गेला. त्यावेळी पहिल्या दुकानातल्या मालकाने दुसऱ्या दुकानदाराला खुणेने काही सांगितले दुसऱ्या दुकानदाराला ते कळले. हनीफ त्याच्या





दुकानात आला तेव्हां त्याने विचारले– "कायरे बुवा, तुला काय पाहिजे?"

हनीफने विचारले–"माझ्या गाढवाने तुमच्या दुकानातून तांदूळ घेतले का? कारण अजून ते घरी परतले-नाही, म्हणून विचारतो."

"तुझं गाढव दुकानावर आलं होते. परंतु ते म्हणत होतं की त्याला बैरूटचे तांदूळ पसंत पडले नाहीत, म्हणून ते जफा नगराकडे गेले आहे. तेथे चांगले तांदूळ मिळतील, असे त्याला वाटले." दुसरा दुकानदार म्हणाला.

ते ऐकून हनीफ घाबरला. कारण त्याला जफा नगराला जावे लागणार व तेथून गाढव शोधून आणावे लागणार. नाही तर मरियम त्याला घरात पाऊल टाकू देणार नाही. म्हणून त्या दुकानदाराकडून एक दीनार उसने मागून घेऊन हनीफ जफा नगराकडे निघाला.

हनीफ जफा नगरी जाऊन बाजारभर हिंडला. सर्व दुकानांत चवकशी केली. परंतु त्याला त्याचे गाढव मिळाले नाही. शेवटी रस्त्यावर जाणाऱ्या एका माणसाला थांबवून त्याने विचारले–"काय हो, या गावात तांदुळाचे सर्वांत मोठे दुकान कोणते?"

त्यानंतर तो त्या मोठ्या दुकानात गेला व दुकानदाराला विचारले–"काय हो शेटजी, माझं गाढव माझ्या मालकासाठी तांदूळ घ्यायला तुमच्या दुकानात आलं होतं का?"

त्या दुकानदाराचं त्या नगराच्या मोठ्या काजीशी फार वाकडे होते. हनीफच्या तोंडी गाढवाची गोष्ट ऐकून एक गोष्ट त्याच्या डोक्यात आली, की त्या काजीची मान खाली व्हायला ही संधी छान आहे. तो मैत्रीचा आव दाखवून हनीफला म्हणाला– थोड्या वेळापूर्वी तुझं गाढव आमच्या दुकानावर आलं होतं खरं, परंतु तांदुळाच्या भावासंबंधी त्याच्याशी थोडी बाचाबाची झाली आणि दुकानासमोर गर्दी जमली. तुझ्या गाढवाची बुद्धिमत्ता पाहून लोकांनी त्यालाच काजी म्हणून नेमले. आता ते मनुष्यरूप धारण करून काजीचे काम करीत आहे.

त्यानंतर तो दुकानदार हनीफला काजीच्या कोर्टापर्यंत पोचवून परतला.

हनीफला वाटू लागले की इतक्या मोठ्या हुद्द्यावर काम करू लागलेले गाढव आतां आपल्याबरोबर येणार नाही. म्हणून तो मुळे विकणारीच्या दुकानातून गेला. मुळे विकत घेऊन तो काजीच्या कोर्टात गेला. परंतु तेथल्या शिपायांनी त्याला आत जाऊ दिले नाही. हनीफ त्याच्या बरोबर भांडू लागला.

काजीने बाहेर येऊन भांडणाचे कारण विचारले. तेव्हां शिपायांनी हनीफ विषयी त्यांना माहीत होते ते सांगितले. काजीने हे सर्व कारस्थान त्या तांदुळाच्या दुकानदाराचे असले पाहिजे हे अंदाजाने ओळखले. त्याने आपला राग आवरून हनीफला आत बोलाविले.

हनीफ आत जाऊन आपल्या हातातली मुळ्यांची जुडी पुढे करीत म्हणाला–"हे माझे गाढव आहे. त्याने काजीचे सोंग घेतले आहे. मी त्याच्या पगडीत एक दीनार खोचून ठेवलेला आहे. काजीला कळले की हनीफ एक महामूर्ख आहे. तो अगदी शांत स्वरात म्हणाला–"तू आपले गाढव केवढ्याला विकत घेतलेस?" हनीफने एका दीनाराला विकत घेतले असल्याचे सांगितले.

तेव्हां काजीने हनीफच्या हातात चार दीनार दिले आणि त्याला समजावून सांगितले की उगाच काही भांडण तंटा न करतां त्याने कोर्टातून निघून जावे.

हनीफच्या जिवात जीव आला. त्यानं एक गाढव व एक पोतं भरून तांदूळ विकत घेतले. पोते गाढवाच्या पाठीवर टाकून तो मालकाच्या घरी आला. पोते पोंचते करून तो घरी परत आला.

तेव्हां पासून हनीफने गाढवाच्या म्हणण्यावर विश्वास केला नाही.





# मीनेचा मितव्यय

मीना मितव्यय फार करी. मुख्य करून केलेला सैंपाक बाहेर फेकून देणे तिला मुळीच आवडत नसे. एकदा तिने शेजारच्या सुभाषच्या सर्व मंडळींना जेवायला बोलाविले. सुभाष अंगापिंडाने थोडा जाडजूडच होता. म्हणून मीनेने सर्व सैंपाक थोडा जास्तच केला होता. परंतु त्याच दिवशी नेमके सुभाषला तेवढे बरे नव्हते. म्हणून तो तसा-बेतानेच जेवला. म्हणून सर्व पदार्थ बरेच उरले. पाहुणेमंडळी निघून गेल्यावर "आतां हे सर्व काय करणार ग? बरेच उरलं आहे की!" असे म्हणत सदाशिव थोडासा चिंतामग्न झाल्यासारखा उरलेल्या अन्नाकडे पहात राहिला.

"ते मी सर्व पाहून घेईन!" मीना म्हणाली.

बायकोचा मितव्यय नवऱ्याला चांगला माहीत होता. ही बाई हे सर्व आपल्याला खायला लावणार अशी शंका सदाशिवरावांच्या मनांत आली. म्हणून दुसऱ्या दिवशी तोंड धुतल्याबरोबर दोन्ही हातांनी पोट धरून पोट फुगून आल्यासारखा तोंड वांकडे करून फिरू लागला. बायकोने काय झाले हो, म्हणून जवळ येऊन विचारले तर पोटांत कळा येत असल्यासारखा पोट दाबू लागला.

मीनाने वैद्याकडे निरोप पाठविला. वैद्याने येऊन सदाशिवरावांना तपासून पाहिलं व विचारले–"रात्री असं काय खाल्लेस रे?" सदाशिवरावांनी विचारलं.

"एवढ्यावर पोटात वात वाढण्याचं कारण नाही. बरं तर घरी जाऊन औषध पाठवून देतो. आज काही खाऊपिऊ नका.' वैद्याने सल्ला दिला.

मीनाने वैद्याकरिता एका प्लेटमध्ये "थोडा कराळ करा," म्हणत काही आणून दिले, प्लेट हातात न घेतांच खायचे पदार्थ पाहूनच वैद्यबुवांना ते शिळे असल्याची शंका आली. ते घाईघाईने उठून उभे राहिले व म्हणाले–"हे पहा, ताई! आज मला आहे उपास! बाकी दुसरं काही नाही." आणि निघून गेले.

"त्यांना उपास आणि तुम्हांला बरं नाही! आणि हे सर्व पदार्थ! काय करायचं बाई?" मीना निराश होऊन म्हणाली.

"खूप भुकेला कोणी असेल त्याला बोलावून पोटभर खायला घाल. भुकेला कधी चवबीव पहात नाही. शिवाय तुला पुण्य मिळेल." सदाशिवराव म्हणाले.



मीना बाहेर व्हऱ्हांड्यात जाऊन उभी राहिली. त्याच वेळी गावच्या पाटलाचा गडी जात असलेला दिसला. "असा उदास थकलेला दिसतो आहेस! सकाळपासून काही खाल्लं नाहीस वाटतं?"

"होय हो अक्का! मालक एकदम तापले आणि काल दिवसभर मला खोलीत कोंडून ठेवले. आतांच सोडले." गडी म्हणाला.

"बिचारा! आमच्या घरी जेवण वगैरे सर्व तयार आहे. जा चार घास खाऊन!" मीना म्हणाली. तिने पडवीत एक पत्रावळ घातली व एकेक पदार्थ वाढू लागलेली पाहून गडी घाबरून म्हणाला–"ऐका अक्का! आमच्या घरचे लोक मी आहे कोठे म्हणून शोधत आहेत. पुन्हां केव्हां तरी वाढा, मी येईन खायला." म्हणत निघून गेला.

काय ग बाई? हा असा निघून कां गेला?" मीना सदाशिवरावांजवळ येऊन म्हणाली. तू वाढलेले सर्व पदार्थ कालचे शिळे असल्याचे त्याने ओळखलं वाटतं!" सदाशिवराव म्हणाले.

"तर काय झालं? भुकेलेल्याला चवबीव कसली हो!" मीना म्हणाली.

"होय ग, भुकेसमोर चवबीव काही नसते. पण वास येतोच की, तो काही भिकारी नाही!"



नवऱ्याने ते म्हणताच मीना बाहेरच्या दाराबाहेर जाऊन पाहू लागली. एक भिकारी आला. "चार दिवसांपासून काही खायला मिळालं नाही! घासभर काही घाला, आहे!"

"घासभर का रे, चांगलं पोट भरून जेव!" ये आत ये!" मीना म्हणाली.

या खेपेस तिने एका पत्रावळीत सर्व पदार्थ पुष्कळपुष्कळ वाढून आणले व भिकाऱ्या समोर ठेवले. त्या पदार्थांचा वास लागतांच त्याने एकदां मीनाकडे पाहिले आणि डोळे फिरवून जमिनीवर पडला.

मीना घाबरून जाऊन नवऱ्याकडे धावली. सदाशिवराव तो मेलाच असणार असे समजून शेजारच्या गल्लीत एक भटजी रहात होते त्यांच्या घरी गेला आणि म्हणाला—"एक भिकारी आमच्या घरी येऊन जेवायला बसतांच पानावर मेला हो! आतां काय करायचं सांगा."

"त्यात काय हो? अनाथ प्रेताचा दहन केला तर फार मोठा पुण्यलाभ होतो. तूच ते कर. घरात केलेला सर्व सैंपाक मला दान करून टाक!" भटजी म्हणाले.

ते सदाशिवरावांबरोबर त्यांच्या घरी आले भिकाऱ्याला पाहून म्हणाले—"प्रेताला इतक्यातच वास सुटला आहे!"

"तो वास प्रेताचा नाही हो. त्याच्या समोर जे वाढलं ते सर्व पदार्थ काल केलेले आहेत." सदाशिवराव म्हणाले.

भटजी दचकून म्हणाले—"हो अनाथ प्रेताचा दहनसंस्कार वगैरे नाही का? त्याचे दान वगैरे मला नाही घेतां येणार! एवढेच नव्हे, हा उपासान जीव कासावीस होऊन मेला आहे. तेव्हां घरात जे शिजवलेले पदार्थ आहेत, ते सर्व याच्या प्रेताबरोबर चितेवर ठेवायचे असतात!"

सदाशिवराव आनंदाने म्हणाले—"प्रथम सर्व शिजवलेले अन्न चितेवर ठेवून त्यावर याचा देह ठेवला तर ठीक होईल ना?"

तेवढ्यात तो भिकारी उठून बसला आणि ते अन्न पहिल्यानेच चुलीत टाकले तर माझा दहनसंस्कार करण्याची वेळच येणार नाही!" म्हणत पळून गेला.

झालं काय हे कळायला भटजींना काही वेळ लागला. घरी बोलावून एका गृहिणीने अन्न वाढले ते नाकारणे शक्य नव्हते व ते खाणेही शक्य नव्हते. म्हणून मेल्याचे सोंग करून तो भिकारी पडून होता. चिता वगैरेच्या गोष्टी ऐकल्यावर उठून पळून गेला. भटजी व सदाशिवराव परस्परांकडे पाहून खूप हसले. मीनाला मात्र मेल्यासारखं झालं.

ती रागाने बडबडू लागली—"मी स्वत. साठीच मितव्यय करते आहे? मी थोडे हात राखून केले तर तुमचेच मेहनतीचे चार पैसे वाचतील. तुम्हांला हा सर्व खेळ वाटत असेल तर ते मी आत्तांच सर्व करते." असे म्हणत नवऱ्याकडे रागाने पहात मीनाने सर्व अन्न चुलीत टाकले.

"माझ्या पोटात दुखायचं आतां थांबलं, बघ! मला तर कडकडून भूक लागली आहे. लवकर सैंपाक कर!" सदाशिवराव म्हणाले.

"अस्सं! म्हणजे तुमचा आजारसुद्धां लटकाच होता तर!" म्हणत मीना रागावून निघून गेली. नवरा बायकोच्या भांडणात आपण कशाला, असा विचार करून भटजींनी सुद्धा तेथून पाय काढला.

त्याच वेळी वैद्यबुवा घाईघाईने येत म्हणाले—"अहो सदाशिवराव! औषध पाठवायला कोणी भेटलं नाही. मीच घेऊन आलो आहे. उशीर झाला रागावू नका!"

"कशाला औषध? अहो, त्यांचा तो आजार लटका होता!". असे सांगून मीनाने वैद्यबुवांना घडलेला सर्व वृत्तांत सांगितला.

"तरमग, आणखी काय? ते सर्व अन्न चुलीत टाकलेत म्हणून मी उपाससुद्धा सोडला. माझंही पान वाढा!" वैद्यबुवा म्हणाले.

"सर्वच एकाहून एक!" असं म्हणत चिडून मीना सैंपाकघरात निघून गेली.

त्या दिवसापासून मीनाने, काही अन्न उरलं तर लगेच ज्या वेळचे त्या वेळेला कोणाला तरी देऊन टाकायचं ठरविले.



# निरूत्तर करणारा प्रश्न

एक राजा आपल्या दरबारांत एक न एक गमतीदार प्रश्न विचारीत असे. त्या प्रश्ना बरोबर थोडा विनोदही होई. जो कोणी उत्तम विनोदयुक्त उत्तर देई राजा त्याला चांगल इनाम देत असे. एकदां त्याने प्रश्न केला—"बाजारात इतर सर्व वस्तु बरोबर बुद्धि सुद्धा विकत घ्यायला मिळू लागली तर काय होईल ?"

एक दरबारी उभा राहून म्हणाला—"बुद्धि विकत मिळू लागली तर सर्व मूर्ख ती भराभर विकत घेतील व देशात कोणी मूर्ख राहणारच नाही !"

राजाला ते उत्तर आवडले असावे अशी शंका घेऊन दरबारी विदूषक म्हणाला—"महाराज, तसे होणेच शक्य नाही. समजा, बुद्धि ही विकत मिळू लागली तरी मूर्खांची संख्या कमी होणे शक्य नाही !"

"ते कसं काय, हे सिद्ध करून दांखव !" राजा म्हणाला.

"प्रत्येक व्यापारी पुष्कळ फायदा मिळावा, अशी आशा करणार. बुद्धी विकत घेऊन सर्व मूर्ख बुद्धिमान झाले तर बुद्धी विकत घेणारा कोणी मिळणार नाही. व्यापारी बुद्धीच्या नावाखाली दुसरंच काही तरी विकत राहणार. मूर्ख मूर्खच राहून जातील."

"खरेदी करणारे ते विकत आहेत ती बुद्धी आहेकी नाही, हे ओळखू शकणार नाहीत का ?" एका दरबाऱ्याने विचारले.

"ओळखू शकणार नाहीत ! कारण बुद्धी विकत घ्यायला निघालेले सर्व मूर्खच तर असणार !" विदूषक म्हणाला. तें उत्तर ऐकून सर्व दरबारी हसले, राजाने विदूषकाला यथायोग्य पारितोषिक दिले.






[ १५ ]

[ शिवदत्त व मंदरदेव दोघांनी ज्या बेटावर ते आले होते तेथे एका विचित्र व्यक्तीला पाहिले. त्याने तो शमन द्वीपाचा निवासी असल्याचे व बारा वर्षांपूर्वी समुद्रकेतू नावाच्या एका चांच्याने त्याला एकटे सोडल्याचे सांगितले. नंतर सर्व खायच्या प्यायच्या तयारीला लागले. नेमका त्यावेळी समुद्रकाठाकडून आरडा ओरडा ऐकू आला. पुढे–]

शिवदत्त व मंदरदेव दोघांनी तलवारी उपसल्या व झाडांच्या आडून लपत ते समुद्रकिनाऱ्याकडे निघाले. त्यांच्या अनुयायांपैकी फक्त दोघेजणच मागे राहिले. वज्रमुष्टी झाडांच्या खालून रांगत सर्वांच्या आधी समुद्रकाठावर पोहोचून पाठीमागून येणाऱ्यांना सावधगिरीने यायला खूण करू लागला.

सर्वांनी झाडांच्या आडून समुद्राकडे पाहिले. काठापासून सुमारे हजार पावलावर समुद्रात नौका युद्ध चालू होते. त्या युद्धात फक्त सहाच युद्ध नौका होत्या. समुद्र खवळलेला होताच. त्या नौका एकीवर एक आदळत होत्या. सशस्त्र सैनिक एका नौकेवरून दुसरीवर उड्या टाकून शत्रूशी युद्ध करीत होते.

अशा गंभीर परिस्थितीत एक भयंकर आकृतीचा काळाकभिन्न दांडगा माणूस दातात तलवार धरून शिडाच्या दांडीवर



अर्ध्यापर्यंत चढून गेला आणि तेथून आपली तलवार उजव्या हातात घेऊन फिरवीत "जय कालकेया!" असा ओरडला आणि दुसऱ्या नावेवर उडी टाकली.

त्या क्षणापासून युद्ध जास्त भयंकर होऊ लागले. दोन्ही बाजूचे सैनिक कोणाचे डोके तर कोणाचा हात कापल्या गेल्याने समुद्रात पडत होते. एक शिंग बसविलेले शिरस्त्राण घालून तो काळाक-भिन्न बलदंड योद्धा भयंकर गर्जना करून ह्या नावेवरून त्या नावेवर सहज उडी मारून जात होता व आपली तलवार गर-गर फिरवीत शत्रूवर डुकरासारखा तुटून पडत होता.

त्याच्याकडे बोट दाखवून वज्रमुष्टी म्हणाला—"मालक, तोच तो समुद्रकेतू, क्रूर चाचेगिरी करणारा दुष्ट!"

शिवदत्त व मंदरदेव त्याच्याकडे पाहून नंतर परस्परांकडे पाहू लागले. तो भयंकर आकृतीवालाच समुद्रकेतू असल्याचे कळतांच शिवदत्ताला कल्पना आली की त्या चांच्याचा हल्ला समुद्रपार व्यापार करणाऱ्या किंवा प्रवास करणाऱ्या प्रवाशांवर झालेला आहे. तर आपण आतां काय करावयाचे या विचारात तो असतां एक लहानसं होडकं त्या मोठमोठ्या नौकांच्या मधून बाहेर येत असलेले दिसले.

शिवदत्त व मंदरदेव ते होडकं पाहून आश्चर्यचकित झाले. ते होडकं किनाऱ्याकडे जात असल्याचे युद्ध करीत असलेल्यांपैकी कोणाच्याही लक्षात आल्यासारखं दिसत नव्हतं. ते आपल्याच नादात मोठ्याने ओरडत होते आणि एका नौकावरून दुसरी वर उड्या मारीत समोर सांपडेल त्या शत्रूला कापीत पुढे जात होते.

थोडा वेळ गेला असेल. समुद्रकेतू मोठ्याने ओरडला—"अरे, त्यांना पहा, पळून जात आहेत! पोंहोत जाऊन ते होडकं धरा!"

त्या पाठोपाठ चांच्यांच्या टोळीतल्या काही जणांनी समुद्रात उड्या टाकल्या



आणि होडक्याच्या दिशेने पोहू लागले. त्यांच्या पाठोपाठ आणखी काही जणांनी उड्या मारल्या आणि पुढे पोहोत जाणाऱ्यांवर आपल्या तलवारींनी वार करू लागले.

आतां दोन्ही बाजूचे लोक परस्परांवर हल्ला करून तलवारीने वार करू लागले. ते जमले नाही त्यांनी बाहुबलाचा प्रयोग करून परस्परांच्या मुंड्या मुरगळण्याचा प्रयत्न सुरू केला.

"हे युद्ध तर आणखीच विचित्र दिसतं आहे! दोघेही समुद्रात पोहोत परस्परांची डोकी उडविण्याच्या प्रयत्नात आहेत. मी असले युद्ध कधी यापूर्वी पाहिले नाही." मंदरदेव शिवदत्ताला म्हणाला.

शिवदत्ताने फक्त मान हलवून होकार दिला. त्याची नजर एकदां नौकांवर युद्ध करीत असलेल्या लोकांकडे जाई व दुसरी किनाऱ्याजवळ येऊ लागलेल्या होडक्याकडे जाई. या दोन्हींबरोबर त्याची दृष्टी समुद्रांत पोहोत युद्ध करणाऱ्यावरही जात होती.

हळूहळू ते होडकं किनाऱ्याजवळ येऊ लागलं. आतां किनारा फक्त पांच सहा पावलांवरच होता. आतां होडक्यातून त्या दोघी स्त्रिया गुडघाभर पाण्यात उतरल्या आणि झपाझपा पावले टाकीत किनाऱ्यावर



आल्या. तत्क्षण समुद्रकेतूची आरोळी आसमंतात दुमदुमली. त्या पाठोपाठ दोन नावा किनाऱ्याकडे निघाल्या आणखी दोन नावा बुडण्याच्या बेतात होत्या. त्यांत जखमी होऊन पडलेले लोक त्यांना वांच-विण्यासाठी करुणा भाकीत होते.

मंदरदेवा, आतां आपण बाहेर पडलंच पाहिजे." शिवदत्त म्हणाला. "त्या पळून जाणाऱ्या स्त्रिया कोण आहेत, या गोष्टीची विचारपूस करणे तूर्त तरी अनावश्यक आहे. आपण लगेच त्या चांच्यांच्या सर-दाराला तोंड दिलं नाही तर तो सहजी त्या स्त्रियांना जाऊन धरील व हाल करील."












मंदरदेवाने मागे वळून पाहिले. त्याला तिथे सैनिक व वज्रमुष्टी मात्र दिसले. त्याने "इतर दोघे कोठे आहेत?" असे त्या सैनिकांना विचारले.

"मालक, आपण जेवणाखाण्याची तयारी केली तेथे आहेत!" एक सैनिक म्हणाला. तो त्या वेळी मागे वळून पहात होता.

"तू जाऊन त्यांना लगेच बोलावून घेऊन ये." या शब्दात मंदरदेवाने त्याला आज्ञा केली.

तो सैनिक मागे फिरून तिकडे जाणार एवढ्यात शिवदत्ताने त्याला थांबविले व म्हणाला—"मंदरदेवा! आपण सर्व मिळून फक्त आठ जणच तर आहों! यांच्यांच्या टोळीत पन्नास एक तरी असतील. त्यांना आपण तोंड द्यावयाचे झालंतर एक युक्ती केली पाहिजे."

"तरमग काय करावे म्हणतोस?" या अर्थी मंदरदेवाने शिवदत्ताकडे पाहिले.

"आपण इतके थोडे जण आहों, हे समुद्रकेतूला कळले तर त्यात धोका आहे. म्हणून आपण पांच जणांनीच सहस्त्रावधी आहों असे दर्शविण्यासाठी झाडीच्या आडूनच ओरडले पाहिजे आणि त्यांच्यावर तुटून पडलं पाहिजे आणि उरलेले तिघे आपल्याचसारखे त्यानंतर ओरडून पुढे आले तर बरे होईल." शिवदत्त म्हणाला.

मंदरदेवाला ते पटले. जेवणाची तयारी पहात असलेल्या दोघांना ती गोष्ट कळविण्यासाठी एकजण गेला व त्या तिघांनी यांच्यांच्या टोळीवर नंतर एकदम तुटून पडण्यास त्याने शिवदत्ताची आज्ञा कळवली.

नंतर थोड्या वेळाने समुद्रकेतूच्या दोन्ही नौका समुद्रकिनाऱ्याजवळ येऊ लागल्या. समुद्रावरचे युद्ध त्यामुळे थोडे थंड पडले. दोन नौका बुडल्या व दोन नौका समुद्रकेतूच्या अनुयायांनी आपल्या ताब्यात करून घेतल्या. नंतर तेसुद्धां किनाऱ्याकडे





निघाले. त्यांना वाटेत पोहोत युद्ध करणारे दिसले. त्यांनी आपल्या लोकांना नावांत चढायला हात दिला आणि शत्रूचे जे लोक पाण्यातले होते त्यांच्यावर शस्त्रप्रहार सुरू केला.

शिवदत्ताने ते भयंकर दृश्य एकदां पाहिले व म्हणाला—"मंदरदेवा! दुष्ट यांचे आपल्या सर्व शत्रूंचा संहार करणार. म्हणून त्या स्त्रियांच्या रक्षणाचा भार आपण आपल्या खांद्यावर घेतला पाहिजे."

मंदरदेव विचार करून मान हलवीत म्हणाला—"चल तर, आपण बाहेर निघू या!" असे म्हणत त्याने दोन पावले पुढे टाकली आणि बाजूलाच पुढे येत असलेल्या वज्रमुष्टीकडे पाहून म्हणाला—"अरे रे, हा वज्रमुष्टी तर निशस्त्रच आहे! ही गोष्ट आतापर्यंत आपल्या कोणाच्याही लक्षात आली नाही!"

ते ऐकून वज्रमुष्टी थोडा हसला व म्हणाला—"अहो, मला हवी असलेली तलवार मीच मिळवतो पहा! शक्य झाले तर त्या समुद्रकेतूचे मुंडके मीच उडवितो."

तेथून सर्व निघाले. झाडीतून समोर उघड्यावर आले. वज्रमुष्टीला तो सर्व प्रदेश व त्यातल्या वाटा चांगल्या माहीत होत्या. म्हणून तोच पुढे निघाला. किनाऱ्यावर आलेल्या दोघी स्त्रियांनी मागे वळून एकदां समुद्राकडे पाहिले आणि समुद्रकेतू आपला पाठलाग करायला येत असल्याचे ओळखले आणि जवळच दाट झाडी होती तिकडे लपायला धावल्या.

तिकडे त्याच वेळी समुद्रकेतूच्या दोन्ही नौका किनाऱ्याला येऊन लागल्या. त्याने आपली तलवार आकाशांत उंच धरून "जय कालकेया!" असा जयघोष केला. नंतर मागे वळून पाण्यात पाऊल टाकीत आपल्या अनुयायांकडे पहात ओरडला—"त्या स्वयंप्रभेला एकटीला कोणत्याही

प्रकारची दुखापत होता कामा नये. त्या म्हातारीला नरकात जाऊ द्या!"

समुद्रकेतू गुडघाभर पाण्यातून चालत किनाऱ्यावर आला. पाठोपाठ वीस चांचे किनाऱ्यावर उरले. सर्व काही आवाज केल्याशिवाय ज्या झाडीत त्या स्त्रिया लपायला गेल्या होत्या, त्या बाजूला निघाले.

"काय वाटेल ते करून आपण प्रथम तिकडे पोंचायच्या आत सर्वांनी जयघोष करून त्याच्यावर हल्ला केला पाहिजे, मग जय होवो की पराभव..."

"सर्व त्या मराळ देवीची कृपा!" असे म्हणत मंदरदेवाने तलवार वर करून एकदां नमस्कार केला.

सर्वजण त्या झाडीत शिरले आणि तलवारी उपसून हल्ला करायला दबा धरून बसले. झाडीत शिरलेल्या स्त्रियांचा आवाज कोठेच आला नाही. "बहुतेक त्या आणखी खोल झाडीत गेल्या असाव्या!" मंदरदेव म्हणाला.

शिवदत्त होकारार्थी मान हलवीत म्हणाला–"एकदां जर का त्या चांच्यांना पळवून लावलं की नंतर त्या कोठे पळून गेल्या लपल्या आहेत हे कळणे तेवढे कठीण नाही."

समुद्रकेतू आपल्या अनुयायांसह झाडी-जवळ येऊ लागला. वज्रमुष्टी तेथे एक उंच झाड होते त्यावर सर-सर चढून गेला आणि खाली वांकून असलेल्या एका फांदीला चिकटून पडून राहिला.

समुद्रकेतू आपल्या अनुयायांसह त्या झाडाखाली येतांच "जय कालकेया!" असा जयघोष करीत त्याने त्यांच्या अंगा-वर उडी मारली.

त्याच वेळी "जय मराळी!" असा जयघोष करीत शिवदत्त व मंदरदेव आपल्या अनुयायांसह झाडांच्या आडून एकदम पुढे येऊन समुद्रकेतूच्यावर तुटून पडले.

क्षणभरच समुद्रकेतू त्या अचानक हल्ल्यामुळे थबकला. तेवढ्यात वज्रमुष्टीने समुद्रकेतूच्या अनुयायांपैकी एकाच्या हाता-तील तलवार हिसकावून घेतली आणि सिंह गर्जना करून समुद्रकेतूच्या दोघां अनुयायांची डोकी उडविली.

ते पाहून समुद्रकेतू क्षणभरच वचक-ल्यासारखा झाला. आपल्या अनुयायांना प्रोत्साहन देत त्याने "जय कालकेया!" असा जयघोष केला आणि शिवदत्ता-वर चालून गेला. त्या वेळी त्यांच्या अनुयायांपैकी काही जण मागे वळून पहात समुद्राच्या दिशेने पळून जाण्याचा विचार करू लागले.

इतक्यात तिथे सैनिक समुद्रकेतूच्या अनुयायांवर आणखी एका बाजूने येऊन तुटून पडले.

समुद्रकेतू तरी थोडादेखील कचरला नाही. तो शिवदत्तबरोबर दोन हात





करीत एकेक पाऊल मागे टाकीत आपल्या अनुयायांना सांगत होता–"पळू नका. थांबा शत्रूकडे फक्त आठजण तर आहेत! भिण्याचं कारण काय?"

ते ऐकून त्याचे अनुयायी मागे फिरले आणि धाडस करून शिवदत्ताच्या सैनिकांशी युद्ध करायला सरसावले.

चारपांच मिनिटे युद्ध जोराने झाले. वज्रमुष्टीलाच चौघांपांच जणांनी घेरले. परंतु त्या बहाद्दराने त्या सर्वांच्या तलवारी अडवून त्यांच्यापैकी काही जणांना आपल्या विजेसारख्या फिरणाऱ्या तलवारीने घायाळ केले.

जखमी झालेला एक शत्रू ओरडत मागे सरकताच त्याच्या जागी आणखी एक जण येऊन उभा राहिला.

ही चकमक फार वेळ चालणे शक्य नाही हे शिवदत्ताने ओळखले. तो त्याच्याहून वयाने लहान अशा समुद्रकेतूशी झटापट करीत असतां समुद्रातून किनाऱ्याला येणाऱ्या दोन्ही नौकांकडेसुद्धा एक नजर ठेवून होता. नौकांतून शत्रूचे आणखी काही अनुयायी आले तर स्वतःला व त्याच्या अनुयायांना सहजी घेरा घालतील हे त्याला ठाऊक होते. अशा परिस्थितीत आपण आपल्या अनुयायांसह पाय मागे घेण्यातच शहाणपण आहे, असे त्याने ठरविले. आतांपर्यंत त्या स्त्रिया जंगलांत बऱ्याच दूर व एखाद्या सुरक्षित जागी पोचल्याही असतील असे त्याला वाटले.

शिवदत्ताने एकदां जोराने जयघोष केला–"जय मराली" आणि आपल्या उजव्या पायाने समुद्रकेतूला जोराने लाथ मारली व तो खाली पडल्यावर उठेपर्यंत आपल्या अनुयायांना सावध करून झाडीत शिरला. ती सूचना ओळखून त्याचे अनुयायी सुद्धा मागे फिरले.

पापणी लवायच्या आत शिवदत्त व त्याचे सर्व अनुयायी झाडीच्या आडून पळून गेले. (क्रमशः)



# आश्रम धर्म

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, समाजात राजा महाराजांना जो मान व गौरव मिळतो तसाच वेदांती, तत्वज्ञानी व साधुसंन्यासी इत्यादिकांसही मिळतो परंतु समाजाच्या हितासंबंधी किंवा उन्नतीसंबंधी त्यांच्या विचारांत पुष्कळ भेद असतो. एवढेच नव्हे तर काही बाबतीत परस्पर विरुद्धही असतात. या मध्यरात्रीच्या वेळी इतके परिश्रम करून साध्य होणारे काम त्यांच्यापैकी कोणी तुझ्यावर टाकलं असावं अशी एक शंका माझ्या मनात येत आहे. तुला कंटाळा येऊ नये म्हणून मी सहजानंद याची गोष्ट सांगतो, लक्ष



देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्रवाळ देशातल्या प्रमुख नगरांपैकी एक अशा राजगिरी नगराबाहेर सहजानंद नांवाचे एक विद्वान आश्रम स्थापन करून रहात असत. त्यांच्या आश्रमांत पुष्कळ शिष्य राहून तत्वज्ञान, वेदांतशास्त्र इत्यादी विषयांचा सहजानंद यांच्याजवळ अभ्यासही करीत असत. सहजानंद ऐंशी वर्षांचे वृद्ध होते. आश्रमवास सुरू करण्यापूर्वी ते प्रवाळ देशाच्या राजघरातील लोकांना शिक्षण देणाऱ्या आचार्यांत प्रमुख आचार्य म्हणून काम करीत होते. प्रजा श्रद्धा व भक्तिपूर्वक त्यांचा आदर करी.

प्राकारपुर प्रवाळ देशाची राजधानी होती. नंदिकेश्वर राजा सामर्थ्यशाली होता. तो राज्यातील सर्व मुख्य शहरांत योग्य व शक्तिशाली अधिकारी नेमीत असे.

एकदा राजा नंदिकेश्वराच्या कानावर राजगिरीच्या अधिकाऱ्याविरुद्ध काही तक्रारी आल्या. तो अधिकारी अयोग्य असून त्याच्या अकर्तेपणामुळे राजगिरी व जवळपासच्या प्रदेशात अराजक माजले असल्याच्या तक्रारी प्रजेकडून दरबारात येऊ लागल्या होत्या. तेथे चालू असलेला अन्याय व अत्याचार यांस मूळकारण दुर्जय नावाची एक व्यक्ती होती. तो महाराणीच्या जवळच्या नातेवाइकांपैकी असल्यामुळे राणी साहेबांची त्याच्यावर मर्जी होती. म्हणून त्याला मार्गावर आणणे नगराच्या अधिकाऱ्याला शक्य होत नव्हते. शिवाय आपणच नगराचे मुख्य अधिकारी व्हावे, ही महत्वाकांक्षा मनात बाळगून दुर्जय त्यासाठी प्रयत्नही करीत होता.

राणी सरकारांच्या नातेवाईकांचा धिंगाणा राजापर्यंत पोचविल्यास महाराज कदाचित आपल्याच विरुद्ध उलटतील या भीतीने प्रधान म्हणाला—"महाराज, राजगिरीला आणखी एखादा नवा अधिकारी नेमणे आवश्यक असल्यासारखे वाटू लागले. त्या पदासाठी सर्व तऱ्हेने योग्य असा प्रताप नावाचा एक तरुण आपल्याच दरबारात आहे."

राजाने त्या गोष्टीस होकार दिला. प्रधान त्याच दिवशी प्रतापला बोलावून म्हणाला—"तुम्हांला महाराजांनी राजगिरीचा प्रधान अधिकारी म्हणून नेमले आहे. तरी तुम्ही तावडतोब जाऊन अधिकाराची सूत्रे हाती घ्यावीत."

प्रतापाचा प्रधानावर फार विश्वास होता व तो त्यांच्या शब्दाला फार मान देत असे. तरी ती नेमणूक त्याला फार मोठ्या कष्टाची वाटली. आपल्या सारख्या योग्य व समर्थ व्यक्तीला राजधानीतून काढून दूर कोपऱ्यातल्या एका शहराचा अधिकारी नेमण्यात प्रधानाचा काय हेतू असावा? त्यांच्या स्वतःच्या पदाला माझ्यामुळे धक्का पोचेल असे तर त्यांना वाटत नसेल? शिवाय आपण ज्या प्रदेशात जन्मलो वाढलो तरी राजाज्ञा मोडता येत नाही.

आवड नसूनही प्रताप राजगिरीला निघाला. त्याच्या रथाच्या मागेपुढे दहा दहा घोडेस्वारही होते. एके दिवशी रथ राजगिरीजवळ पोचत असतां एका झाडाखाली सहजानंद आपला पट्टशिष्य चिन्मय याच्याशी कसल्यातरी विषयावर विचार विनिमय करत असल्याचे दिसले. सहजानंदांच्या चेहऱ्यावर ब्रह्मतेज तळपत होते. आश्रमाचा परिसर कसा शांत व गंभीर होता. प्रतापच्या मनात वैराग्याचा संचार झाला.





प्रतापने रथातून उतरून आश्रमात पाऊल टाकले. सहजानंदांनी दुरून त्याला पाहिले व आपल्या शिष्यांबरोबर प्रताप होता त्या बाजूला गेले.

प्रतापने सहजानंदांना वांकून नमस्कार केला व म्हणाला—"माझे नाव प्रताप. मी आपली राजधानी प्राकारपूरहून येत आहे. महाराजांनी मला राजगिरीचा शासक म्हणून नेमले आहे. ते पद स्वीकारण्यापूर्वी आपले दर्शन घडले, हे माझे महद्भाग्य! हा आश्रम व येथील शांत व गंभीर वातावरण आणि या सर्वांहून आपले सान्निध्य हे सर्व पाहून मला कोणत्या शासकीय पदावर काम करण्याची इच्छाच उरली नाही. आपण अनुज्ञा दिलीत तर आपल्या शिष्यांतला एक म्हणून राहण्याची फार इच्छा आहे."

सहजानंदांनी क्षणभर प्रतापच्या चेहऱ्याकडे खोल दृष्टीने पाहिले व नंतर रागाऊन म्हणाले—"मी सर्वसंग परित्याग केला असला तरी मी संन्यासी नाही, लोक व्यवहाराला अनुसरून न्याय अन्याय, धर्म अधर्म इत्यादी विषयांवर मी निस्पृहपणे तात्विक विचार करतो. तुझ्याविषयी मला सर्व काही माहीत आहे. या लहान वयात इतके वैराग्य दर्शविण्याचे काहीच कारण नाही. म्हणून तुला आपला शिष्य म्हणून स्वीकारणे मला शक्य नाही."

ते ऐकून प्रतापने सहजानंदांना नमस्कार केला व काही एक प्रत्युत्तर न देतां रथात बसून निघून गेला.

नंतर दुर्जय आपल्या काही अनुचरांसह पालखीत बसून आला व आश्रमाजवळ पोचतांच पालखीतून उतरून सहजानंदांना नमस्कार करून म्हणाला—"या उन्हाळ्यात आपल्याला सोयीचे होईल म्हणून संगमरवरी दगडाचा सभामंडप आश्रमाच्या उद्यानात बांधण्यासाठी मजुरांना पाठविले होते. परंतु आपण नको म्हणालात. आपली एवढी सेवा करण्यासही मी योग्य नाही का?"

सहजानंद मंदहास्य करीत म्हणाला—"तू आपल्या सेवेची गोष्ट म्हणालास ते ठीकच झाले. परंतु माझ्यासारख्या विद्वानांचे संगमरवरी दगड आणि गाद्यागिद्या या सर्व उपभोगाच्या वस्तूंशी वैर आहे ही गोष्ट तुला माहीत नसेलसे वाटत नाही! माझी सेवा करणेच तुला जास्त महत्वाचे वाटत असेल तर तू आश्रमातच येऊन कां राहू नयेस?"

तो प्रश्न ऐकून दुर्जय दचकल्यासारखा होऊन म्हणाला—"गुरुदेव! मला गावातल्या कित्येक कामांबरोबर व्यवहार ही पहावे लागतात. सर्वदा मनात आपलेच ध्यान करीत असतो. अशा परिस्थितीत आश्रमात येऊन कायम राहणे आवश्यक नाही."

ते ऐकून सहजानंद रागाने म्हणाले—"दुर्जया! मी स्वतः होऊन तुला आश्रमात येऊन रहा, असे कित्येकदां म्हटले आहे. तरी तू, कां कोणास ठाऊक, मागेपुढे करतो आहेस. त्यावरून तुझ्या मनात मनसा, वाचा कर्मणा माझ्यावर गुरु भक्ती नाही हेच सिद्ध होते आहे, तू कोणत्यातरी लोभार्थ माझ्यावर गुरुभक्तीचे सोंग तर करीत नाहीस ना? अशी शंका माझ्या मनात येते आहे. कमीत कमी सहा महिने तरी आश्रमात येऊन तू कां राहू नयेस?"



दुर्जयने सहजानंदांना कधी राग आल्याचे त्यापूर्वी पाहिले नव्हते, म्हणून तो थरथर कांपत म्हणाला—"मी आश्रमांतच रहावे अशीच गुरुआज्ञा असेल तर मी या क्षणापासून आश्रमात रहायला तयार आहे."

सहजानंदांनी मनाचे समाधान झाल्यासारखी मान हलविली. त्यांचा पट्टशिष्य चिन्मय यालाच, आपल्या गुरुवर्यांना बुद्धिभ्रम तर झाला नाही ना अशी शंका आली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! चिन्मयला गुरुविषयी जी शंका वाटली? अगदी तशीच शंका माझ्याही मनात आली. स्वतः होऊन आश्रमात

राहण्याची इच्छा दर्शविलेल्या प्रतापाला आश्रमात राहण्यास एक अयोग्य व्यक्ती ठरवून परत पाठविणे, म्हणजे आश्चर्याची गोष्ट नाही का? त्याच वेळी राजगिरी नगरीत महादुष्ट म्हणून प्रसिद्ध असलेल्या दुर्जयला आश्रमात येऊन रहायला सहजानंदांनी सांगावे, ही गोष्ट आश्चर्य वाटण्यासारखी नाही का? सहजानंदांच्या या विचित्र वागणुकीचे कारण काय? या शंकेचे समाधानकारक उत्तर तू दिले नाहीस, तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"सहजानंदांच्या वागणुकीविषयी आश्चर्य करण्यासारखं काहीच नाही. ते एक विद्वान व तत्ववेत्ते होते व समाजाप्रत त्यांच्या कर्तव्या कर्तव्याची पूर्ण जाणीवही होती. नंदिकेश्वर राजाने राजगिरी अराजक स्थितीत असल्याचे कळल्यावर एक शासक म्हणून प्रतापला नेमून पाठविले हे ऐकतांच तो तरुण त्या पदास योग्यच असला पाहिजे हे सहजानंदांना सहजी कळण्यासारखेच होते. अशा व्यक्तीचे स्थान आश्रमात नाही, प्रजेमध्ये राहणेच त्याला योग्य आहे. आतां दुर्जयचे पाहू या. राजगिरीत अराजक माजण्यास तोच कारण होता. त्याला राणी सरकारांचा तो नातेवाईक आहे या गोष्टीचा गर्वही होता. अशा व्यक्तीला कमीत कमी सहा महीने तरी आश्रमात ठेवून घेतले तर प्रतापला दुर्जयच्या अनुयायांना काबूत आणणं शक्य होईल. त्यानंतर दुर्जयने आश्रमवास सोडला तरी अनुयायी नसल्यामुळे तो एकटा पडेल अशा परिस्थितीत त्याला काबूत ठेवणे प्रतापासारख्या समर्थ शासकाला तेवढे कठीण जाणार नाही. सहजानंदांनी या सर्व गोष्टींचा विचार करूनच प्रताप आणि दुर्जय यांच्याशी परस्परविरुद्ध वागणूक केली."

अशातऱ्हेने राजाचे मौनभंग होतांच वेताळ प्रेतासह अदृष्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.






शशांक नगराच्या आसपासच्या डोंगराळ भागात वीरेश नावाचा एक अट्टल चोर रहात होता. तो वाटमारी करी व प्रवाश्यांना लुबाडून तो खूप गब्रू झाला. मधून मधून गावातही शिरून दरोडे घाली.

एकदां वीरेशने आपल्या तिघा अनुयायांना गावात चोरी करायला पाठविले. एक आठवडा लोटल्यावर त्या तिघांपैकी एक जण परतला आणि त्याला फार दुःख झाल्यासारखा उभा राहिला.

वीरेशने त्याला विचारले–"असं काय रे झाले? बाकीचे दोघे कोठे आहेत? राजाच्या शिपायांच्या हाती कैद झाले की काय?"

"मालक, ते सांपडले ते राजाच्या शिपायांच्या हातात नाही; धर्मदेव नांवाचा एक देवपुरुष आहे, त्याच्या हातात." तो चोर म्हणाला.

वीरेश संतापून त्याला म्हणाला–"या काय गप्पा चालविल्या आहेस? काय झाले ते सर्व सविस्तर सांग."

"आम्ही तिघे गावभर फिरुन श्रीमंतांच्या घरांचा ठाव घेत फिरत संध्याकाळी एका धर्मशाळेत विश्रांतीसाठी येऊन रहात होतो. चार दिवसांपूर्वी धर्मशाळेच्या समोरच्या देवळातल्या मंडपात धर्मदेव नावाचा एक थोर महापुरुष येऊन राहू लागला असल्याचे आणि तो धर्मशास्त्र व पुराणातल्या धर्म व कर्तव्य परायणतेच्या कथा सांगत असल्याचे ऐकले. थोडीशी करमणूक होईल असा विचार करून आम्ही तिघेही इतर लोकांबरोबर त्याच्या प्रवचनाला हजर झालो. लागोपाठ दोन दिवस त्याचे प्रवचन ऐकल्यावर माझ्याबरोबरच्या दोघांच्या मनात एकदम पालट झाला. 'नको बाबा, हे पापकर्म! दुसऱ्याचा शाप डोक्यावर नको!'

असा विचार करून माझे दोघे साथी धर्मदेवाच्या शिष्यांत सामील झाले."

ते ऐकून वीरेश जास्तच भडकला. म्हणाला–"मग तुझा काय विचार आहे?"

"मला सुद्धा हे पापकर्म सोडून धर्माचरण करावे असेच वाटू लागले आहे. तरी तुम्हांला प्रथम सांगावे म्हणून आलो आहे."

"अस्सं!" असे म्हणत वीरेश मान हलवून पुढे म्हणाला–"आजची रात्र तू येथेच रहा. मी गावात जाऊन तो धर्मदेव कोण आहे, हे एकदा पाहून येतो."

त्या दिवशी रात्री वीरेश गावात गेला तेव्हां देवळाच्या सभामंडपात वीरेशचे पुराण प्रवचन चालू होते. लोक देहभान विसरून पुराण श्रवणांत निमग्न झाले होते.

वीरेशनेजवळ बसलेल्या एका वृद्ध माणसाला विचारले–"हे जो उपदेश करतात तो ऐकून सर्व श्रोते देहभान विसरून जातात त्याचे काय कारण असावे हो?"

तो वृद्ध म्हणाला–"ते एक थोर ज्ञानपुरुष आहेत!"

एका शब्दात तुम्ही महाज्ञानी म्हणालात. तेवढ्यात काय झाले हो? त्या मागे काही तरी गूढ असलेच पाहिजे!"

त्याचे ते अज्ञान पाहून तो वृद्ध थोडा चिडून म्हणाला–"त्याच्या हातात जो ताडपत्राचा ग्रंथ आहे, तेच ते गूढ आहे!"

चोराने विचार केला की तो ताडपत्राचा ग्रंथ जर चोरला तर तो ज्ञानी अज्ञानी होईल व आपले साथीदार आणि इतर श्रोते त्याचे प्रवचन ऐकायला बसणार नाहीत.

त्याने त्याप्रमाणे त्या रात्री धर्मदेव रहात होते त्या घरात शिरून तो ताडपत्राचा ग्रंथ चोरून नेला आणि आपल्या गुहेत निघून गेला. एका आठवड्यानंतर तो पुन्हां देवळाच्या सभामंडपाजवळ आला. धर्मदेवाच्या हातात ताडपत्राचा कोणताच ग्रंथ नव्हता आणि तरी त्यांचे प्रवचन चालू होते. लोक तन्मयतेने ते प्रवचन ऐकत होते. ते पाहून त्याचे अज्ञान दूर झाले. त्याने केलेल्या पापकर्माचा त्याला वीट आला. श्रोत्यांच्या मधून चालत जाऊन त्याने धर्मदेवांना साष्टांग नमस्कार केला.





# खिळ्याची किंमत

फार पूर्वी एका खेडेगावात गोविंद नावाचा एक तरुण युवक रहात असे. त्याचे लग्न झाले होते व त्याला दोन मुलेंही होती. त्याला स्वतःचा जमीनजुमला नव्हता म्हणून गोविंदला दिवसभर काबाडकष्ट करूनच आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चालविता येणे शक्य होत होते. त्यासाठी तो पायी शहरात जाई. दिवसभराच्या कमाईतून घरी आवश्यक असलेल्या वस्तू खरेदी करून संध्याकाळी परत येई.

तसा गोविंद स्वभावानेच मितव्ययी होता. त्याचे वडील त्याला लहानपणी सांगत–"बाळ, प्रत्येक वस्तु उपयोगी असते. कधीन कधी उपयोगी पडतेच! कधी विसरू नकोस!"

एके दिवशी तो हमरस्त्याने शहराकडे जात होता त्याला प्रधानाचा मुलगा घोड्यावर बसून घाईघाईने उलट दिशने येत असलेला दिसला. पाहातां पाहातां घोड्याच्या नालाला मारलेला एक खिळा निखळून खाली पडला.

गोविंदने तो पाहिला आणि मोठ्याने ओरडून त्याने नालाचा खिळा पडला असल्याचे सांगितले.

प्रधानाच्या मुलाने मागे वळून पाहिले. परंतु परतला नाही आणि बेपर्वाईने हात हलवून पुढे निघून गेला. नालाच्या एका खिळ्यासाठी मागे परतून येणे त्याला कमीपणाचे वाटले. शिवाय तो जंगलाच्या आडवाटे राजधानीकडे जात होता. म्हणून त्याला वाटत होते की खिळा नसला तरी त्यामुळे विशेष काही बिघडण्यासारखे नाही.

परंतु प्रधानाचा तो विचार चुकलाच. तो जंगलात थोडेच अंतर चालून गेला असेल की घोड्याच्या पायाचा नालच










निखळून पडला. जर प्रधानाच्या मुलाने वेळीच तो खिळा गोविंदकडून मागून घेऊन नालाला मारून घेतला असता तर त्याला नंतर जे कष्ट सहन करावे लागले ते लागले नसते. नाल नसल्यामुळे घोडा लंगडू लागला. म्हणून प्रधानाच्या मुलाला घोड्या-वरून उतरून घोड्याबरोबर पायी चालावे लागले. तो जंगलाच्या वाटेने जात असतां चोरांनी त्याला लुटले व त्याला एका झाडाला बांधून ठेवले.

तिकडे गोविंदने तो खिळा उचलून जवळ ठेवून घेतला आणि पुढे चालू लागला. तो थोडेच अंतर चालून गेला. तेवढ्यात त्याला एक गाडी उलटून पडलेली दिसली. गाडीच्या बाजूला एक श्रीमंत माणूस उभा होता. त्या श्रीमंत माणसाने गोविंदला पाहून विचारले—"कायरे बाबा, तुझ्याजवळ एखादा खिळा आहे का? मला लवकर शहरात जावयाचे आहे. वाटेत कोठे तरी गाडीच्या धुरीचा खिळा गळून पडला. या जंगलात लोखंडाचा एखादा तुकडाही दिसत नाही."

गोविंदाने आपल्या जवळचा खिळा चाकाच्या बाजूला धुरीत खुपसून दगडाने ठोकला. श्रीमंत माणसाला पुनर्जन्म झाल्या-सारखे वाटले.

"तू सुद्धा शहरातच चालला आहेस वाटतं? चल माझ्याबरोबर." असे म्हणत त्या श्रीमंत माणसाने गोविंदला आपल्या-बरोबर गाडीत बसवून घेतले आणि त्याच्या हातात एक मोहोर ठेवली.

सोन्याचे ते नाणे पाहून गोविंद चकितच झाला. त्या एका नाण्याने त्याच्या कुटुंबाचा एका महिन्याचा खर्च निघेल. बाबांनी पूर्वी जी गोष्ट सांगितली होती, ती खरी निघाली. एका लहानशा खिळ्याची किंमत म्हणून त्याला एक मोहोर मिळाली.

त्यानंतर बाजारात जाऊन गोविंदने आपल्या घरी न्यायला म्हणून महिन्या भराचे सामान विकत घेतले आणि पुन्हां जंगलाच्या वाटेने आपल्या गावी निघाला. थोडेच अंतर चालून गेला असेल, रस्त्याच्या



काठाला झाडांच्या आड त्याला कोणी तरी मोठमोठ्याने ओरडत असल्याचे ऐकू आले. गोविंदने त्याच्या हातातले पोते एका झुडपाआड लपवून ठेवले आणि आवाज आला त्या बाजूला झाडांच्या आड गेला. खूप खोल जंगलात गेल्यावर त्याला एक बाई आपल्या सहा मुलांबरोबर दिसली. ती एका कोट्याधिशाची बायको होती व ती मुलं तिचीच होती.

गोविंदला पाहून धीर करून ती बाई त्याला म्हणाली—"हे पहा रे बाळा, परवां संध्याकाळी मी आपल्या मुलांना घेऊन फिरायला निघाले. माझी मुलं फुलंफळं वेचायला जंगलात शिरली. मुलं कोठे तरी भटकतील म्हणून मी त्यांच्या पाठोपाठ धावले. तेवढ्यात सूर्यास्त झाला आम्ही वाट चुकलो. रात्रभर वाट शोधत भटकत राहिलो. कालचा संबंध दिवस सारं जंगल पालथं घातलं, तरी रस्ता मिळाला नाही. खायला प्यायला काही न मिळाल्याने आता पाय ही उचलवत नाहीत. म्हणून शेवटी येथे बसून ओरडतो आहो. परंतु या अरण्यात आमचं रडणं कोणाच्या कानी पडणार? तू कसा देवासारखा पावलास!

"तुम्हाला घाबरण्याचं मुळीच कारण नाही. चला मी दाखवितो वाट चला माझ्याबरोबर." गोविंद म्हणाला.



"बाबारे, भुकेने जीव कासावीस झाला आहे. एक पाऊलही टाकणे आम्हांला अशक्य आहे. काही खायला मिळेल का?"

"तर मग तुम्ही येथेच थांबा. मी खायला काही तरी घेऊन येतो." असे म्हणत गोविंद तेथून धावत निघून गेला आणि थोड्याच वेळाने आपले पोते घेऊन आला. गोविंद आपल्या मुलांसाठी म्हणून जो खाऊ, मिठाई वगैरे घेऊन आला होता, त्या सर्व वस्तू त्या पोत्यात होत्या. गोविंदने त्या सर्व वस्तू काढून मुलांना वाटल्या आणि बरोबर जे इतर खाद्य पदार्थ आणले होते ते काढून त्याने सैंपाक केला व सर्वांना पोटभर जेवायला वाढले. सर्वांच्या अंगात

पुन्हां हिंडण्या फिरण्याचा उत्साह चढला. त्यानंतर गोविंद त्या सर्वांना आपल्याबरोबर रस्त्यापर्यंत पोचवायला गेला. "आता तुमचा सर्वांचा निरोप ध्यावा, म्हणतो."

"छे! ते नाही चालायचे. आम्हांला घरापर्यंत पोंचवून मग कोठे ते जा." श्रीमंत कोट्याधिशाची बायको म्हणाली. गोविंदने त्याला ही होकार दिला. घरी पोचल्यावर कोट्याधिशाच्या बायकोने गोविंदच्या हातात एक लहानशी पिशवी ठेवली.

गोविंदने पिशवी उघडून पाहिली तीत आठ मोहोरा होत्या. त्या पाहून गोविंदचा डोळयांवर विश्वासच बसेना. एका नालाच्या खिळयाची किमत त्याला इतकी मोठी मिळणार आहे, या गोष्टीची त्याला स्वप्नात ही कल्पना नसावी. त्यानंतर तो पुन्हां शहरात जाऊन सामान विकत घेऊन जंगलाच्या वाटेने आपल्या गावी निघाला.

जंगलाच्या मध्यभागी पोचल्यावर त्याला कोणीतरी कण्हत असल्याचा आवाज ऐकू आला. तेव्हां गोविंद आवाजाच्या अनुरोधाने निघाला. झाडाला बांधून ठेवलेला प्रधानचा मुलगा त्याला दिसला.

प्रधानाच्या मुलाने प्रसंग गुजरला होता तो गोविंदला थोडक्यात सांगितला. गोविंदने प्रधानाच्या मुलाला सोडविले व हाताचा आधार देऊन आपल्या घरी नेले आणि त्याला पोटभर जेवायला वाढले.

त्यानंतर गोविंदने आपली ओळख सविस्तर दिली आणि म्हणाला–"मालक, नालाचा खिळा घालवून आपण नुकसान सहन केलेत व मी त्याच खिळयामुळे आपला स्वतःचा इतका फायदा करून घेऊ शकलो."

सर्व ऐकून घेतल्यावर मंत्र्याचा मुलगा गोविंदला म्हणाला–"गोविंद, तुझ्यासारखा माणूस सतत माझ्या रक्षणासाठी आवश्यक आहे. तू माझ्याबरोबर शहरात चल. तुला मी एक चांगलं घर देतो व त्या बरोबर चांगला पगारही देतो."

त्याच दिवशी गोविंद आपल्या कुटुंबियांसह राजधानीच्या गावी गेला आणि मंत्र्याच्या मुलाकडे नोकरी करू लागला.





# दुःखाचं मूळ लोभ

काशी येथे ब्रह्मदत्त नावाचा एक राजा राज्य करीत होता. त्याला दोन मुलगे होते. उतारवय झाले तेव्हां राजाने आपल्या थोरल्या मुलाचा राज्याभिषेक करून धाकट्याला सेनापती म्हणून नेमण्याचे ठरविले. अगदी राज्याभिषेकाच्या वेळी मोठा राजाला येऊन म्हणाला–"मला हे राज्य नको, धाकट्यालाच राज्य करू दे!"

तो काशीचे राज्य सोडून दूर एका सामंत राजाच्या राज्यात गेला. तेथे तो एका श्रीमंत माणसाच्या घरी नोकरी करू लागला. दिवसभर तो त्या श्रीमंताच्या घरात गड्याचे काम करी.

काही काळ लोटल्यावर काशीच्या राज्याचे काही अधिकारी जमिनीची मापे वगैरे घेत व त्यावरचा राज्य कर ठरवीत. त्या सामंत राजाच्या राज्यात ते येऊन पोंचले. त्यांनी त्या श्रीमंताच्या घरी काम करणाऱ्या युवराजाला पाहिले व त्याच्यावर आपली भक्ति व श्रद्धा दर्शविली. ते कळतांच त्या श्रीमंत माणसाने युवराजाकडे येऊन विनंती केली की "आपण आपला धाकटा भाऊ काशीचे महाराज यांना पत्र लिहून माझ्यावर लागणारा कर थोडा कमी करावा!" युवराजाने तसे पत्र लिहिले व काशीच्या राजाने कर कमी केला.

ही गोष्ट सर्वांस कळल्यावर गावातील अनेक लोक युवराजाकडे आले व त्यांच्यावरचा कर कमी करण्यासंबंधी राजाला लिहिण्यास विनंती करू लागले.

सर्वांच्या तर्फे युवराजने आपल्या धाकट्या भावाला पत्र लिहिले आणि सर्वांनी इच्छिल्याप्रमाणे जमिनीवरचा कर कमी करण्यास राजाने मंजूरी दिली.

पुढे तर राज्याच्या खजिन्यात भरावयाचे कर लोक युवराजाकडेच येऊन भरू लागले

जातक कथा



युवराजाने नको म्हटले तरी प्रजा त्यालाच येऊन कर देऊ लागली. त्यामुळे भावाच्या मनातले वैराग्य कमी होऊ लागले आणि राज्यप्राप्तीचा मोह वाढू लागला.

त्यानंतर तो एकेका सामंत राजाला आपल्याकडे वळवून घेऊन किंवा त्याला जिंकून आपली सत्ता वाढवू लागला. त्या गोष्टीची माहिती आपल्या धाकट्या भावालाही युवराज देऊ लागला. तरी धाकट्या भावाने मोठ्या भावाने जे केले त्याचा विरोध तर केलाच नाही, त्याला आपली मान्यताच दिली. शेवटी युवराजाच्या मनात काशीचे राज्यच हस्तगत करण्याचा मोह होऊ लागला. एके दिवशी त्याने आपल्या धाकट्या भावाकडे निरोप पाठविला–"तू आपले सर्व राज्य मुकाट्याने मला द्यावे, नाहीतर युद्धाला सिद्ध रहावे.

धाकट्या भावाने उत्तर पाठविले–"हे राज्य तर आपलेच आहे. आपल्याला वाटेल तेव्हां येऊन स्वीकारावे." त्यानंतर युवराजाने आपला राज्याभिषेक करवून घेतला व धाकटा भाऊ सेनापती झाला.

काशी राज्य मिळाले तरी तेवढ्यावर थोरल्या भावाच्या मनाचे समाधान झाले नाही. तो एकामागून एक लहान लहान राज्ये जिंकून राज्याचा विस्तार करू लागला. त्याच्या मनाचे समाधान झाले नाही.

देवेंद्र भूलोकांतील विविध राज्यांसंबंधी चर्चा करीत असतां काशी राज्याचा उल्लेख झाला, याविषयी दुर्लक्ष केले तर सर्व लोकांवरच संकट येण्याची शक्यता दिसली. म्हणून थोरल्याची कान उघाडणी केली पाहिजे असे देवेंद्राला वाटले.

तो संकल्प करून देवेंद्र एका तरुणाचे रूप घेऊन काशीला राजाच्या दर्शनासाठी आला. एक महत्वाची गोष्ट सांगून निघून जाणार असल्याचे त्याने सांगितले.

राजा त्याला आपल्या अंतःपुरात बोलावून घेऊन गेला.

"राजा! माझ्या माहितीप्रमाणे एका जागी तीन मोठी महानगरे आहेत. ती सर्व संपत्ती व वैभव युक्त अशी आहेत. गज, घोडे, रथ व पायदळ असे चतुरंग सैन्य त्यांच्याकडे आहे. मी ती तीन शहरे जिंकून तुला देतो." असे सांगून तरुणाच्या वेषात असलेल्या देवेंद्राने राजाला खूप प्रोत्साहन दिले. राजा लोभवश त्या गोष्टीस तयार झाला. तितक्यात देवेंद्र अंतर्धान पावला.

राजाने त्या तरुणाचा खूप शोध केला. परंतु तो सांपडला नाही. तेव्हां राजाला काही सुचेना. त्याने आपल्या सर्व प्रमुख अधिकाऱ्यांना बोलावून हुकूम दिला की आत्तां थोड्या वेळापूर्वी एका तरुणाने येऊन तीन महानगर जिंकून देण्याचे वचन मला दिले होते. तरी तुम्ही त्याला लवकर हुडकून काढा."

राजाच्या खास अंगरक्षकांनी व इतर अधिकाऱ्यांनी सैनिकांच्या मदतीने खूप शोध काढला, परंतु त्या तरुणाचा शोध लागला नाही. तेव्हां राजाला त्याला वेड तर लागले नाही असे वाटू लागले. त्याच मानसिक आजाराने राजा आजारी पडला. वैद्याने अनेक उपचार केले, परंतु सर्व निरुपयोगी ठरले.

त्याच वेळी समस्त शास्त्रांत प्राविण्य-संपादन करून बोधिसत्व तक्षशिलेहून काशीला परतले. त्यांना महाराजांच्या विचित्र आजाराची माहिती कळली. त्यांनी राजाकडे निरोप पाठविला की राजांचा आजार बरा करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी आहे. तरी एक संधी द्यावी.



राजाने बोधिसत्वांना राजवाड्यात बोलावून घेतले. 'बोधिसत्वांनी राजाला विचारले–"महाराज, आपल्या आजाराचे कारण काय?"

त्याचे उत्तर म्हणून राजाने त्याला एका तरुणाने तीन महानगर जिंकून देण्याचे जे वचन दिले होते ते सांगितले आणि म्हणाला–"त्या दिवसापासून माझ्या मनाला धक्का बसला आहे. ही व्याधी तुम्हांला दूर करतां आली तर प्रयत्न करून पहावा."

बोधिसत्वांनी राजाला विचारले–"समजा, आपण या आजारातून बरे झालात तर ती तीन महानगरे जिंकू शकाल का?"

"नाही, ते शक्य नाही!" राजा लगेच उत्तरला.

"तरमग त्या नगरांची फिकीर करीत बसण्यात काय अर्थ आहे? जगातली प्रत्येक वस्तू थोड्याच दिवसात पाहतां अदृश्य होते. म्हणजे ती क्षणभंगुर आहे, होय की नाही?" बोधिसत्वांनी विचारले.

राजा म्हणाला–"होय!"

"हेही तितकेच खरे आहे की प्रत्येक जीव धान्याला प्राण गेल्यावर हे जग सोडून जावे लागते. म्हणून हे राजा! तीनच काय तीस महानगरे जिंकली तरी आपल्याला जास्त सुख मिळणे शक्य नाही. या जगात कोणीतीही वस्तू किंवा प्राणी शाश्वत नाही. मोह नावाचे एक मोठे भूत आहे! लोभाला अंतच नसतो. कोणी माणूस लोभाला बळी पडतो तेव्हां त्याला मानसिक व्याधी होते. तिच्यापासून मुक्ती हवी असेल मनांतील आशा व आकांक्षा काबूत राखल्या पाहिजेत. चांभार जसा पायाचे माप पाहून चामडे कापतो तसेच आपल्याला इच्छा व कामना आपल्या उपयोगी पडतील तेवढ्याच वाढविल्या पाहिजेत." बोधिसत्व म्हणाले.बोधिसत्वांचा उपदेश ऐकून राजाच्या मनाला शांति मिळाली व त्याची मानसिक व्याधि नाहीशी झाली. त्यानंतर बोधिसत्वांनी राजाला उपदेश केला व आजीवन बोधिसत्वांच्या मार्गदर्शनाप्रमाणे तो राज्य-कारभार पाहू लागला.





## संत कबीर

वाराणसी, म्हणजे काशी नजीकच्या एका गावी नीरु व नीमा नावाचे एक मुसलमान विणकर जोडपे रहात असे. एका दिवशी तळ्याच्या काठी एका झाडाखाली नीरुला एक तान्हा मुलगा रडत असलेला दिसला. त्याने त्या मुलाला उचलून नेऊन आपल्या बायकोच्या हातात दिले.

त्या जोडप्याने त्या मुलाचे नाव कबीर-दास असे ठेवले आणि त्याला लाडात वाढविले. कबीरदास मोठा झाल्यावर आपल्या दत्तक पित्याचा धंदा करू लागला. तो मागावर विणायला बसू लागला आणि मनांत गीत रचना करीत गुणगुणू लागला.





त्या काळात काशी येथे एक विद्वान आचार्य रामानंद हे रहात होते. कबीर-दास त्या विद्वान आचार्यांचे शिष्यत्व लाभावे यासाठी प्रयत्नात होते. परंतु रामानंदजी आपणांस कदाचित आपला शिष्य म्हणून ग्रहण करणार नाहीत,



रामानंदजी दररोज पहाटे सूर्योदया-पूर्वी गंगास्नानास जात असत. एके दिवशी उठल्याबरोबर कबीरदास, रामानंदजी ज्या घाटावर स्नानाला जात त्या घाटाच्या एका पायरीवर जाऊन पडून राहिले. स्नान आटोपून परतते वेळी त्या काळोखात रामा-नंदजींचा पाय कबीरदासांच्या पाठीवर पडला. तेव्हां आचार्यांच्या तोंडातून 'राम' 'राम' असे शब्द बाहेर पडले.

लगेच कबीरदास उठून उभे राहिले आणि हात जोडून म्हणाले–"गुरुवर्य, आपण या ब्राह्म मुहूर्तावर गंगास्नान करून परतते वेळी दिव्य राम नामचा उपदेश-केला आहे." तेव्हां रामा-नंदजींनी कबीरदासांना विचारले–"तू कोण?" कबीरदास नम्रपणे म्हणाले–"माझे नाव कबीरदास आहे, आपला शिष्य आहे. माझा एवढाच परिचय पुरे!





त्यानंतर कबीरदासांनी भक्ति रसपूर्ण अनेक पदे रचली व ती लोकप्रिय झाली. त्याबरोबर त्यांनी या गोष्टी प्रचार सुरू केला की प्रभुला प्राप्त करण्यासाठी कर्मकांड सोडून भक्ति मार्ग स्वीकारला पाहिजे. त्यानंतर त्यांनी जातिभेद इत्यादींचे खंडन केले. त्या विरुद्ध कठोर शब्दात प्रचार सुरू केला.

कबीराचा हेवा करणाऱ्या काही लोकांनी अनेकांकडे खोटे निमंत्रण पाठविले की कबीराने त्यांना जेवायला बोलावले आहे. त्यावेळी कबीरदास घरी नव्हता. परंतु तो घरी परतला तेव्हां त्याला त्याच्याच सारख्या दिस-णाऱ्या कोणीतरी जेवायला वाढून निरोप दिला असल्याचे, कळले. कबी-राला आश्चर्य वाटले.





काही लोकांनी दिल्लीच्या सुलताना-कडे अशी फिर्याद केली की कबीरदास त्यांच्या धार्मिक विश्वासांची निंदा करतो. सुलतानाने कबीरदासाकडे त्या गोष्टीचा जाब विचारला तेव्हां कबीरदास म्हणाला–"मी हिंदु नाही की मुसलमानही नाही. हिंदु व मुसलमान असा भेदभाव न करणाऱ्या परमेश्वराचा मी भक्त आहे."

कबीरदासाचे ते उत्तर ऐकून एका अधिकाऱ्याने कबीराला धमकावले की, तुझे हे उत्तर तुझ्या जिवाला धोक्याचे आहे. तू आपले विचार बदल. परंतु कबीरदास म्हणाला–"हत्तीवर स्वारी करून फिरणारा कबीर कुत्रा भुंकली तर भिऊन जाणार का? ते ऐकून सर्व दरबारी चकित झाले व त्यांना कबिराचा थोडा धाकही बसला. परंतु





वार्धक्य काळी कबीराने गोरखपूर येथे आपला देह ठेवला. हिंदू त्याच्या भौतिक देहाचा अग्निसंकार करावा म्हणाले आणि मुसलमान त्यांच्या परंपरेप्रमाणे पुरायला निघाला. या एका बाबीवर हिंदुमुसलमानांचे भांडण सुरू झाले.

परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्याच्या मृत देहावरचे कफनचे कापड काढले तेव्हां देहाऐवजी कमळेच कमळे मिळाली, त्यांपैकी काही कमळे नेऊन हिंदूंनी काशीत एक स्मारक उभे केले तर उरलेली कमळे पुरून मुसलमानांनी कबर बांधली.





कबीरदास चौदव्या शतकाच्या शेवटी-पासून पंधराव्या शतकाच्या सुरवाती-पर्यंत जीवंत होते. त्यांची पदे आणि दोहे यांचा पुढल्या पिढ्यांवर फार परिणाम झाला. विशेष करून गुरुनानक मीराबाई व रईदास इत्यादींवर तो स्पष्टपणे दृष्टिगोचर होतो.



# समदृष्टी

मंगलपूरच्या जहागीरदारांचा धाकटा भाऊ विश्वनाथराजे याला दुसऱ्याची एक न एक चूक दाखवायची एक वाईट खोड होती. त्यातच त्याला आनंद होत असे. त्या संवयीमुळे तो लहानथोर याचा विचार न करतां वाटेल तसा अपमान करी. व त्यात आनंद माने.

मंगलपूरला दर वर्षी चैत्र पौर्णिमेला परमानंदस्वामी नावाचे एक साधू अवश्य येत असत. ते येण्याची बातमी मिळताच मंगलपूरच्या रहिवाश्यांनी एक मोठा रथ तयार करून सजविला व त्यांच्या स्वाग-ताला निघाले.

साधू परमानंद आनंदाने स्मित करून रथात जाऊन बसले. तेव्हां विश्वनाथ-राजे गर्दीतून पुढे सरकत गेला आणि थट्टा उडवीत म्हणाला—"सर्वसंग परित्याग कर-णाऱ्या साधूच्या मिरवणुकीसाठी रथाची गरज कां भासावी ?" त्यांना पायी चालत कां आणू नये.

ती थट्टा ऐकून इतर सर्व लोक खूप संतापले, परंतु परमानंद स्वामी म्हणाले—"तू म्हणतोस त्यात सत्याचा अंश थोडा आहे खरा तू आतां तरी रथात चढून माझ्या शेजारी येऊन बस." म्हणजे तुला हळू हळू समजू लागेल.

विश्वनाथराजे ते ऐकून खूष झाला, जणुकाही एका मोठ्या युद्धात विजय मिळ-वून आला होता. तो स्वामीच्या बाजूला मांडीला मांडी टेकून बसला. थोड्या वेळाने रथ एका मोठ्या वाड्यासमोर आला.

विश्वनाथराजे रथातून उतरताना म्हणाला—"काय पण गंमत आहे, जग हे माया आहे, असे म्हणणाऱ्या स्वामीसाठी उतरायला एका मोठ्या राजवाड्याची गरज भासावी, नाही का ?"



तेव्हां परमानंद स्वामी हंसून म्हणाले—"तू एक आठवडाभर माझ्याबरोबर राहिलास तर तुझ्या सर्व शंका दूर होतील." तेव्हां तू माझ्याबरोबर रहा.

विश्वनाथराजे त्या गोष्टीसही कबूल झाला परमानंद स्वामीने वाड्यात पाऊल टाकतांच एका रेशमी वस्त्राचा व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्याने एका चांदीच्या मोठ्या ताटात फुलांफळांबरोबर एक रेशमी वस्त्र आणून स्वामींच्या चरणांवर ठेवले आणि म्हणाला—"स्वामीजी, आपण कृपा करून याचा स्वीकार करावा!"

परमानंद म्हणाले—"छान, छान! फार आनंदाचीच गोष्ट आहे. तुझ्या इच्छेप्रमाणे मी याचा स्वीकार करतो. परंतु असेच एक रेशमी वस्त्र आणून विश्वनाथराजे यांनाही दिले पाहिजेस."

त्यानंतर स्वामी म्हणाले—"मी येथे जितके दिवस निवास करीन, तितके दिवस माझ्याशी जसे सर्व लोक वागाल तसेच विश्वनाथराजे यांच्या बरोबरही वागले पाहिजे."

त्या दिवसापासून विश्वनाथराजे यास स्वामीजींच्याबरोबरीने आदर सत्कार मिळू लागला. तिसऱ्या दिवशी रात्री स्वामीजी विश्वनाथराजे याला म्हणाले—"मी कोणत्याही गावी तीन दिवसाहून अधिक काळ रहात नाही. उद्यां मी दुसऱ्या गावी जाणार तुम्हीसुद्धा माझ्याबरोबर चला."

विश्वनाथराजे स्वामीजींबरोबर जायला तयार झाले. दुसऱ्या दिवशी सकाळी मंगलपूरची प्रजा स्वामीजींना रथात बसवून मिरवणुकीने गावच्या वेशीपर्यंत श्रद्धाभक्तिपूर्वक पोंचवून घरी परतली.

रथ परत निघून गेल्यावर परमानंद स्वामी विश्वनाथ राजे यांस म्हणाले—"हे पहा, आतां आपण त्या समोरच्या पाऊल वाटेने पायी चालायचे आहे म्हणजे संध्याकाळपर्यंत दुसऱ्या गांवी पोहोचू.





नंतर दोघे त्या पाऊल वाटेने चालू लागले. त्या पाऊल वाटेवर कांटे व खडे होते. म्हणून पायी चालणे थोडे कष्टाचे वाटत होते. विश्वनाथ राजे बरेच दमून गेले. शिवाय कडक उन्हाचा त्रासही त्यांना वाटू लागला. भूकही फार लागली होती. परंतु परमानंद स्वामी तर झपाझप पावले टाकीत जातच होते.

विश्वनाथ राजे यांना मुळीच चालवत नव्हते. ते स्वामीजींना म्हणाले—"स्वामीजी, मला फार तहान लागली आहे. माझा कंठ कोरडा झाला आहे. पाणी पाहिजे."

परमानंद स्वामीने रस्त्याच्या बाजूला एक तळे होते ते दाखविले व म्हणाले—"जाऊन पाणी पिऊन या!"

"ते पाणी तर घाण दिसत आहे! कालपर्यंत मी तहान लागल्याची गोष्ट बोलताच आपण फळांचा रस देत आलांत. ते विसरलांत का?" धापा टाकीत राजे म्हणाले.

"तसे नव्हे, परंतु येथे आपल्याला फळांचा रस देणारा कोणी नाही!" असे म्हणत परमानंदस्वामी तळ्यात उतरले आणि ओंजळ भरून पाणी पिऊ लागले. राजेसुद्धां पाणी पिऊन व आपली तहान भागवून काठावर येऊन काठावर बसले व म्हणाले—"स्वामीजी, आता पुढे चालण्याची माझ्या अंगात शक्ती नाही."

परमानंदस्वामी स्मित करून त्याच्या बाजूला जाऊन बसले. जवळ जवळ एका तासाने तेथून एक गाडी जात असलली दिसली. गाडीवाला नरसोबा स्वामीजींना पाहून खाली उतरला व प्रणाम करून म्हणाला—"स्वामीजी, बसा गाडीत व आमच्या गावी चला."

नरसोबाच्या आग्रहावरून स्वामीजी विश्वनाथराजांबरोबर गाडीत बसले आणि मध्यरात्रीच्या सुमारास एका गावी येऊन पोंचले. नरसोबाने गावातल्या धर्मशाळेसमोर गाडी उभी केली व म्हणाला—

"स्वामीजी, माझे घर अगदीच लहान आहे. आपल्याला उतरायला ही जागा जास्त सोयीची आहे."

म्हणून परमानंदस्वामी व विश्वनाथराजे नरसोबाने दिलेली पेज पिऊ लागले परंतु त्यांना ओकारी येत असल्यासारखे वाटले. म्हणाले—"यात मीठसुद्धा नाही की हो!"

त्यानंतर नरसोबा घरी जाऊ लागला. तेव्हां परमानंद त्याला जवळ बोलावून म्हणाले—"या मध्यरात्रीच्या वेळी तू पेज पाजून आमचा जीव वांचविलास. तुझे हे उपकार आम्ही कधी विसरणार नाही. ही रेशमी शाल घे. या शिवाय तुला द्यायला माझ्या जवळ दुसरे काही नाही." असे सांगून परमानंदांनी नरसोबाच्या हातात ती शाल दिली.

विश्वनाथराजे चकित होऊन म्हणाले—"मिठाशिवाय दिलेल्या पेजेबद्दल तुम्ही ही रेशमी शाल देतां? रेशमी शालीची किंमत किती असते याची कल्पनासुद्धा तुम्हांला नसतांना तुम्ही ती घंतलीतच कशाला?"

परमानंद स्मित करून म्हणाले—"मंगलपूरच्या लोकांनी प्रेमाने जे दिले ते मी घेतले. मी भगवी वस्त्रे वापरणारा, मला या रेशमी वस्त्राची गरजच काय? विश्वनाथराजे माणसाने सर्व वस्तू समदृष्टीने पहावयाची संवय लावून घ्यावी. प्रेमाने कोणी आपल्याला बोलाविले मग त्याने खीर प्यायला दिली तरी व पेज प्यायला दिली तरी माझ्या दृष्टीने दोन्हींचे मूल्य एकच. सुख समयी मला गर्व करण्याचे कारण नाही. त्याचप्रमाणे दुःख समयी हातावर हात धरून बसण्यातही अर्थ नाही. सर्व समयी लहान थोर, गरीब श्रीमंत सर्वांना मदत करणे हा मानवधर्म आहे."

तेव्हां विश्वनाथ राजे परमानंदस्वामींचे पाय धरून म्हणाला—"आपल्या मनाचा हा थोरपणा समजून न घेतां मी आपणांजवळ उर्मटपणाने बोललो आपण मला कृपा करून क्षमा करावी"



# सर्वच शूर

कुंतलदेशात राहणारा अजय नावाचा एक तरुण युवक कर्पूरदेशाची राजधानी इंद्रपुर येथे राहणाऱ्या विनय नावाच्या आपल्या मित्राकडे घोड्यावर बसून निघाला.

विनयने बऱ्याच दिवसांनी भेटलेल्या मित्राच्या आतिथ्यसत्कारात कोणत्याही प्रकारची उणीव राहू दिली नाही. संध्याकाळी गंमतीजमती पहायला दोघे मित्र आपापल्या घोड्यांवर बसून निघाले. काही अंतर चालून गेल्यावर विनयचा घोडा मागे पडला. अजय बढून मोठ्या गर्वाने म्हणाला—"आपल्या कुंतलदेशातले घोडे कसे चांगल्या जातीचे आहेत. किती वेगाने धावतो आहे माझा घोडा!"

विनय थोडा स्मित करून म्हणाला—"अरे बाबा, आम्हांला उच्च दर्जाचे घोडे हवेतच कशाला? रणांगणावर शत्रूशी युद्ध करीत असतां वेगाची गरजच काय? पाठ दाखवून पळून जाणाऱ्या शत्रूचा पाठलाग आम्ही करीत नाही! कारण आमच्या देशात सर्व शूरच शूर आहेत!"

मित्र म्हणाला ते विनोदाने घेत अजय थोडासा हंसला मात्र!





# सत्यनिष्ठ

गोपाळपूर नांवाच्या गावी निळोबा नावाचा दोन एकर जमिनीची मालकी असलेला एक शेतकरी रहात असे. त्याला एकुलती एकच मुलगी होती, सावित्री. तिला तो सावू म्हणे. लहानपणीच तिची आई गेली. परंतु बापाने तिला कसली ही उणीव भासू दिली नाही. आतां तिचे लग्नाचे वय झालं होतं. दहा पंधरा हजारांचा हुंडा दिल्या-शिवाय कोणी वर मिळण्याची आशा नव्हती. निळोबा कोठून तरी कर्ज काढण्याच्या हेतूनें शेजारच्या गावी गेले. सावू आपल्या एका मैत्रिणीला भेटायला म्हणून जवळच्याच दुसऱ्या एका गावी गेली.

ती काळोख पडू लागायच्या सुमारास भाड्याची गाडी करून घरी परतली. घरात वडील कोणाशी तरी भांडत असल्याचा मोठा आवाज तिला ऐकू आला. "तुम्ही वयाने मोठे म्हणून मी इतका वेळ नमत्या आवाजात बोललो. दुर्बुद्धी सोडून उद्या उजाडायच्या आत तुम्ही माझे पैसे परत केले नाहीत. तर पाटलाकडे फिर्याद केल्याशिवाय राहणार नाही." असे म्हणत पंचवीस एक वर्षांचा एक तरुण युवक बाहेर येऊन गल्लीत निघून गेला.

सावू घरात गेली आणि ती बापाला विचारू लागली–"काय हो बाबा, ही सर्व भानगड?"

निळोबा थोडेसे रागानेंच म्हणाले– "सर्व गोष्टी तुला सांगायला हव्यात का? आत जाऊन सैंपाकपाणी कायते पहा!"

कधी संतापून न बोललेल्या वडिलांचे शब्द ऐकून सावूच्या डोळ्यांना पाणी आले. अर्धा तास शांतपणे गेल्यावर नमत्या आवाजात निळोबा म्हणाला–"तुझं लग्न पुढल्याच महिन्यात बरं का! सर्व गोष्टी पसंत पडल्या दहा हजारांचा हुंडा दिला पाहिजे, असे आठवड्यापूर्वी सांगून गेले होते ना, तेच स्थळ ठरवायचा निश्चय करावा म्हणतो."

"पैसे कोठे मिळाले बाबा?" सावूने भीत विचारले.

"त्या भानगडी तुला कशाला हव्यात? लहान तोंडी मोठा घास!" निळोबा असे दरडावून सांगून खाटेवर आडवे झाले.

सावू सैंपाकघरातली कामे आवरून परतली तोंपर्यंत निळोबा घोरू लागले होते तिने वडील कपडे ठेवीत ती पेटी उघडून पाहिली. पेटीच्या तळाला एक चामड्याचे पाकीट दिसले ते भरून पैसे होते. वडिलांना आपल्या लग्नासाठी शेवटी चोरीसारखे नीच कर्म करावे लागले तर! हा विचार मनात येतांच तिचे मन बधिरच झाले. तिने ते पाकीट आपल्या उशाशी उशी खाली ठेवले आणि झोपली.

उजाडल्यावर निळोबाशी भांडण करून गेलेला तो तरुण युवक आला. तो आल्याबरोबर निळोबा त्याच्यावर ओरडले– "आतांपर्यंत मी शंभरवेळां सांगितले आहे. तुझ्या पैशाची गोष्ट मला माहीत नाही. तेव्हां आलास तसा चालू लाग."

तो तरुण युवक रागावून काही बोलणार इतक्यात सावू मध्ये बोलली–"कोणत्या तरी पैशांची गोष्ट काढून माझ्या बाबांना त्रास देणे बरोबर होईल का?"



"यात त्रास देण्याचा हेतू मुळीच नाही जे घडले ते मी सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून तो युवक सांगू लागला :

त्याचे नाव रघू होते. तो एका जव्हेऱ्यांच्या दुकानात कारकुनाचे काम करीत होता. एके दिवशी मालक दहा हजारांच्या नोटा एका चामड्याच्या पाकिटा मध्ये ठेवून व्यापाराच्या कामा निमित्ते बाहेर पडला, आणि एका तासाभरातच दुकानात घाबरल्यासारखा परतला वाटेत कोणी पाकीट मारलं होतं म्हणे. ते ऐकून मालकापेक्षा रघूलाच जास्त वाईट वाटले.

रघूचा थोरला भाऊ तालुक्याच्या गावी रहात असे. तो आजारी पडल्याचे कळल्या-



वर रघू त्याच दिवशी रात्री तालुक्याच्या गावी निघाला. वाटेत तलावाच्या काठाला लागून लहानशी झाडी होती. त्या झाडीतून जात असतां झाडा-आडून त्याला कोणी तरी बोलत असल्याचा भास झाला.

"हे पैसे आपल्यापैकी कोणा एकाला मिळाले तर कमीत कमी एक वर्षभर तरी चोरी करण्याची गरज उरणार नाही आणि सुखाने जगता येईल. तरमग एक काम करू या. आपण हे पाकीट येथे ठेवून देऊ या आणि सुखाने तलावाच्या काठाने शंभर पावले दूर जाऊ या. तेथून धावत येऊन जो प्रथम या पाकिटाला हात लावील त्याला या पर्समधले पैसे मिळतील.

दुसऱ्या चोराने त्या गोष्टीस होकार दिला. दोघांनी पर्स तेथे ठेवली व तलावाच्या काठाकाठाने शंभर पावले चालून गेले. रघूने ते गेल्याबरोबर जवळ येऊन पाकीट पाहिले व थक्कच झाला. ती पर्स त्याच्या मालकाचीच होती. रघूने चटदिशी पाकीट उचलून घेतले आणि पळू लागला. दुरून ते पाहून चोर त्याच्या पाठोपाठ धावले.

रघू बराच वेळ धांवत राहिल्यावर निळोबाच्या गावी येऊन पोहोचला. रस्त्यांवर अजून 'ये जा' सुरू झाली नव्हती. आपणाला चोरांनी धरले तरी मालकाचे पाकीट त्यांच्या हाती लागू द्यायचे नाही असे ठरवून गल्लीच्या बाजूला एका घराच्या ओटीवर बांबूचा तटचा बसवलेला होता त्याच्या पाठीमागे पाकीट टाकून दिले.

नंतर तो गाव पार करून आणखी काही वेळ पळत राहिल्यावर चांगले उजाडले. आतां काही उपयोग नाही, असा विचार करून चोर कोठे तरी निघून गेले. रघू तालुक्याच्या गावी गेला व वडील भावाची तब्येत थोडी सुधारल्याचे कळल्यावर निळोबांच्या गावी परत आला. आतां निळोबा त्या पाकिटाची गोष्ट त्यांना काही एक माहीत नसल्याचे बोलत होते.

सर्व ऐकून घेतल्यावर साबूच्या मनात रघूच्या स्वामिभक्तीबद्दल आदर वाढला



व ती आपल्या उशीखाली ठेवलेले पाकीट रघूला देण्याचा विचार करू लागली. परंतु तेवढ्यात निळोबा आडवे आले व म्हणाले– "ते पाकीट देऊ नकोस! हा म्हणतो आहे ती सर्व कपोलकल्पित गोष्ट आहे. मला ते पाकीट कसे मिळाले ते मी सांगतो. जरा ऐकून घे!"

त्याने आपल्या मुलीच्या लग्नासाठी पैसे मिळावे म्हणून एक दोन जागी प्रयत्न केला. परंतु त्यात यश मिळाले नाही, म्हणून निराश होऊन तो घरी परत यायला निघाला. त्यावेळी त्याला जिवाचा वीट आला होता. आपल्या एकुलत्या एका मुलीचे लग्न करण्याचेही सामर्थ्य आपल्यात असू नये तरमग जिवंत राहून तरी काय उपयोग? असा विचार करून रस्त्याच्या बाजूला एक पडकी जुनाट विहीर होती त्या बाजूला अडखळत चालू लागला.

निळोबाच्या थोडा मागून एक मध्यम वयाचा माणूस येत होता. त्याने निळोबाला अडखळत चालत असलेला पाहिले व घाईघाईने येऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला–"थांब, तू काहीतरी वेडेपणा करायला निघालेला दिसतो आहेस.

निळोबा डोळ्यात पाणी आणून म्हणाले– "आपल्या एकुलत्या एका मुलीचे लग्न करून देण्याचे सामर्थ्य नसलेला मी जगून तरी काय उपयोग?"

ते उत्तर ऐकून तो मनुष्य हसला व म्हणाला–"मला दहादहा मुलींचं लग्न





करून देण्याचं सामर्थ्य आहे, परंतु मला मुलीच नाहीत. हे पैसे माझे नाहीत, तरी तू घे. तू आपला पत्ता दिलास म्हणजे दरमहा तू सांगशील तितके हप्त्या हप्त्याने वसूल करीन." असे म्हणत त्याने निळोबाला एक पाकीट दिले.

"त्याचे नाव राजाराम होते. त्याने मला पाकीट दिले ते आडून पाहून हा रघू ते उडविण्याच्या प्रयत्नात आहे. तेव्हां सावू, याच्या बोलण्यावर मुळीच विश्वास करू नकोस. ही गोष्ट खरी की खोटी हे सांगायला तो राजाराम कोठे राहातो, माहीत नाही." निळोबा चिडून म्हणाले.

इतक्यात राजराम रस्त्यावरून उंबरठ्या जवळ आला व हंसत म्हणाला–"इतक्या काळोखातही मी हे घर ओळखले."

निळोबाने राजारामाची ओळख करून दिली. तिने घडलेला सर्व वृत्तांत त्याला सांगितला व म्हणाली–"हा गुंता आतां तुम्हीच सोडवा कसा!"

"ते काय मोठे काम झालं?" असे म्हणत राजारामाने घडलेला वृत्तांत सांगितला.

तो तालुक्याच्या गावी नातेवाइकांच्या घरी लग्नासाठी म्हणून सूर्योदय व्हायच्या थोडा आधीच निघाला. निळोबाच्या गावी येऊन त्यांच्या गल्लीत पाऊल टाकतांच पाऊस पडू लागला. आडोशाला म्हणून ओटीवर येतांच त्याला (राजारामाला) तट्टयाच्या बाजूला एक पाकीट दिसले. उघडून पाहिले तर आत खूप पैसे दिसले. दाराला कुलूप होते. घरातली मंडळी कोठे तरी जाण्याच्या घाईत असतां त्यांचे हे पाकीट देतां येईल, असा विचार करून पाऊस थांबताच तो पाकीट घेऊन निघाला. वाटेत एका जागी निळोबा एका पडक्या विहिरीकडे जात असलेले पाहून त्याने ते पाकीट त्यांना दिले. तेव्हां राजारामाला पिशवी मिळाली ते घर निळोबाचेच होते हे माहीत नव्हते. नंतर तो घरी गेला आणि पैसे घेऊन ज्या घरी त्याला ते पाकीट मिळाले होते त्यांना ती गोष्ट कळवून पाकिटात होते तेवढे पैसे त्यांना देण्याच्या हेतूने परत आला होता.

इतके सांगून राजाराम निळोबांना म्हणाला–"मी तुम्हांला दिलेले पाकीट रघूच्या मालकाचेच असावे. ते रघूला देऊन टाका. तुम्हांला लग्नकार्यासाठी हुंड्याला लागणारे दहा हजार रुपये मी देतो." असे सांगून रघूकडे सार्थक दृष्टीने पाहिले व म्हणाला–"तुमचा होणारा जांवई या मुला-सारखाच असेल का हो?"

"मुलीला पहायला येऊन गेलल्या मुला-विषयी जास्त खोलात जाऊन चवकशी करायला मला वेळ कोठे होता हो? आई-वडिलांनी दहा हजार हुंडा दिला पाहिजे, म्हटल्यावर नंदी बैलासारखी मान हलविली होती, एवढे खरे!" निळोबा म्हणाले.

राजारामाने या खेपेस रघूचा खांदा धरून हलवीत विचारले–"तुझ्या मालकाने 'गेलं सगळं' म्हणून हात झाडले होते ते पैसे तू परत मिळवून दिलेस. तू केलेली मेहनत आणि तुझा प्रामाणिकपणा मला फार आवडला. निळोबा व सावित्रीने माझं ऐकलं तर...! तुझं लग्न झालं का? नसेल झालं तर हुंडा किती मागशील?"

रघूने एकदा निळोबाकडे व एकदां सावित्रीकडे पाहिले. निळोबासुद्धा रघूकडे प्रेमाने पहात होते. सावित्री लाजेने मान खाली करून उभी होती.

"आपलं लग्न टळलं तरी चालेल, असा विचार करून पाकीट मला द्यायला तयार झालेल्या सावित्रीचा प्रामाणिकपणा मला आवडला. हुंड्यामुळेच इतक्या भानगडी झाल्या असतां मी पुन्हां हुंड्याच्या गोष्टी काढू म्हणतां?" रामू म्हणाला.

राजारामाने निळोबा व सावित्रीकडे पाहून व त्यांनाही आनंद झाला असल्याचे ओळखून म्हटले–"येत्या महिन्यातच लग्नाचा मुहूर्त धरू या. या घरी नाही, माझ्या घरी! मला मुलगी नाही, परंतु दहा मुलींचे लग्न करून द्यायचे सामर्थ्य मला आहे, हे मी निळोबाला मागेच सांगितलं होतं.'



# मूळ स्वभाव जाईना

एका गावी जग्गू नावाचा एक गवळी होता. रतिबाने दूध घेणारे मालक लोक कित्येकदां ओरडले व त्याला त्यांनी बजावले की दुधात पाणी घालू नकोस तरी त्याची ती खोड काही जाईना. शेवटी ग्रामप्रमुखांनी त्याची सर्व गुरे सोडली आणि त्यांना गावाबाहेर हांकून नेले.

जग्गू आणखी कोठे तरी राहून आयुष्य घालवायचे ठरवून डोंगराळ प्रदेशातून जात असतां त्याला एका तळ्याच्या काठी एक गुहा दिसली त्या गुहे बाहेर एक योगी दिसला. जग्गूने त्या योग्याला नमस्कार केला व आपली सर्व रडकथा सांगून म्हणाला–"स्वामी ! माझे आतां कोठे डोळे उघडले. मला एक गवळ्याच्या धंद्याव्यतिरिक्त दुसरे काही करतां येत नाही. तुमची कृपादृष्टी असावी."

योग्याला त्याची कीव आली. त्याने ते तळे जग्गूला दाखिवले व म्हणाला की हे तळे पाण्याऐवजी दुधाने भरेल."

जग्गुने योग्याला दोन्ही हाताने नमस्कार केला व म्हणाला–"या दुधाच्या तळ्या जवळच दोन पाण्याची तळी ही निर्माण करून द्यावीत, स्वामी !"





# विष्णुपुराण

क्षीर सागरात जो त्रिकूट पर्वत आहे, त्याला लोखंड, चांदी व सोन्याची तीन शिखरे आहेत. त्या शिखरांच्या मध्य भागावर फळांनी लदलदलेल्या वृक्षांचे एक मोठे अरण्य आहे. त्या अरण्यात गजेंद्र नावाचा एक मदोन्मत्त हत्ती आपल्या दशलक्ष कोटी हत्तिणींसह विहार करीत तहान भागविण्यासाठी त्या वनाच्या मध्य भागी असलेल्या सरोवराकडे निघाला.

तहान भागवून घेतल्यावर त्याला जल-क्रीडा करावेंसे वाटले आणि तो आपल्या हत्तिणींसह पाण्यात उतरला व जलक्रीडा करू लागला. तो देहभान विसरून जल-क्रीडेत लीन झाला असतां त्याचा उजवा पाय एका भयंकर मगरीने धरला.

असह्य वेदनेने विव्हळ होऊन तो हत्ती ओरडत असतां सर्व हत्तिणी घाबरून जाऊन किनाऱ्यावर गेल्या व गजेंद्रावर ओढवलेल्या महा भयंकर प्रसंगाकडे पाहून आक्रोश करीत रडत राहिल्या. मगरीच्या पकडीतून गजेंद्राला कसे सोडवायचे हे त्यांना कळेना.

गजेंद्राने स्वतः आपली सुटका करून घेण्यासाठी नाना प्रकारे आदळ आपट केली, परंतु सर्व फुकट. इतर हत्ती भूकतहान भागवायला इतर ठिकाणी जाऊन येत व किनाऱ्यावर उभे राहून डोळ्यांतून पाणी काढीत राहिले. सरोवरात हत्ती व मगरीची झुंज चालूच होती.

हत्ती मगरीला आपल्या सुळ्यांनी टोचीत होता. मगर उड्या मारमारून



हत्तीच्या अंगाचे लचके तोडी. हत्तीचे सर्वांग रक्तबंबाळ झाले.

हत्ती सोंडेने मगरीला आवळून धरी तर मगर आपल्या खडबडीत शेपटीने हत्तीला बडवून काढू लागली.

हत्तीने मगरीवर उभे राहून तिला पायाखाली चिरडून टाकायचा यत्न केला तर मगर खोल पाण्यात स्वतःचे अंग नेऊन हत्तीचे प्रयत्न निष्फळ करी. मगर सोडून गेली असे वाटून किनाऱ्यावर जाण्यासाठी धावे, तर तेवढ्यात मगर त्याचा पाय धरून नेऊन त्याला पाण्यात बुडवी. अशा तऱ्हेने हत्ती व मगरीचे द्वंद्व एकसहस्र वर्षे चालू होते.

गजेंद्राने स्वतःच्या शक्तीवर अवलंबून राहून किती शौर्याने लढत दिली हळूहळू त्याची शक्ती क्षीण होत गेली, मगर तर पाण्यातच राहणारी पाण्यात तिची शक्ती अपरंपार. हत्तीचं रक्त पिऊन पिऊन ती आणखी जास्त शक्तिशाली झाली. तिच्या तोंडातून आपली सुटका नाही, हे त्याला चांगले कळले.

"मी तहान भागवायला या सरोवरावर आलो होतो. पाणी प्याल्यावर परतून सरोवरात कां उतरलो? माझ्या या मूर्खपणामुळेच मी मगरीच्या तोंडात सांपडलो."

"माझं आतां कोण रक्षण करणार? कोणाला बोलवू? मी स्वतःचं रक्षण करू शकत नाही, तरी माझ्या मनात कोणत्यातरी कोपऱ्यात मी स्वतःला वाचवू शकेन अशी आशा मात्र आहे. त्या आशेमुळेच रक्षण व्हावे अशी आशा करतो आहे. तरमग आशेला काहीतरी आधार आहे, तो म्हणजेच देव! त्याला सांकडे घालतो!"

देव, भगवान, ईश्वर या भावनेचे मूळ अशा देवा! सर्व कारणांचं मूळ कारण असा तूच आहेस!"

माझ्या सारखे गर्विष्ठ, मंदमती व मदोन्मत्त त्यांच्यावर मोठे संकट येईपर्यंत तुझी आठवण काढीत नाहीत. निरुपाय झाल्याशिवाय तुझी गरज त्यांना वाटत



नाही. अशा तऱ्हेने अनेक प्रकारे स्वतःची निंदा करीत असतां मगरीच्या पकडीमुळे होत असलेली वेदना थोडी कमी झाल्यासारखी वाटली.

गजेंद्र देवाचे स्मरण करून स्वतःला दोष देऊ लागला त्या क्षणापासूनच मगरीचे सुळे लुळे पडू लागले, छातीत धडधड सुरू झाली. तरी जास्त चिडून जाऊन तिने हत्तीच्या पायाचा कडकडून चावा घेतला.

प्राण्यांवरचे संकट, वेदना व दुःख तू हरण करीत आलास! तू सर्वव्यापी आहेस! तेव्हां सर्व देवांच्या देवा! या जगाची सृष्टी करणाऱ्याची सृष्टी करणाऱ्या देवा! माझे रक्षण कर म्हणून मी जितक्या जोराने हांक मारीत आहे, तितक्याच वेगाने येऊन देवा तू माझं रक्षण करशील, असा माझा विश्वास आहे. तू नक्कीच रक्षण करू शकशील!

"तूच सर्वस्व आहेस हे वचन मनात चिरस्थायी असल्याची ओळख न होऊ देणाऱ्या देवा! माझ्यासारख्या दीनांपर्यंत पोचण्याची जबाबदारी तुझीच नाही का?"

"माझ्या अंगातली सर्व शक्ती नष्ट झाली आहे, डोळ्यातलं पाणीसुद्धा वाळून गेले आहे, तुझे स्मरण करून हांका मारण्याची शक्तीसुद्धा अंगात राहिली नाही.



कण्हण्याची शक्तीही राहिली नाही, शुद्धीसुद्धां जाणार!"

"माझं रक्षण कर किंवा करू नकोस, तुझी इच्छा! तुला सोडून मला दुसरा आधार नाही!" असे म्हणत गजेंद्राने उरलेली सर्व शक्ती एकवटून सोंड उंच करून हांक मारीत असल्यासारखे सरळ वर पाहिले.

मगरीच्या अंगातली शक्ती कमी होऊ लागल्यासारखी झाली जिभेत त्राण नसल्यासारखं व कंठातून स्वर उमटत नसल्यासारखं भासलं.

आपण जिवंत आहों की नाही अशा स्थितीत गजेंद्र डोळे मिटून पडला असतां



तो तसाच काही हालचाल न केल्यासारखा पडून राहिला.

तेव्हां विष्णु प्रगट झाला.

सर्व आकाश त्याच्या रूपांत एक भूत झालं तो एका अणूसारखा गजेंद्राला दिसला.

आल्याबरोबर विष्णूने आपले सुदर्शन चक्र सोडले आणि आपला अभयहस्त गजेन्द्राच्या दिशेने धरला.

सुदर्शन चक्र प्रचंड वेगाने गेले आणि मगरीचे डोके कापले गेले.

ती मगर म्हणजे मुळात एक गंधर्व होता. त्याचे नाव 'हुहू' असे होते. देवल नावाचे एक ऋषी पाण्यात उभे राहून सूर्याला अर्घ्य देत असतां त्या गंधर्वाने मगरीसारखं खोल पाण्यातून जाऊन ऋषीचा पाय धरला. त्या ऋषीने "मगरीसारखा पडून रहा!" असा त्याला शाप दिला. विष्णूच्या सुदर्शन चक्राने त्याचे डोके कापल्याबरोबर तो गंधर्व शापमुक्त झाला.

मगरीच्या पकडीतून सुटलेल्या गजेंद्राला धरून विष्णूने सरोवराबाहेर ओढले आणि त्याच्या गंडस्थलावर हात फिरविला. तो स्पर्श होतांच गजेंद्र अर्धमेल्या स्थितीतून पुन्हां पुर्नजन्म झाल्यासारखा उठला व त्याला पूर्वजन्माचे स्मरणही झाले.

गजेंद्र हा पूर्वजन्मी विष्णुभक्त इंद्रद्युम्न नावाचा राजा होता. विष्णूचे ध्यान करून तो ध्यानस्थ बसला असतां अगस्त्य ऋषी आले व त्याचे त्यांच्याकडे लक्ष गेले नाही. अगस्त्यांना राग आला आणि 'मदोन्मत्त हत्ती होऊन तू जन्माला ये' असा शाप त्यांनी दिला. त्याच राजाने गजेंद्र होऊन आतां मोक्ष प्राप्त केला.

गजेंद्र मोक्षाची ही कथा सूत मुनींनी नैमिषारण्यात जो सत्रयज्ञ झाला त्यावेळी शौनकादि मुनींना सांगितली.

मुनीकथा ऐकून सूत ऋषींना म्हणाले—"मुनींद्रा! गजेंद्र मोक्षाची ही कथा ही फक्त हत्तीपुरतीच दिसत नाही. तर सर्व जीवकोटीला, त्यांतल्या त्यात मुख्य करून मानवाला, अनेक बंधनातून व संकटांतून मुक्त होण्यास उदाहरण स्वरूप होऊ शकेल नाही का?"

सूत म्हणाला—"होय तर! गजेंद्र मोक्षाचा अंतरार्थही आहे! कोणीही कशाही तऱ्हेने त्याचा अन्वयार्थ लावून घ्यावा. काळ हा विष्णूच्या अधीन असतो. काल चक्रात कित्येक समस्या कष्ट व संकटे उत्पन्न होतात व नाहीशी होतात.

मुनी म्हणाले—"मुनिवर्य! गजेंद्र मोक्ष आख्यानकावरून कारण व कारक तो विष्णूच आहे, असा विष्णूच्या कथा ऐकाव्या असे मनाला वाटते आहे. तुझ्या समोर आम्ही लहान बालकांसारखे आहों. म्हणून विष्णूविषयी जे काही विशेष आहे ते आम्हांला सहजी कळेल अशा रीतीने तू सांगावे अशी आमची सर्वांची तुला हात जोडून विनंती आहे. व्यास मुनींच्या तोंडी सर्व अष्टादश पुराणे व इतिहास व त्यांतील विशेष अंश ऐकून तू एकटयाने समजून घेतला आहेस. तेव्हां विष्णु पुराणातील त्या कथा तू आम्हांला सांग."

सूत मुनींना ऋषी म्हणाले ते ऐकून आनंद झाला व म्हणाला—"ठीक तर ऐका. व्यास मुनींनी विष्णूच्या अनेक लीला व त्यांतील सर्व विशेष अर्थ महा भागवतात रचून ठेवला आहे व त्यांनी आपला मुलगा



शुक याला त्याचा उपदेश केला आहे. विष्णूच्या विषयी आख्याने ऐकून या भवसागरातून मुक्ती मिळावी या हेतूने परीक्षित राजाला त्या शुक मुनींनी सर्व कथा सांगितल्या. गजेंद्राचा मोक्ष करण्यासाठी विष्णूने जो अवतार धारण केला तो 'आदिमूळ अवतार!'

विष्णूने अनेक अवतार धारण केले. त्यांतील मुख्य असे दशावतार धारण नावाने ओळखले जाणारे दहा अवतार आहेत.

'नार' म्हणजे 'नीर' म्हणजे पाणी. पाण्याला मूळ कारण असा विष्णु 'नार' शब्दावरून 'नारायण' झाला. नारायणा-



तूनच 'नीर'ची सृष्टी झाली. विष्णूने जलचर म्हणजे मत्स्य रूपात अवतार धारण केला. तोच मत्स्यावतार! दशावतारात मत्स्यावतार हा प्रथम होय!

विष्णू पाण्याने भरलेल्या नील मेघा-सारखा निळ्या रंगाचा असतो. मेघात जशी वीज असते तसा विष्णू तेजस्वी असतो. त्यातून आलेले पाणीसुद्धा तेज:पुंज असते व त्याचा शुभ्र प्रकाश नित्य निर्मळ असतो. तेच पाणी धारणोदक क्षीरसागर होय!

त्या क्षीरसागरात अनंत असा काळ शेषनाग रूपे अनेक वलये करून राहातो. शेषनागाला सहस्त्रफण असतात. अंत नसलेल्या अशा अनंत शेषनागावर शेषशायी होऊन विष्णू पहुडला असतांना त्याच्या नाभीतून निघालेल्या नाळावर एक विशाल पद्म निघाले. त्यावर ब्रह्मदेव जन्मला. त्या ब्रह्मदेवाने सर्व सृष्टी केली.

अनंत अनंत असा काळ युगयुग चालू असतो. कृत, त्रेता, द्वापर व कली अशा चार युगांचे मिळून एक महायुग होते. सहस्त्र युगांचा एक कल्प हा ब्रह्मदेवाचा एक दिवस होय, तो दिवस पुरा झाला की ब्रह्मदेवाला झोप येते. तोच कल्पांत, तेव्हां सर्व सृष्टी अंधकारमय होऊन जाते. विष्णू-तून निघालेल्या संकर्षणाग्नीच्या तापाने सर्व जगत भस्मीभूत होते. प्रलय कालाचा वायु सुरू होतो व काळे ढग एकावर एक चढत येऊन सर्व आकाशात व्याप्त होतात आणि हत्तीच्या सोंडेसारखी जलधारांची वृष्टी होते. स्वर्ग, भूमी व पाताळ त्रिलोक महापुरात बुडून जातात. जिकडे पहावे तिकडें पाणीच पाणी दिसत असते. अशा तऱ्हेने प्रलय होतो. अशा तऱ्हेने ब्रह्मदेव झोपत असतां जी रात्र होते तीच प्रलय काळ! तीच कल्पांत जवळ येत असल्याची वेळ!

सत्यव्रत नावाचा राजर्षी नदीवर आंघोळ करून आणि नारायणाचे ध्यान धरून अर्घ्य देऊ लागला त्यावेळी त्याच्या ओंजळीत

सोनेरी रंगाचा एक छोटासा मासा आला. सत्यव्रत त्याला नदीत सोडायला निघाला तेव्हां तो चिटुकला मासा म्हणाला—"ए राजा! आमची माशांची जात चांगली नाही. मोठे मासे सर्व लहान माशांना खातात. त्यांच्या हातातून निसटलों तरी कोळी जाळयात पकडून आमचा जीव घेतात. म्हणून तुझ्या आश्रयाला मी तुझ्या ओंजळीत आलो. मला अशा निर्दयपणाने सोडू नकोस!"

सत्यव्रताने तो मासा आपल्या कमंडलात घालून राजधानीला गेला. सत्यव्रत महाराज राज्य करीत असतां तपश्चर्या करीत असल्यामुळे राजर्षी झाला. तो एक विष्णुभक्त होता व थोर ज्ञानीही होता.

कमंडलूत ठेवलेला चिटुकला मासा दुसऱ्या दिवशी खूप वाढला आणि कमंडलात उड्या मारीत सत्यव्रताला म्हणाला—"राजा, मला याच्यातून काढ व थोड्या मोठ्या जागेत पोंचव."

त्या माशाला राजाने उचलून एका हौदात पोंचविला. मासा काही वेळाने इतका मोठा झाला की त्याला जागचे हाल्लताही आले नाही. तेव्हां सत्यव्रताने त्याला एका लहानशा डबक्यात नेऊन सोडले. मासा वाढतच गेला. डबक्यातून सरोवरातून शेवटी त्याला समुद्रात पोंचवावे लागले, इतका तो वाढतच राहिला. तेथे पोंचल्यावर तो मासा राजाला म्हणाला—"ए राजर्षी! मी तुझ्या आश्रयाला आलो होतो आणि तू आतां मला समुद्रात टाकून देत आहेस का? हा काय न्याय झाला? मगरी व देवमासे मला गिळणार नाहीत का?" माशाने राजाला विचारले.

राजा सत्यव्रत त्याला म्हणाला—"अरे, मोठ्या मिशावाल्या माशा! याहून जास्त मी करण्यासारखं काय आहे, तूंच सांग! क्षणोक्षणी शत योजन वाढण्याची शक्ती असलेल्या तुला कोणीच गिळू शकणार नाही, होय की नाही?"

(क्रमशः)





# चार खुनी

फार पूर्वी चीन देशात एक श्रीमंत शिंपी रहात असे. तो एक आनंदी वृत्तीचा माणूस होता. तो कधीकधी आपल्या बायको बरोबर गांवभर गमतीजमती पहात हिंडे फिरे आणि आनंदाने आयुष्य घालवी.

एके दिवशी शिंपी आपल्या बायकोबरोबर नेहमीप्रमाणे सर्व शहरभर फिरून संध्याकाळी घरी परत येत असतां त्यांना एक खुजा दिसला. तो निरनिराळ्या तऱ्हेने हास्यविनोद करून आपल्या चारीबाजूला जमलेल्या लोकांना खूप हसवीत होता. शिंपी व त्याची बायको दोघेही त्या खुजाने केलेला हास्यविनोद पाहून पोट धरधरून हसले. त्यांनी त्या दिवशी रात्री त्याला आग्रह करून घरी बोलावून नेले.

त्या खुजाला आपल्या घरी आणल्यावर शिंपी दुकानात जाऊन भाजलेले मासे, पाव रोटी, लिंबे आणि शिरा विकत घेऊन आला. तिघे खायला बसले. खाणंपिणं हसत खेळत आनंदाने चालू होतं. शिंप्याच्या बायकोने गमती खातर एक माशाचा तुकडा उचलून खुजाच्या तोंडात कोंबला व त्याचे तोंड घट्ट आवळून धरले आणि म्हणाली—"तो तुकडा एकदम गिळला पाहिजे. फार कष्टाने त्या खुजाने तो माशाचा तुकडा गिळण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याच्या दुर्दैवाने त्या माशाच्या तुकड्यात कांट्यासारखं एक लांब हाड होतं. ते त्याच्या गळ्यात अडकलं आणि त्या खुजाने डोळे पांढरे केले. ते पाहून शिंपी घाबरला. "अरे अल्ला! याचा प्राण आमच्या हाताने गेला की! काय हे आमचं दुर्दैव!" तो आपले कपाळ बडवू लागला.

"रडून काय हो उपयोग? काय पुढे काय करायचे हा विचार नको का करायला?" शिंप्याची बायको त्याला म्हणाली.



"काय करावे, म्हणतेस ?" शिप्याने तिला विचारले.

"काही नाही, याच्यावर आपण एक चादर टाकू या आणि तू त्याला खांद्यावर उचलून घे." आपण दोघे आपल्या मुलाला आजार झाला असल्याचे सोंग करून हकिमाच्या शोधार्थ जाऊ या."

शिप्याने त्याप्रमाणे त्या खुजाच्या अंगावर एक चादर पांघरायला घातला आणि त्याला उचलून घेऊन रस्त्यावर आला. त्याची बायको पुढेपुढे चालत मोठमोठ्याने ओरडत होती—"अल्ला रे अल्ला ! देवी हो ! माझ्या मुलाला कोठून हा आजार आला ! कोण याला वांचविणार ? आहे का कोणी हकीम !"

दवींचं नाव ऐकूनच वाटेत लोक भेटत ते दूर दुरून चालत. शिप्याच्याजवळ कोणी येतच नव्हता. शिप्याची बायको त्यांना विचारी—"हकिमाचं घर कोठे आहे हो? कोणीकडून जायचं हो?" कोणीतरी त्यांना एका हकिमाचं घर दाखविले.

शिप्याने हकिमाच्या घराचं बाहेरचं दार जोरजोराने ठोठावले. एका निग्रो गुलाम दासीने येऊ दार उघडले. शिप्याची बायको तिला म्हणाली—"आमच्या मुलाला फार काहीतरी झालं आहे ग ! लवकर येऊन पहायला सांगतेस का हकीम साहेबांना ?" असे म्हणत तिने त्या गुलाम दासीच्या हातात एक चांदीचं नाणं ठेवलं.

ती गोष्ट कळवायला दासी मालकाकडे माडीवर गेलेली पाहून नवराबायकोने आत शिरून त्या खुजाचा मृतदेह जिन्यातच आणून ठेवला आणि तेथून पळ काढला.

तिकडे त्या दासीने हकिमाच्या हातात ते चांदीचं नाणं ठेवून कोणी रोग्याला घेऊन आला असल्याचं सांगितलं. ते नाणं पाहूनच हकिमाला आनंद झाला व तो घाईघाईने जिना उतरून खाली येऊ लागला. तो बरोबर दिवा घेऊन यायचं सुद्धा विसरला होता. म्हणून काळोखांत त्या खुजाच्या अंगावरच हकिमाचा पाय पडला. म्हणून तो मृतदेह जिन्यावरून



खाली घसरत येऊन आदळला. हकिमाने खाली येऊन पाहिले तर एक मृत देह !

आपल्याच हातून त्या गरिबाचा प्राण गेला, असे वाटून हकीम घाबरला. त्या प्रेताचं आता काय करायचं असा विचार करू लागला. त्याने आपल्या बेगमला जाऊन घडलेले वृत्त सांगितलं आणि तिचा सल्ला विचारला.

बेगम म्हणाली—"हे प्रेत आपल्या घरात राहता कामा नये. आपण हे प्रेत वर गच्चीवर घेऊन जाऊ शेजाऱ्याच्या परसात टाकू या. तो माणूस सुलतानाचा मोठा बावर्ची आहे. त्यांच्या घरभर उंदीर मांजरं व कुत्री आहेत. ती क्षणभरात सर्वप्रेत 'चट्ट' करून टाकतील. काय म्हणता ?"

ठरलं, दोघं नवराबायकोंनी मिळून ते प्रेत उचलून गच्चीवर नेले आणि शेजाऱ्याच्या परसात उभे करून भिंतीला लागून सोडले आणि आपली सुटका करून घेतली.

थोड्याच वेळाने शेजारचा बावर्ची रात्री घरी आला. त्याने मेणबत्ती पेटविली आणि चालू लागला. अकस्मात मेणबत्तीच्या उजेडात भिंतीला टेकून हालचाल न करता कोणी तरी उभा असल्याचं पाहिले.

त्याच्या घरातून खाद्य पदार्थ गेले काही दिवस नाहीसे होत होते. ती चोरी मांजरं किंवा कुत्री करीत असावीत अशी त्याची



समजूत होती तो—"ओहो ! म्हणजे चोरी करणारा माणूसच आहे तर ! शेजारच्या घरातून उतरून आला वाटतं." असा विचार करून त्याला बडवून काढायला एक जाडजूड दांडकं घेऊन आला. एक वार करतांच खुजाचे प्रेत खाली पडले. परंतु तेवढ्याने त्याच्या मनाचं समाधान झाले नाही म्हणून लागोपाठ पांच सहावार केले.

अरे, चोर ओरडत नाही, हालत नाही ! हे पाहून त्याने वांकून पाहिले तर प्रेत !

"अरे, खुजा, माझा जीव घेतलास की रे ! माझ्या घरी चोरी करून माझं नुकसान केलस ते तुला पुरलं नाही, म्हणून येथे जीवस दिलास का माझा जीव घ्यायला ?



अल्ला! तूच वांचव या गरिबाला आता!" असे म्हणत बावर्ची कपाळ फोडू लागला.

त्याने ते प्रेत खांद्यावर उचलून घेतले आणि दुकानासमोर नेऊन त्याच्यासमोर उभे करून ठेवले. नंतर तो तेथून निसटला तों पर्यंत बरीच रात्र लोटली होती.

थोड्यावेळाने सावकारीचा धंदा करणारा एक सावकार खूप पिऊन झिंगून आला आणि स्नान घर कोठे आहे हे पहात शोधत तेथे आला त्याने या खुजाला पाहिलं. तो कोणी चोर असावा अशी शंका त्याला आली. तो मोठ्याने ओरडला–"चोर चोर! पकडा!" त्याने प्रेताला ढकलून जमिनीवर पाडले व बुक्क्यांनी खूप बडवू लागला.

त्या झिंगलेल्या माणसाचा आवाज ऐकून अनेक पाहरेकरी तेथे धावत आले. आणि खाली पडलेल्या माणसाची हालचाल चालू नव्हती.

"तू खून केला आहेस. चल वली साहेबांकडे!" असे म्हणत पाहारेकऱ्यांनी खुजाचे प्रेत व खुजाला धरून कोतवाला कडे घेऊन गेले.

घडलेला प्रकार ऐकून कोतवालाने सावकाराला उजाडतांच फाशीची शिक्षा द्यायला आपल्या शिपायांना हुकूम केला.

उजाडल्याबरोबर व्यापाऱ्याला फाशीची शिक्षा देण्यात येणार असल्याची दवंडी गावभर पिटण्यात आली. फाशी देतात त्या जागी लोकांची गर्दी झाली. सावकाराला वधस्थानी नेऊन उभे करण्यात आले आणि त्याच्या गळ्यात शिपायांनी फांस देखील अडकविला.

इतक्यात सुलतानाच्या महालात स्वैपाक करणारा बावर्ची धावत आला व ओरडला– "थांबा, थांबा! त्या खुजाचा खून झाला तो माझ्या हातून!"

कोतवालाने त्याला विचारले–"तू त्याचा खून कां केलास?"

बावर्च्याने घडलेली गोष्ट सांगितली.

"या माणसाने स्वतःच आपला गुन्हा कबूल केला आहे. म्हणून त्या सावकाराला सोडा आणि याला फाशीवर चढवा!" असा हुकूम कोतवालाने केला.

इतक्यात हकीम साहब धावत आले व म्हणाले–"खरं पाहिलं तर खून माझ्या हातून घडला!" त्यांनी घडलेले वृत्त सांगितले. कोतवालाने हकिमाला फाशी द्यायला सांगितले.

शिपाई हकिमाला फाशी देणार इतक्यात शिंप्याने येऊन वास्तविक तोच खरा खुनी असल्याचे सांगून सर्वकथा सांगितली.

कोतवाल म्हणाला–"खरा खुनी आत्तां मिळाला. तर त्यालाच फाशीवर चढवा!"

परंतु या खेपेस ही एक विघ्न आले. हा खुजा सुलतानाच्या दरबारातला विदूषक होता. गेल्या रात्री तो कोठेतरी निघून गेला होता आणि परतला नाही. म्हणून सुलतानाने त्याच्या विषयी चवकशी करायला हुकूम काढला होता. खुजा मेला असल्याचे व त्याचा खून करणारा एका मागून एक चौघे जण 'मी केला' असे म्हणत असल्याचेही ही सुलतानाच्या कानावर गेले. तेव्हां सुलतानाने खुजाचे प्रेत आणि त्याचा खून केला म्हणून म्हणणाऱ्या चौघां जणांना हजर करावे, असा सुलतानाने कोतवालाकडे निरोप पाठविला.

सर्वजण सुलताना समोर हजर झाले. 'मी खून केला' म्हणून चौघां खुन्यांनी आपापली गोष्ट सांगितली. चौघे जण सांगत होते त्या गोष्टी एक न्हावी वैद्य ऐकत होता. तो खुजाच्या प्रेताजवळ गेला व त्याने प्रेताची जवळून परीक्षा करून पाहिली. व म्हणाला–"विदूषक खुजा अजून जिवंत आहे. त्याने खुजाचे तोंड बळजबरीने उघडले आणि घशात अडकलेले माशाचे हाड चिमट्याने धरून काढले. लगेच खुजा जोराने एकदां शिंकला आणि झोपेतून जागा झाल्या सारखा उठून उभा राहिला.

अशातऱ्हेने सर्वांच्या जिवावरचे संकट टळले, सुलतानाने न्हावी वैद्याला खूप इनाम दिले. नंतर सुलतानाकडून चार ही 'खुन्यांना' इनाम मिळाल्यावर सर्व आनंदाने आपापल्या घरी गेले.





# देवकरतोतेबऱ्यासाठी

सूर्यास्त झाला, अंधारून येऊं लागले, व विजेच्या कडकडाटात, पावसाचे टपोरे थेंब पडू लागले सुन्दरला जवळचे खेडे दिसत होते पण पावसाचा मारा वाढत होता. नोकरीच्या शोधात सुन्दरची पायपीट चालू होती. पावसापासून स्वत:चा बचाव करण्यासाठी सुन्दरची नजर आडोसा शोधू लागली. थोड्या अंतरावर त्याला एक मोडकळीस आलेल घर दिसले सुन्दरने पळतच त्या घरासमोरील ओसरी गांठली मुसळधार पाऊस कोसळत होता. काळोख वाढत होता, विजा चमकत होत्या. पाऊस थांबण्याचे चिन्ह दिसत नव्हते.

आतां काय करावे? असा विचार करीत सुन्दरने दरवाज्याकडे पाहिले दाराला एक अतिशय गंजलेले कुलूप लोंबत होते.

तेवढ्यांत पावसापासून स्वत:चा बचाव करण्यासाठी त्या घराच्या ओसरीच्या एका बाजूस उभ्या असलेल्या अठरा-वीस वर्षे वयाच्या मुलीस विजेच्या प्रकाशांत सुंदर दिसतच ती दचकली. तिला धीर देत सुंदर म्हणाला–"भिऊं नका, मी कुणी चोर-भामटा नव्हे. आधी भिजलेले डोके पुसून घ्या." म्हणत सुंदरने तिला आपले उपरणें दिले." एवढ्या पावसांत, अंधारात, एकटीने निघण्याचे कारण काय? आणि कुठे जाताहांत?" सुन्दरने तिला विचारले.

उपरण्याने केसांवरील पाणी टिपून घेत ती किंचित अडखळली, तिने विचार करीत क्षणभर सुंदरच्या चेहऱ्याकडे पाहिल्या सारखे केले व म्हणाली–"या शेजारच्या गांवी राहणाऱ्या आमच्या एका नातलगाची प्रकृती अस्वस्थ होती म्हणून भेटून येते आहे. बैलगाडी केली होती पण ऐन निघते वेळी पावसाच्या भीतीने गाडीवानाने गाडी जोडण्याचे नाकारले, म्हणून पायीच निघाले, गांव इथून अर्ध्या कोसावरच आहे, पण या पावसामुळे अडकून पडावे लागले आहे."

इतक्यांत त्या पडक्या घराच्या खिडकीतून एक घुबड फडफडत बाहेर पडले व तिच्या डोक्यावरून पलीकडे गेले. भीतीने तिने किंकाळी फोडली.

सुन्दर हसत म्हणाला–"भर पावसांत एकटी येण्याचे साहस केलत म्हणून फार धैर्यवान असाल असे वाटले होते."

किंचित ओशाळून ती म्हणाली–"मला चोरांचे, अंधाराचे, सर्पांचे भय वाटत नाही पण भुता-खेतांची अतिशय भीती वाटते जुन्या पडक्या घरांतून भुतें राहतात, म्हणतात ना?" बोलतांना तिने आपले नांव-शिल्पा असल्याचे सांगितले.

थोडावेळ विचार करून सुन्दर म्हणाला–"शिल्पा! मला तरी वाटते की आपल्या अवती-भवती असणाऱ्या माणसांत भुताला लाजवणारे लोक असतात. आतां हेच बघ, माझे वडील वारल्यानंतर–"आम्ही तुमचे हितसंबंधी आहोत–"असे म्हणत कितीतरी लोकांनी मला नाना प्रकारे बनवून आमचा असलेला थोडा जमीन-जुमला लुबाडला मी पोट भरण्यासाठी नोकरी शोधत गांवो-गांव भटकत आहे. म्हणून म्हणतो की भुतांपेक्षा माणसेच भयंकर असतात."



"जाऊ द्या, रात्री भुतां-खेतांचा विषयच नको बाई!" शिल्पा म्हणाली.

पाऊस थांबण्याचे लक्षण दिसत नाहीसे बघून "आतां आपल्याला आजची रात्र या घरांत काढण्यावाचून गत्यंतर नाही." असे म्हणत सुंदरने त्या गंजून गेलेल्या कुलुपास हिसका दिला कुलूप निखळून हाती आले व त्याच क्षणीं त्या घरांतून–"कोण आहे ते? मी भूत आहे, खबरदार! आंत पाऊल टाकू नका!" असा भेसूर आवाज आला.

शिल्पा भीतीने थर-थर कांपू लागली. तिने सुंदरचा हात घट्ट पकडला व हळू आवाजांत ती कुजबुजली–"पाऊस असू द्या, चला आपण इथून पळून जाऊं या!"

श्री माधव स. नरवणे



तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां सुंदरने त्या मोडकळीस आलेल्या दारावर एक लाथ हाणली, ते मोडून पडले.

सुन्दर अंधारात बघत म्हणाला—"आम्हीं माणसें आहोत, भुतांना भीक न घालणारी माणसं!" व असे म्हणत तो आंत शिरला.

खोलीच्या मध्यभागी एक म्हातारे भूत बसले होते. सुन्दर आणि शिल्पाकडे बघत ते म्हणाले—"केवढा हा धीटपणा! केवढी तुमची हिम्मत! तुम्हाला उभ्या-उभ्या चिरून काढीन!"

"ते नंतर बघतां येईल, पण आधी हे सांग की या मोडक्या-तोडक्या घराची तूं रखवाली करतो आहेस का?" सुन्दरने टर उडविण्याच्या आवाजांत त्यास विचारले. हे ऐकताच रडका सूर काढीत ते म्हातारे भूत म्हणाले—"छे! या पडक्या घराबद्दल मला अतिशय घृणा आहे! माझी बायको व मुलें मला पैश्यांसाठी नानाप्रकारे त्रास देत होती, पण तूंच सांग, पैसा कमवायचा तो काय उधळण्यासाठी? मी त्यांची डाळशिजूं देत नसे. आतां मी इथे या पडक्या खोपटांसाठी रहात नसून इथे लपवून ठेवलेल्या द्रव्यासाठी रहात आहे."

सुन्दर हेटाळणीच्या सुरांत त्या म्हाताऱ्या भुताला म्हणाला—"बायका पोरे आणि तू सुद्धा त्या कमावलेल्या पैश्यांचा अनुभव न घेतां मेलांत आणि आतां कुत्र्यासारखा त्या धनाची रखवाली करतो आहेस!"

सुंदरचे हे बोलणे ऐकून ते म्हातारे भूत विचारांत पडले. वर्षानुवर्षे त्या खोलींत रखवाली करीत बसण्याचा त्यास वैताग आला होता. खोलींत एके जागी खणून, एक पेटी बाहेर काढून त्याचे झाकण उघडून ते सुंदरला म्हणाले—"तू हा सगळा पैसा घेऊन टाक. माझ्या मागचा हा रखवालीचा ताप चुकेल."

सुंदरने त्या पेटीतील कांही नाणीं हातांत घेऊन निरखून बघत म्हटले—"तुला मरून बराच काळ लोटला. ही तांब्याची कांस्याची नाणीं आतां चालत नाहीत."

"काय! चालत नाहीत?" असे म्हणत ते भूत जोराने ओरडले व दुसऱ्याच क्षणीं त्यास घुबडाचा आकार आला व पेटींतील पैश्यांवरून एक घिरटी घेत ते जोराने किंचाळत घराबाहेर उडाले.

सुंदरने ती पेटी भुताने खणलेल्या खड्यांत ढकलली व वरून माती लोटून हात झटकत शिल्पाकडे पाहिले.

ती आश्चर्याने म्हणाली—"खरंच तुम्ही किती धैर्यवान आहांत हो!"

"माझे धैर्य असूं दे, पण आतां ही रात्र या खोपटांत घालविण्या वाचून मार्ग नाही." सुन्दर म्हणाला.



दोघांनी मिळून खोली थोडी साफ-सूफ केली व ते झोपी गेले. सकाळी उठून सुन्दरने पाहिले, शिल्पा बाहेर ओसरींत उभी राहून रात्रीच्या वादळांत तुटून पडलेली झाडें बघत उभी होती. बाहेर येत सुन्दर म्हणाला—"फारच मोठे वादळ होते रात्रीचे. आपल्याला भुताचे हे खोपटे मिळाले हे सुदैवच."

"तुम्हाला अजून एक सुदैवाची गोष्ट सांगते ती ही की बाबांना सांगून तुम्हाला कुठेतरी नोकरी मिळवून देईन त्यासाठी मी त्यांना एक काल्पनिक घटना सांगेन की रात्री कांही चोरांनी माझे दागिनें लुटण्याचा प्रयत्न केला पण तुम्ही त्यांतून मला वांचविले आहे." शिल्पा म्हणाली. सुंदर मान डोलवून गप्प राहिला. उजाडल्यावर चालत शिल्पाच्या गांवी पोंचेपर्यंत उन्हं बरीच वर आली होती. शिल्पाचा प्रशस्त वाडा, फळझाडें, फुलझाडें बघून सुंदरने ओळखले की हे लोक खूप श्रीमंत आहेत.

इतक्यांत शिल्पाचे वडील तिथे आले. शिल्पाला बघून ते आनंदाने म्हणाले—"सुखरूप आलीस ना बेटा! काल रात्री तूं आली नाहीस म्हणून काळजीने मला रात्रभर झोप आली नाही."

शिल्पाने वडिलांना सुन्दरची ओळख करून देत, स्वतःच्या कल्पनेंने चोरीची










गोष्ट सांगून; "बाबा! यांनी केलेल्या मदतीची परत-फेड म्हणून यांना एखादी नोकरी लावून द्याना!" असे म्हणाली.

"नोकरी? हात्तिच्या! अग नोकरी लावून लावून देऊन हे ऋण फिटेल का?" असे म्हणत त्यांनी सुंदरला दोन्ही हातांनी जवळ घेतले.

सुंदर त्यांना म्हणाला, "क्षमा असावी, आपल्या मुलीने जे सांगीतले ते खरे नाही, मी चोरांपासून त्यांचे रक्षण केलेले नाही. मी बेकार असलो म्हणून काय झाले? खोटे बोलून नोकरी मिळवणें मला पटत नाही.

त्यांनी आपल्या मुलीकडे गोंधळून पाहिले; तिने हसून घडलेला सर्व वृत्तान्त सांगितला व हळूच वडिलांना म्हणाली; "तुम्ही सध्या माझ्यासाठी स्थळ पाहताय ना बाबा! हे मला आवडले, तरी, माणसाचे अंतरंग कसे आहे हे जाणून घेण्यासाठी मी खोटी कहाणी रचून सांगण्याचे हे नाटक केले. खोटे बोलून मिळणारी नोकरी नाकारण्यात त्यांची सत्यप्रियता दिसून येते."

शिल्पाच्या वडिलांनी एकवार सुंदरकडे बघितले व ते आपल्या पत्नीला बोलविण्या-साठी आत गेले.

सुन्दर शिल्पाला म्हणाला, "मी तुमच्या वैभवास साजेसा नाही. तरी निर्णय घेण्याआधीं पुन्हा विचार कर!"

शिल्पा कृत्रिम कोपाने म्हणाली, "आतां तोला-मोलाच्या गोष्टी, कृपा करून बोलूं नका, मला तुमचे धैर्य, नीतिमत्ता आणि खरेपणा हे गुण आवडले आहेत हो! मी जर तुम्हाला पसंत नसेन तर मात्र सांगा,"

"जे होते ते बऱ्याचसाठी! मला जमीन-जुमला नसून, नोकरी साठी फिरावे लागले हे बरेच झाले. नाहीतर तुझ्यासारखी पत्नी मला लाभली असती का?" सुंदर म्हणाला.

शिल्पाच्या आई-वडिलांनी या दोघांचे हे बोलणें ऐकले-त्यांना- अतिशय आनंद झाला.






[१६]

[समुद्र किनाऱ्या कडून गोंगाट ऐकू आला तो कसला हे पहायला निघालेल्या शिवदत्ताला व त्याच्या अनुयायांना समुद्रात चांचेगिरी करणारा समुद्रकेतु दिसला. त्याच्या जहाजांतून निसटून एका होडक्यातुन किनाऱ्याकडे येत असलेल्या दोघी स्त्रिया किनाऱ्यावर उतरून जंगलात पळाल्या त्यांचा पाटलाग करणाऱ्या समुद्रकेतूला शिवदत्ताने अडविलें. पुढे–]

शिवदत्त आपल्या अनुयायांसह झाडीत पळून जातात न जातात तेवढ्यात किनाऱ्यावर दोन पडाव आले व त्यांतून काही चांचे किनाऱ्यावर उतरले. समुद्रकेतू बराच दमला होता. तो आपली तलवार किनाऱ्यावरच्या वाळूत खुपसूत ठेवीत ओरडला–"अरे, पहा रे, ते सगळे झाडीत शिरून लपले आहेत. तुम्ही सर्व इतका वेळ काय करीत होता रे?" या शब्दात त्याने आपल्या अनुयायांवर आपला राग काढला. नंतर त्या स्त्रिया पळून गेल्या होत्या त्या बाजूला बोट दाखवून म्हणाला–"फक्त वीस जणच येथे रहा आणि बाकीचे सगळे त्या दोघी पिशाचिणींना धरून घेऊन या!"

लगेच चांचे जंगलात खोल त्या स्त्रियांच्या शोधार्थ शिरले. समुद्रकेतूची ती आज्ञा झाडाआडून शिवदत्ताने ऐकली. झाडीच्या



आडून तो जे काही चालले होते ते सर्व पहात व ऐकत होता.

"शिवदत्ता, आतां आपण काय करायचे रे? आपण गुपचुप पहात राहालो तर त्या दोघी स्त्रिया या समुद्री चोरांच्या हाती सापडणार!" मंदरदेव म्हणाला.

शिवदत्त निरुपाय झाल्यासारखा मान हलवून म्हणाला–"प्रस्तुत परिस्थिति आपण करण्यासारखे काहीच नाही. आपण फक्त आठ जण आहों आणि ते पन्नास एक तरी असतील. त्यांना समोरासमोर आव्हान केले तर ते आपली सर्वांची कत्तल करतील. आपल्याला मारून टाकतील. आतांपर्यंत त्या दोघी खोल आत कोठे तरी सुरक्षित जागी पोचल्याही असतील.

अर्धा एक तास गेला असेल सर्व जंगलाचा भाग चोरांच्या आरोळ्या व गोंगाटामुळे दुमदुमत होता. थोड्या वेळाने ते समुद्रकेतू होता, तिकडे आले व म्हणाले–"ती म्हातारी नाही, मालक! त्या म्हातारीला नाही पण हिला मात्र पकडून घेऊन आलो!" त्यांच्या बरोबर एक अत्यंत तरुण स्त्री होती. तिला आणून त्यांनी तिला आपल्या नायकासमोर उभे केले.

"हाः हाः हाः हाः!" असा मोठ्याने हसत समुद्रकेतू म्हणाला–"आपल्याला पैसे मिळवून देणारी ती हीच तर आहे, ती म्हातारी फुकटाची खात आली तो आपल्याला भुरदंडच होता. तर चढा पडावांत!" नंतर मागे वळून पहात म्हणाला–"बरं तरं, तुम्हाला हे कोणी नवे लोक दिसले त्यांचा चेहरामोहोरा लक्षात राहील ना तुमच्या? हा प्रदेशही तुम्ही विसरूं नका. संधी मिळेल तेव्हां त्या सगळ्यांची शिकार साधली पाहिजे!"

समुद्रकेतूचे तिन्ही पडाव समुद्रात निघाले. शिवदत्त त्या पडावांकडे काही वेळ पहात राहिल्यावर म्हणाला–"तूर्त आपण यांच्याविषयी विचार करण्यासारखं काही नाही. चला, खाणंपिणं उरकून घेऊ या!" त्याच वेळी त्यांना थोड्या अंतरावर एक स्त्री रडत असल्याचा आवाज ऐकू आला.

शिवदत्त चकित होऊन मंदरदेवाकडे एकदा पाहून तो आवाज आला त्या दिशेने चालू लागला. त्याचे सर्व अनुयायी त्याच्या पाठोपाठ निघाले.

शिवदत्त आपल्या अनुयायांबरोबर ती स्त्री होती तेथपर्यंत थोड्याच वेळात पोंचला, ती कोणी अगदी नवीन बाई नव्हती. समुद्रकेतूच्या पडावातून उतरून काठावर पळून आलेल्या दोघां स्त्रियां पैकी वृद्ध स्त्री होती. शिवदत्त तिच्या जवळ गेला आणि त्याने तिला विचारले–"बाई, कोण तुम्ही? तुमचं नाव काय? तुम्ही कोठल्या राहणाऱ्या?"

ती स्त्री शिवदत्ताने विचारले ते ऐकून दचकून शिवदत्ताकडे आश्चर्यचकित मुद्रेने पाहू लागली. तिच्या चेहऱ्यावर भीतीच होती. शिवदत्त ते ओळखून म्हणाला–"बाई, तुम्हांला आमच्या पासून काहीच त्रास होणार नाही. तुम्ही आणखी एका तरुण स्त्री बरोबर समुद्रगुप्ताच्या नावेतून उतरून पळून येत असतां आम्ही तुम्हांला पाहिलं होते. माझे अनुयायी फक्त आठच जण आहेत. या थोड्याशा अनुयायांच्या मदतीने पन्नाससाठ जणांना तोंड देणे धोक्याचे होईल म्हणून आम्ही गप्प राहिलो!"



"आई, आई ग! स्वयंप्रभेला ते क्रूर पुन्हां धरून घेऊन गेले!" असे म्हणत ती स्त्री मोठमोठ्याने रडू लागली.

शिवदत्त तिचे दुःख कमी करण्याच्या हेतूने, तिला वाटेल ती मदत द्यायला तो तयार असल्याचे सांगून त्याने तिला विश्वास व धीर यावा या हेतूने स्वतःची आत्मकथा सांगितली.

सर्व काही ऐकल्यावर ती आपले रडणे आवरून म्हणाली–"आहो, माझं नाव देवमाया. आम्ही शमनद्वीपाचे निवासी. दहाबारा वर्षांपूर्वी मला या समुद्रकेतूने कैद केले. तेव्हांपासून त्याच्या जवळ त्याच्या दासी सारखी मी रहात आले आहे. आतां







ज्या मुलीला कैद करून तो घेऊन गेला तिचे नाव स्वयंप्रभा ती शमन द्वीपाजवळ जलविहार करीत असतां तीनचार दिवसां-पूर्वीच समुद्रकेतू हिला पळवून घेऊन आला."

"म्हणजे तुम्ही गेली बारावर्षं त्या समुद्रकेतूची एक दासी म्हणून त्याच्या कैदेत आहांत तर! तर मग तुम्हांला त्या दुष्ट माणसाविषयी सर्व काही चांगले माहीत असले पाहिजे, असे मला वाटते!" शिवदत्ताने विचारले.

उत्तरादाखल देवमाया मानेने होकार देत म्हणाली–"अहो, त्या दुष्ट व्यक्ती विषयी मला सर्व काही माहीत आहे! या बेटाच्या पश्चिम किनाऱ्यावर 'मकर मंडल' नावाचा एक डोंगराळ प्रदेश आहे. त्या बाजूला जायला एकच एक रस्ता आहे. तो खाऱ्या जमिनीचा उंचसखल प्रदेश आहे. त्या खाऱ्या प्रदेशात एका उंच पठारावर तो दुष्ट राहातो."

"तर मग स्वयंप्रभेला तो क्रूर तिकडेच घेऊन गेला असणार! त्या मकरमंडलात राहणारे लोक सभ्यच आहेत ना की रानटी जातीचे आहेत?" शिवदत्ताने विचारले.

त्या मकरमंडलात राहणारे लोक अगदी रानटीच आहेत, असे नाही. ते खेडे गावा-तून राहतात. शिकार हाच त्यांचा मुख्य धंदा आहे. त्याचे कारण मकरमंडल प्रदेशातल्या डोंगराळ प्रदेशातील एका दरीत राहणारी एक मगर आहे!" देवमाया म्हणाली.

"एका मगरीमुळे...मगरी किती मोठी व भयंकर असली तरी तिच्यामुळे मकर-मंडलात राहणारे सर्व निवासी इतके घाबरून जावेत, म्हणजे आश्चर्यच आहे." शिवदत्त म्हणाला.

"दादा! ती मगर म्हणजे सामान्य मगर नाही!" देवमाया म्हणाली. विकृत रूप असलेल्या वज्रमुष्टीकडे भयभीत नजरेने पहात ती पुढे म्हणाली–"त्या मगरीला पैशाचिक शक्ती प्राप्त आहेत, असे सांगतात. म्हणून ते लोक तिला 'मकरदेवता' म्हणतात. तिला आहार म्हणून दररोज चारमाणसे तिच्या समोर टाकतात. हे काम मकरमंडलाचा राजा हरिशिख हा स्वत: करतो. त्यासाठी लागणारी माणसं समुद्रकेतू आणून हरि-शिख राजाला विकत असतो."

"अस्सं! तर मग हे खरं गुपित आहे तर!" असे म्हणत शिवदत्ताने मंदरदेवा-कडे पाहिले.

"मी त्या मगरीला ठार करू शकेन. तुम्ही मला परवानगी द्याल, तर मी त्या मकरमंडलाला जाईन!" वज्रमुष्टी म्हणाला. त्या वेळी तो शिवदत्ताचे काय मत आहे कळावे म्हणून त्याच्याकडे पाहू लागला.

वज्रमुष्टी ते म्हणाला तेव्हां देवमायेच्या चेहऱ्यावर आनंदाची लहर आलेली दिसली








ती वज्रमुष्टीकडे प्रेमभावाने पहात म्हणाली–"दोन वर्षां पूर्वी मकरमंडलात राहणारा एक ज्योतिषी गणित करून म्हणाला होता–'चार एक फूटकंचीचा व भयंकर रूप असलेला एक विकृत माणूस मकरमंडलात येईल व त्याच्या हाती त्या मगरीचे मरण लिहिलेले आहे! त्यानंतर मकरमंडलावर कोणते ही संकट येणार नाही आणि मकरमंडल वैभव संपन्न होईल? असे त्याने भविष्य वर्तविले आहे!"

देवमाया म्हणाली ते ऐकून शिवदत्त खूप हंसला. नंतर वज्रमुष्टीकडे वळून म्हणाला–"तो विकृत रूप असलेला कदाचित वज्रमुष्टीच असेल! तू त्या मकरमंडलाला जायची वाट दाखविलीस तर आपण सर्वच तिकडे जायला हरकत नाही."

"वाटेत समुद्रकेतू राहातो तो प्रदेश आहे. त्याची नजर चुकवून व त्याला चकवून आपण पलीकडे जाणे सहजी साध्य होणारी गोष्ट नाही!" देवमाया थरथर कापत म्हणाली.

"ते शक्य होईल की नाही, हे आम्ही पाहून घेतो! स्वयंप्रभासुद्धा यावेळी त्याच्या बंदीखान्यात असणार!" मंदरदेव थोड्या रागानेच म्हणाला.

"होय, तिला सुद्धा त्या मकरदेवतेच्या आहार करून देण्यासाठी तिला विकण्याच्या विचारात तो क्रूर समुद्रकेतू दिसतो आहे. ते मला चांगले माहीत आहे. सुंदर तरुण स्त्रियांसाठी व बलिष्ठ तरुण पुरुषांना चांगली किंमत देऊन हरिशिख विकत घेतो. म्हणून समुद्रकेतू अशाच लोकांच्या शोधार्थ हिंडत असतो!" देवमाया म्हणाली.

शिवदत्त ती म्हणाली ते ऐकून काहीवेळ विचार केल्यावर म्हणाला–"देवमाया, काय वाटेल ते करून आम्ही स्वयंप्रभेला वाचवितो आणि त्या क्रूर समुद्रकेतूलाही ठार केल्याशिवाय विश्रांती घेणार नाही. हरिशिख विषयी काय करायचं त्याचा विचार मागाहून करू!"

शिवदत्त म्हणाला त्याला होकारार्थी मंदरदेवाने मान हलविली. नंतर शिवदत्त आपल्या अनुयायांकडे वळून म्हणाला–"प्रथम खाणंपिण उरकून घेऊ या तर! वेळ न घालविता त्या मकरमंडलाकडे निघू या!"

सर्व अनुयायांनी होकारार्थी माना हलविल्या. देवमायासह सर्वांनी मागे अर्धवट टाकून दिलेले खाद्य पदार्थ वाढून घेऊन खाणेपिणे भराभर उरकून घेतले, तोंपर्यंत सूर्य डोक्यावर आला होता. ऊन कडक पडले होते. काही वेळ विश्रांती घेतल्यावर शिवदत्त म्हणाला–"चला, आतां निघू या. संध्याकाळ व्हायच्या आत त्या समुद्रकेतूचे निवास स्थान कोठे आहे, याची माहिती काढून घेणे आपल्याला सर्व तऱ्हेने बरे होईल!"

थोड्याच वेळाने सर्व निघायला तयार झाले. बेटाच्या पश्चिमेकडच्या बाजूला असलेले समुद्रकेतूचे निवासस्थान एकट्या देवमायेलाच माहीत होते. म्हणून मार्ग दाखविण्याची जबाबदारी तिच्यावरच आली शिवदत्त व मंदरदेव अनुक्रमे तिच्या पुढे व मागे चालू लागले. त्यांचे अनुयायी त्यांच्या पाठीमागून चालू लागले.

ते जात होते त्या मार्गावर कोठे माणसाची पाऊल वाट किंवा आणखी काही




खूण मिळेल अशी एकही जागा दिसली नाही. कोठें ही मनुष्य वस्तीची चिन्हे झोपड्या किंवा इतर काही दृष्टीस पडलं नाही नैसर्गिक वातावरणात वाढलेले मोठ-मोठे गगनचुंबी वृक्षच वृक्ष दिसत होते आणि त्यांच्या बुंधाजवळ वाढलेली अनेक रानटी झाडे व लतावेली होत्या. म्हणून ऐन दुपारीसुद्धा संध्याकाळच्या काळोखा-सारखा काळोख होता. त्या भागात त्यांना झाडावरून लोंबत असलेली अजगरे सुद्धा जागोजागी दिसत होती.

त्यांच्या जवळ पासही न पोचतां त्यांच्या पासून आपला बचाव करीत सर्व फार सावधगिरी बाळगून पुढे जात होते.







बरोबर सूर्यास्त व्हायच्या सुमारास वज्रमुष्टी सर्वांच्या पुढे जाऊन वाटेला लागून असलेल्या एका उंच झाडावर चढला. तो होता त्या जागेपासून सुमारे एका कोसावर पसरलेला उंचसखल खाराप्रदेश होता. त्याच प्रदेशात समुद्रकेतू रहात असे. त्या खाऱ्या प्रदेशात मधून मधून भूभाग दिसत. अशाच एका प्रदेशात काही माणसेसुद्धा वज्रमुष्टीला दिसली.

वज्रमुष्टी लगेच झाडावरून उतरून खाली आला व शिवदत्ताजवळ जाऊन म्हणाला–"मालक, आपण, देवमाया म्हणाली त्या समुद्रकेतूच्या निवासस्थाना पासून फार दूर नाही असे मला वाटते आहे. त्या झाडावरून पाहिले तर सांपासारख्या मिठाच्या टेकड्या पसरलेल्या व मधून जमीन दिसते. एका जागी काही माणसं सुद्धा दिसली. ते लोक समुद्रावर लुटालूट करणारे चांचे असावेत."

"असं असेल तर आपण सर्वांनी एकदम तेथे जाणंही बरोबर होणार नाही. तू आणखी दोघांना बरोबर घेऊन जाऊन पुढे जा आणि तेथील परिस्थितीचा अभ्यास करून परत या." शिवदत्त म्हणाला.

शिवदत्ताने सांगितल्या बरोबर वज्रमुष्टी दोघा सैनिकांना बरोबर घेऊन निघाला. ते झाडाआडून खूप सावधगिरी बाळगून चालत चालत थोड्या वेळाने त्या खाऱ्या प्रदेशात येऊन पोंचले. खाऱ्या प्रदेशाच्या किनाऱ्या किनाऱ्याने दाट झुडपासारखी वाढलेली झाडे होती. त्यांच्या आडून त्यांनी पाहिले तर त्यांना खाडीतून चालत असलेली लहान मोठी होडकी दिसली. त्या खाऱ्या जमिनीची व खाड्यांची रुंदी चाळीस पन्नास हाताहून जास्त नव्हती. त्याच्या पलीकडे एक उंचवटा होता. त्या उंच जागेवरून विचित्र आरडाओरडा व हंसण्याचा आवाज ऐकू येत होता.

(क्रमशः)



# जन्मरहस्य

विक्रमदित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, इतक्या मध्यरात्रीच्या वेळी तू इतके कष्ट सहन करीत आहेस ते पाहून तुझी कींव येण्याऐवजी मला केव्हां केव्हां तुझा रागच येतो. तू किंवा तुला या कामात गुंतविणारी व्यक्ती काही तरी गुपित रहस्य इतरांना कोणाला कळू न देण्याचा प्रयत्ना त तर नाही ना अशी शंका मनात येते. खरे पाहिले तर कोणते ही गुपित लपवून ठेवणे शक्य तरी होईल का? त्याचे उदाहरण म्हणून वसंतसेन नावाच्या एका राजाची कथा मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



श्रीपुर नगराचा राजा वसंत याची चंद्रावती नावाची मुलगी अत्यंत सुंदर म्हणून राज्यभरच नव्हे तर जवळपासच्या राज्यांत प्रसिद्ध होती. तिला ज्या कोणी पाहिले, ते म्हणत अशी रूपवती स्त्री पूर्वी कधी झाली नसेल व पुढे ही कधी होईलसे वाटत नाही.

राजा वसंतसेनाच्या मनात एक विचार आला. सौंदर्य हे कधी शाश्वत नसते. व या बरोबर सौंदर्य जसे आज आहे तसेच कायम दिसावे असे असेल तर तिची चित्ररूप प्रतिमा कोणी चित्रकाराने काढून ठेवली पाहिजे परंतु चंद्रावतीचे रूपलावण्य जसे अत्यद्भुत आहे, तसाच कोणी असामान्य निपुण चित्रकारच तिचे ते रूप चित्रात उतरवू शकेल.

वसंतसेन राजाने असा एक निपुण चित्रकार शोधून आणण्यासाठी आपल्या काही हुशार दरबाऱ्यांना पाठविले व कलासागर नावाचा एक चित्रकार आणविला. कलासागराच्या प्रतिभेची कीर्ती चतुर्दिक होती. त्याच्यात काही तरी दैवी शक्ती आहे व त्यामुळेच त्याची चित्रे इतकी चांगली होतात असेच सर्व लोक सांगत.

वसंतसेन राजाने कलासागराला सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्या, व त्याला चंद्रावतीला दाखविले. तिला पाहताच कलासागर म्हणाला–"महाप्रभो! अशा लावण्यवतीचे रूप कुंचीने उतरविण्याचे भाग्य सर्वांना लाभत नाही. मी हिचे रूप चित्रात उतरवितो; परंतु त्यात प्राण ओतावयाचा झाला तर हिच्या तीन पूर्व पिढ्याचे रहस्य कळले पाहिजे."

कलासागर म्हणाला ते ऐकून राजा विचारात पडला. त्याचे एक कारण होते. एका छोटे खानी राज्याचा राजा रानात शिकारीला गेला होता. तेथे एका कोळयाच्या मुलीला पाहून राजा तिच्यावर भाळला व तिला आपली राणी करून घेतले. त्यांच्या पोटी चंद्रावतीची आई जन्मली होती. हे गुपित राजघराण्यातील लोकांनाच काय ते माहीत होते. ते गुपित सामान्य प्रजेला कळणे राजाला इष्ट वाटत नव्हते.

राजा मागे पुढे करीत असल्याचे ओळखून कलासागर म्हणाला–"आपल्या मुलीच्या गेल्या तीन पिढयांचे गुपित आपणांला मला सांगणे इष्ट वाटत नसेल तर चित्रसागर नावाच्या माझ्या धाकटया भावाला आपण बोलवून घ्यावे. तो आपल्या अद्भुत लावण्यवती कळल्या शिवायच चित्रित करू शकेल."



वसंतसेन राजाने चित्रसागराला बोलाविले. तो राजाला म्हणाला–"मी राजकन्येचे रूप चित्रित करतो. परंतु त्यापूर्वी मी तिच्याशी एकांतात बोलावे म्हणतो त्या गोष्टीस अनुमती असावी."

वसंतसेन राजा आश्चर्यचकित झाला. "कशाला?" त्याने चित्र सागराला विचारले.

"कारण मी कोणाशीही एकांतात काही वेळ बोललो की त्या व्यक्तीचे गेल्या तीन पिढ्याचे गुपित मला कळते. माझ्या त्या प्रतिमेचे मी स्वत:हून सांगणे बरोबर नाही. भगवंताच्या कृपा प्रसादाने मला ती प्रतिभा-लाभली आहे!" चित्रसागर म्हणाला.

चरित्र सांगा असे कलासागर म्हणाला होता. ते चरित्र मी स्वत:च ओळखून घेईन असे चित्रसागर म्हणतो आहे. एकूण दोघांना पूर्व चरित्र हवे आहे! राजाला आपल्या घरातील गुपित इतर कोणाला कळू देणे इष्ट नव्हते. आतां काय करावयाचे, या विचारात राजा पडला.

राजाला विचारात पडलेला ओळखून चित्रसागर म्हणाला–"प्रभो! आपले हे काम माझा धाकटा भाऊ रेखासागर सहजी करू शकेल. राजकन्येचा पूर्ववृत्तांत जाणून घेतल्याशिवाय तिचे चित्र तो काढू शकेल."
तेव्हां राजा वसंतसेनने रेखासागरला बोलावून घेतले. त्याने राजाच्या इच्छे प्रमाणे चंद्रावतीचे चित्र काढले. ते चित्र पाहून राजकन्या स्वत:च चकित झाली.

कारण ते चित्र अगदी हुबेहूब तिच्या सारखेच होते. राजाने रेखासागरचा खूप सत्कार केला.

रेखासागर राजाचा निरोप घेते वेळी म्हणाला–"महाराज, मी आपली सर्व प्रतिभा पणास लावून राजकन्येचे चित्र काढले आहे. परंतु हे चित्र सजीव नाही. सजीव चित्र काढण्याची योग्यता फक्त माझ्या दोघां थोरल्या भावात आहे."

राजा पुन्हा विचारात पडला. एका मंत्र्याने त्याला सांगितले होते की कलासागरने पूर्वी आनंद चक्रवर्तीचे चित्र काढले होते. विचार केल्यावर राजाला एक उपाय सुचला. त्याने पुन्हां कलासागरला बोलावून विचारले–"मला असे कळले आहे तू आनंद चक्रवर्तीचे सजीव चित्र काढले आहेस. म्हणजे, तुला त्याचा पूर्व इतिहास चांगला माहीत आहे. तरमग तो पूर्व इतिहास सांगशील का?"

"प्रभो! मी आतां त्यांच्याविषयी काहीच सांगू शकणार नाही." कलासागर उत्तरला.

"कां? त्यांच्या पाठीमागे काही गुपित आहे का?" राजाने विचारले.

"ते मी आतां सांगू शकणार नाही. मी कोणाचा पूर्वइतिहास जाणून घेतल्यानंतर तो पूर्णपणे चित्रात उतरवितो. त्यानंतर मला तो आठवत नाही. कारण लहान मोठ्या गोष्टी माझ्या डोक्यात टिकून रहातच नाहीत. कलासागरने निवेदन केले. ते उत्तर ऐकून राजा वसंतसेनाला आनंद झाला. त्यानंतर राजाने कलासागरला आपल्या मुलीच्या तीन पूर्व पिढींचा इतिहास सांगितला. दुसऱ्या दिवशी कलासारने राजकन्येला तिच्या वडिलांसमोरच बसवून काही तासांतच तिचे चित्र काढले. ते चित्र पाहून सर्व लोक चकित झाले. ते चित्र फक्त हुबेहूब तिचे प्रतिबिंबच नव्हते तर जणुंकांही ती स्वतःच होती. त्या चित्रासमोर रेखासागरने काढलेले चित्र फिक्के पडले.

राजाने प्रसन्न होऊन कलासागरला पुष्कळ इनाम दिले. त्यावेळी चित्रसागर राजाला म्हणाला–"प्रभो! चंद्रावतीचे सौंदर्य अत्यद्भुत आहे. तिचे सौंदर्य चित्रित करण्याची संधी मलाही देण्याची कृपा करावी!"

"तू राजकन्येशी एकांतात बोलायला मिळावे असे म्हणाला होतास. म्हणून तुझी इच्छा पुरी होणे शक्य नाही." राजा म्हणाला.

"आता राजकन्येशी एकांतात बोलण्याची मला इच्छा नाही. परंतु माझ्या भावाने जे चित्र काढले आहे, त्या चित्राबरोबर मला एकांतात एक दिवस रहायला अनुमती द्यावी. एवढीच विनंती आहे! मला राजकन्येचा सर्व पूर्व इतिहास कळेल!" चित्रसागर म्हणाला.

चंद्रावतीला चित्रसागरच्या हस्तेसुद्धा तिचे चित्र काढवून घ्यावेसे वाटू लागले. परंतु राजाला ते मान्य नव्हते. नंतर चित्रसागरचाही यथोचित सत्कार वगैरे करून राजाने त्याला निरोप दिला. त्यानंतर





कलासागरने काढलेले चित्र अंत:पुरात पाठविले आणि रेखासागरने काढलेले चित्र चित्रालयात टांगले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, वसंतसेन राजाची ही सर्व वागणूक तुला अयोग्य वाटत नाही का? एका थोर कलाकाराचा यात अपमान झाला असे तुला वाटत नाही का? चित्रसागराने राजकन्येबरोबर एकांतात एक दिवस राहण्याची अट न घालता आपल्या भावाने काढलेल्या चित्राबरोबर एक दिवस एकांतात रहायला अनुमती मागितली होती. तरी राजाला त्यात हरकत कां असावी? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम ठाऊक आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"वसंतसेनच्या वागणुकीत तसा विक्षिप्तपणा किंवा कोणाचा अपमान करण्याची वृत्ती दिसत नाही. चित्रसागरकरवी पुन्हा एकदा राजकन्येचे चित्र काढवून घेण्याच्या इच्छेतच त्याची अशिष्टता प्रगट होते.

उणीवा झाकून ठेवून चांगुलपणाला प्रोत्साहन देणे राजाचे लक्षण होय. कलासागर राजवंशाचा पूर्वेतिहास कळला तरी चित्र काढून झाल्यावर तो तो इतिहास विसरून जात असे. परंतु चित्रसागरची गोष्ट निराळी होती. चित्र पाहून तो व्यक्तीचे चरित्र ओळखत असे. ते त्याच्या मनात राहून जात असे. ते तो इतरांजवळ सांगेल ही भीती होती. म्हणून राजाने आपल्या मुलीचे चित्र काढायला त्याला अनुमती दिली नाही. शिवाय पुढचा विचार करून कलासागराने काढलेले चित्र राजाने अंत:पुरात नेऊन ठेवविले. ते चित्रालयात ठेवले तर ते चित्र पाहून तिचे गत चरित्र ओळखून घेणारी हुशार मंडळी असण्याची शक्यताही होती."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# योग्य उत्तर

कनकपूरची राजकन्या रत्नकुमारी आपल्या रूप लावण्याबरोबर आपल्या बुद्धिमत्तेमुळेही प्रसिद्ध होती. राजा नागेंद्रवर्मा याला मुलगा नव्हता. म्हणून राजाने मुलीला इतर स्त्रियोचित सर्व कलांच्या शिक्षणाबरोबर राजाला योग्य असलेल्या सर्व विद्याचेही योग्य शिक्षण दिले होते.

रत्नकुमारीचे वय विवाह योग्य झाले. तेव्हां तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने मोठमोठ्या राज्यांच्या वारसांकडून संदेश येऊ लागले. राजाने दोघातिघा राजकुमारांविषयी चवकशी करून त्यांच्यापैकी कोणत्याही एकाशी विवाह करून घेण्याचा सल्ला रत्नकुमारीला दिला. परंतु ती म्हणाली–"बाबा! माझ्या लग्नाची इतकी घाई करू नका. माझ्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्यांपैकी जो सर्वांत बुद्धिमान व पराक्रमी असेल त्यालाच मी आपला पती म्हणून वरमाला घालीन."

राजाने विचारले–"मुली, तू म्हणतेस ते सर्व ठीक आहे. परंतु तू अशा राजकुमाराची निवड कशी काय करणार?"

"बाबा, मी स्वयंवर करणार असल्याचे आपण जाहीर करावे, स्वयंवराला येणाऱ्या राजकुमारांना मी तीन प्रश्न करीन. त्या प्रश्नांची सयुक्तिक व योग्य उत्तरे देणाऱ्याशी मी विवाह करीन." रत्नकुमारी म्हणाली.

राजा नागेंद्रवमनि रत्नकुमारीचे स्वयंवर करण्याचे निश्चित करून प्रमुख राज्यांत संदेश पाठविले. अनेक राजकुमार स्वयंवराच्या दिवशी हजर झाले.

स्वयंवराच्या मंडपात राजा सिंहासनावर बसला होता. खाली दोन उच्च आसनांवर राजकन्या व राजगुरु बसलेले होते.

राजगुरुने उपस्थित राजकुमारांना संबोधन करून निवेदन केले–"राजकन्येच्या वतीने मी आपणां सर्वांस तीन प्रश्न विचा-

रीत आहे. त्यांची उत्तरे बरोबर आहेत की नाहीत, ह्याचा निर्णय राजकन्याच घेणार आहे." नंतर राजकन्येकडे वळून राजगुरुने विचारले–"मुली, तरमग ते तीन प्रश्न कोणते ?"

राजकन्येने एक लहानसे ताडपत्र हातात दिले. राजगुरुने त्या ताडपत्रावर लिहिलेले प्रश्न सर्वांना ऐकू जातील इतक्या उच्च स्वरात वाचले–"बिन वजनाची वस्तु कोणती? न दिसणारी आकृती कोणती? श्वासोच्छ्वास न घेणारा प्राणी कोण ?"

ते प्रश्न काही राजकुमारांचे चेहरे पांढरे-फट्ट पडले. काही लोक दरबाराच्या छताकडे पाहू लागले. काहींची प्रश्नांची उत्तरे माहीत नसल्याचे कबूल केले, काहींनी उत्तरे दिली. परंतु राजकन्येला त्यांपैकी एकही समाधानकारक उत्तर वाटले नाही. अगदी शेवटी विक्रमपुरीचा राजकुमार उग्रसेन उठून उभा राहून म्हणाला–"राजकन्येच्या प्रश्नांची उत्तरे कोणी राजकुमार देऊ शकला नाही, हे खरे आहे. याच्या मागे एक मोठे कारण आहे. बिन वजनाची वस्तु न दिसणारी आकृती आणि श्वासोच्छ्वास न घेणारा प्राणी या सृष्टीत नाहीच. म्हणून हे प्रश्नच निरर्थक आहेत !"

ती उत्तरे ऐकून सभेत गोंधळ झाला. काही जणाना वाटले की राजकन्येचा हा तोंडावर अपमान केला गेला आहे. म्हणून त्या राजकुमाराचा जीव धोक्यात पडण्याची शक्यता आहे. परंतु राजकन्या रत्नकुमारी राजकुमार उग्रसेन याच्याजवळ जाऊन मंदहास्य करीत म्हणाली–"बरोबर, माझे प्रश्न निरर्थक आहेत ही गोष्ट खरी आहे. तरी काही जण त्याचे उत्तर शोधण्याची खटपट करू लागले. काही जणांना माझे प्रश्न निरर्थक असल्याचे वाटत असूनही माझा उपमर्द होईल म्हणून तसे म्हणण्याचं धाडस त्यांना झाले नसावे. परंतु ते साहस दर्शविणारे विक्रमपूरचे युवराज उग्रसेन यांचे वरण मी करीत आहे."

असे सांगून तिने आपल्या सखीच्या हातातील वरमाला घेऊन उग्रसेनला घातली.





# सर्वांचाच फायदा

रामूकाका ऐन तारुण्यात होते तेव्हां पासूनच ते एक हुशार आणि दुसऱ्यांच्या भानगडीत ढवळाढवळ न करणारे आपलं काम बरं व आपण बरे असे समजणारे एक सद्‌गृहस्थ म्हणून जवळपासच्या पंचक्रोशीत प्रसिद्ध होते.

एकदां रामकाकांना पैशांची फार गरज पडली म्हणून त्यांनी आपल्या मुलीची सोन्याची माळ मगनलाल नावाच्या जव्हेऱ्याकडे आठशे रूपये घेऊन गहाण ठेवली, परंतु कित्येक दिवस झाले तरी त्यांनी ती सोडविली नव्हती. तेव्हां मगनलाल शेटने कर्जाची रक्कम फेडून माळ घेऊन जायला कित्येकदां निरोप पाठविला. परंतु प्रत्येक वेळी रामूकाका अजून पैसे जमले नाही. सांगून मुदत वाढवून घेत.

रामूकाकां कडून पैसे परत मिळत नाहीत हे पाहून मगनलाल शेट स्वतः आले, उद्यां देतो परवां देतो असे सांगून रामूकाका मगनशेटला भेटायचे टाळू लागले. नोकर आला की घरात असूनही बायको करवी घरी नसल्याचे सांगवून वेळ मारून नेत, कधी नोकर भेटलाच तर त्यालाच समजावून सांगत की मालकाला थोडी मदत वाढवून घ्यायला सांग.

शेवटी मगनशेट कंटाळला आणि त्याने रामूकाकाला बजावून सांगितले की तीन दिवसांची मुदत मी स्वतः होऊन वाढवून देत आहे. मात्र कायदेशीर इलाज करावा लागेल किंवा सोन्याची माळ विकून टाकून कर्जाची रक्कम वसूल करावी लागेल.

तो तीन दिवसांचा अवधी देखील संपला, परंतु रामूकाकांनी कर्जाची रक्कम फेडली नाही की मगन शेटला तोंडही दाखविलं नाही. शेवटी चिडून जाऊन मगनशेटने ती माळ सुगुणमल शेटच्या हातात देऊन



त्यांना म्हटले–"शेटसाहेब, मी ही माळ एक हजार रूपयांना माझ्याकडे ठेवून घेतली होती तेव्हां तुम्ही ही माळ बाराशे रूपयांहून कमीला काढू नका."

एके दिवशी सुगुणमलशेटच्या दुकानात त्या गावचा जमिनदार स्वत: दागिने विकत घ्यायला आला. सुगुणमल शेटने माळ दाखवून म्हटले–"मालक, आपण या माळे तील कारागिरी तर पहा, मुंबईचा माल आहे. किंमत दोन हजार आहे. तर आपण आमचे जुने गिऱ्हाईक म्हणून फक्त आपल्याला पंधराशेला मी देईन."

जमिनदार घासाघीस घालीत बसला नाही. पंधराशे रूपये दिले आणि माळ घेऊन गेला. सुगुणमलने तीनशे रूपये आपल्या तिजोरीत ठेवले आणि मगनशेटला बोलावून आनंदने म्हणाले–"शेटसाहेब, तुमच्या म्हणण्या प्रमाणे मी ती माळ बाराशेला विकली. हे घ्या तुमचे पैसे!"

जमिनदाराकडे गणू नावाचा एक गडी होता त्याच्या मुलीच्या लग्नाला जमिन-दार जातीने हजर होता. जमिनदाराने नोकराच्या मुलीला प्रेमाची भेट म्हणून ती माळ दिली व गणूला बजावून सांगितले–हे पहा गणू, तू आपल्या मुलीला संभाळून रहायला सांग या माळेची किंमत दोन हजार रुपये आहे. बरं का!" जमिनदाराने पंधराशेच रुपये दिले होते, परंतु सुगुणमल शेटने त्याची मूळ किंमत दोन हजार सांगि-तली होती. म्हणून जमिनदाराने नोकराला तीच किंमत सांगितली.

एवढी मूल्यवान माळ मिळाल्याबद्दल गणूला परमानंद झाला. त्याने रामूकाकां-कडून थोड्याच दिवसांपूर्वी पांचशे रुपये लग्नासाठी म्हणून सांगून कर्जाऊ घेतले होते.

गणू गडी रामूकाकांकडे ती माळ घेऊन गेला व त्यांना ती माळ देत म्हणाला–"रामू काका, खरं म्हणजे एवढी मूल्यवान माळ कशी विकावी हेच मला माहीत नाही. तेव्हां तुम्हीच हा व्यवहार करा व पांचशे घेऊन बाकी रक्कम मला परत द्या."

रामकाकांनी माळ ओळखली व विचा-रले–"तुला ही कशी काय मिळाली रे?"

ते ऐकून गणू संतापून म्हणाला–"तुम्हांला मी ही माळ चोरून आणली असं का वाटलं! जमिनदार साहेबांनी माझ्या मुलीला लग्नसमयी भेट म्हणून दिली. त्यांनी ती दोन हजार रुपयांना विकत घेतली असल्याचे सांगितले.

"ओ हो! असं होय!" असे म्हणत रामूकाका गणूला बरोबर घेऊन रघूशेट सोनाराकडे गेले आणि कसोटीवर कसून तिची किंमत सांगायला सांगितले.

रघूशेटने कसोटीवर कसून पाहिल्यावर म्हटले–"अरे वा, हे तर शंभरनंबरी सोने आहे." ते ऐकून गणूला परमानंद झाला रामूकाकांना म्हणाला–"पाहिलंत, मला तुमचं बोलण ऐकून मला वाटलं होतं की जमिनदारसाहेबच फसले की काय? पण आतां तुमचीच दुष्ट बुद्धी प्रगट झाली.

तेव्हां रामूकाका सोनाराला म्हणाले–"चांगलं कसून पहा व खातरी करून घ्या." सोनाराने माळेतल्या मण्याची एक पोत कापून कसून पाहिले व आश्चर्यचकित होऊन म्हणाला–पितळ्याच्या मण्यावर सोन्याचा जाड मुलम्मा केला आहे. याची किंमत पांचशे रुपयांहून जास्त नसावी."

ते ऐकून गणू गडी आश्चर्यचकित झाला. रामूकाकांनी गणूला विचारले–"गणू, आतां तू जमिनदार साहेबांना जाऊन, त्यांनी असे कां फसविले, हे विचारणार का?



"बापरे बाप! मोठ्या लोकांनी काही केलं तरी तिकडे कानाडोळा करावयाचा असतो." गणू म्हणाला.

"बरोबर, पण मला तुझी कीव वाटते, म्हणून मी ही माळ तुझ्या पांचशे रुपये कर्जाबद्दल ठेवून घेतो." असे सांगून रामूकाका माळ आपल्या खिशात टाकून निघाले.

रघुशेट सोनाराच्या दुकानात बसून हे सर्व दृश्य पहात व बोलणे ऐकत होते रामकाकांचे मित्र धोंडूकाका. ते घाईघाईने दुकानाबाहेर आले आणि रामूकाकाला थांबवून म्हणाले–"मित्रा, तुला वेडबीड तर नाही लागल? रघुशेटने माळेची किंमत पांचशे लावली. परंतु या माळेची किंमत पांचशेच असेल हे कशावरून? तू ती माळ गणूलाच देऊन टाक आणि त्याच्याकडून पांचशे रूपये वसूल करून घे!"

रामूकाका ओरडून म्हणाले–"तुम्हांला काय कळतं धोंडू काका? आहो, ही माळ जर मी गणूला परत दिली तर तो कधी जमिनदारासमोर माळेचं पितळ उघड पाडेलकी! मग जमिनदार त्या माळेची मालकी मूळ कोणाची शोधत फिरेल. तेव्हां पापाचे खापर माझ्या माथी येईल की!"

"ते कसं काय, बाबा?" धोंडू काकांनी विचारले.

"खरी गोष्ट अशी मीच माळ अडीच रुपयात करवून घेतली होती व मुलम्मा एवढा जाड चढवून घेतला होता की खोटी गोष्ट नजरेस येणारच नाही. मी ही माळ मगनलाल सावकाराकडे आठशे रुपये घेऊन गहाण ठेवली होती. नंतर त्याने सुरवातीपासून सर्व गोष्ट सांगितली व म्हणाले–"ही माळ कित्येक हातातून फिरून शेवटी माझ्याच जवळ परत आली. मला जो फायदा मिळाला त्या पेक्षा थोडा जास्त मिळाला असता, एवढेच ना! आतां थोडा कमी झाला. परंतु ही गोष्ट गुप्तच ठेवा, धोंडू काका!"

ते ऐकून धोंडूकाका खदखदां हसले आणि म्हणाले–"म्हणजे या व्यवहारात कोणाचे काही नुकसान झालेच नाही, उलट सर्वांचा फायदाच झाला!"





# श्वेत गजराज

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां काशी नगरीपासून थोड्या अंतरावर लाकुडतोडे व सुतारांची एक वस्ती होती. तेथें सुमारे पांचशे सुतार रहात असत. ते लहान लहान होडक्यांतून जंगलात जात व तेथून त्यांना लागणारे इमारती लाकूड तोडून ते आपल्या होडक्यात भरून आपल्या गावी आणीत ते लाकूड संपले म्हणजे पुन्हां होडक्यांतून जंगलात जाऊन लाकूड तोडून आणीत.

त्या जंगलाच्या एका कोपऱ्यात एक हत्तीण रहात असे. एकदां तिच्या पायात लाकडाचे एक पाचर बोचले, त्यामुळे तिचा तो पाय सुजला आणि दुखू लागला. अनेक प्रयत्न करून ही तिला ते पाचर पायांतून उपटून काढतां येईना. त्याच वेळी तिला झाडे तोडण्याचा आवाज ऐकू आला. हत्तीण लंगडत त्या दिशेला गेली.

हत्तिणीला पाहतांच सुतारांना तिला काही तरी होत असल्या सारखे वाटले. ती हत्तीण त्यांच्यासमोर बसली व पाय वर करून पायाला काही तरी झाल्यासारखे तिने खुणावले. सुतारांनी जवळ जाऊन पाय पाहिला आणि त्यांनी क्षणार्धात ते पाचर काढून तिच्या पायाला मलम लावून पट्टी बांधली. थोड्याच दिवसात हत्तिणीची जखम भरून आली व ती हिंडू फिरू लागली तीं सुतारांनी केलेल्या उपकाराची फेड करण्याच्या हेतूने त्यांना मदत करू लागली. ती पडलेली झाडे ओढून सोयीच्या जागी आणून देई. ओणकी उचलून होडक्यांत ठेवी. अशातऱ्हेने हत्तीण व सुतार यांची परस्परांशी मैत्री जमली. सुतार आपल्या खाण्यातला वांटा उरवून पिला देऊ लागले.

कित्येक दिवस लोटले हत्तिणीला एक पिल्लू झाले. तो ऐरावत जातीचा पांढरा



हत्ती होता. हत्तीण वृद्ध होत गेली व तिने तिचं ते पिल्लू सुतारांवर सोडून दिले व ती जंगलात खोल निघून गेली. श्वेत हत्ती सुतारांना मदत करी. सुतार खायला घालीत ते तो खाई. त्यांच्या मुलां बाळांना आपल्या पाठीवर बसवून खेळवी. त्यांना नदीत आपल्या बरोबर नेई व आनंदाने त्यांच्याबरोबर राहू लागला. सुतार हत्तीला आपल्याच मुलासारखा मानीत व त्याच्याशी वागत.

ब्रह्मदत्त राजाला जंगलात पांढरा हत्ती असल्याची बातमी कळली तेव्हां तो ससैन्य त्या हत्तीला धरून न्यायला आला. सुतारांना वाटले की राजाला इमारती लाकड हवे आहे. त्यांनी राजाला निवेदन केले– "महाराज, आपणांस इमारती लाकडाची गरज होती तर आमच्याकडे निरोप पाठविला असतात तर आम्ही लाकूड आणून नसते का पोंचविले ?"

राजा म्हणाला–"मी लाकडासाठी आलेलों नाही. पांढऱ्या हत्तीला धरून नेण्यासाठी आलो आहे." त्याने आपला खरा हेतू उघड सांगून टाकला.

"तर मग आपण हत्तीला आपल्याबरोबर घेऊन जावे." सुतार नम्रपणे म्हणाले, परंतु खूप प्रयत्न करूनही हत्ती जागचा हलला नाही. हत्ती जागचा हालत नसलेला पाहून राजाच्या एका अधिकाऱ्याने हत्तीच्या मनातली गोष्ट ओळखली व म्हणाला–"महाराज, हा हत्ती फार विवेकशील व शाहाणा आहे. आपण या हत्तीला घेऊन गेलात तर या सुतारांचे फार नुकसान होईल. त्यांना होणाऱ्या नुकसानाची भरपाई आपण करू शकलात तर हत्ती येथून हालेल."

राजाने हत्तीच्या चारही पायांजवळ प्रत्येकी एकेक लाख स्वर्णमुद्रा ठेवल्या व त्या सुतारांना वाटून देण्यास सांगितले. तरी हत्ती जागचा हलला नाही. त्यानंतर राजाने सुतारांच्या बायका मुलांना वस्त्रदान केले. तेव्हां कोठे हत्ती जागचा हलला आणि राजाच्या पाठोपाठ निघाला. त्यानंतर राजाने वाजत गाजत श्वेत गजराजाला राजधानीत आणले. राजधानीभर त्याची मिरवणूक काढण्यात आली. त्यानंतर त्याच्या साठी योग्य गजशाला तयार करण्यात आली. तो हत्ती राजाची स्वारी नेणारा मुख्य हत्ती झाला. त्याच्यावर राजाशिवाय इतर कोणालाही स्वारीचा अधिकार नव्हता.

तो श्वेत हत्ती आला त्या शुभ घटकेपासून काशीराज्याची भरभराट होऊ लागली. कोणी शत्रू राज्यावर स्वारी करायला येई त्याचा पराभव होई. राज्याचा विस्तार ही झपाट्याने वाढू लागला. काही दिवसांनी काशीच्या राणीला दिवस राहिले. बोधिसत्वांनी तिच्या पोटी अवतरण्याचे ठरवून तिच्या गर्भात प्रवेश केला. प्रसवकाळाला एक आठवडा उरला होता आणि काशीचा राजा एकाएकी परलोकी गेला. ती संधी साधून कोशल देशाच्या राजाने काशी राज्यावर स्वारी केली. मंत्र्यांनी बराच वेळ खलबत करून कोशलराजाकडे एक संदेश पाठविला– "आमच्या राणीचा प्रसवकाळ एका आठवड्यावर येऊन ठेपला आहे. राणीच्या पोटी कन्या जन्मली तर आपण काशीराज्य काबीज करावे आणि जर पुत्ररत्न जन्मले तर आम्ही आपणांशी युद्ध करायला सिद्ध राहू."

कोशलराजाने एका आठवड्याचा अवधी मान्य केला.












बरोबर एका आठवड्याने बोधिसत्वांचा जन्म झाला. काशीराज्याचे सैन्य कोशलच्या सैन्यावर चालून गेले. परंतु त्या युद्धात काशीराज्याचा पराभव होणार असे वाटू लागले. परिस्थिती ओळखून मंत्र्यानी राणी जवळ निवेदन केले की महाराजांच्या हत्तीने रणांगणावर पाय टाकला तरच आपणांस विजयप्राप्ती होईल. परंतु महाराज परलोकवासी झाले त्या दिवसापासून श्वेत गजराजाने अन्नपाणी सोडले आहे. काय करावे, हे आम्हांलाही कळेनासे झाले आहे.

मंत्र्यांच्या तोंडी ते ऐकून राणी आपल्या. शिशूला राजपुरुषा लायक पोशाख चढवून श्वेत गजराजाजवळ घेऊन आली. मुलाला हत्तीच्या पायाजवळ ठेवून म्हणाली– "गजराज, मालक गेल्याचा शोक आवर आतां या नव्या मालकाच्या रक्षणाची जबाबदारी उचल. शत्रू चालून आला आहे. शत्रूचा गर्वभंग करणे एकट्या तुझ्या हातांत आहे. तुला ते मान्य नसेल तर आपल्या या मालकाला आपल्या पायांखाली तुडवून याचा शेवट कर." राणीच्या तोंडी ते शब्द निघतांच श्वेत गजराज आपला अनावर शोक आवरून उठला आणि त्याने युवराजाला अलगद उचलून आपल्या मस्तकावर ठेवले आणि राणीच्या हातात युवराजाला देऊन रणांगणाकडे प्रस्थान केले.

श्वेत गजराजाला उग्ररूप धारण करून येत असलेला पाहून कोशल राजाच्या सैन्याच्या थरकांप उडाला आणि ते वाट फुटेल तिकडे पळू लागले. हत्तीने सरळ कोशल राजाला आपल्या सोंडेने उचलून आणून शिशु युवराजांच्या पायासमोर आणून फेंकले. कोशल राजाने माफी मागितली आणि काशीराजाच्या मंत्र्याच्या अनुमतीने कोशल देशी प्रयाण केले.

बोधिसत्वांना सातवे वर्ष लागलें तोंपर्यंत गजराजाने काशीराज्याचे रक्षण केले. बोधिसत्वांचा राज्याभिषेक यथासमयी झाला आणि गजराज त्यांच्या सेवेत आनंदाने राहू लागला.





# गुरुनानक

लाहोर शहरा नजीक तलवंडी नावाचे गाव आहे. आज ते गाव नानकाना नावे प्रसिद्ध आहे. त्या गावी १५ एप्रिल १४६९ या दिवशी तृप्ता व कल्याणचंद यांच्या पोटी एका मुलाचा जन्म झाला. मुलगा महापुरुष होणार असे मुलाच्या हस्तरेखेवरून वाटत होते. मुलाचे नाव नानक असे ठेवण्यात आले.

नानक शाळेत जायचे वय झाल्यावर शाळेत जाऊ लागला. एकदा शिक्षक नानकाला 'क' 'ख' 'ग' ही अक्षरे शिकवीत होते. परंतु नानकाचे लक्ष अभ्यासाकडे नव्हते. तो दुसरेच काही-तरी पाटीवर रेखाटत होता. शिक्षकाने जवळ जाऊन पाहिले. पाटीवर कोणते तरी प्रार्थनेचे गीत लिहिलेले होते. ते पाहून शिक्षक चकितच झाले.





नानकांचे वडील कल्याणचंद यांनी मुलाला, व्यापार करण्यासाठी हाताशी घेण्याचे योजले. एकदा मुलाला काही रुपये देऊन पैठेतून माळखरेदी करून आणायला पाठविले. नानक जंगलाच्या वाटेने जात होते. त्यांना वाटेत साधू व संत भेटले. ते उपाशी होते. नानकाने वडिलांनी दिलेले रुपये खर्च करून खाद्य पदार्थ खरेदी केले व ते साधू संतांना वाटून टाकले.



कल्याणचंदांना वाटले की मुलाचे लग्न करून दिले की मुलगा मार्गावर येईल. त्या प्रमाणे त्यांनी नानकाचे लग्न करून दिले. नानकाला दोन मुलगे झाले. परंतु नानकाचे मन कौटुंबिक वातावरणात रमले नाही. ते नित्य भक्ति गीत लिहिण्यातच मग्न रहात. ते म्हणत–"मला वरून जो संदेश मिळाला आहे, तोच मी लिहिणार !"

एके दिवशी नानक देशाटनाला निघाले. निघते वेळी ते आपल्या कुटुंबाला म्हणाले–"परमेश्वर सर्व जगाचे रक्षण करतो. तोच तुमचे रक्षण करील." त्यानंतर भारतभर फिरून त्यांनी तीर्थ क्षेत्र दर्शन केले आणि आपल्या मर्दन नामक एका मुसलमान स्नेह्या बरोबर नेपाळ, तिबेट, मक्का मदीना वगैरे इतर देशा तील तीर्थ दर्शन ही केले.





एकदा हरिद्वार येथे पूर्वेकडे तोंड करून तर्पण करीत असलेल्यांना पाहून नानक पश्चिमेकडे तोंड करून पाणी उडवू लागले. एकाने विचारले–"तू हे काय करतो आहेस रे ?" नानक म्हणाले–"लाहोरला माझी झाडे आहेत त्यांना पाणी घालतो आहे. तुम्ही पितरांना तर्पण करून पाणी देत आहा तर माझे हे पाणी झाडांपर्यंत पोचणार नाही का ?"

एकदा नानक सैयदपूर येथील एका गरिबाच्या घरी गेले त्याच वेळी एका श्रीमंत माणसाने त्यांना एका मेजवानीला बोलाविले. नानकाने दोघांचे आतिथ्य स्वीकारले. नंतर गरिबाने वाढलेली भाकरी उजव्या हातात व श्रीमंताने वाढलेले पक्वान्न डाव्या हातात घेऊन नानकाने पिळले तर उजव्या हातातल्या मुठीतून दूध व डाव्या हाताच्या मुठीतून रक्त गळू लागले, असे म्हणतात !





मक्केला असतांना नानक एकदा काबाच्या दिशेने पाय पसरून झोपले. ते पाहून काजीने विचारले–"हे काय रे, तू देवाकडे पाय करून झोपला आहेस ?" नानक म्हणाले–"तू माझे पाय देव नसेल त्या बाजूला उचलून ठेव !" त्यानंतर म्हणे, नानकाने जिकडे पाय फिरविले तिकडे-काजीला काबाचे पवित्रदर्शन घडले.

गुरु नानकाने सहिष्णुता, दया इत्यादी गुणांचा प्रचार सुरु केला. बाह्य आडंबरात न पडतां, निर्मल व पवित्र मनाने सत्यस्वरूप अशा परमेश्वरांवर प्रेम व त्याची भक्ती करावी जाति भेद, वर्ण भेद यांचे नानकाने खंडन केले. हिंदु व मुसलमान दोन्ही मताव लंबियांना गुरुनानकने धर्मोपदेश केला व पवित्र जीवन घालविण्यास प्रवृत्त केले.





गुरुनानकाने जे उपदेश केले तेच शीख धर्म नामे पुढे नावारूपास आले. नानकाने आपला पट्टशिष्य अंगद याला आपला आध्यात्मिक वारस म्हणून नेमले. सत्य हेच आपल्या जीवनाचे ध्येय मानून व पवित्र जीवन संपूर्ण करून या थोर पुरुषाने ७ सप्टेंबर १५३९ या दिवशी आपला भौतिक देह सोडला.

नानकाच्या भक्तांनी त्याचे स्मारक मंदिर बांधले ते रवी नदीच्या पुरात वाहून गेले. मुख्य व शाश्वत असते ते ध्येय, त्याचे भौतिक चिह्न नसते. म्हणूनच की काय अशाश्वत ते गेले असावे, असे त्याचे शिष्यवर्ग मानतात. गुरुनानकांनी रचलेली भक्ति गीतेच संग्रहित होऊन 'ग्रंथ साहेब' (आदि ग्रंथ) नामे चिरस्थायी झाली.





गुरुनानकाचे स्मृति चिह्न म्हणून त्याच्या शिष्यवर्गाने नदीतीरावर डेरा बाबानानक नावाचे नगर वसविले. एकदा गुरुनानक ध्यानमग्न होऊन ज्या जागी बसले होते त्या जागी एक गुरुद्वारा बांधला. शिखांचे हे एक पवित्र तीर्थ स्थान म्हणून आजतागायत प्रसिद्ध आहे. गुरु नानकानंतर त्याचे आठ शिष्य व प्रशिष्य एका थोर पंथाचे निर्माते झाले.

# पाण्याची टंचाई

रंगा गवळी केशवपूरच्या गावी कित्येकांच्या घरी रतिबाचे दूध घालीत असे. तेवढ्यावर त्याचा व त्याच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह छान चाले. तो शेजारच्या गोविंदपूर गावी सुद्धा रतिबाचे दूध घालीत असे.

एकदां मधुकर नावचा केशवपूरचा रहिवाशी गोविंदपूरला गेला होता. तेथे रंगा गवळी केशवपूरहून तिथल्या लोकांना स्वस्त दूध देत असल्याचे मधुकरने पाहिले. मधुकर रंगा गवळ्याकडूनच रतिबाने दूध घेत होता.

तो रंगा गवळ्यावर तावून त्याला म्हणाला–"कायरे रंगा! हा काय न्याय झाला? तू आपल्या गावकऱ्यांना महाग दूध विकतोस आणि परगावच्या लोकांना मात्र स्वस्त दूध विकतोस! हे बरोबर नाही!"

रंगा गवळी जरासुद्धा न कचरतां म्हणाला–"छोटे मालक, आपल्या गावात पाण्याची किती टंचाई आहे, हे आपल्याला माहीत नाही, असे नाही. आतां गोविंदपूरला तर गंगानदीच वाहाते आहे. दूधाच्या किंमतीत फरक व्हायचे मुळ कारण हेच समजा!"





# नैसर्गिक शंकेखोरपणा

महिपतराव जमिनदाराच्या कचेरीत शिवराम नावाचा कारकून होता. त्याला कधी पैशाची कमतरता भासल्याचे कोणाच्या लक्षात आले नाही. उलट तो आपल्या सहकारी मित्रांना कधी कधी लहान मोठी कर्जे देत असे. नोकरीला लागल्यावर दहा वर्षांच्या आत त्याने छोटे से घरही विकत घेतले. आपल्या दोघा मुलांच्या शिक्षणाची चांगली व्यवस्था केली. चांगले व स्थळ पाहून आपल्या एकुलत्या एका मुलीचे लग्नही करून दिले.

शिवरामच्या सहकारी कारकुनांच्या मनात ही शंका नेहमी येई की हा माणूस आपल्या सारखाच लहानशी नोकरी करतो आणि कर्ज काढल्या शिवाय आपल्या कुटुंबाच्या सर्व गरजा भागवीत आला आहे. सर्व जबाबदाऱ्याही पार पाडल्या आहेत. पुष्कळ विचार करून ही शिवरामच्या सुखी संसाराचे गुपित त्यांच्या लक्षात येईना. त्यांच्या पैकी काही जणांना शिवरामपेक्षा जास्त पगार असून त्यांचा खर्च भागत नसे. म्हणून शिवराम विषयी त्यांना हेवा वाटे. तो पैसे सरळ मार्गाने मिळवितो की नाही याची शंकाही वाटे.

मनात एकदा शंकेने घर केल्यावर त्यांनी वाटेल त्या बातम्या उडवायला कमी केले नाही. एक अफवा शिवराम कचेरीत कामाला येणाऱ्या लोकांकडून लांच घेतो अशीही होती. त्या कचेरीत रघुनाथराव नावाचे दिवाण होते. रघुनाथरावांनी ती गोष्ट जमिनदार साहेबांच्या कानावर घातली.

तेव्हां जमिनदार रघुनाथरावांना म्हणाला—"तुम्ही म्हणालात हे सर्व ठीक आहे. परंतु याला काही पुरावा? तुमच्या पैकी कोणी शिवरामला कोणाकडून काही घेतांना प्रत्यक्ष पाहिले आहे का? किंवा लांच देणाऱ्यांपैकी कोणी येऊन तुमच्याकडे तक्रार केली आहे?"

"मालक, अशा प्रकारच्या अफवांच्या मागे काही पुरावाच मिळाला तर शिवरामला तुरुंगात नसते का पाठविता आले?" रघुनाथराव म्हणाले.

जमिनदाराने स्वतः दिवाणसाहेबांना बोलावून त्याच्या विरुद्ध उडालेल्या अफवांविषयी चवकशी करायला सांगितले.



दुसऱ्याच दिवशी दिवाणसाहेब रघुनाथरावांना बरोबर घेऊन शिवरामच्या घरी गेले, जणुकाय कचेरीत काम करणाऱ्या सहकाऱ्यांशी मैत्रीभाव दर्शविण्यासाठी. त्यावेळी शिवराम आपला एक सहकारी लक्ष्मणराव याला कर्जाऊ रक्कम देत होता. दिवाणसाहेब स्मित करून म्हणाले—"शिवरामपंत तुम्ही आपल्या पगाराशिवाय वरची प्राप्ती म्हणून लोकांकडून काही पैसे सुद्धा घेतां म्हणे आणि म्हणून तुमचा संसार चैनीत चालू आहे. परंतु आम्ही काही उलटच पाहातों आहों. तुम्ही सहकाऱ्यांचे हात गरम करतां आहां!"

दिवाणसाहेब म्हणाले ते ऐकून लक्ष्मणराव दचकले. परंतु शिवराम थोडादेखील गडबडला नाही. तो दिवाणसाहेबांना बसायला आरामखुर्ची देत म्हणाला—"दिवाणसाहेब, लक्ष्मणराव माझे सहकारी आहेत. त्यांच्यावर काही तरी कठिण प्रसंग आला आहे. म्हणून अडचणीच्या वेळी मी थोडी मदत करतो आहे, एवढेच!"

दिवाणांनी लक्ष्मणरावांकडे चकित नजरेने पहात विचारले—"काय हो, कचेरीत तुम्ही दोघे एकाच तऱ्हेच्या कामावर एकाच पगारावर कामे करतां आहां. मग शिवरामपंतांवर जो प्रसंग कधी ओढवला नाही तो तुमच्यावर कसा काय ओढवला?" नंतर शिवरामकडे वळून म्हणाले—"काय हो, तुमच्यावर कोणताही प्रसंग ओढवत नाही? आनंदाने तुमचा संसार चालू आहे!"

"दिवाणसाहेब, मला जो पगार मिळतो त्यापैकी एक भाग घरखर्चासाठी निराळा

काढून ठेवतो. औषधपाण्यासाठी काही रक्कम निराळी ठेवतो. उरलेल्या पगारातील काही रक्कम सणवार नवीन कपडे विकत घेण्यासाठी म्हणून काढून ठेवतो अशातऱ्हेने तीन चतुर्थांश पगार कुटुंबाच्या सुखसोयीसाठी खर्च होतो. उरलेला एक चतुर्थांश पगार नोकरी गेली किंवा विशेष काही अडचण आली तर त्यासाठी म्हणून निराळा ठेवतो. याच रकमेंतून कधी कोण्या मित्राला कर्ज लागलं तर ते देतो." शिवरामपंतांनी आपली बाजू मांडली.

"हे सर्व ठीकच आहे की! आयुष्य एका सायुक्तिक चाकोरीतून घालविण्याचा हाच मार्ग आहे! परंतु तुमच्या सारख्यांना पाहून त्याचे अनुकरण तुमचे सहकारी कां करीत नाहीत? उलट हे लोक तुमच्या विषयी नसत्या अफवा मात्र पसरवीत फिरतात?" दिवाणांनी थोडया चढत्या सुरातच विचारले.

त्यानंतर दिवाणसाहेब जमिनदार साहेबांना भेटले आणि निवेदन केले— "शिवरामपंत आपल्या प्राप्तीप्रमाणे अंथरूण पाहून पाय पसरणारी एक सूज्ञ व्यक्ती आहे. ते आपल्या मितव्ययाच्यासंवयीमुळे पगारातीलच काही रक्कम शिलकेत टाकतात आपल्या इतर नोकरवर्गाची पद्धत अगदी उलटी आहे. आपली संवय बदलण्या ऐवजी हे लोक शिवरामपंताविरुद्ध खोटया अफवा पसरविण्यात मग्न असतात.

जमिनदार म्हणाला—"अस्सं, तर मग ही चूक आहे तर! त्यांच्या विरुद्ध खोटया कंडया पिकविणारां विरुद्ध तुम्ही शिस्तभंग केल्याबद्दल आवश्यक कारवाई करा!"

दिवाणसाहेब म्हणाले—"प्रभो! शिवराम पंतांसारखी माणसं फार थोडीच असतात. असे लोक सद्‌वर्तणुकीने लोकप्रिय होण्या-ऐवजी शंकेला पात्र ठरतात. शिवरामपंतांचा ओहोदा आपण दिला तर हेवा करणाऱ्या सहकाऱ्यांना शिक्षा करेण्याची गरज उरणार नाही."

त्यानंतर जमिनदारसाहेबांनी दिवाणांच्या सल्ल्याप्रमाणे शिवरामपंतांना खजिनदाराचा सहायक म्हणून नेमले.



# विद्याध्यमनाचा मंत्र

नारायण दीक्षित नावाच्या एका मुलाला त्याच्या वडिलांनी विद्याध्ययनार्थ एका गुरुकुलात पाठविले. नारायण फार आळशी होता. पहाटे पांच वाजतां उठून धडा पाठ करायचा त्याच्या जिवावर येई. तरी तसे नियमपूर्वक अध्ययन केल्यास विद्याध्ययन पूर्ण होईल असे वडिलांना वाटत होते.

एके दिवशी एक स्वामी त्या गुरुकुलात आले. आपल्या शिक्षक वर्गाच्या तोंडी नारायण दीक्षिताने असे ऐकले होते. की स्वामीजी एक अधिकारी पुरुष आहेत व मंत्रशास्त्रविद्येत पारंगत आहेत.

एके दिवशी सायंकाळी स्वामीजी एक झाडाखाली बसून काहीतरी वाचीत होते. तेव्हां त्यांच्याजवळ जाऊन नारायण दीक्षिताने त्यांना विचारले—"सहजी विद्याध्ययन होऊ शकेल असा काही मंत्र आहे का?"

स्वामीजींनी गंभीरपणे नारायण दीक्षिताच्या डोळयात खोल पाहिले व डोळे मिटून म्हणाले—"कां नाही, मुला, सरस्वतीचा अनुग्रह मिळविण्यासाठी एक मंत्र आहे."

"तरमग आपण मला त्या मंत्राचा उपदेश करावा." नारायण म्हणाला.

स्वामीजी स्मित करून म्हणाले—"ठीक; परंतु दररोज पहाटे चार वाजतां उठून स्नान करून त्या मंत्राचा जप करावा लागेल. असे चौदा वर्षे केलेस तर सरस्वती प्रसन्न होऊन सर्व विद्यांचे दान तुझ्या पदरात घालील.

ते उत्तर ऐकून नारायण दीक्षित घाबरून गेला. आणि स्वामीजींचे चरण धरून म्हणाला—"स्वामीजी, मला मंत्रोपदेश नको, मी सामान्य पद्धतीने अध्ययन करून विद्यार्जन करीन."












# दुष्काळाचे तांडवनृत्य

महेंद्रगिरीचा राजा विशालक्ष हा भयंकर संशयी वृत्तीचा राजा होता. त्याचा कधी कोणावरही विश्वास नव्हता. एखाद्या जिल्हाधिकाऱ्याने त्याच्या जिल्ह्यातल्या कामासाठी खर्चा करितां मंजूरी मागितली तर राजाला शंका येई की त्या जिल्हाधिकाऱ्याचा त्यात स्वतःचा काही स्वार्थतर नाही? एकदा राज्यात त्या उज्वल मंडळ नावाच्या भागात लागोपाठ दोन वर्षे पावसाच्या अभावी दुष्काळ पडला. परिस्थिती फारच गंभीर होती.

त्या मंडळाधिकाऱ्याचे नाव गरूडवर्मा असे होते. त्याने राजाकडे त्या मंडळातील गंभीर स्थितीचे वर्णन लिहून पांचलक्ष रूपयांची मदत हवी असल्याचे निवेदन पाठविले.

विशालाक्ष महाराजांनी निवदेन वाचले व चंद्रवर्मा याच्याकडे वळून स्मित करून म्हणाला–"यात गरूडवर्माचा वाटा किती असावा असे तुम्हांला वाटते?"

राजाने विचारलेला प्रश्न ऐकून मंत्र्याला फार वाईट वाटले. कारण उज्वल मंडळात पडलेल्या भयंकर दुष्काळाची माहिती मंत्र्याला पूर्वीच मिळाली होती. त्या भागात राहणाऱ्या काही नातेवाइकांकडून मंत्र्याला तेथील परिस्थितीची चांगली कल्पना होती.

चंद्रवर्मा त्याला जे माहीत होते ते निवेदन करण्याच्या विचारात होता. परंतु राजाने गरुडवर्मा वर जसा संशय केला तसा आपल्यावर ही करील या भीतीने चंद्रवर्मा म्हणाला–"महाराज, गरुडवर्माच्या निवेदना विषयी मला काही माहीत नाही. परंतु एवढे खरे की त्या मंडलात भयंकर दुष्काळ पडल्याच्या बातम्या राजधानीत पसरल्या आहेत."

"तसे असेल तर, मंत्री, आपण स्वतः जाऊन परिस्थितीचे अध्ययन करून आपलं निवेदन द्यावे." राजा विशालाक्ष चंद्रवर्माला म्हणाला.

मंत्री चंद्रवर्मा दुसऱ्याच दिवशी उज्वल मंडळाला निघाला. तो मंडळाधिकारी गरुडवर्मा याला भेटला व दुष्काळाची परिस्थिती पहात असता त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वहात होत्या. शेत ओसाड पडलेली होती, व त्यात पडलेल्या गुरांच्या प्रेतांवर कुत्री व गिधाडांची मेजवानी चाललेली होती. भुकेने कासावीस झालेली प्रजा, अस्थि पंजर स्थितीत भटकत होती चंद्रवर्मा अंदाजाने किती मदत करणे आवश्यक होईल याचा विचार करून गरुडवर्माला म्हणाला–"तू महाराजांकडून पांच लक्ष रुपयांची मदत मागितली आहेस, ती काय पुरणार? कमीत कमी दहा लक्ष रुपये खर्च केलेस तरच या दुष्काळाने झालेल्या नुकसानाची थोडी फार भरपाई होईल."

त्या प्रमाणे चंद्रवर्माने दुष्काळाच्या परिस्थितीचे वर्णन करून कमीत कमी दहा लक्ष रुपये तरी सहाय्यार्थ खर्च करावे लागतील असे राजाजवळ जाऊन निवेदन केले.



राजाने निवेदनातील दुष्काळाचे वर्णन वाचले व अल्पमात्रही विचलित न होतां म्हणाला–"म्हणजे तो मंडळाधिकारी बराच बस्ताद दिसतो आहे म्हणावयाचा त्याने तुम्हांला सुद्धा आपल्या बाजूला वळवून घेतले तर!" असे म्हणत राजा थोडा हंसला.

मंत्र्याला भयंकर राग आला, परंतु तो आवरून म्हणाला–"महाराज, तेथील परिस्थिती किती भयंकर आहे, हे मी स्वतः पाहून आलो आहे. मंडलाधिकाऱ्याने मागणी केलेली रक्कम कोणत्याही परिस्थितीत पुरी पडणार नाही. माझ्या मते, महाराजांनी स्वतः एकदां पाहणी करून का

श्री रा. व. सर्वे

येऊ नये? आताच्या आत्ता आपण जाऊन पाहून यावे."

राजा दोन एक मिनिटे विचार केल्यावर म्हणाला–"ठीक, परंतु तुम्ही सुद्धा माझ्या बरोबर आले पाहिजे!"

दुसऱ्याच दिवशी विशालाक्ष राजा आपल्या मंत्र्याबरोबर उज्वल मंडळाची पाहाणी करण्यासाठी निघाला. राजधानी-सोडून काही अंतर चालून गेल्यावर राजाला हिरव्यागार शेतांच्या बाजूला उघड्या जागेवर जनावरांची मढी पडलेली दिसली. ती पाहून राजा खिन्न झाला.

राजाने मंत्र्याला ती दाखवून विचारले–"काय हो, आपल्या राजधानीच्या परिसरात राहणारे लोक साफसफाईच्या बाबतीत निष्काळजी दिसताहेत. नाही तर मेलेली जनावरे उघड्या मैदानात टाकून देणे किती मूर्खपणाचे आहे? ह्या जनावरांची विल्हे-वाट रीतसर व्हायला हवी होती! ती केली गेलेली नाही ते का?"

"महाराज, सामान्यपणे मेलेल्या जना-वरांना कोणी जाळीत नाही की पुरून टाकीत नाही. आपल्या गावातली कुत्री व जंगलात राहणारे कोल्हे लांडगे उज्वल मंडळाकडे गेले असावेत, असे मला वाटते!"

ते उत्तर ऐकून उज्वल मंडळात चालू असलेल्या दुष्काळाच्या तांडव नृत्याची कल्पना राजाला झाली. त्याचा कंठ दाटला व सारथ्याला रथ राजधानीकडे परत नेण्यास त्याने आज्ञा केली.

"महाराज, हे काय? आपण उज्वल मंडळाच्या पाहणीला जात आहो, नाही का?" प्रधानाने विचारले.

राजाने मंत्र्याला त्याचे कांहीच उत्तर दिले नाही. परंतु राजवाड्यात पोंचतांच त्याने उज्वल मंडळास सहाय्य निधी म्हणून वीस लाख रुपये पाठविण्यास मंजुरी दिली. आणि त्याच बरोबर इतर सहाय्यार्थ सर्व मदत करण्यास व देखरेख करण्यास स्वत: मंत्र्याला पाठविले.




# शिष्टाचार

श्रीकांतला असे वाटे की. तो एक चांगल गायक आहे. एके दिवशी रस्त्यावरून जाणाऱ्या कुमारगुप्तला अडवून त्याने एक गाणे म्हणून दाखविले. आणि विचारले "माझे गाणे आपणाला कसे वाटले?"

"तुमचे नाक खुप सुंदर आहे" कुमारगुप्तने पटकन उत्तर दिले. श्रीकांतने विचारले–"मी माझ्या गाण्याबद्दल तुमचे मत विचारले तर तुम्ही माझ्या नाकाची प्रशंसा कां करत आहांत?"

"हा माझ्या कुटुंबाचा प्रघात आहे." कुमारगुप्त म्हणाला.

"गाण्याची बाब सोडू माझ्याच नाकाची चर्चा करणे हा कसला प्रघात आहे?" श्रीकांत म्हणाला.

"समजा, कोणीही कोठल्या बाबतीत आमचे मत विचारले आणि जर ती गोष्ट अशावेळी आम्हांला आवडली नाही, त्याच्यामध्ये जी गोष्ट आवडते, त्याचगोष्टीबद्दल मत देणे यालाच शिष्टाचार म्हटले जाते. ही गोष्ट माझ्या आजोबांनी माझ्या वडिलांना व वडिलांनी मला सांगितली आहे." कुमारगुप्त म्हणाला.





# जलदान

विंध्य पर्वतात एक शेतकरी रहात असे. त्याला गंगा नावाची एक मुलगी होती. ती लहानपणापासूनच बकऱ्या व मेंढरे चरायला घेऊन जात असे. मेंढरे चरायला नेत असल्याकारणाने ती खूप हिंडत असे.

गंगाला एके दिवशी एक विचित्र रोपटे दिसले. ते उघड्या मैदानात होते. मेंढरां बकऱ्यांच्या तोंडी ते रोपटे केव्हांच नष्ट झाले असते. तो विचार मनात येतांच तिने रोपटे उपटून एका उंचवट्याच्या जागी दगडांधोंड्यांच्या अडचणीच्या जागी तिने ते लावले. ती दररोज त्याला शेजारच्या तळ्याचे पाणी आणून घाली.

काही वर्षांनी ते रोपटे वाढून एका महावृक्षाच्या रूपात बदलले, त्या झाडा-खाली गार सावली होती. त्या झाडांवर पक्ष्यांनी आपली घरटी बांधली. गंगा आपली मेंढरे व बकऱ्या चरायला त्याच भागात घेऊन येई आणि दुपारच्या वेळी त्या झाडाच्या सावलीत विश्रांती घेई. कडक उन्हाळ्यात जवळपास चरणारी सर्व जनावरे त्याच झाडाखाली बसून रवंथ करीत. विश्रांति घेत.

त्या झाडाजवळच एक तलाव होता. त्या तळ्याच्या चारीबाजूला अनेक खेडेगावे होती. एकाही गावात पिण्याच्या पाण्याची एकही विहिर नव्हती. अर्थातच सर्व गावकरी पिण्याच्या पाण्यासाठी त्या तलावावरच अवलंबून होते. ऐन उन्हाळ्यातही त्या तलावात पाणी मिळे. उन्हाळ्याच्या दिवसात कधीकधी लोक तलावात खड्डे खणून त्यातल्या पाण्यावर उन्हाळा काढीत. तो तलाव कोरडा पडला की आसपासच्या पंचक्रोशीत दुष्काळाचे सावट येई.



एके वर्षी पाऊसच पडला नाही, म्हणून तलाव भरला नाही. शिवाय त्या वर्षी उन्हाळा कडक पडला, म्हणून तलाव कोरडा झाला. झाडे झुडपे वाळून गेली. गवत हिरवळ कोठेही दिसेनाशी झाली. गुरांना चरायला जागा उरली नाही. पाण्यासाठी लोक गावे सोडून निघून जाऊ लागले जनावरे पाणी न मिळाल्याने अंग टाकू लागली.

एके दिवशी दुपारच्या सुमारास गंगा, तिने लावलेल्या झाडाजवळ आली. तिला एका गोष्टीबद्दल फार काळजी वाटत होती, हे झाडही वाळून जाणार तर नाही? परंतु त्या झाडाला नवीन पालवी फुटलेली होती. लोक त्या झाडाच्या थंड सावलीत बसून विश्रांती घेत होते. गंगाला फार तहान लागली होती. झाडाच्या सावलीत बसून, आतां या जगात आपले वास्तव्य फार दिवस नाही, असा विचार करीत होती. तिच्या घशाला कोरड पडली होती. त्याच झाडाखाली शेवटचा श्वास घेण्याचे ठरवून ती तेथे आली होती. दुरूनच तलावात एक थेंबभरही पाणी नसल्याचे तिला दिसले होते. तलावाला मोठमोठ्या चिरा पडल्या असल्याचे पण तिला दिसले.

त्याच वेळी तिला भ्रम झाल्यासारखे झाले. झाडाच्या बुंधावर तिला मनुष्या-



कृतीसारखं काहीतरी दिसलं व तो माणूस म्हणत होता–"गंगा, तू कित्येक दिवस खत पाणी घालून वाढविलेस. त्याबद्दल मी तुला वाटेल तितकं पाणी देतो. तू माझं एक मूळ उपटून पहा, तुला पाणी मिळेल. पाणी पिऊन झाल्यावर ते मूळ पुन्हां त्याच जागी पुरून ठेव. परंतु लक्षात ठेव हे गुपित इतर कोणाला कळतां कामा नये."

गंगेला स्वत:च्या कानांवर किंवा डोळ्या-वर विश्वास होईना. तिने उभी राहून चारीबाजूला नजर फिरविली. एका दगडा-वरून जाऊन एक मूळ एका जागी जमिनीत शिरले होते. गंगेने ते मूळ आपले सर्व बळ










एकवटून उपटले. तत्क्षण त्या मुळाच्या भोकातून एक फवाऱ्यासारखी जलधारा उडू लागली. गंगेने स्वत:ची तहान भागवून पुन्हां ते मूळ त्याच जागी पुरून ठेवले.

तितक्यात एक वृद्ध माणूस तेथे आला तहानेने त्याचा जीव कासावीस झाला असल्याने बेशुद्ध झाला. गंगा मूळ उपटायला निघाली. त्या वेळी एक आवाज तिला ऐकू आला–"गंगा तू मूळ उपटलेस तर तुझ्या जिवाला धोका आहे!"

ती धमकी ऐकून गंगा थोडी देखील घाबरली नाही. तिने मूळ उपटले व म्हाताऱ्याला जलधारे पर्यंत पोंचविले. म्हाताऱ्याने पोट भरून पाणी पिऊन घेतले. त्याच्या जिवात जीव आला. गंगेने याखेपेस मूळ पुन्हां त्याच्या जागी न ठेवता त्या वृद्ध माणसाला सांगितले–"आजोबा, तुम्ही जाल तिथे लोकांना सांगत जा की येथे भरपूर पाणी आहे! मी येथून कोठेही जाऊ शकणार नाही." म्हातारा निघून गेला

गंगा त्या जलधारेकडे पहात राहिली. ती फवाऱ्यासारखी धारा वाढू लागली व पाणी तलावाच्यादिशेला वळले. गंगा झाडाकडे पाहून म्हणाली–"वृक्षदेवते! मी तुझ्या आज्ञे विरुद्ध हे कार्य केले. सहस्रावधी लोकांचा जीव वाचून माझा जीव जाणार असेल तर मी आनंदाने जीव द्यायला तयार आहे. माझ्या प्राणांची आता तुझ्या चरणी अर्पण!"

त्या पाठोपाठ झाडाच्या बुंधावर पुन्हां तो चेहरा प्रगट झाला–"मी भक्त तुझी परीक्षा घेण्यासाठीच ती धमकी दिली होती. तुझ्यासारख्या गुणी मुलीचा जीव मी कसा घेईन? तू मला कधी काळी पाणी दिले होतेस, त्या जलदानाबद्दल मी हा तलाव भरून देऊन उपकाराची फेड करण्याचा प्रयत्न करीन." असे म्हणत तो चेहरा अदृश्य झाला.

थोड्या वेळाने तलाव भरला व जवळपासच्या खेडे गांवांवर आलेले दुष्काळाचे सावट टळले.





# विष्णु पुराण

सत्यव्रत म्हणाला ते ऐकून मासा समुद्राच्या मधोमध गेला आणि एका मोठ्या डोंगरासारखा वाढत वाढत त्याने सर्व महासागर व्याप्त केला व म्हणाला–"सत्यव्रता! पाहिलेस तू म्हणालास ते अमोघ ठरले, पाहातो आहेस ना! आणखी काम चालूच आहे. असा आणखी वाढत वाढत काय होतों, नकळे!"

तेव्हां सत्यव्रत हात जोडून नमस्कार करीत म्हणाला–"मत्स रूपात असलेल्या हे नारायणा! मी रक्षण कर म्हणतांच आलास आणि माझ्या रक्षणार्थ मत्स्यावतार धारण केलास. तुझी अगाध लीला कळण्या इतका मी कोठे आहे रे?" अशाच तऱ्हेने अनेक प्रकारे नारायणाचा स्तुतिपाठ केला.

तेव्हां मत्स्यावतार धारण केलेला विष्णु म्हणाला–"अरे राजा! सात दिवसात कल्पांत होणार आहे. व सर्व जग जलमय होईल. ज्ञान, औषधी वनस्पती व बीजें नष्ट होता कामा नयेत. पुढे येणाऱ्या कल्पात ही सर्व नसतील तर कसे चालेल? म्हणून या सर्वांचे रक्षण झाले पाहिजे. तुझ्यासाठी एक मोठी नौका, धनांधकारत जसा दिवा, तशी येत आहे. तीत सप्तर्षी असतील ती ज्योती त्यांचीच समज!"

"औषधी वनस्पती, बियाणाच्या राशी वगैरे. तू आपल्या बरोबर नौकेत भर! माझ्या नाकावरच्या शिंगाने मी तुम्ही नावेत असाल ती नाव बुडू नये व तिचे रक्षण व्हावे यासाठी सर्व प्रयत्न करीन.



म्हणून मी असर अवतार धारण केला आहे. ब्रह्मदेव जागा होई पर्यंत नाव ध्रुव ताऱ्याच्या दिशेने तरंगत जात राहील. येणाऱ्या कल्पात तू वैवस्वत या नावे मनू होशील!" असा नारायणाने आदेश दिला.

सत्य व्रताने विष्णूला गुढगे टेकून नम्रपणे नमस्कार केला.

मत्स्यावतार आपल्या चारही कल्ल्यांनी पोहीत आणि शेपटी पाण्यावर आपटीत वेगाने लाटांना कापीत खोल निघून गेला.

ब्रह्मदेव गाढ झोपेत होता. सर्वत्र अंधकार पसरला व जग काळोखात बुडाले.

हयग्रीव नावाचा सोमकासुर तलातल पाताळ लोकातून समुद्राच्या पातळीवर येऊन वटवाघळासारखा ब्रह्मदेवाचे निवासस्थान जो सत्यलोक तेथे उडत गेला.

ब्रह्मदेव झोपेतच जांभया घेत असतां चारही मुखांतून अनुक्रमे पांढरा शुभ्र, लाल, पिवळा व निळा या रंगाचे प्रकाश रूपे चारही वेद बाहेर येऊन बाजूला पडले. हयग्रीवाने ते वेद चोरले आणि समुद्राच्या तळाला खडकात नेऊन लपवून ठेवले.

हयग्रीवासुर देवांचा व विष्णूचा घोर शत्रू होता. वेद नसतील तर ब्रह्मदेवाला सृष्टी करतां येणार नाही. कल्पकल्पात, चांगले काही उन्नत काही करावे हे विष्णूचे कार्य परंतु ते नष्ट करणे हाच हयग्रीवासुराचा मुख्य धंदा होता.

प्रलयकालात समुद्रात पृथ्वी बुडली समोर दृष्टी ठेवून जात असलेल्या सत्यव्रताला अंधःकारात दूर लहानशा नक्षत्रासारखी दिसून मोठी होत गेलेली व जवळ येत असलेली एक ज्योति दिसली. तीच सप्तर्षींच्या कांतीने लकाकत दिसणारी नाव होती. अनेक औषधी वनस्पती, नानाप्रकारची बियाणी त्या नावेत घालून सत्यव्रत नारायणाचे स्तोत्रगान करीत त्या नावेत बसला व पुढे जाऊ लागला. मत्स्यावताराच्या नाकावर उभे एक शिंग होते. नक्षत्रासारखे ते शिंग चमकत होते. त्या शिंगाच्या टोकाला गुंडाळी करून धरून एक मोठा



नाग एकाद्या दोरखंडासारखा बांधलेला होता व नावेला धरून आपली फडा विस्फारित करून प्रलय काळातील तुफानाला फाडून टाकीत जणुकाही दिशेला गिळीत होता. मत्स्यावतार आपल्या कल्ल्यांनी लाटाची चीरफाड करीत समुद्राला कापीत ती नाव सुरक्षितपणे घेऊन चालला होता. ध्रुवनक्षत्राला गंतव्यस्थान मानून नाव एखाद्या फुलासारखी तरंगत पुढे जात होती.

समुद्राच्या तळाला लपवून ठेवलेल्या वेंदावर पाहारा ठेवीत सोमकासुर समुद्रातच घिरट्या घालीत होता. चारही वेद लहान बालकरूप धारण करून लहान अर्भकासारखे मोठ्याने रडत होते. मत्स्यावतार धारण केलेला विष्णु वेदांचाशोधकाढीत हिंडत होता.

एका विशाल माशाला पाहून सोमकासुर घाबरला होता तरी बळेच धैर्य दाखवून आपली काटेरी दगडी गदा घेऊन त्या माशाला तोंड द्यायला आला.

तेव्हां विष्णू कंबरे पर्यंत माशाच्या रूपातच राहून वरील भाग चतुर्भुज रूपे प्रगट झाला. त्या मत्स्य मूर्तीचे व सोमकासुराचे घनघोर युद्ध झाले.

सोमकासुराने समुद्राच्या तळाला पळ काढण्याच्या विचार केला विष्णुने आपले सुदर्शन चक्र टाकून सोमकासुराचा वध



केला. त्याचे सर्वांग तुकडे तुकडे होऊन पडले. विष्णूने लहान शिशुरूपात असलेले वेद उचलून घेतले व दोघां दोघांना दोन्ही खांद्यावर उचलून घेतले व पाण्याबाहेर आला. ती मुलं विष्णूच्या छाती वरचे श्रीवत्स चिह्न व गळ्यातील हारातला कौस्तुभमणी आपल्या चिमुकल्या हातांनी धरून खेळू लागली व मोठमोठ्याने ओरडून बालक्रीडा करू लागली ती चारही मुले अनुक्रम पांढरी शुभ्र, लाल, पीत व नील कांतीची होती. विष्णूच्या उरलेल्या दोन्ही हातांत शंखचक्र शोभायमान होती. विष्णूला मत्स्यावतार रूपात पाहून ऋषी व सत्यव्रत आनंदातिरेकाने देहभान



विसरून दोन्हीहात जोडून स्तोत्रपाठ करू लागले. प्रलय काळातला समुद्र शांत झाला. नौका आपला गम्यस्थानी येऊन पोंचली.

ब्रह्मदेवाची रात्र संपत आली व दिवस उजाडू लागला. त्याची झोपेची वेळ संपत आली. प्रकाश झोत विस्तीर्ण आकाशात पसरू लागले. नवीन कल्पारंभाची चिन्हें दिसू लागली. सरस्वती प्रथम जागी झाली. तिने वीणेच्या तारा जुळविल्या व भूपाली रागिणीचे स्वर छेडू लागली. ब्रह्मदेव जागा झाला व त्याला चारही डोक्यात काही तरी गडबड, कसली तरी उणीव असल्याचा भास झाला. जास्त खोल विचार करून पाहिला तर त्याला त्यांत वेद नसल्याचे आढळले. वेद नाहीसे झालेले कळल्या बरोबर ब्रह्मदेव सर्वस्व घालवून बसल्या सारखा चिंतामग्न झाला असतां विष्णूने मत्स्यावतारात प्रगट होऊन त्याला चारही वेद आणून दिले.

ब्रह्मदेव विष्णूला मत्स्यरूपात पाहून डोळ्यांचे पारणे फिटल्यासारखा आनंदित झाला व हात जोडून विष्णूची स्तुती करू लागला. म्हणाला–"हे नारायणा! तुझ्या या मत्स्यावताराचे कोणी ध्यान केल्यास त्याच्यावर कल्पांतातून सुटका मिळाल्यासारखा ब्रह्मानंद होईल व त्यांचा अज्ञानांधकार दूर होईल.

ज्यासाठी विष्णूने मत्स्यावतार धारण केला होता ते कार्य पूर्ण झाले. विष्णू अंतर्धान पावला आणि वैकुंठलोकास निघाला.

ब्रह्मदेवाने वेद ग्रहण केले आणि सृष्टी सुरू केली. नवीन कल्पांत वैवस्वत नामें जन्मलेला सूर्यपुत्र सत्यव्रत याने नवीन मनु प्रारंभ केला व तो वैवस्वत मनू या नावाने तो प्रसिद्ध झाला.

सप्तर्षी आकाशात स्वस्थानी पोचले आणि उत्तर ध्रुवाला सृष्टीक्रमा प्रमाणे प्रदक्षिणा घालू लागले. असे सूत महर्षींनी सांगितले तेव्हां मुनी म्हणाले–"सूत मुनिवर्मा! आम्हांला ध्रुव चरित्र ऐकण्याची इच्छा आहे!"





सूत महर्षी ध्रुवाची कथा सांगू लागले :

या विश्वात सर्वोच्च स्थान कोणते असेल तर ते ध्रुवमंडल होय. तेच स्थान विश्वस्वरूप जो विष्णू त्याचे शीर्ष स्थान.

ते अति उन्नत असे पद ध्रुवाने प्राप्त केले होते. ध्रुव हा उत्तानपाद राजाचा मुलगा होता. ध्रुवाच्या आईचे नाव सुनीती होते ती उत्तानपाद राजाची थोरली राणी. राजाच्या दुसऱ्या राणीचे नाव सुरुची होते. सुरुची ही राजाची लाडकी राणी होती.

एकदां उत्तानपाद राजा सुरुचीसह बोलत बसला असतां सुरुचीचा मुलगा उत्तम राजाच्या मांडीवर बसला होता. राजा त्याच्याशी लाडीकपणे बोलत होता. त्याच वेळी ध्रुव तेथे आला व तो ही राजाच्या मांडीवर बसण्याच्या हेतून जवळ येऊन राजाकडे पाहू लागला. सुरुची तेथेच होती· राजा तिच्याकडे पाहून थोडासा भ्याला व ध्रुवाला न पाहिल्याचे सोंग करून गप्प राहिला. धाकट्या भावाला बापाने मांडीवर घेतले तसे आपल्यालाही घेईल अशी आशाधरून बसलेल्या ध्रुवाच्या डोळ्यात निराश झाल्यामुळे पाणी आले. त्याच्या गालावर अश्रु बिंदु मोत्यां सारखे झळकू लागले. ते पाहून सुरुची खदखदां हसली व म्हणाली–"त्या अभागिनीच्या पोटी जन्मलास ना रे! तू किती तपश्चर्या केलीस तरी तुला माझ्या मुलाच्या बरोबरीने बापाच्या मांडीवर बसायला मिळायचे नाही! माझ्या पोटी जन्माला यायला हवे. समजले. तू नारायणाचा स्तोत्रपाठ करतोस ना! तू तपश्चर्या करून नारायण तुला ते ते भाग्य देतो का, विचारून पहा!" या शब्दात तिने ध्रुवाची हेळणा केली.

त्याला फार दुःख झाले व भयंकर रागही आला. कोरड्याने सावत्र आईला बडवून काढावे असे त्याला वाटले. तलवार घेऊन उभी चिरून काढायचा विचार त्याच्या मनात आला. तेवढ्यात सुरुची म्हणाली–"बाळा, तू नारायणावर विश्वास ठेव आणि तपश्चर्या कर जा!" तो सुरुचीचा उपदेश आहे ध्रुवाला



वाटले. इतका थोर उपदेश ऐकून ही न समजणारा उत्तम दुर्दैवी भोळाच पाहिजे, असे ही ध्रुवाला वाटले. उत्तानपाद राजा किंकर्तव्य विमूढ होऊन आकाशाकडे पाहू लागला.

ध्रुवाने सुरुची तोंडी तो गुरूपदेश मिळाला असे समजून सुरुचीला गुरु भक्तीने नमस्कार केला व तेथून निघून गेला. ध्रुवाने केले त्याचा सुरुचीला काहीच बोध झाला नाही. ती थक्क होऊन म्हणाली–"मुलगा शाहणा दिसतो, चार शिव्या दिल्या तरी नमस्कार करून गेला. नमस्कार करणार नाही तर काय करणार? माझ्या समोर उलटण्याची त्याची छातीच काय, त्याच्या आईची तरी छाती होईल का?" असा विचार करून मनातल्या मनात खूष झाली. मुलाच्या डोळ्यांना पाणी आलेले पाहून व दासीच्या तोंडी घडलेले वृत्त ऐकून सुनीतीला अपार दु:ख झाले. तरी स्व:तला सावरुन ती म्हणाली–"होयरे, बाळा! दासीहून असलेल्या माझ्या पोटी तू कशालारे जन्मलास? तुझ्या सावत्र आईने सांगितले ते खरे आहे; तुला त्या नारायणाशिवाय दुसरा आधार नाही."

ते ऐकून ध्रुव धैर्याने उठला व म्हणाला–"आई, मी तपश्चर्या करायला जातो."

"काय, तू तपश्चर्या करणार? सुरुचीच्या पोटी जन्म मिळावा म्हणून तपश्चर्या कर!" म्हणाली.

"आई, थांब, पुन्हां ते शब्द उच्चारू नकोस! मी तुझा मुलगा आहे. आणखी कोणाच्या पोटी जन्माला येण्याची मला गरजच नाहीं. तसा विचार करणे म्हणजे आत्महत्ये सारखे पापकर्म होय. जगाच्या तोंडून ध्रुवाची आई किती भाग्यशालिनी होती असे युगुनयुगे म्हणविण्यालायक मी नारायणाचे स्मरण करून तपश्चर्या करतो!" असे सांगून ध्रुव आईचा निरोप घेऊन तेथून निघाला. त्याला वाटेत नारद महर्षी भेटले. म्हणाले–"अरे ध्रुवकुमार का? खेळायला निघालास वाटतं?"

"मुने, मी तपश्चर्या करायला जात आहे." ध्रुव उत्तरला.

"तपश्चर्या म्हणजे एक खेळच आहे, म्हणावयाचे! घरी जाऊन चांगला खेळ!" नारदमुनी म्हणाले.

"खेळ नव्हे, खरोखरच तपश्चर्या करायला निघालो आहे, मुनिवर्या!" ध्रुव म्हणाला.

"अस्सं! तरमग कळलं! परंतु तपश्चर्या कशासाठी रे ध्रुवा! माझ्या बरोबर चल. तुझा बाप तुला मांडीवर कां घेत नाही, मी पाहातो!" नारद म्हणाला.

"मला कोणाच्या कृपेची गरज नाही; स्वामी! सर्वांत थोर असतो नारायण त्याचा अनुग्रह मला हवा आहे! म्हणून तपश्चर्या करण्यासाठी जंगलात जात आहे! ध्रुव म्हणाला.

"तपश्चर्या म्हणजे गप्पा नव्हेत बाळा! जंगलांत वाघसिंह वगैरे क्रूर हिंस्र पशू असतात. ऊन, पाऊस व वारा सर्व सहन करावे लागतात. तू माझं ऐक व घरीं परत चल!" नारदाने अनेक प्रकारे ध्रुवाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. नारद म्हणाला ते ऐकून ध्रुव म्हणाला—

"मी क्षत्रिय आहे! पराभव मला कधी सहन होणार नाही. त्या पेक्षा मरण पत्करले. मला भित्रीभागू बाई करण्यासाठी आलात का मुनींद्रा!"

"बाबा ध्रुवा! तुझ्या मनाची किती तयारी आहे, हे पाहण्यासाठी मी सर्व म्हटले. माझी सुद्धा एकेकाळी एखाद्या अनाथ असहाय्य मुलासारखी स्थिती झाली होती. मला अनेक प्रकारे अपमान सहन करावा लागला होता. मला कित्येक संकटांना तोंड द्यावे लागले होते. तरी जंगलात जाऊन मी तपश्चर्या केली होती! तू मधुवनात जा व तेथे "ओम् नमो नारायण" असा जप करीत तपश्चर्या कर. मी तुला आशीर्वाद देतो. तुझा निश्चय कृतार्थ होवो!" असे म्हणत 'नारायण!" नारद म्हणाला." अशा तऱ्हेने सूत महर्षींनी कथा सांगितल्यावर सर्व मुनी म्हणाले—"मुनिवर्या! नारदाला संकटांना कां तोंड द्यावे लागले? नारदाचा वृत्तांत ऐकण्याची फार इच्छा आहे!"





# बोला फुलाची गांठ

हसन आणि त्याची पत्नी गरीबीने वैतागून पोट भरण्यासाठी बगदाद शहरीं आली. दिवस भर कामाच्या शोधांत शहरांतील गल्ल्या-बोळांतून त्यांचे वण-वण फिरणें एका भल्या गृहस्थानें पाहिले त्याने एके दिवशी हसनला बोलावून विचारले, "दररोज तुम्ही असे वण-वण करीत का फिरतांहांत?"

"हुजूर! कुठे मोल-मजूरीचे कांही काम मिळाले तर पहावे या आशेने फिरत आहोत," हसन म्हणाला.

"अरे! मग कांही धंदा कां करीत नाहीस?" त्या गृहस्थाने सुचविले.

"काय करूं? मला कोणताही धंदा येत नाही," हसन म्हणाला.

"तर मग, कुऱ्हाड घेऊन अमीन कचेरी जवळ गेलास तर कांही लाकुड-फाटा तोडण्याचे काम मिळेल व, तेवढेच चार पैसे मिळतील," तो गृहस्थ म्हणाला.

दुसऱ्या दिवशी हसन कुऱ्हाड घेऊन अमीन कचेरी पाशी गेला. तिथे त्याला लाकूड फोडण्याचे काम मिळाले अशा प्रकारे चार पैसे मिळू-लागले. त्याची व, त्याच्या बायकोची गुजराण होऊ लागली.

एके दिवशी हसनची बायको त्याला म्हणाली, "अहो, मी हमाम करून यावे म्हणते कांही पैसे आहेत का, द्या बरं!"

हसनने तिला पैसे दिले. ती स्नान-साठी हमाम खान्याला गेली. तिथे बड़ी-बड़ी मंडळी स्नानासाठी जमलेली होती. त्यावेळी तिला आपल्या गरीबीपेक्षा मेलेले बरे, असे वाटले. इतक्यांत, अरे ती पहा राज-ज्योतिष्याची पत्नी! "असे कांही-जणांचे कुजबुजणे ऐकून तिनेसुद्धा मान उंचाऊन, वळून बघितले, राज-ज्योतिष्याची पत्नीं ऐटीत हमामखान्याकडे येत होती.



तिचे वैभव बघून हिला आपल्या दारिद्र्याची लाज वाटली व छे!" हे काय जगणे? राज-ज्योतिष्याची बायको म्हणून जगणेंच खरे! असा विचार करीतच हसनच्या बायकोने स्नान आटोपले. घरी येताच ती नवऱ्याला म्हणाली, "अहो! ऐकलं कां? एक तर तुम्ही आत्तांच्या आत्तां राज-ज्योतिषी व्हा नाहीतर मला सोडून जा, काय ते लवकर ठरवा."

हसन घाबरून म्हणाला "अग! मला लिहतां-वाचतांच येत नाही मी काय राज ज्योतिषी होणार कपाळ!"

"ते सर्व मला सांगू नका, राज-ज्योतिषी झाल्याशिवाय मला तुमचे तोंड दाखवू नका." असे तिने निक्षून सांगितले. गत्यंतर नसल्यामुळे हसनने कांही कागद, दऊत-टांक वगैरे सरंजाम बरोबर घेतला व सार्वजनिक स्नानगृहा समोर चार-चौघांना दिसेल अशा बेताने कुंडल्या मांडीत बसला.

थोड्या वेळाने स्वत: खलीफाची स्वारी बडा हमाम साठी आली. खलीफा कडून कांही खैरात मिळेल या आशेने फ़क़ीर वगैरेंचा घोळका त्यांच्या भोवती होता. खलीफाचे लक्ष वेधून घेण्यासाठी हसन मोठ्याने म्हणाला, "खाविंदांनी मेहरबानी करून इकडे पायधूळ झाडावी."

खलीफांची मर्जी झाली अन् तो स्नान गृहा कडून, दाराबाहेर बसलेल्या या जोतिष्याकडे वळला. त्याच क्षणी स्नान गृहा वरचे छप्पर अचानक कोसळून पडले, सर्वांना त्या जोतिष्या बद्दल आदर वाटून, ते "थोडा उशीर झाला असता तर आज खलीफांचा प्राण गेला असता, हा ज्योतिषी बराच जाणकार दिसतोय, खलीफां वरील केवढे गंडांतर टळले." अशी त्याची तारीफ करूं लागले तिथे आलेल्यांनी स्वत: जवळच्या मूल्यवान वस्तु हसनला भेट म्हणून दिल्या-खलीफां बद्दल तर सांगणे नकोच.

भेट मिळालेल्या सर्व वस्तु घेऊन हसन घरी गेला व म्हणाला, "अगं! बघितलेस का? माझा आदर करून लोकांनी मला केवढ्या देणग्या दिल्या आहेत."

त्याच्या बायकोने आंतूनच म्हटले, "हव्यात कुणाला तुमच्या देणग्या? तुम्ही राज-जोतिषी झालांत का, ते आधी सांगा!"

मान खाली घालून पडेल स्वरांत हसन, "अजून नाही" असे म्हणाला.

-"तर मग मला तुमचे तोंड दाखवूं नका" असे त्याची पत्नी म्हणाली हसन परत निघाला व त्याने त्या सार्वजनिक हमामखान्यापुढे आपला तळ ठोकला.

दुसऱ्या दिवशी खलीफांची रत्न-जडित अंगठी हरविली खूप शोध करून सुद्धा मिळाली नाही. अचानक कुणीतरी म्हणाले, "हमामखान्या जवळ बसणाऱ्या ज्योतिष्यालाच अंगठी बद्दल विचारावे, तो चांगला जाणकार आहे, स्वत: खलीफांचा प्राण त्याने वांचवलाय, ही चोरी तोच पकडूं शकेल" मग काय उशीर? खलीफाने लगेच त्या जोतिष्याला बोलावून आणले व आपली रत्नजडित अंगठीचा शोध लावण्यास सांगितले.

काय उत्तर द्यावे हे न सुचून हसनने थोडा अवधी मागितला, "दोन दिवसाचा अवधी घे, लागलाच तर", खलीफा म्हणाला,

हसन मनांत म्हणाला, "या अवधींत बगदाद सोडून पळून जावे" पण त्याला एका महालांत ठेवण्यांत आले. तेथेच त्याच्या राहण्या-खाण्याची व्यवस्था करण्यांत आली.





हसनला काय करावे? हे कळेनासे होऊन तो त्याच्या खोलींतल्या खिडकींतून बाहेरच्या बगीच्याकडे टक लावून बसूं लागला. त्या बागेत कांही बदकें फिरत असत. त्यांत एक लंगडे बदक होते, ते आजारी असल्या प्रमाणे दिसत होते. त्या बदकास बघून हसन मनाशी म्हणूं लागला, "हे बिचारे माझ्या सारखेच कमनशीबी आहे!" दोन दिवस त्या बदकाकडे पाहण्यांत गेले. तिसऱ्या दिवशी महालाचा दरवाजा उघडला. हसनला खलीफां कडे नेण्यांत आले.

"माझ्या अंगठीचा ठाव-ठिकाणा कांही लागला का?" खलीफाने विचारले.

"या दोन दिवसांत एका लंगड्या बदकाशिवाय मी कांहीच पाहूं शकलो नाही", हसन कसे-बसे म्हणाला.

"लंगडे बदक" हे शब्द त्याच्या तोंडून निघण्याचा अवकाश, की कांही शिपायांनी उद्यानांत फिरणाऱ्या लंगड्या बदकास धरून आणले. त्या बदकाचे पोट चिरतांच त्यांतून खलीफाची रत्न-जडित अंगठी बाहेर पडली.

एका दासीने ती अंगठी चोरली होती, पण कुठेही लपवतां येणे शक्य नव्हते, म्हणून तिने ती अंगठी एका बदकासगिळवून खुणे साठी त्या बदकाचा पाय मोडला होता.

खलीफाने हसनची योग्यता पाहून त्याचा आदर-सत्कार केला व बहुमोल नजराणे दिले. त्या सर्व भेट-वस्तु घेऊन हसन घरी आलां व बायकोला म्हणाला, "अग बघ तर, मी किती बहुमोल नजराणे मिळविले आहेत,"

"मला बहुमान व नजराण्यांची गोष्ट सांगू नका. राज-ज्योतिषी झालात की नाही ते सांगा," बायको म्हणाली.

उदासवाण्या तोंडाने, "अजून नाही" असे हसन उत्तरला.

"तर मग मला तुमचे तोंड दाखवूं नका," हसनची बायको म्हणाली.



हसनला जीवनाचा वैताग आला. त्या भरांत त्याने ठरविले की, सरळ खलीफा कडे जाऊन विचारावे. व तो बाहेर पडला. तो राजमहालावर गेला तेव्हां खलीफा माडी-वर आराम करीत होते. सेवकाने हसनला खलीफाकडे नेले.

हसन नम्रपणे खलीफास म्हणाला, "खाविंदांनी एका गोष्टीची विनंती करण्या साठी आलो आहे. आपला दरबारी ज्योतिषी म्हणून राहण्याची माझी इच्छा आहे."

त्याच वेळी एक सेवक एका थैलींत कांही तरी घेऊन येत असल्याचे दूरूनच खलीफांनी पाहिले व ते म्हणाले, "तो माणूस थैलींत काय घेऊन येतोय हे सांगाल तर आत्तांच माझे दरबारी जोतिषी म्हणून तुमची नेमणूक करेन.

हसनचे हृदय बंद पडण्याची वेळ आली, "हुजूरांनी क्षमा करावी, मी आपल्याला हमामखान्यांतून बाहेर येण्याची विनंती केली होती त्याच वेळी हमामखान्याचे छप्पर कोसळले; लंगड्या बदकाशिवाय कांही एक बघितले नाही म्हणालो आणि त्याच्या पोटातून रत्नजडित अंगठी बाहेर पडली. पण हुजूर, कितीही चतुर असला तरी ससा शिकाऱ्याच्या जाळ्यांत अडकणारच!" हसन म्हणाला.

तेवढ्यांत तो सेवक जवळ आला व त्याने थैलींतील ससा काढून खलीफाला दाखवला.

खलीफाला आश्चर्य वाटले व हसनलां शाबासकी देत, "वा! बहोत खूब! तुमच्या पेक्षा मोठा जोतिषी जगांत कुणी असेल असे मला वाटत नाही. याक्षणीच मी राजजोतिषी म्हणून आपली नेमणूक करीत आहे," असे खलीफाने मोठ्या आनंदाने जाहीर केले.

हसनची पोळी पिकली त्याने घरी येऊन ही बातमी सांगताच त्याच्या बायकोच्या आनंदास पारावार उरला नाही.





# गुरुला शिक्षा

रमानाथ एकटाच होता. लहानपणीच माता-पित्याचे छत्र गेल्यानंतर तो एका गुरुकुलाच्या आश्रयास येऊन गुरूंची सेवा करीत वाढू लागला. त्याचे गुरु फार प्रेमळ होते. त्यांच्या-कडे शिकावयास येणाऱ्या धनिकपुत्रां समवेत त्यांनी रमानाथास शिकविले. वीस वर्षांच्या वयांत रमानाथ सर्व शास्त्रांत पारंगत झाला. एके दिवशी रमानाथाला जवळ बोलवून गुरु त्याला म्हणाले–"बाळा, रमानाथा! तू फार शहाणा व समंजस आहेस. धनाचा लोभ न धरतां गावोगांवी फिरून लोकांना आपली विद्या शिकव. लोक प्रेमाने जे देतील तेवढेच स्वीकारून समाधानी वृत्तीने रहा."

रमानाथ नम्रपणे हात जोडून म्हणाला–"गुरुदेव आपण सांगितल्यानुसारच मी वागेन. आधी कोणत्या गांवी जावे, अशी आपली आज्ञा आहे?"

गुरु म्हणाले–"कुण्याही गांवीं गेलास तरी हरकत नाही, पण चुकूनसुद्धा मूर्खपुरीस जाऊं नकोस, ही गोष्ट मात्र लक्षांत ठेव म्हणजे झाले."

गुरूंस अभिवादन करून, रमानाथ गुरुकुलाचा निरोप घेऊन निघाला, त्याचे दैव म्हणा की योगायोग म्हणा, दिवस मावळायच्या सुमारास तो मूर्खपुरीच्या सीमेवर पोंचला. एक रात्र त्या गांवी घालवल्याशिवाय गत्यंतर नसल्यामुळे त्याने त्या गांवातील एका घरी मुक्काम केला. त्या घरच्या गृहस्थाने रमानाथाच्या नावा गांवाची, उद्योग-धंद्याची चौकशी केली. रमानाथाने स्वत:बद्दलची सर्व माहिती सांगितली. ती ऐकताच त्या गृहस्थाने त्याला नमस्कार करून म्हटले–"वयाने लहान असला तरी विद्येने थोर असणाऱ्याला हात जोडून नमस्कार करावा, असे शास्त्रवचन आहे. आमच्या गांवांत योग्य गुरु नसल्यामुळे मुले बिघडून जात आहेत. तुम्ही इथेच राहून आमच्या गांवच्या मुलांना शिकवावे."

"वसुंधरा"

यावर गुरूचा उपदेश लक्षांत घेऊन रमानाथाने, आपणांस या गांवांत राहणें शक्य नसल्याचे सांगितले. सकाळी तो उठतोय तोच गांवांतील कित्येक लोक विविध प्रकारच्या भेट-वस्तु घेऊन त्याला भेटावयास आले. व आपल्या मुलांस शिकवण्याची विनंती केली.



त्या सगळ्या भेट-वस्तू बघून रमानाथाच्या तोंडास पाणी सुटले. विद्याभ्यासासाठी कष्ट सहन करणाऱ्या गांवकऱ्यांना बघून रमानाथाला वाटले की त्यांच्या मुलांना शिकवणें हा त्याचा धर्म होय. अशा प्रकारे गुरूने केलेल्या उपदेशाकडे त्याने कानाडोळा केला. ग्रामाधिकाऱ्याने रमानाथासाठी एक लहान घर बांधवून दिले. शाळेची सुरुवात होण्याआधी त्याने रमानाथास म्हटले, "तुमची शाळा व्यवस्थित चालू शकली नाही तर तुम्हाला त्या तिकडे दिसणाऱ्या वाड्यात रहावे लागेल.

त्याच्या बोलण्याचा रमानाथास अर्थबोध झाला नाही.

मूर्खपुरीची पोरं अति द्वाड होती. रमानाथ अनेक प्रकारे शिकवायचा प्रयत्न करी, पण ती नुसता-धिंगाणाच घालीत. त्याने लक्षपूर्वक प्रत्येक मुलाचा अभ्यास करून पाहिले की सगळीच मुलं खराब नाहीत. त्यांतील कांहीजण खोडकर असून ती इतरांना शिकूं देत नाहीत, म्हणून त्याने अशा कांही व्रात्य मुलांना निवडून त्यांना कडक शिक्षा दिली.

त्याच दिवशी ग्रामाधिकारी रमानाथास भेटून म्हणाला–"तुम्ही मुलांना कां मारले?"

"त्यांनी धिंगाणा केला म्हणून मारावे लागले." रमानाथ म्हणाला.



"धिगाणा मुले करणार नाहीत तर तुम्ही, करणार काय?" ग्रामाधिकारी रागाने म्हणाला.

काय बोलावे हे न कळून रमानाथ गप्प राहिला.

ग्रामाधिकाऱ्याने रमानाथाला "मुलें म्हणजे देवाघरची फुलें, म्हणतात ना? मग यापुढे मुलांना कधी हात लावूं नका, न मारतां शिकवत चला!" अशी समज दिली.

त्यानंतर रमानाथ मुलांना न रागावतां न मारतां शिकवण्याचा प्रयत्न करूं लागला, पण त्या निर्बुद्ध मुलांपैकी एकजणसुद्धा एक अक्षरही शिकला नाही. कांही दिवसांनंतर ग्रामाधिकारी पुन्हा रमानाथास म्हणाला, "तुझ्याकडून एकाही मुलास विद्याभ्यास येत नाही असे गांवकरी म्हणत आहेत." यावर रमानाथ म्हणाला–"तुमच्या मुलांना विद्या येत नाही, यास कारण मी नव्हे, त्यांचे आईवडीलच होत."

"मग, काय करावे म्हणतां?" ग्रामाधिकाऱ्याने विचारले.

"सगळया गांवकऱ्यांना एकदां एकत्र बोलवा, मुलांनी चांगला अभ्यास करावा म्हणून घरी काय करावयाचे ते मी समजाऊन सांगेन!" रमानाथ म्हणाला.

त्याच्या म्हणण्यानुसार गांवकऱ्यांची एक सभा बोलवण्यांत आली. मुलांना अभ्यासाचे वळण कसे लावावे? घरी कसा अभ्यास करवावा? गरज भासली तर त्यांना शिक्षेची जरब कशी बसवावी? वगैरे गोष्टी रमानाथाने त्यांना समजाऊन सांगितल्या. तेव्हां, "मुलांचा अभ्यास सगळा घरी आई-वडिलांनी घ्यायचे झाले तर विद्यालय कशाला? गुरु कशाला?" ग्रामाधिकारी म्हणाला.

तिथे उपस्थित असलेल्या बऱ्याच मोठया लोकांनी सुद्धा हीच शंका बोलून दाखवली.

रमानाथाने त्यांना बरेच समजाऊन सांगितले, पण ते पुन्हा-पुन्हा हाच प्रश्न विचारू लागले. कांही न सुचल्यामुळे रमानाथ किंचित हताश होत म्हणाला–"मी इतके समजावून सांगतोय, पण तुमच्या ध्यानांत कसे येत नाही?"

लगेच ग्रामाधिकारी म्हणाला–"आम्हां मोठया माणसांना कळेल अशा प्रकारे तुम्ही सांगू शकत नाही, तर मुलांना काय शिकवूं शकतां? तुम्हांला कांही दिवस त्या मोठया वाडयांत राहणें आवश्यकच आहे."

रमानाथाच्या मनांत सुद्धा, "त्या मोठया वाडयांत काय आहे?" हे पाहण्याचे कुतूहल होतेच. ग्रामाधिकाऱ्यासह तो त्या वाडयाकडे निघाला. त्याने आंत पाऊल टाकतांच ग्रामाधिकाऱ्याने बाहेरून दार लावून घेतले. आंत कांही माणसें होती. त्यांतील एक जण रमानाथाकडे बघून, "आपल्याला अजून एक साथीदार मिळाला आहे." म्हणून जोराने ओरडला.

रमानाथाने त्यांना, "तुम्ही कोण आहांत?" म्हणून विचारले.

"या गावांतील मुलांना विद्याभ्यास शिकवावयास येऊन हार खाल्लेले दुर्दैवी आहोत आम्ही. या कारागृहांत दररोज कांही मुले येऊन गुरुने कसे शिकवले पाहिजे याचे धडे देतात. त्यांच्या बरोबर चौघे भीमकाय पहेलवान असतात." त्यांपैकी एकाने माहिती दिली.



गुरूचा उपदेश न ऐकल्याचे हे फळ मिळाले; असे रमानाथाला वाटले. तो विचार करूं लागला की सगळे मिळून दहाजण आहोत, सर्वांनी मिळून बाहेर पडण्याचा मार्ग शोधला पाहिजे.

दुसऱ्या दिवशी सकाळी गुरूंना विद्या शिकवण्यासाठी कांही मुलें आली. रमानाथ त्यांना म्हणाला, "तुम्ही सर्वजण फारच भाग्यवान आहांत, कांहीही कष्ट न करतां एका तासांत सकलशास्त्रवेत्ते होण्याची संधी तुम्हाला मिळते आहे."

"ते कसे?" एका मुलाने विचारले.

"इतके सगळे विद्वान एका स्वरांत माता सरस्वतीचे स्तोत्रगायन करतील तर देवी प्रसन्न होऊन आजू-बाजूला उपस्थित असणाऱ्यांना विद्या प्रदान करील." रमानाथा म्हणाला.

त्या मुलांनी ही गोष्ट गावांत जाऊन सांगितली. थोडयाच वेळांत त्या वाडया-जवळ ग्रामस्थांची तोबा गर्दी उसळली.

पूजा सुरू झाली. थोडया वेळानंतर मोठया आवाजांत रमानाथाने घोषणा केली. "जिथे मूर्खपण असते तिथे सरस्वती नसते. आम्ही अकरा-जण सरस्वतीस्तोत्र म्हणत ग्रामप्रदक्षिणा सुरू करतो, ज्यांना सरस्वतीची कृपा हवी असेल, त्यांनी आमच्या मागे चलावे."

रमानाथाच्या मागे ते सगळे गुरुजन सरस्वतीचा नामघोष करीत गांवच्या वेशीकडे चालू लागले, व त्यांच्या मागोमाग मूर्खपुरीचे लोक निघाले.

गांवची वेस जवळ येतांच रमानाथ गांवच्या लोकांना म्हणाला, "सरस्वती-मातेची आज्ञा आहे की आम्ही गुरूंनी जोरांत पळावे व गांवकऱ्यांनी इथे वेशीजवळच थांबावे." व तो इतर गुरुजनांसह पळून गेला.

त्यानंतर त्याने आपल्या, 'ज्ञानाच्या व विद्येच्या जोरावर राजाश्रय मिळविला. त्याने राजाला, मुर्खपुरीत स्वतःला आलेला अनुभव कथन करून त्या गावांतील लोकांना राजाज्ञेने विद्या शिकण्यास भाग पाडले.






[१७]

[समुद्रकेतूच्या अनुयायांशी काही वेळ चकमक झाल्यावर शिवदत्त खोल जंगलात निसटून पळाला. तेथे त्यांना देवमाया नांवाची एक स्त्री भेटली. तिच्याकडून शिवदत्ताला मकर मंडलाची माहिती कळली. वज्रमुष्टी दोघां साथीदारांसह वाट दाखवीत पुढे निघाला. त्याला समुद्रकेतूच्या चांचे चोरांची वस्ती दिसली. पुढे–]

वज्रमुष्टीला वांकडया तिकडया पसरलेल्या चिचोळया खाडयांच्या पलीकडून विचित्र गोंगाट ऐकू आला, तेव्हां तो आपल्या साथीदारांकडे वळून म्हणाला– "तो आवाज समुद्रकेतूच्या अनुयायांच्या टोळीचा असावा. त्यांच्या पैकी कोणी तरी झिंगून बरळत गात असावा, असे मात्र नक्कीच वाटते आहे. तुम्ही इकडेच थांबा, मी पाहून येतों!" असे म्हणत जमिनीवर जवळजवळ रांगत जात काठावरच्या एका होडक्यात उडी मारून चढला.

थोडया वेळाने तो पलीकडच्या काठावर येऊन पोंचला. त्याने किनाऱ्यावरच्या एका रानटी झाडाला ते होडकें बांधून ठेवले व फार सावधपणे रांगत रांगत पुढे निघाला. एका सपाट जागेवर समुद्रकेतूचे सुमारे दहा बारा अनुयायी आपापली शस्त्रास्त्रे



एका जागेवर एकावर एक रचून खूप पिऊन ओरडत होते.

त्या सर्वांना ठार करण्यास हीच चांगली संधी आहे असे वज्रमुष्टीला वाटले. तो एक उडी मारून झाडाआडून पुढे आला व जोराने "जय कालकेया!" असा घोष करीत तलवार उपसून चांचेचोरांवर तुटून पडला.

आपल्यावर भयंकर प्रसंग ओढवला आहे, असे त्यांच्या पैकी कोणाच्याही लक्षात येण्यापूर्वीच वज्रमुष्टीची तीक्ष्ण धार असलेली तलवार पांच जणांची मुंडकी धडापासून निराळी करून मोकळी झाली होती. बाकीचे पांच जण शुद्धीवर आल्यासारखे आपल्या आयुधांकडे धावले. परंतु जवळ पोंचायच्या आंत वज्रमुष्टीने त्यांची मुंडकी सुद्धा उडविली.

फक्त एक चांचेचोर त्या गडबडीत निसटला आणि खाडीच्याकडे धावला. परंतु वज्रमुष्टीने त्याला निसटू दिले नाही. कारण एकटा जरी जिवंत निसटला तरी तो आपला बेत उलटून पाडू शकेल, असे त्याला वाटले.

वज्रमुष्टी "जय कालकेया!" असा घोष करीत पळून जाणाऱ्या चांचेचोरांच्या अंगावर धावला. त्या नि:शस्त्र चोराने, त्यात तो खूप झिंगलेलाही होता, एकदां वज्रमुष्टीकडे भयंकर रौद्र रूप धारण करून पाहिले व जोराने "मेलों!" असा शंखनाद करीत समोरच्या खाडीत उडी मारली.

वज्रमुष्टी त्याच्या पाठोपाठ त्याला धरायला खाडीत उडी टाकणार, इतक्यात त्याला ताडाच्या एखाद्या लांब खोडासारखी पाण्यात तरंगत असलेली मगर दिसली. ती त्या उडी मारणाऱ्या चोराकडे पोहोत आली. पापणी लवायच्या आत तिने त्याला गिळले व पळून गेली.

वज्रमुष्टीने ते पाहिले व आनंदाने खूप हसला व दांतओठ चावीत म्हणाला– "समुद्रकेतूला सुद्धा अशाच मरणाशिवाय सुटका नाहीं. माझ्या हाती किंवा मगरीच्या जबड्यात...जय कालकेया!"

त्याच सुमारास वज्रमुष्टीबरोबर आलेले दोघे साथीदारसुद्धा खाडीच्या काठावर येऊन पोचले. त्यांनी हात हलवून वज्रमुष्टीला खूण केली. आता जास्त वेळ घालविणे धोक्याचे आहे, हे ओळखून वज्रमुष्टी एका होडक्यात चढून खाडी पार करून त्या बाजूला आला.

एकट्या वज्रमुष्टीने इतक्या साऱ्या जणांना ठार केलेले ऐकून दोघां साथीदारांनी त्याची खूपखूप स्तुति करून त्याची पाठ थोपटली. त्यानंतर सर्वजण शिवदत्त वाट पहात होता तिकडे गेले.

शिवदत्त इतका वेळ आतुरतेने त्यांची वाटच पहात होता. त्यांना येत असलेला पाहून तो त्यांना सामोरा गेला आणि त्याने विचारले–"झालं का काम? समुद्रकेतूचे अनुयायी तिकडे कोठे आढळले नाहीत का?"

वज्रमुष्टी घडले ते सांगणार इतक्यात त्याच्या बरोबर गेलेल्या दोघां सैनिकांनी, वज्रमुष्टीने जो थोर पराक्रम गाजविला होत त्याचे वर्णन आनंदाने केले. शिवदत्त व मंदरदेव दोघांनी वज्रमुष्टीने दर्शविलेल्या साहसाची खूप प्रशंसा केली. शिवदत्त म्हणाला– "वज्रमुष्टी! खरोखरच तुझं




धाडस वाखाणण्या सारखंच आहे! तू पूर्वी मनातली इच्छा दर्शविल्याप्रमाणे संधी मिळाली तर त्या समुद्रकेतूला ठार करण्याची जबाबदारी तुझ्यावरच टाकू!"

देवमाया समुद्रकेतूचे नाव ऐकतांच रागावेशाने म्हणाली–"अहो! वज्रमुष्टीच्या तलवारीला बळी पडलेले सर्व या प्रदेशातले कोणीतरी नेमलेले पाहारेकरी असावेत. म्हणून आपण कोणाच्या दृष्टीस न पडता आतां त्याच्या अगदी गुप्तस्थानी पोहाचू शकतो. येथून फक्त चारपाच कोसाच्या अंतरावरच त्याचे ते गुप्तस्थान आहे. आपण तेथे जायचं झालं तर नावेतून किंवा पहाडावरूनच जावे लागेल."




"समुद्रकेतू राहातो ती जागा म्हणजे मोठा किल्ला-बिल्ला तर नाही ना?" शिवदत्ताने विचारले.

देवमाया उत्तरादाखल म्हणाली—"तेथे किल्लावगैरे मोठें बांधकाम काहीच नाही. तो सर्व प्रदेश म्हणजे समुद्राच्या पाण्याने घेरलेला आहे. मधून-मधून बेटां-सारखे उंचवटे मात्र पुष्कळ आहेत. तो राहातो ती जागा अशीच एक आहे. त्याला संरक्षण म्हणजे चारी बाजूला पसरलेले खारं समुद्राचं पाणीच!"

"त्याचे अनुयायी सुद्धां पुष्कळच आहेत की, परंतु त्यांच्याहून जास्त त्याचे गुलाम आहेत आणि ते त्याचे शत्रुही आहेत! ते देखील तेथेच आहेत. मी तेथेच तर गुलाम म्हणून पुष्कळ दिवस बांधलेली होते! आपण जर का, त्या गुलामांना बंदीमुक्त करू शकलो तर आपण काही करायची गरजच राहणार नाही, ते गुलामच त्या समुद्रकेतूवर व त्याच्या अनुयायांवर चालून जातील." देवमाया अत्यंत उत्साहाने म्हणाली

"ते गुलाम अंदाजे कितीजण असतील? शिवदत्ताने विचारले.

"पांचशे...सहाशे तर असतीलच! त्याहून कमी नसतील!" देवमाया म्हणाली.

"तरमग आता आपण तिकडेच निघू या! वज्रमुष्टीने मिळविलेल्या होडक्यांच्या मदतीने सर्वजण आपण या उथळ पाण्यातून जाऊन तो समुद्रकेतू राहातो त्या बेटावरच्या गुहेत पोचता येईल, अंधार पडू लागला आहे. शत्रूला सुगावा लागू दिल्याशिवाय त्याच्यावर तुटून पडायला याहून जास्त चांगली वेळ मिळणे शक्य नाही!" शिवदत्त म्हणाला.

त्या प्रमाणे सर्वजण खाडीच्या दिशेने निघाले. थोडयाच वेळाने ते उथळ पाणी पसरलेल्या प्रदेशात पोचले. तेथे मधून मधून ऊंच सखल प्रदेश होता व जागोजागी झाडे झुडपे ही होती. एकंदर ती जागा एका उंचवटया सारखीच होती. चांचेचोरांनी समुद्रकाठावर लहान-लहान झाडांना बांधून ठेवलेली होडकीं सुद्धां होती. सर्वजण त्या होडक्यांत चढून देवमायेने दाखविलेल्या वाटेने निघाले.

तोंपर्यंत चांगला काळोख पडला होता. चंद्रकोर मधून-मधून ढगाआडून बाहेर येऊन वाट दाखवीत होती. तेथून समुद्रकेतू राही ती जागा पुष्कळ दूर असूनही लहान बेटांवर दिवे 'मिणमिण' करीत असलेले दिसत होते. परंतु इतके असूनही ती जागा धास्ती वसेल अशीच होती.

त्या काळोखांत परस्परांना सावध करीत आणि होडक्यांची परस्पर टक्कर होऊ न देतां शिवदत्त सर्वांना घेऊन सावधपणे हळूहळू पुढे जात होता. मधून-मधून पाण्यांतून उंचवटे वर डोकी काढीत होते व त्यांवरच्या झाडांवर जलपक्षांची किलबिलाट ऐकू येत होती. पाण्यात आहाराच्या शोधार्थ मगरी, मासे व इतर पाण्यातले इतर प्राणी होडक्यांपर्यंत येऊन त्यांत मनुष्य असल्याचे पाहून दूर पळून जात होते.

जवळ-जवळ. मध्यरात्रीच्या शुमारास शिवदत्त आपल्या अनुचरांसह समुद्रकेतू राही त्या जागेच्या परिसरात पोचला, आतां कोणत्याही प्रकारे आवाज वगैरे होऊ न देतां ढोरांसारखे बांधून ठेवलेल्या



गुलामांच्या झोंपडयांपर्यंत जाऊन त्यांना सोडवायचे, हेच काम ठरले होते. त्यांच्या मदतीने समुद्रकेतू व त्याच्या अनुयायांचा सर्वनाश करावयाचा!

शिवदत्त मनातल्या मनात हेच योजीत असतां एकदम करावयाचे ते काम अकस्मात येऊन ठेपलेच! सर्वजण चाहूल दिल्या शिवाय होडक्यांतून काठावर उतरले. नंतर झाडाआडून लपत छपत काही अंतर चालून गेल्यावर अकस्मात् तो सर्व प्रदेश कित्येक दिव्यांच्या उजेडाने प्रकाशित होत असलेला त्यांच्या नजरेस आला.

शिवदत्त लगेच एका झुडपाआड कोणाच्या दृष्टीस पडू नये या विचाराने



लपला आणि त्याने आपल्या सर्व अनुयायांना जवळ यायला खूण केली.

सर्वजण झाडांच्या पानांआड लपून ज्या बाजूने दिव्यांचा उजेड येत होता त्या बाजूला पाहू लागले. तेथे सुमारे चाळीस पन्नास चांचेचोर, काही जण उभे तर काही जण बसलेले त्यांना दिसले. समुद्रकेतु हातात त्याला घेऊन व मधून-मधून दारूचे घोट घेत चिलखत घालून असलेल्या चौघां पांचजणांबरोबर कांहीं तरी गुप्त मसलत करीत होता.

देवमाया आपल्या तर्जनी बोटाने त्यांच्याकडे खूण करून म्हणाली— "ते चिलखत घातलेले शिपाई मकरमंडलाचा राजा हरिशिख याचे शिपाई आहेत! उजाडल्यावर मकरदेवतेला अत्यंत प्रिय असा आहार घेऊन जाण्यासाठी आले आहेत. समुद्रकेतूने धरून आणलेल्या लोकांपैकी जे अव्यंग, योग्य वयाचे व सुंदर असतील त्यांना वाटेल ती किंमत देऊन विकत घेऊन ते मकरमंडलाला निघून जातील.

शिवदत्त ती म्हणाली ते ऐकून आश्चर्यचकित होऊन म्हणाला—"मकर देवतेला आहार म्हणून माणसांशिवाय इतर प्राणी उपयोगी नसतात का? ती केवढी मोठी देवता झाली तरी शेवटी ती मगरच ना!"

देवमाया उत्तरा दाखल म्हणाली— "मकरमंडलाच्या सर्व राहणाऱ्यांना ती थोर देवीच वाटते, मग ती कितीही क्षुद्र देवता असेना! ती देवता म्हणजे त्यांना फार मोठी धास्तीच वाटते. त्या देवतेला आणखी इतर प्राणी बळी देणे म्हणजे मोठे पाप असे वाटते, त्यांना!"

"त्या मूर्खांना जी फार मोठी देवता वाटते तिला खाणारा काळ आपल्या बरोबर आहे, म्हणावं!" असे म्हणत शिवदत्त वज्रमुष्टीकडे खूण करून थोडा हंसला.

"मी त्या एकट्या मकरदेवतेचाच काळ नाही, त्या समुद्रकेतूचा सुद्धां काळ आहे!" वज्रमुष्टी दांतओठ चावीत रागाने म्हणाला.

"बरं तर, आपण आता गुपचुप जाऊन कैद करून ठेवलेल्या त्या गुलामांना मुक्त करणे बरोबर होईल! समजा, त्या प्रयत्नात आपण अयशस्वी झालो तर आपण बसून आलो ती होडकी येथेच आहेत, आपण त्यांत बसून पळून जाऊ!" शिवदत्त म्हणाला.

देवमायेने गुलामांना ज्या गोठ्यासारख्या झोपड्यांत बांधून ठेवल्याचे सांगितले होते त्या दिशेने सर्वजण झाडआड लपत-छपत तिच्या पाठोपाठ निघाले. थोड्याच वेळात ते गोठ्यांसारख्या त्या झोंपड्यांजवळ पोचले. तेथे शेंकडो लोक हातपाय सांखळ्यांनी बांधून गुरांढोरांसारखे बांधलेले दिसले.

शिवदत्त आपल्या अनुयायांना सावध करून हळूच त्या झोंपड्यात शिरला. वज्रमुष्टीने हळूच त्या गुलामांजवळ जाऊन, त्यांच्या पैकी प्रत्येकाला ते कोणत्या कामासाठी तेथे आले होते हे सांगून त्यांना गप्प राहायला आणि खूण केल्यावर शत्रूवर तुटून पडायला समजावून सांगितले.

आपल्या जवळच्या शस्त्रास्त्रांनी शिवदत्ताने व त्याच्या अनुयायांनी प्रथम काही गुलामांना सांखळ्या तोडून सोडविले.



नंतर त्यांनी व सुटका मिळालेल्या गुलामांनी मिळून सर्व गुलामांना मुक्त केले.

अशा तऱ्हेने थोड्याच वेळात जवळ-पासच्या सर्व गोठ्यांतील सर्व गुलाम सुटले.

परंतु सुरवाती पासूनच स्वयंप्रभा कोठे आहे, ही शंका देवमाया व मंदरदेव आणि इतरांना येतच होती. त्यांनी पुष्कळशा गुलामांना विचारूनही पाहिले. परंतु त्यांच्या पैकी कोणालाही तिच्या विषयी काहीच माहीत नव्हते. तरमग स्वयंप्रभेला या पूर्वीच मकरदेवते समोर बळी म्हणून टाकले का? ही भीती त्यांना वाटू लागली.










पण इतक्यात एक गुलाम. पुढे येऊन म्हणाला–"आतांच थोडया वेळापूर्वीच एक पाहारेकरी म्हणत असतांना आम्ही सर्वांनी ऐकले की एक अत्यंत सुंदर स्त्री, कोणी समुद्रकेतू आहे त्याला-सापडली आहे व तिला तो समुद्रकेतू मोठया किंमतीला विकणार आहे, म्हणे!"

ते ऐकून देवमायेला व इतर सर्वांना जास्त भीती वाटल्या सारखे भासले. मंदरदेव शिवदत्ताजवळ येऊन म्हणाला–"शिवदत्ता, येथे इतके गुलाम आहेत, पण यांच्यावर कोणी पाहारेकरी नाही, याचे आश्चर्यंच वाटते!"

शिवदत्त ते ऐकून हंसला व म्हणाला–"चहूंकडे पसरलेल्या या समुद्रांच्या खोल खाऱ्या पाण्यामध्ये, हातपाय सांखळदंडांनी बांधलेले असतां कोण कोठे पळून जाऊ शकेल? तर आतां पुढे आपण काय करायचे याचा विचार करू या स्वयंप्रभा याच बेटावर नक्कीच कोठे तरी असणार! आपण सर्व मिळून अकस्मात समुद्रकेतूवर हल्ला करुन त्याला व त्याच्या अनुयायांना ठार करूं या!"

तिकडे वज्रमुष्टीने मध्यंतरी सर्व गुलामांना एकत्र जमवून त्यांना काठ्या, लोखंडी गज आणि असेच जे हाती आले ते देऊन त्यांचे सैन्य उभे केले होते. शिवदत्ताच्या आज्ञेप्रमाणे सर्वांच्या तीन टोळ्या करण्यात आल्या व त्यांचे नायक म्हणून शिवदत्त स्वत: मंदरदेव व वज्रमुष्टी तिघांना नेमण्यात आले. नंतर हल्ला करण्याचे ठरले.

सर्वजण आरडा ओरडा केल्या शिवाय झाडाझाडच्या सावलीतून जात एकाएकी तीन दिशांनी येऊन जयघोष करीत समुद्रकेतूवर तुटून पडले.

इतक्या एकाएकी इतके जण कोण शत्रू आले, ह्या गोष्टीचा विचार करण्याच्या आतच समुद्रकेतूच्या अनेक चाचेचोर अनुयायांचे शिवदत्त व त्याच्या अनुयायांच्या हस्ते शिरकाण झाले होते.

(पुढल्या अंकात संपूर्ण)



# गुप्तधन

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाहीं तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत काढून खांद्यावर घेतले आणि मौनपणे स्मशानाची वाट चालण्यास सुरुवात केली. तेव्हां प्रेतांतील वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तूं हे जे श्रम करतो आहेस ते तुझ्या नशीबीं लिहलेले आहे म्हणून किंवा दैव फिरल्यामुळे तुला हे भोगावे लागत आहे म्हणून, न कळे! कांहीजण मोठ्यांच्या हाताखाली येऊन गत्यंतर नसल्यामुळे चाकरी करतात तर कांहीजण कोणत्याही प्रकारचा दैवदुर्विलास नसून सुद्धा चाकरी करण्यांत आयुष्य घालवितात. या दुसऱ्या प्रकारची वृत्ति असणारा रामदास नांवाचा एक माणूस होता त्याची कहाणी मी आज सांगतो, म्हणजे तुला चालण्याचे श्रम, वाटणार नाहीत." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला;



"कांचनपुरीत धनगुप्त नांवाचा कोटयाधीश व्यापारी होता. वीडलोपार्जित ऐश्वर्यात, त्याने विदेशांत सुद्धा आपला व्यापार वाढविल्यामुळे सतत भर पडत राहिली. त्याच्या तोडीस दुसरा कुणीच व्यापारी नव्हता.

एवढे ऐश्वर्य होते पण वृद्धत्वाकडे झुकलल्या धनगुप्तास मनःशांती अशी नव्हती, कारण त्याच्या पोटी संतान नव्हते. सतत चिंतेची ही असाध्य मनोव्याधी त्याच्या पत्नीस, रत्नमालेस, पोखरुन टाकीत होती.

व्यापाराच्या बहुविध कामांत गुरफटून असणाऱ्या धनगुप्ताला न सुचलेला एक उपाय रत्नमालेस सुचला, त्या दिवशी रात्री जेवण आटोपल्या नंतर तिने धनगुप्तास तो उपाय सांगितला.

तो अनपेक्षित उपाय ऐकून धनगुप्तास धक्का बसला, तो म्हणाला–"खरोखरच तू वेडी आहेस, स्वतःहून सवतीची अपेक्षा करतेस! अग, तू म्हणतेस ते ठीक आहे, तुझी मावस बहीण कनकलता सर्व प्रकारे योग्यच आहे पण तिचे वय तुझ्याहून अर्ध्यापेक्षाही कमी आहे. हे लग्न कोणत्याही प्रकारे श्रेयस्कर नव्हे!"

धनगुप्तास आपला मुलगा दत्तक देण्यास त्यांचे कित्येक नातलग एका पायावर तयार होते, पण या नवरा-बायकोस दत्तक घेण्याचा विचार रुचत नव्हता. दत्तक-पुत्र हा बोलून-चालून दत्तकच. पोटच्या पोराची बरोबरी थोडीच येणार? तो परकाच!

नवऱ्याने तिचा सल्ला न मानल्यापासून रत्नमालेची तब्येत आणखीनच ढासळली व कांही दिवसांतच तिने डोळे मिटले!

आपण तिचा सल्ला न ऐकल्यामुळेच रत्नमाला वारली या गोष्टीचे धनगुप्तास खूप वाईट वाटलें. अखेर त्याने कनकलतेशी लग्न करण्याचे ठरविले.

गाजा-वाजा न करतां लग्न झाले. व एका वर्षातच कनकलतेच्या पोटी एक गोरा गुटगुटीत मुलगा जन्मला. धनगुप्ताने त्याचे नांव, आपल्या वडिलांच्या नांवावरच श्रीगुप्त असे ठेविले. एकुलता एक मुलगा श्रीगुप्त लाडात व कोडकौतुकांत वाढू लागला.

धनगुप्ताने आतां सत्तरी गाठली होती, मुलगा बारा वर्षाचा झाला. धनगुप्तास पुन्हा काळजी, लागली आपल्या नंतर एवढ्या धन-ऐश्वर्याचा सांभाळ कसा होईल? हे काम बायकांनी करण्याचे नव्हे, त्यांतल्या त्यांत कनकलता अजून पोरगीच म्हणवली जाते, तिला विशेष व्यवहार-ज्ञानही नाही" या काळजींतून मुक्त होण्यासाठी तळमळत असतांनाच त्याला एक चांगली कल्पना सुचली, "आपल्या व्यापारांत लागलेला पैसा, स्थावर मालमत्ता सोडून, अमाप हिरेमाणकें, सोन्याचे दागिने वगैरे आपल्या तिजोऱ्यांत पडून आहेत. श्रीगुप्त वयांत येईपर्यंत ही संपत्ती दुसऱ्यांच्या हाती न लागू देतां सांभाळणारा विश्वासू माणूस रामदासच आहे. धनगुप्तास शंका नव्हती. त्याच्यावर विश्वास करून आपण निश्चितपणे डोळे मिटावे.

रामदास हा धनगुप्ताच्या नोकरांपैकी एक-होता, लहानपणीच आई-वडिलांच्या मायेस पारखा झालेल्या रामदासला धनगुप्ताने आपुलकीने लहानाचे मोठे केले होते. दुकानांत असो की घरी असो,



रामदास त्याच्यामागे सावलीप्रमाणे रहात असे. मालकाबद्दल त्याच्या मनांत फार भक्ती होती. व्यापारानिमित्तं परदेशी गेले असतांना त्याने आपला जीव धोक्यांत घालून मालकाचे रक्षण केले होते. तो मालकाचा अत्यंत विश्वास-पात्र होता.

एके दिवशी रात्री धनगुप्ताने रामदासला आपल्या खोलींत बोलवून म्हटले–"अरे रामदास! माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे, म्हणून तुझ्यावर एक फारच जबाबदारीचे काम सोपवीत आहे. तरी जबाबदारीने हे काम पूर्ण करण्याविषयी तुझ्याकडून मला वचन हवे आहे. वचनाचे पालन करशील का?"



"मालक! आपला शब्द मी आजवर कधी पडूं दिला काय? आपल्या पायाशपथ सांगतो, आपली आज्ञा पूर्ण करीन. निःसंकोच आज्ञा करावी." रामदास हात जोडून म्हणाला.

यावर धनगुप्त म्हणाला–"शपथ माझ्या पायाची नको, रामरायाची ही प्रतिमा डोक्यावर उचलून शपथ घे, म्हणजे मी निश्चिंत होईन." रामदासने तसे केले.

त्यानंतर धनगुप्त म्हणाला–"रामदास! आतां माझ्या जिवाचा भरंवसा नाही. जसजसे वय होत चालले आहे तसतशी श्रीगुप्ताबद्दलची चिंता माझ्या मनाला घोर लावीत आहे. वाडवडिलांपासून चालत आलेली संपदा माझ्या माघारी आमच्या वंशाला सोडून तर जाणार नाही अशी धास्ती जिवाला लागली आहे. तूंच या धनऐश्वर्याचा नीट सांभाळ करूं शकतोस! श्रीगुप्ताला योग्य वेळी हे ऐश्वर्य पोंचते कर." नंतर त्याने त्याला जे सांगावयाचे होते सांगितले.

यानंतर वर्षाच्या आंतच धनगुप्ताने इहलोकाची यात्रा संपवली. रामदास मालकाच्या कुटुंबाची जिवापाड काळजी घेत होता. व्यापारांत कुठेही मालकाची उणीव दिसूं देत नव्हता.

प्रति कुबेर मानल्या जाणाऱ्या धनगुप्ताच्या अपरिमित संपत्तीचा संरक्षक रामदास सारखा यःकश्चित् नोकर असावा या गोष्टीबद्दल कित्येकांना आश्चर्याबरोबर संशय वाटूं लागला. योग्य काळजी न घेतली तर रामदास या अनाथ आई-मुलाशी बेइमानी करील, असे सुद्धा बरेचजण समजूं लागले. कांही नातलगांनी, विशेष करून तिच्या माहेरच्या लोकांनी कनकलतेला सावधानतेचा इशारासुद्धा दिला.

बारंबार या गोष्टी कानावर आल्यामुळे कनकलतेच्या मनांत रामदासबद्दल थोडी शंका येऊन ती एके दिवशी त्याला म्हणाली, "रामदास! श्रीगुप्त आतां स्वतःच्या पायावर उभा राहण्याच्या वयात आलाय. त्याच्या वडिलांनी, सर्व संपत्तीची माहिती तुला असल्याचे म्हटले होते, पण काय कुठे आहे हे सांगितले नव्हते."

यावर रामदास म्हणाला–"बाई साहेब! मालकांची आज्ञा होती की धाकटे मालक वयात आल्यानंतर सर्व धन-संपत्तीचा ठेवा त्यांच्या स्वाधीन करावा. आणखी महिन्याभरांत धाकटे मालक वीस वर्षांचे होतील, तोवर आपण धीर धरावा एवढीच विनंती करू इच्छितों."

तो दिवस उगवला. त्या दिवशी रामदास दोन दणकट घोड्यांची बग्गी जोडून श्रीगुप्ताला त्यांत घेऊन जंगलाकडे निघाला. घनदाट जंगलांतील एक उंच टेकडीच्या पायथ्याशी बग्गी उभी करून दोघे माळ चढून, पलीकडे उतरून एका लहानशा घळींत उतरले. झुडुपांच्या आड, दोन शिळांच्या मध्यभागी असलेल्या मोकळ्या जागी उतरून रामदास उभा राहिला व तो आपले केस उपटीत, तिरक्या डोळ्यांनी श्रीगुप्ताकडे वेड्यासारखा बघूं लागला.

ते बघून श्रीगुप्ताला भीती वाटून तो म्हणाला–"रामदास! तुला काय झाले आहे? आपण बाबांनी जतन करून ठेवलेले गुप्तधन नेण्यासाठी आलो आहोत नां? बोल नां?"

"बाबांनी ठेवलेले गुप्तधन? कुठले धन? तू कोण?" रामदास लाल डोळे फिरवीत विचारूं लागला.





या मुळे अधिकच घाबरून जाऊन श्रीगुप्त घरी पळून गेला व घडलेला सर्व वृत्तान्त त्याने आईला कथन केला.

वे सर्व ऐकून कनकलता स्तंभित झाली तेवढ्यात रामदास तिथे आला, जणू कांही काहीच घडले नाही अशा प्रकारे तो आपल्या कामाला लागला.

कनकलतेने मुलाकडून ऐकलेली गोष्ट खरी काय? म्हणून रामदासला विचारले तर तो विस्मय वाटल्यासारखे करून, "होय का! हे सर्व मला कांही माहीत नाही!" म्हणून मोकळा झाला.

त्याचे हे बोलणे ऐकून तो सर्व मालमत्ता गिळंकृत करणार हा संशय पक्का झाला. तरी रामदासशी गोडी गुलाबीने बोलून दुसऱ्या दिवशी त्या दोघांसह कनकलता सुद्धा त्या टेकडीकडे निघाली. रामदासने त्या मोकळ्या जागेंत उतरून, तारवटलेल्या डोळ्यांनी या माय-लेकांकडे वेडसरा सारखे बघत, विचित्र आवाज काढून त्यांना मारावयास धांवल्या प्रमाणे करीत, बराच गोंधळ केला.

हे बघून कनकलतेस भीतीपेक्षा, आपली सर्व संपत्ती जातेय, या गोष्टीचे दुःख वाटले. पुन्हा दुसऱ्या दिवशी तिने गावांतील कांही प्रतिष्ठित लोकांना बरोबर घेतले, सर्व जण रामदासबरोबर टेकडींतील त्या गुप्त ठिकाणी आले. यावेळी रामदासने त्या ठिकाणी येतांच भक्तिभावाने नमस्कार केला व सोबत आणलेल्या पहारीने एका जागी खणू लागला. खणल्याबरोबर जमीनींतून कितीतरी तांब्याचे हंडे बाहेर निघाले. सर्व हंडे मौल्यवान हिरे, माणिक आदि रत्नांनी व सोन्याने भरलेले होते. सर्व लोक थक्क होऊन पाहू लागले.

ही सर्व संपत्ती बघून कनकलतेस व श्रीगुप्तास अपरिमित आनंद झाला, परंतु बरोबर आलेल्या लोकांना रामदासच्या त्या पूर्वीच्या विचित्र वागण्याचा उलगडा झालाच नाही.

एवढे सांगून वेताळ म्हणाला, "राजा! रामदासच्या मनांत काय होते असे तुला वाटते? तो धनगुप्ताच्या मुलास आणि बायकोस फसवीत असावा असे अनेक लोकांनाच नव्हे तर खुद्द कनकलतेस सुद्धा वाटत होते. हे सर्व माहीत असून सुद्धा रामदास दोन वेळां वेड्यासारखा वागला मग तिसऱ्यांदा त्याने सर्व संपत्ती कनकलतेस कां दाखविली? ती संपत्ती लुबाडण्याचे धैर्य नसल्यामुळे? की ज्यांनी त्याला लहानाचे मोठे केले त्यांच्या बद्दलची गुलामीची भावना त्याच्या स्वभावांत बाणलेली होती व स्वाभिमान नव्हता म्हणून, तू या प्रश्नाचे उत्तर माहीत असूनही दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकलें होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

यावर राजा म्हणाला–"रामदासच्या स्वभावांत कोणतीच खोट नव्हती, व ज्यांनी त्याचे पालन-पोषण केले त्यांच्या बद्दल आदर असणे वा त्यांचा विश्वास-पात्र असणें ही गुलामगिरीची प्रवृत्ती नव्हे, धनगुप्ताच्या दुसऱ्या बायकोस व मुलास रामदासच्या सत्यनिष्ठेची खात्री नव्हती, कनकलतेने तर त्यास गुप्त धनाचा ठाव-ठिकाणा सुद्धा विचारला होता; म्हणजे तिच्या मनांत हा गुप्त धन लुबाडेल कीं काय ही शंका होती हे रामदासला कळले होते. म्हणजे पुढे रामदासने मालकाच्या गुप्त धनाचा कांही भाग चोरून घेतला असा आरोप होणें शक्य होते. बरे, मुद्दाम बाहेरच्या लोकांसमक्ष पत्ता दाखवतो म्हणणें मालकिणीच्या प्रतिष्ठेविरुद्ध झाले असते, म्हणून दोन वेळां वेड्यासारखे वागून त्याने, तिसऱ्यांदा, चार प्रतिष्ठितां समक्ष गुप्त धन खणून काढले."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होतांच, वेताळ प्रेतासह जाऊन झाडावर लोंबकळू लागला. (कल्पित)



# व्यवहारज्ञान

विठू एक लाकुडफोड्या होता. एके दिवशी बरीच लाकडं फोडून तो थकून उभा होता. त्याच वेळी त्याबाजूने जाणारा एक संन्यासी विठूला तशा स्थितीत बघून म्हणाला, "अरे! एवढी लाकडं फोडायची कशाला? एवढे थकायचे कशाला? थोडीशी जरी फोडली असतीस तरी आज पोटापुरती कमाई झाली असतीच की"

थपा टाकीतच विठू म्हणाला, "आजच्या या मोळीतून मला तीन दिवस पुरेल एवढे अन्न मिळू शकेल. मग येते तीन दिवस, जंगलांत येऊन कष्ट न करतां, भरपूर आराम घेता येईल."

त्याची कींव करीत संन्यासी म्हणाला, "बाबारे! हे शरीर पुढच्या क्षणी राहील की नाही याची शाश्वती नाही हे खरे ना? मग उद्याची काळजी करीत एवढ्या हाल अपेष्टा कां सोसतोस?"

या उपदेशाला टोला देत विठू म्हणाला, "मी उद्या जर जिवंत राहिलो नाही तर प्रश्नच मिटला, पण जर कदाचित् जगलोच तर जंगलांत येण्याचा त्रास राहणार नाही, नाही का?"

संन्यासी क्षणभर निरुत्तर झाला. थोडा वेळ थांबून तो म्हणाला, "असे व्यवहारज्ञान आणि अशी तर्कबुद्धि माझ्या गुरूला ही नाही." व गुपचुप आलेल्या मार्गाने परत गेला.





# बुद्धि चातुर्य

उझ्बेकिस्तानांत एक गरीब माणूस होता. त्याला तीन मुलं होती. बाप त्या तिघांना उपदेश द्यायचा, "बाबारे! आपल्याजवळ जमीन-जुमला, गुरे-ढोरं, सोने-नाणं नाही, तुम्ही शिकून-सवरून शहाणे व्हा व ज्ञान हीच तुमची संपत्ती समजून वागा."

बापाच्या सांगण्यानुसार विद्याभ्यास शिकून, प्रत्येक विषयाचे सांगोपांग आध्ययन करीत ते मोठे झाले. कांही दिवसानंतर त्यांचे वडील वारले तेंव्हा ते तिघेजण उदर-निर्वाहासाठी राहते गांव सोडुन निघाले.

बऱ्याच भ्रमंती नंतर ते एका शहराजवळ आले. या शहरांत आपणांस कांही नोकरी-धंदा मिळेल या आशेने ते शहराकडे निघाले.

खाली मान घालून चालतां-चालतां थबकून वडील भाऊ म्हणाला, "या मार्गाने कांही वेळापूर्वी एक धिप्पाड उंट गेला आहे."

थोडे पुढे गेल्यानंतर दूसरा भाऊ म्हणाला, "तो उंट एका डोळयाने आंधळा आहे."

शहराच्या अजून जवळ येताच सर्वांत धाकटा भाऊ म्हणाला, "त्या उंटावर एक स्त्री आणि एक मूल स्वार झालेले आहेत."

असे बोलत ते पुढे जाताहेत तोंच मागून येणारा एक घोडेस्वार त्यांच्याबरोबर चालू लागला. त्याच्या अंगावर भारी चिलखत होते. त्याच्याकडे बघत मोठा भाऊ म्हणाला, "महाराज! आपण कांहीतरी शोधीत आहांतसे दिसते आहे ते म्हणजे उंट तर नव्हे ना?"

"होय! उंट कुठे गेलाय हेच शोधतोय" तो घोडेस्वार म्हणाला.

"उंट धिप्पाड आहे-होय ना?" मोठया भावाने पुन्हा विचारले.



"होय, तुम्ही बघितलय उंटाला?" घोडेस्वार विचारू लागला.

त्यावर, "उंटाचा डावा डोळा आंधळा आहे ना?" दुसरा भाऊ म्हणाला.

"त्या उंटावर एक स्त्री आणि एक मूल स्वार झालेले आहेत, होय ना?" तिसरा भाऊ म्हणाला.

"होय, होय! आपण त्यांना पाहिले आहेसे दिसतेय, तो उंट कुठे आहे?" असे तो घोडेस्वार विचारू लागला.

"नाही! आम्ही आपला उंट बघितला नाही" तिघे भाऊ म्हणाले.

त्यांचे बोलणें ऐकून घोडेस्वारास त्यांचा संशय आला, तो त्यांना म्हणाला, "माझ्या तश्या उंटास व त्यावर स्वार झालेल्या माझ्या पत्नीस व मुलास तुम्ही कुठे नेले आहे हे बऱ्या बोलाने सांगा, नाही तर मी तुम्हाला बादशहाकडे पकडून नेऊन देईन!"

त्यावर ते तिघेजण म्हणाले, "आम्ही तुझ्या उंटाला किंवा त्यावर स्वार असलेल्या तुझ्या पत्नीला-मुलाला डोळ्यांनी पाहिले नाही, तरी याच रस्त्याने गेलास तर ते तुला मिळतील."

त्या घोडेस्वाराचा संशय बळावला, तो त्यांना म्हणाला तुम्ही डोळ्यांनी न पाहिलेल्या माझ्या उंटाची व त्यावरील स्वारांची माहिती कशी दिलीत? असे म्हणत त्यांना बादशहाकडे घेऊन गेला व त्यांनी बादशहाकडे आपल्या पत्नीस, मुलास व उंटास पळविल्याची फिर्याद केली.

फिर्याद ऐकून, "तुझ्या आरोपास पुरावा काय आहे?" म्हणून बादशहाने विचारले. त्यावर, "माझा उंट धिप्पाड आहे, तो एका डोळ्याने आंधळा असून त्यावर एक स्त्री व एक मूल स्वार आहेत, हे यांनीच सांगीतले; पण आपण उंटाला बघितलेच नाही असे हे म्हणताहेत" असे तो फिर्यादी म्हणाला.

"आम्ही आमच्या डोळ्यांचा उपयोग करीत, प्रत्येक गोष्टीची बारकाईने पाहणी



करून अनेक गोष्टी जाणून घेत असतो" असे ते भाऊ म्हणाले.

"मी तुमच्या ज्ञानाची आत्तांच परीक्षा घेतो असे म्हणत बादशहाने आपल्या वजिराच्या कानांत कांहीतरी सांगितले. वजिराने दोघां नौकरांकरवीं एक पेटी उचलून आणवून बादशहा समोर ठेवविली"

"या पेटींत काय आहे सांगा!" बादशहा त्या तिघांना म्हणाला. पहिला भाऊ म्हणाला, "ही पेटी रिकामी असून यांत फक्त एक गोल वस्तू आहे"

"ती गोलवस्तु म्हणजे एक डाळिंब होय" दुसरा भाऊ म्हणाला.

"डाळिंब कच्चे आहे!" तिसरा भाऊ म्हणाला.

बादशहा आपल्या आसनावरून उठून पेटीजवळ आला, पेटीचे झांकण उघडून त्याने आंतून एक कच्चे डाळिंब बाहेर काढले. ते बघून सर्व दरबारी मंडळी थक्क झाली.

बादशहा फिर्यादीस म्हणाला; "हे तिघे गुन्हेगार नव्हेत तर महान् प्रज्ञावंत आहेत! तुझा उंट कुठे गेलाय हे तुझे तू शोधून घे" व बादशहाने त्या तिघांना आपल्या महाली नेऊन उत्तम मेजवानी दिली.



त्यांची वाखाणणी करीत बादशाहा म्हणाला, "तुमची हुशारी खरोखरच अद्भूत आहे, तुम्ही न पाहिलेल्या उंटाचे व त्यावरील स्वारांचे वर्णन कसे काय करू शकलां हे मला कळेल काय?"

यावर मोठ भाऊ म्हणाला, "रस्ताने उंटाची पावलं उमटलेली होती ती सर्वसामान्य उंटाच्या पावलांपेक्षा मोठी होती, म्हणून त्या रस्त्याने गेलेला उंट धिप्पाड असला पाहिजे हे कळूं शकले"

दुसरा भाऊ म्हणाला, "रस्त्याने जातांना या उंटाने केवळ उजव्या बाजूचे गवत, झुडुपें खाल्लेले दिसत होते, पण डावीकडील

गवतास उंटाने तोंडही लावलेले नव्हते यावरून उंटाला डावा डोळा नाही हे कळले.'

तिसरा भाऊ म्हणाला, "रस्त्यांत एके ठिकाणी जिथे उंट विसावल्याची चिन्हं दिसत होती, त्याठिकाणी एका स्त्रीची आणि लहान मुलाची पावलं दिसली. यावरून सिद्ध होत होते की उंटावर एक स्त्री आणि मूल स्वार होते."

यावर बादशहा म्हणाला, "तुमच्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीने तुम्ही हे सर्व पुराव्या सकट सिद्ध करून सांगितले आहे पण पेटीत कच्चे डाळिंब आहे हे, पुरावा नसतांना कसे सांगू शकला हे आश्चर्य आहे?"

"एकाब खाविंद" मोठाभाऊ म्हणाला, "आपले नोकर पेटी उचलून आणीत होते, त्यांच्या उचलण्यावरुनच ध्यानी आले की त्यात वजन नाही, पेटी जमीनीवर ठेवतांना एका बाजूला किंचित झुकली तेव्हां त्यांत कांहीतरी घरंगळल्याचा आवाज आला, त्यावरुन कळले की रिकाम्या पेटीत कांहीतरी गोल वस्तू आहे."

दुसऱ्या भावाने म्हटले, "हुजूर! ती पेटी आपल्या महालाशेजारच्या बागेतून आणली जात होती, घरांत असावयाची पेटी डाळिंबाच्या बागेतून येते तेव्हांच कळले की त्यांत डाळिंबा शिवाय दुसरी कोणती गोल वस्तु असू शकते?"

यावर बादशहा म्हणाला, "इथवर तर ठीक आहे पण डाळिंब कच्चेच होते हे कसे कळू शकले? हे माझ्या ध्यानांत येत नाहीये!"

"हे ओळखणें तर फारच सोपे आहे" धाकटा भाऊ म्हणाला, "अजून डाळिंब पिकण्याचा मोसम सुरु झालेला नाही, हवे तर आपण स्वत: बागेत डोकावून बघावे, सगळी डाळिंबं कच्चीच आहेत, एकही पिकलेले नाही."

बादशहा त्या तीन्ही भावांच्या या बुद्धि चातुर्यावर खुष झाला व त्याने त्यांना आपल्या दरबारी मोठ्या पगारावर नोकऱ्या दिल्या.





# नवकोट नारायण

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां तेथे एक फार मोठा श्रीमंत व्यापारी रहात असे. नवकोटी मिळवून उतार वय झाले तेव्हां त्याला एक मुलगा झाला. म्हणून त्याने आपल्या मुलाचे नाव नवकोट नारायण असे ठेवले.

नारायणाला बापाने कधी कोणत्याही गोष्टी बद्दल नकार दिला नाही. मुलाचे सर्व लाड पुरविले. तो जे मागेल ते देई व तो नाचेल तसा नाचू देई. तो वाईट संगतीत पडला व पुढे त्याचे कसे होईल याची काळजी बापाला वाटू लागली.

मुलगा वयात आल्यावर बापाने एका सुंदर व हुशार मुलीशी त्याचे लग्न करुन दिले. त्यानंतर थोड्याच दिवसांनी बापाने इह लोकाचा निरोप घेतला.

लहानपणापासूनच वाईट संगतीत पडल्या कारणाने नारायण उधळपट्टी करीत आला आणि त्याने अनेकांकडून कर्जे काढली. बाप वारल्या बरोबर कर्ज देणारे सर्व लोक त्याच्या अंगावर नागासारखे धावून आले. तेव्हां नारायणाला जिवाचा वीट आला. निस्सहाय अवस्थेत आपण जीव दिला तर कर्ज देणारांना काय उत्तर द्यावे हे त्याला सुचले नाही व तो त्यांना वैतागून जाऊन म्हणाला-"हे पहा, मी गंगेच्या काठावर मोठे वडाचे झाड आहे ना, त्याच्या खाली उद्या सकाळी येईन. त्या झाडाखाली माझ्या पूर्वजांनी पुरून ठेवलेला साठा आहे. तर तुम्ही आपापले कागदपत्र घेऊन त्या जागी या. ठीक आहे वाटून सर्वजण दुसऱ्या दिवशी तेथे हजर झाले. नारायण तो साठा कोठे आहे, हे शोधण्याचे सोंग बराच वेळ करीत राहिला. संध्याकाळ झाली आणि सर्वजण अगदी कंटाळलेले पाहून त्याने जय परमेश्वरा! "म्हणत



नदीत उडी मारली. सर्व, जण त्याची कीव येऊन अहो त्याला वांचवा!" असे ओरडत असतां प्रवाहाच्या वेगात नारायण दूर वाहून गेला व काळोखात दिसेनासा झाला.

त्याच सुमारास बोधिसत्वानी एका हरणाच्या रूपे अवतार धारण केला होता. परंतु ते हरण हरणांच्या कळपात न राहतां एकटे निराळया जागी गंगेच्या काठीच रहात असे. ती जागा म्हणजे आमराई होती. ते हरण म्हणजे सामान्य हरणा सारखे नव्हते. त्याचा रंग म्हणजे अगदी सोन्यासारखा, खूर तर काळ्या स्फटिका-सारखे लखलखीत, शिंगे चांदीसारखी चक-चकीत आणि डोळे हिऱ्यासारखे चमकदार होती. असे ते हरण अगदी अपूर्व सुंदर होते. त्या हरणाला मध्यरात्रीच्या सुमारास एका माणसाच्या आक्रंदनासारखा आवाज ऐकू आला. ते सुवर्णमृग धाईधाईने धावत धावत जाऊन नारायण वहात चालला होता तेथे—"कोण हा संकटात सांपडला आहे बुवा!" असे म्हणत आले.

"बाबारे, मुळीच भिऊ नकोस!" असा धीर देत हरणाने त्याला आपल्या पाठीवर घेतले व आमराईत घेऊन आले. तो शुद्धीवर यायच्या आत त्या हरणाने फळे मुळे आणून त्याला खायला दिली. भुकेने कासवीस झालेला जीव खाऊन पिऊन थोडा सावरला.

एके दिवशी सुवर्णमृग नारायणाला म्हणाला—"बाबारे, हे जंगल पार तुला नेऊन तुझ्या काशी राज्याकडे जायची वाट दाखवितो. फक्त एकच एक इच्छा आहे ती सांगतो, कोणी राजाने किंवा कोणी श्रीमंताने तुझ्यावर किती उपकार केले तरी अमुक जागी एक सुवर्णमृग राहतो, हे तू सांगू नकोस!"

नारायणाने होकार दिला. ते त्याचे वचन खरे मानून त्या सुवर्णमृगाने नारायणाला पाठीवर बसवून काशी राज्याच्या वाटेवर आणून सोडले.

नारायण काशीला पोचला, त्याच दिवशी एक विचित्र गोष्ट घडली. आदल्या दिवशीच महाराणीला स्वप्नात एक सुवर्णमृग दिसला व त्याने तिला धर्मोपदेश केला. राणीने उठून महाराजाना भेटून विचारले—"असा सुवर्णमृग या जगात कोठे नसेल तर तो मला कां दिसला? म्हणून तसा सुवर्णमृग जगात जेथे असेल तेथून आणला नाही तर माझा जीव राहील की नाही मला शंका आहे!"

राजाने लगेच एका हत्तीवर अंबारी चढवायला सांगितले आणि अंबारीत सोन्याच्या हजार मोहारांची पेटी ठेवली आणि अशा तऱ्हेने त्या हत्तीची मिरवणूक निघाली. एक माणूस दवंडी पिटीत व जाहीर करीत होता की जो कोणी सुवर्ण-मृग कोठे आहे हे दाखवील त्याला पेटीतल्या सर्व मोहरा इनाम दिल्या जातील. गावोगाव सेनापती ती मिरवणूक घेऊन जात होता. ती मिरवणूक काशीच्या वेशीवर आली त्याच वेळी नारायण काशीला पोंचला होता.

तो सेनापतीला येऊन भेटला व म्हणाला "अहो, तुम्हाला हवा असलेल्या सुवर्णमृगा विषयी मला सर्व माहीत आहे. मला महाराजाकडे घेऊन चला."

नंतर नारायण राजाला व त्याच्या परिवारासह सुवर्णमृग राही त्या आमराई-जवळ घेऊन गेला आणि ती एकांताची जागा दाखवून दूरच थांबला.

लोकांनी आमराईत शिरून आरडाओरडा सुरू केला. मृगरूपात असलेल्या बोधि-सत्वांनी तो आवाज ऐकला. कोणी मोठा अतिथी आलेला दिसतो आहे, त्याचा






आतिथ्यसत्कार करावा, असा विचार करून सुवर्णमृगाच्या रूपात असलेले बोधिसत्व वाट काढीत सरळ राजा होता तेथे गेले.

त्या सुवर्णमृगाचा वेग पाहून राजा आश्चर्यचकित झाला. त्याने धनुष्यावर बाण चढवून नेम धरला. तेव्हां सुवर्णमृग म्हणाला–"राजा, थांब! अशी घाई करू नकोस! मी राहातो ती जागा तुला कोणी सांगितली?"

राजाला ती वाणी अमृतवाणी सारखी गोड वाटली आणि नकळत त्याच्या हातातले धनुष्य बाण गळून पडले.

शांत गंभीर आवाजात बोधिसत्वांनी पुन्हां विचारले–"राजा, तुला माझे निवासस्थान सांगितले ती व्यक्ती कोण?" राजाने नारायण उभा होता त्याच्याकडे बोट दाखविले.

तेव्हां बोधिसत्वांनी धर्मोपदेश केला–"जगात मानवाहून कृतघ्न प्राणी नाही, हे शास्वमत खरे आहे! प्राण्यांची भाषा कळू शकेल, पक्षाची भाषा कळू शकेल, परंतु माणसाच्या बोलण्याचा अर्थ ब्रह्मदेवाला ही कळणे शक्य नाही." बोधिसत्वांनी नारायणाचे त्यांनी कसे रक्षण केले व त्याच्या कडून कोणते वचन घेतले होते ते सांगितले.

राजाला भयंकर राग आला म्हणाला–"असं काय! असा महापापी कृतघ्न माणूस जिवंत राहणे धोक्याचे आहे. याला या एका बाणाने ठार करतो!"

बोधिसत्वांनी राजाला तसे न करण्यास सांगितले व म्हणाले–"राजा, नको, त्याचा जीव घेतलास तर काय होणार? तो जिवंत राहिला तर कदाचित् त्याला कधी सुबुद्धी होईल. आपण दिलेल्या वचना प्रमाणे त्याला द्यावयाचे इनाम द्यावे. हेंच योग्य होईल." राजाने तसेच केले.

बोधिसत्वाचे औदार्य, क्षमा वगैरे गुणांची कल्पना राजाला झाली. बोधिसत्व थोर विभूती असल्याचे ओळखून राजाने त्यांची निवड राज्याचा रथ चालविणारा सारथी म्हणून केली.





# श्री चैतन्य प्रभू

ओरिसा प्रांतातील जयपूरहून नवद्वीप मायापुरीला येऊन राहू लागलेले मिश्र नावाचे कुटुंब म्हणजे त्या पंचक्रोशी-तल्या लोकांना फार थोर वाटे इ. स. १४८६ च्या फेब्रुवारी महिन्यातल्या १८ तारखेला जगन्नाथ मिश्र व शचीदेवी या जोडप्याला एक पुत्र रत्न झाले.

आई वडिलांनी मुलाचे नाव निमाई असे ठेवले होते तरी मुलाचा रंग गोरा पान असल्या कारणाने त्याला गौरांग या नावाने ही हाक मारीत. गौरांग विद्याभ्यासात व खेळण्यात बरोबरच्या सवंगड्यात कांकणभर जास्तच होता.





गौरांगने तरूण वयातच एक संस्कृत पाठशाला स्थापन केली आणि एक संस्कृत अध्यापक झाला. त्याची विद्वत्ता व उदार स्वभावामुळे लोक त्याच्याकडे सहजी आकर्षित झाले. परंतु अशा परिस्थितीत निमाई पंडितने एके दिवशी गयेला जाऊन ईश्वपुरी नावाच्या एका थोर साधूचे दर्शन घेऊन त्यांचे शिष्यत्व ग्रहण केले.



निमाई पंडितने मायापुरीला परत आल्यावर आपली संस्कृत पाठशाला बंद केली. तो नित्य ध्यानमग्न किंवा श्रद्धा पूर्वक श्री कृष्णाची भक्तिगीते गाण्यात मग्न राहू लागला, थोड्याच काळांत त्याचा शिष्य संप्रदाय वाढला, तो भजन मंडळीच्या रुपे वाऱ्या करुन भजने व भक्तिगीते गात गावोगाव हिंडू लागला.

काही नृत्या विचाराच्या काही लोकांना गीते गाण्याची ही नवीन रीत आवडली नाही. म्हणून त्यांनी बंगालच्या नबाबाचा स्थानिक प्रतिनिधी काजी याला भेटून निमाईच्या अनुयायांच्या गीतभजन पद्धती विरुद्ध फिर्याद केली.





काजीने रस्त्यांवरुन गात हिंडण्याविरुद्ध निषेध आज्ञा काढली. परंतु तिकडे दुर्लक्ष करुन नवद्वीपात राहणाऱ्या सर्वांना त्या भजनगीत गात जाणाऱ्या वाऱ्यांत सामील होण्यास निमाई पंडिताने बोलाविले. परंतु काजीवर कोणत्याही प्रकारे राग न दर्शविता देवावर जी अढळ श्रद्धा व भक्ती होती, त्यामुळे काजीच्या आज्ञेविरुद्ध निमाई पंडित



शेकडों भक्त निमाई पंडिताच्या वारी भोवती एकत्र झाले. श्री कृष्णाचे चरित्र वर्णन करुन लिहिलेली गीते गात साऱ्या गावोगावं हिंडू लागले. होता होता अशा भक्तांची संख्या म्हणजे एक जनसमुद्रच झाला. एकदां वारी फिरत फिरत काजीच्या घरापर्यंत आली. ती पाहून काजीने घराबाहेर येऊन श्रद्धा व भक्ति पूर्वक निमाई पंडिताला नमस्कार केला!

एकदां निमाई पंडिताचे प्रथम शिष्य नित्यानंद यांच्यावर जगाई व मधाई नावाचे दोन गुंड गुंडागिरी करायला आले. त्यांनी त्याच्या अंगावर दारुचे मडकंच फेकले व नित्यानंदाचे सर्वांग रक्तबंबाळ झाले. तरी त्याने न रागावता त्यांना कृष्णनाम स्मरणाचा उपदेश केला. इतक्यात तेथे निमाई पंडित आले तेव्हां ते दोघे गुंड निमाई पंडिताच्या पाया पडले.





निमाई पंडिताचे लग्न विष्णु प्रिया नामक स्त्रीशी झाले. काही काळ संसार केल्यावर नवीन तऱ्हेने पुढील आयुष्य पालविण्याचा साक्षात्कार निमाईला झाला. एके दिवशी संसाराचा त्याग केला व सुप्रसिद्ध केशव भारती यांच्या दर्शनाला जाऊन त्यांच्याकडून संन्यास दीक्षा घेतली. त्या दिवसापासून त्याने कृष्णचैतन्य

आपल्या अत्यंत विश्वास पात्र अशा शिष्यांसह चैतन्य प्रभू तीर्थ क्षेत्र जगन्नाथपुरीकडे निघाले. दुरूनच पुरीचे दर्शन होताच ते देहभान विसरून गेले. कवी, पंडित व साधू यांच्या संगतीत तेथेच कायम राहण्याचे त्यांनी ठरविले.





कृष्णाचे निवास स्थान असे जे सुप्रसिद्ध वृंदावन क्षेत्र तेथे चैतन्य प्रभूने प्रयाण केले. श्री कृष्णाने जेथे जेथे लीला केली होती, त्या सर्व स्थानांचे दर्शन केले. चैतन्य प्रभूच्या इच्छे प्रमाणे तेथे कृष्णाची देवळे बांधण्यात आली. कित्येक जुन्या देवळांचा जीर्णोद्धार करण्यात आला.

कृष्ण चैतन्य प्रभू जगन्नाथ पुरीला परतले तेव्हा ओरिसा देशाचा राजा प्रताप रुद्र आणि मंत्री रामानंद राय यांनी चैतन्याचे फार मोठे स्वागत केले. इ. स. १५५३ साली ते कोणासही न कळू देता कोठे तरी निघून गेले. परंतु त्यांनी चालू केलेला वैष्णव पंथ पूर्व भारतात मुख्य करून सर्व भारतात थोडा थोडा पसरला.






# पंख फुटलेले पाखरू

हरीपुरच्या रामरावांचा मुलगा गोपाळ याचे लग्न सुमती बरोबर झाले एकुलता एक मुलगा असल्यामुळे गोपाळच्या स्वभावांत धडाडी कमी व आज्ञाधारकपणा जरा जास्त होता.

नवा संसार सुरु होता, सुमतीला एकदां नव्या साड्या हव्याश्या वाटल्या. तिने गोपूला नव्या साड्या आणण्याबद्दल सांगितले.

गोपू म्हणाला, "कशा प्रकारच्या, व किती साड्या आणायच्या, हे आईला विचारुन आणीन."

दुसऱ्या दिवशी आपली आई सीताबाई हिच्या सल्ल्यानुसार गोपूने सुमती साठी रोज नेसावयाच्या चार साड्या विकत आणून दिल्या.

कांही दिवसानन्तर गोपूच्या एका मित्राच्या लग्नाचे निमंत्रण आले. लग्न परगांवी होते. सुमतीने नवऱ्याला सुचविले की मित्राच्या लग्नाला शोभेसा आहेर नेणं बरे होईल. त्यावर गोपूने म्हटले. "बाबांना विचारुन त्यांच्या सल्ल्यानुसार आहेराची वस्तु विकत आणीन तो आहेर देईन."

गोपू लग्नाहून परत आल्यानंतर कांही दिवसांनी सुमती म्हणाली, "मला माहेरी न गेलेल्याला खूप दिवस झाले आहेत. आई बाबांना भेटावेसे वाटत आहे, एकदां जाऊन यावे म्हणते!"

"तुला माहेरी कधी पाठवायचे, परत कधी बोलावून घ्यायचे, हे आईला विचारुन सांगतो" असे म्हणून गोपूने आईच्या सल्ल्यानुसार सुमतीला माहेरी धाडले.

चार दिवस माहेरी राहिल्यानंतर सुमती आपल्या भावा बरोबर परत आपल्या घरी आली. सुमतीचा भाऊ, आनन्द तिच्या सासऱ्यांशी – बोलत बसला असता गोपू




तिथे आला व "बाबा, मी बाजारांत जाऊन येतो" म्हणाला.

"ठीक आहे, जा!" रामराव किंचित त्रासिक आवाजांत म्हणाले.

गोपू बाहेर गेल्यानंतर आनंद त्यांना म्हणाला, "आपल्या आणि मामींच्या सल्ल्याशिवाय, परवानगी शिवाय, आमचे मेव्हणे कोणती ही गोष्ट करीत नाहीत असे दिसते."

"होय, त्याला आम्ही तसे वळण लावले आहे" रामराव म्हणाले. व त्यांनी आनंदाला विचारले.

"या बाबतीत आमच्या सून बाईंचे व तुमचे वळण कसे काय आहे?"

आनंद म्हणाला, "आम्ही वेगळ्या वळणांत वाढलो आहोत, लहान-सहान बाबतीत आम्ही आई-वडिलांची परवानगी वा सल्ला घेत नाही.

बोलणें तेवढयावरच राहिले. एक-दोन दिवसांनी आनंद परत गेला. त्यानंतर रामराव गोपूला म्हणाले, "मी व तुझी आई महिन्याभरासाठी दक्षिणेतील क्षेत्रांचे दर्शन घेण्यासाठी जाणार आहोत. उद्यांच निघावयाचे आहे."

वडिलांचे बोलणें ऐकून गोपू गडबडून गेला, व म्हणाला, "पण बाबा! या महिन्या भराच्या अवधींत शेती-भाती वगैरे बाबतीत मला सल्ला कोण देईल?" यावर रामरावांनी कांही उत्तर दिले नाही.

आई-वडील गांवाला गेलेल्या गोष्टीला चार दिवस झाले. एके दिवशी गोपूचा मित्र गिरिधारी त्याच्याकडे येऊन महत्वाच्या कामासाठी हजार रुपयाचे कर्ज दे म्हणाला.

गोपू घरांत येऊन बायकोला म्हणाला, "आतां काय करावे? सल्ला देण्यास बाबा इथे नाहीत. माझा मित्र-हजार रुपये कर्जाऊ मागतोय!"

यावर सुमती म्हणाली, "तुमचा मित्र कर्ज फेडूं शकतो की नाही हे तुम्हाला



कळले पाहिजे, यांत मामजींचा किंवा माझा सल्ला काय म्हणून हवा?

सात-आठ दिवसांनी त्यांची शेती खंडाने करणारे नोकर आले व ते म्हणाले, "मालक! यंदा ऊस कुठे लावायचा? किती लावायचा म्हणतां?"

गोपू बायकोजवळ येऊन तिला म्हणाला, "दरवर्षी उसाची लागवड किती व कुठे करावी, भात किती लावावं हे बाबा सांगतात व त्यानुसार मी सर्व कांही करतो, पण आतां काय करावं?"

यावर सुमती म्हणाली, "अहो यांत न समजण्या सारखे काय आहे. तुम्ही दररोज शेतावर जातांच, तुम्हाला माहीत आहे की भात लावण्यासाठी कांही जमीन सोडून, मागच्या वर्षीच्या पिकाच्या अंदाजाने ऊसाची लावणी करायची, यांत सल्ला कशाला हवा कुणाचा?"

दोन दिवसांतच गोपूने आपल्या अनुभवाचा उपयोग करून घेतलेल्या निर्णयानुसार वाफे तयार करवून घेऊन उसाची लावणी पूर्ण केली सुद्धा.

नंतर शेतकीच्या वा घरच्याइतर बाबतींत सवयीनुसार गोपू सल्ल्यासाठी अडला की सुमती म्हणायची, "हे सर्व तुम्हाला कळत नाही असे थोडेच आहे, त्यांत माझ्या सल्ल्याची लुडबूड हवी कशाला?"




दरम्यान रामरावांनी पत्र पाठवले की, "अजून कांही क्षेत्रांची यात्रा पूर्ण करावयाची असल्यामुळे त्यांचे परतणें दोन महिने लांबले आहे."

आतां गोपू स्वतःच्या विचाराने शेतकीची घरची व इतर व्यवहारांची जबाबदारी उत्तम रीतीने पार पाडू लागला. तीन महिन्यानंतर गोपूचे आई-वडील तीर्थ-यात्रे-हून परत आले. तेव्हा त्यांना भेटण्या-साठी गोपूचा मेहुणा आनंद आला. ते नवरात्राचे दिवस होते. गावांत देवाच्या उत्सवाची तयारी चालू होती.

रामराव आनंद व गोपू अंगणात उभे होते, रामराव त्यांना यात्रेतील कांही

गोष्टी सांगत होते. इतक्यांत गांवच्या उत्सव समितीचे लोक उत्सवनिधि मागण्यासाठी आले.

येऊन म्हणाले, "आपण या उत्सवासाठी मुक्त हस्ताने देणगी द्यावी!" यावर रामराव कांही बोलणार तोच, गोपू म्हणाला, "ठीक आहे! आम्ही आमच्या नांवाला साजेलशी देणगी देऊं पण देवीची पालखी नेताना आमच्या घरासमोर आरती, पोत व गोंधळ हा कार्यक्रम घटकाभर करायला हवा" व त्याने घसघशीत देणगी दिली.

गोपूच्या स्वभावांत पडलेला हा फरक बघून रामरावांना खूप समाधान वाटले. तेवढयांत शेतावर काम करणारे नोकर-चाकर तिकडे जाताहेतसे बघून गोपू त्यांच्याकडे निघून गेला.

आपल्या मेहुण्यांच्या वागण्यांत झालेली सुधारणा आश्चर्याने बघत उभ्या असलेल्या आनंदाला रामराव म्हणाले, "आनंदराव! त्या दिवशी तुमच्या बरोबर बोलणे झाल्यानंतर मुद्दामच आम्ही तीर्थयात्रेच्या निमित्ताने बाहेर पडलो. एवढे वय झाल्यानंतर सुद्धा अगदी लहान-सहान बाबतीतही गोपू स्वतंत्रपणे विचार करु शकत नव्हता, त्याचे कारण आम्ही त्याला आमचे बोट सोडून चालायला शिकवलेच नव्हते, ही माझी चूक मला फार उशीरा उमगली!"

यावर काय बोलावे हे न सूचून आनंद नुसतेच, "असे होय?" म्हणून चूप राहिला.

"तर मग! पंख फुटल्यानंतर सुद्धा चिमणी आपल्या पिलाला अनाठायी प्रेमा मुळे उडूं न देता घरात बसवून भरवू लागली तर काय होईल? पिलाला स्वतःच्या पंखाने असलेले उडण्याचे सामर्थ्य ध्यानांत न येता ते दुबळे बनेल. आमच्या गोपूचे तसेच झाले होते. पण कांही का असेना मुनबाईने आपल्या चातुर्याने गोपूच्या योग्यतेला योग्य ते वळण दिले, याचे आम्हांला समाधान आहे."



# वाईट वाटण्याजोगी गोष्ट

**गणू** हा एक महा आळशी माणूस सोमनाथ शेठच्या दुकानी होता. गणूचे वडील शेवटपर्यंन्त इमाने-इतबारे नोकरी करीत होते, म्हणून सोमनाथ शेट गणूच्या आळशी पणाकडे तेवढे लक्ष देत नसत.

एके दिवशी शेजारच्या शहरांतून दुकानाचा माल आणतांना गाडी पालथी पडून गणूला जबर मार लागला. गाडीवानाने गणूला घरी आणून पोचविले. वैद्यबुवांनी येऊन जखमांची मलमपट्टी केली, औषध दिले. सोमनाथशेठ स्वतः गणूच्या समाचाराला येऊन म्हणाले, "तू सुखरूप वाचलास. त्यापुढे नुकसानीचे कांही मोल नाही. तू पूर्ण बरा होईपर्यन्त कामावर येण्याची काळजी करुं नकोस. तुझ्या पगारांत कपात करणार नाही."

एरव्ही गणूला त्याच्या आळसाबद्दल बोलणारी बायको आजारांत त्याची मनोभावे सेवा करुं लागली. समाचाराला येणारे मित्र व नातलग फळे, भाजी-पाला देऊन जात.

दहा दिवसांनी वैद्यबुवा जखमांची पुन्हा तपासणी करीत. "गणू! तुला वाईट वाटण्याजोगी गोष्ट सांगावी लागत आहे, पण त्याशिवाय गत्यंतर नाही" असे म्हणत, जखमा बांधून म्हणाले–"जखमा फार गंभीर आहेत, कमीत कमी दोन-तीन महीन्यां पर्यंत तुला, चालतां येणार नाही, आराम घे," व औषध देऊन ते जाण्यास निघाले, तेंव्हा त्यांना थांबवीत गणू म्हणाला, "वैद्यबुवा! अहो, कांहीतरी वाईट वाटण्याजोगी गोष्ट सांगेन म्हणालांत आणि तसेच चाललांत काय?"

गणूचे हे विचारणे ऐकून वैद्यबुवा आश्चर्याने थिजून राहिले.





# बिघडले कुठे?

सकाळीच उठून स्वैंपाकाला लागलेला माधव, रस्त्यावरचा गलबला ऐकून दाराबाहेर आला. एका टांग्याभोवती बऱ्याच माणसांचा घोळका बघून धांवत येऊन त्याने गर्दीतून मान उंचाऊन बघितले, पन्नाशीतला एक वयस्क गृहस्थ छातींत उठलेल्या असह्य वेदनांनी विव्हळत असलेला दिसला.

तो गृहस्थ परगांवचा आहे हे विचारून घेतल्यावर कांहीजण त्या टांगेवाल्याला म्हणाले–"हा माणूस या दुखण्यातून जगेलसे दिसत नाही, याला लवकर याच्या गांवीं घेऊन जा."

भांबावलेला टांगेवाला घोडा दामटणार तोंच माधवने त्याला थांबवीत म्हटले– "हृदयाचे दुखणें उठते तेव्हां प्रवास करणें इष्ट नव्हे, विश्रांतीने आराम पडतो, यांना मी माझ्या घरांत नेईन." व टांगेवाल्याच्या मदतीने त्याने त्या अनोळखी माणसास घरांत आणून अंथरुणावर निजविले व त्या गाडीवानाकरवीं वैद्यास बोलावणें पाठवले. वैद्याने येऊन कसलेसे औषध दिले व काळजीचे कारण नसल्याचे सांगितले.

बालपणीच आई-वडिलांच्या मायेस पारखा झालेल्या माधवने नातलगांच्या आश्रयाने शिक्षण पूर्ण केले होते व नौकरी मिळवली होती. तो स्वतःच्या हातांनी सैंपाक करून खात असे म्हणून सकाळीच कामाला लागे.

घरांतील उरलेली कामें आटोपून येईपर्यन्त तो आजारी गृहस्थ व्यवस्थित शुद्धीवर येतांच स्वतःला कुण्यातरी नव्या ठिकाणी बघून, पलंगावर उठून बसत, "मी कुठे आलोय?" असे तो गृहस्थ म्हणाला.



माधवने त्याला सर्व कांही सांगून– "आतां बरे वाटते आहे ना?" म्हणून विचारले.

माधवकडे भारावलेल्या नजरेने बघत तो माणूस म्हणाला–"माझे नांव बलवंतराव, तुम्ही ऐन वेळी मदत करून माझे प्राण वांचवलेत, मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाही."

त्यांना अडवीत माधव म्हणाला–"थोडे बरे वाटत असल्यास स्नान करून, चार घांस जेऊन, आराम करा."

"बरे" म्हणून स्नान करुन ते जेवूं लागले, स्वैंपाकाची तारीफ करीत बळवंत राव म्हणाले–"स्वैंपाक खरोखरच सुंदर झाला आहे. मी माझ्या घरीच जेवतो आहेसे वाटतेय."

थोडा आराम घेऊन बळवंतराव गांवी परतण्यास तयार झाले.

हृदयविकाराच्या रोग्यास एकटे पाठविणें बरे नव्हे, असा विचार करून कचेरींत रजेची चिठ्ठी पाठवून माधव त्यांच्या बरोबरच निघाला.

गांवी पोंचण्यास संध्याकाळ झाली. घरी पोंचतांच पत्नी, मुलगा व मुलगी सर्वांना माधवची ओळख करून देत त्याने केलेल्या मदतीचे बळवंतरावांनी तोंडभर कौतुक केले. सर्वांनी त्याचे मनापासून आभार मानून एक दिवस राहण्याचा फार आग्रह केला. माधवने त्यांच्या आग्रहास मान दिला.

माधव त्यांच्या मुलासह बाहेर फिरावयास गेला, तेव्हां बळवंतराव पत्नीस म्हणाले–"मुलगा चांगला आहे, शिकला-सवरलेला आहे आपल्या राधेसाठी याहून चांगले स्थळ कुठे मिळणार?"

त्याच वेळी राधा तिथे आली आईबापाची लाडकी असल्यामुळे तिला स्वैंपाक करतायेत असूनही स्वैंपाकाचा भयंकर कंटाळा होता. आळस जणू तिच्या पांचवीस पुजला होता.

बाबांनी विचारलेल्या प्रश्नास आईचा होकार निघण्याआधीच, "यांच्या घरी

न. रा. देशपांडे



"आणखी कोण-कोण आहे"? म्हणून राधेने विचारले.

"अग! याला जवळचे, नात्यांतले असे कुणी नाहीतच, एकटाच असतो." बळवंतराव म्हणाले.

"एकटेच असतात? मग जेवण?" राधेने विचारले.

"स्वतःच करून खातात! स्वैंपाक फार चांगला करतात बरं का, अगदी तुझ्या आईच्या स्वैंपाकासारखाच!" बळवंतराव किंचित हंसून म्हणाले.

राधेने विचार केला, "बाबांच्या सांगण्यानुसार माधव हुशार आहे, स्वभावाने चांगला आहे, दिसायलाही सुंदर आहे, मग काय हरकत आहे." व कांहीही न विचारता तिने आपला होकार दिला.

त्या रात्री जेवण झाल्यानंतर गच्चीत बसून पान खातांना बळवंतराव माधवला म्हणाले, "तुम्ही आमच्या घरी सर्वांना फार आवडलां आहांत, आमच्या राधिकेला तुम्ही बघितलेतच आहे, तुम्हाला जांवई करून घ्यावे अशी आमची इच्छा आहे, आपला काय विचार आहे?"

यावर माधव क्षणभर संभ्रमांत पडला, या गोष्टीची त्याला यत्किंचितही कल्पना नव्हती. त्याला आपल्या एकलकोंड्या जीवनाचा कंटाळा येत होता. निरोगी व सुंदर असलेल्या राधेस नाकारण्याचे कांहीं कारण नव्हतेच. थोडा वेळ विचार करून माधवने त्या गोष्टीस होकार दिला.

महिन्याभरांतच लग्न होऊन राधा, माधवच्या घरी त्याची गृहिणी म्हणून आली. आलेल्या दुसऱ्या दिवशी सूर्य बराच वर आला तरी राधा जागी झाली नाही. त्याने राधेला उठवले नाहीं व कचेरींत जाण्यास उशीर होईल म्हणून माधवने घाई-घाईत स्वैंपाक केला.

त्या दिवशी संध्याकाळी माधव परत येताच ती शेजारणी बरोबर देवळांत गेली. नवऱ्याशी दोन शब्द बोलली सुद्धां नाही. तिला परतण्यास उशीर होतोय म्हणून माधवनेच स्वैंपाक केला.

रात्री जेवतांना कौतुकाने राधा म्हणाली, "बाबांच्या सांगण्यावर माझा विश्वास बसला नव्हता, पण खरंच तुमच्या हातचा स्वैंपाक अगदी माझ्या आईच्या स्वैंपाका-सारखाच "गोड" आहे."

बायकोच्या प्रशंसेने माधव हुरळून गेला.

दुसऱ्या दिवशी दिवस बराच वर आला तरी राधा उठत नाहीसे बघून माधव तिला उठवीत, "कचेरीला वेळ होईल लवकर उठून स्वैंपाक आटोपून घे." म्हणाला.

स्वैंपाकाचे नांव ऐकतांच राधा भांबावली काय म्हणावे हे न सुचून, "आई ग! डोकं फार जड झालंय हो!" म्हणाली. त्याही दिवशी माधवनेच स्वैंपाक केला. अशा रीतीने दररोज कांही ना कांही सबब काढून आठवडाभर तिने माधवच्या हाती स्वैंपाक करविला, एवढेच नव्हे तर, "माझा हात पोंचत नाही." या सबबीवर नवऱ्याला घरांतील जळमटं सुद्धा स्वच्छ करण्यास लाविले.

नवऱ्याला अशा प्रकारच्या सबबी सांगून बेजार झाल्यानंतर एके दिवशी राधा आई वडिलांच्या भेटी साठी माहेरी गेली.

पंधरा दिवसांनंतर, सासरी येता-येतांच, "आज मला एक साडी आणाना हो!" म्हणाली पंधरा दिवस एकटा राहून





कंटाळलेला माधव तिच्या या बोलण्याने वैतागून म्हणाला–"आत्तां कसची साडी? सण नाही वार नाही!"

"साडीचा अन् सण-वाराचा हो काय सम्बन्ध? पहिल्यापासूनच मला महिन्याला एक नवी साडी नेसायची संवय आहे" खोटे-खोटे रागावून राधा म्हणाली.

त्या दिवशी संध्याकाळी राधेला घेऊन माधव बाजारांत गेला. साडी घेऊन परत येतेवेळी टांग्यात बसतांना तिचा हात मुरगळला. त्या दिवशी सुद्धा नेहमी प्रमाणें माधवला स्वैंपाक करावा लागला. दुसऱ्या हाताचा बहाणा करून राधा पुन्हा कांही दिवस स्वैंपाक-घराकडे फिरकलीच नाही.

तर, अशा रीतीने स्वैंपाक चुकवण्याचे बहाणे करून कंटाळलेली राधा एके दिवशी माधवला म्हणाली, "का हो; आपल्या लग्नाच्या आधी तुम्हाला कोण स्वैंपाक करून देत असे?"

"मीच करीत असे." माधव उत्तरला.

त्याच्या या उत्तरावर खुष होऊन राधा म्हणाली, "मग आतां, मला स्वैंपाक कर म्हणून कां म्हणतां? मुठभर टाकायचे ते दोन मुठी टाकलंत की दोघांचाही स्वैंपाक होतो, बिघडले कुठे?"

तिच्या या बोलण्याने माधवला बायकोच्या मनाचा पूर्ण थांग लागला. दुसऱ्या दिवशी सकाळी माधव कचेरींत जाण्यास निघाला तेंव्हा राधा म्हणाली, "साडी न घेतां खूप दिवस झाले हो, आज येतांना एक साडी आणा गडे!"

कांही न बोलतां माधव बाहेर पडला. संध्याकाळी घरी येतांना नेहमीच्या दुकानी जाऊन त्याने एक लाल रंगाची साडी पसंत केली. ओळखीचा दुकानदार होता, तो पटकन म्हणाला "साहेब! परवांच बाईसाहेबांबरोबर येऊन . तुम्ही अशीच, याच रंगा-पोताची साडी नेली होती ना? मग आतां वेगळी ध्या!" पण माधवने तीच साडी घेतली. नवऱ्याच्या हातांत साडीचे पुडके पाहून आनंदलेली राधा ती साडी बघतांच कपाळाला आठ्या घालून म्हणाली–"अहो! या अधी अशीच, लालच साडी घेतली आहे ना? ही कशाला आणलीत? ही परत करून दुसरी आणा!"

"आतां, कुठे परत करायचे? असूं दे, इतक्या साड्यां आहेच एकाच प्रकारच्या दोन साड्या असल्या तर त्यांत बिघडले कुठे?

"कांही तरीच काय बोलतां? ढीगभर साड्या असल्या म्हणून कुणीही एकाच सारख्या दोन साड्या नेसत नाहीत, रंगात, कांठपदरांत कुठे तरी वेगळे पण असाय-लाच हवें!" राधा म्हणाली.

"साधी साडीची बाब ती काय, त्यांत तुला एकाच प्रकारच्या दोन साड्या चालत नाहीत मग माझे जीवन मात्र लग्नाच्या आधी आणि नंतर एकाच प्रकारे असावे अशी अपेक्षा तूं का करतेस? तुझ्या वडिलांची तब्येत बरी नसते म्हणून इतके दिवस तुझा नखरा मी सहन केला." असे म्हणत माधव रागरागाने साडी घेऊन बाहेर पडला.

नवऱ्याच्या बोलण्यांतील तथ्य राधेच्या ध्यानी येऊन इतके दिवस त्याला जाणून-बुजून दिलेल्या कष्टाबद्दल तिचे डोळे पाण्याने भरून आले.

तिचेवडील आईच्या स्वैंपाकाची वाखाणणी करीत तेव्हां आईच्या चेहऱ्यावर ओसंडणारे तृप्तीचे भाव, तिला होणारा आनंद राधेला आठवला. दोन तासानंतर माधव परतला तेव्हां अंगणात येत राधा म्हणाली, "मी मूर्खपणाने वागले, मला क्षमा करा!"

तिच्या डोळ्यांतील अश्रू पुसत माधव म्हणाला, "मूर्खांना स्वतःची चूक कधीच कळत नाहीं. स्वतःची चूक उमगलेली तूं मूर्ख होऊच शकत नाहीस!"

माधवने यावेळी आणलेले साडीचे पुडके राधेच्या हातांत दिले, त्यांतील मोरपंखी रंगाची साडी बघून राधेच्या चेहऱ्यावर इंद्रधनुष्याचे हंसू पसरले.



# राग आणि रूप

एक चित्रकार एकदां एका जहागीरदारास भेटण्यासाठी गेला. तो जहागीरदार तेव्हां अतिशय रागांत होता. चित्रकाराचे बोलणें कांही एक न ऐकतां त्याने त्याला वाटेल तसे बोलून घालवून दिले.

कांही दिवसांनंतर तो जहागीरदार एका सभेस गेला असतां त्या चित्रकाराने त्याला भेटून, एक चित्र त्याला भेट देऊन, म्हटले, "महाराज! आपले चित्र काढले आहे, बघून, चांगले इनाम देण्याची कृपा करावी." जहागीरदाराने ते चित्र पाहिले आणि एकदम संतापून ते चित्र सभासदांकडे फेकीत, "हे बघा, हे माझे चित्र म्हणून फाड्-फाड् बोलू लागला.

"क्षमा असावी! पण महाराज पहिल्यांदा आपल्या दर्शनास आलो तेव्हां आपण आधाच कोप-मुद्रेंत होतां," चित्रकार नम्रपणे म्हणाला.

त्या वेळी जहागीरदाराने त्या दालनांतील एका खांबावर असलेल्या आरशांत आपले प्रतिबिंब पाहिले आणि तो अतिशय खुष झाला, ते प्रतिबिंब अगदी त्या चित्रा सारखेच होते. सभासद त्या चित्रकाराची कला बघून स्तिमित झाले. त्या क्षणी जहागीरदाराचे रूप जसे होते तसेच त्या चित्रांत होते. रागावले असतां आपले रूप कसे दिसते हे त्या चित्रकाराने दाखवून दिलेले बघून खुष होऊन जहागीरदाराने सन्मान पूर्वक त्याला बिदागी दिली. त्यानंतर तो कधीच कुणावर संतापला नाही.






सूतमुनी नारदाच्या तपश्चर्येची कथा सांगू लागले :

पूर्वी नारद एका दासीच्या पोटी जन्मला. ती दासी एका भागवत्तोमाच्या घरी काम करीत असे. त्या भागवत्तोमाच्या घरी नेहमी थोर ऋषी व मुनी येत आणि त्यांचे तो चांगले आतिथ्य करी. नारद फार लहान होता तरी त्या बाल्यावस्थेतही तो त्यांना पाणीप्यायला आणून देई व अशाच प्रकारे त्यांची लहान मोठी कामे करून त्यांची सेवाचाकरी करी. त्या वेळी ज्ञानी मुनी आपसात थोर ज्ञानाच्या व विष्णूच्या मायेच्या गोष्टी बोलत. नारद त्या आनंदाने ध्यानपूर्वक ऐकत असे. पाणी म्हणजे 'नीर', ते देणारा म्हणून मुनी त्याला 'नारद' म्हणून हांक मारीत नारदाच्या बालवयातच त्याची आई सांप चावल्याने मरण पावली.

त्या बालकाला त्याचा बाप कोण, काय, काही माहीत नव्हते.

बरोबरची मुलं नारदाला. 'दासीपुत्र', म्हणून त्याचा अपमान करीत.

पुढे काही दिवसांनी त्याचा मालक भागवतोत्तम ब्राह्मण सुद्धा निवर्तला. नारद निराश्रित होऊन फिरत भुकेने जीव कासावीस झाल्या सारखा दारोदारी फिरू लागला. त्याला 'चोर' म्हणून लोक हाकलू लागले. खटयाळ मुलं दगडधोंडे मारून रडवीत आणि त्यातच त्यांना गंमत वाटे.



"मी कशाला जन्मलो? मी असं काय पाप केलं की मला इतक्या अन्यायाने हे लोक मारहाण करतात? कृमीकीटक व जनावरे सुद्धा रानावनांत स्वच्छंदपणे हिंडतात फिरतात!" असा विचार करीत नारदाने गाव सोडून जंगलाची वाट धरली. त्याला मुनी आपसात बोलत त्या गोष्टींची आठवण झाली.

"मी तपश्चर्या कां करू नये? कुलीन कुटुंबात देवांत जन्मलो पाहिजे!" असे ठरवून नारदाने तपश्चर्या सुरू केली.

"अनाथांचा नाथ? या त्रिलोकाचा जो पिता तोच माझे सर्वस्व! त्याने मला कसेंही ठेवावे, मला ते मान्य!" असे मनाशी ठरवून नारदाने तपश्चर्या केली. नारदाचे तप फळाला आले. त्याच्यावर तेजोमय प्रकाशाचा झोत पडला.

तो ज्योतिरूपे स्वतः विष्णूच प्रसन्न होऊन प्रगट झाला होता म्हणाला–"वत्सा, नारदा! तू माझ्यात लीन होत आहेस तू ब्रह्मदेवाचा मानसपुत्र म्हणून जन्मला येशील. तुझ्यात माझा अंश असेल. तू चिरंजीवी होशील त्रिकालाबाधित त्रिलोकात तू भ्रमण करीत महान कीर्ती संपादन करशील." असे विष्णूने वरदान दिले.

नारद विष्णूचा अंश म्हणून व ब्रह्मदेवाचा मानसपुत्र देवर्षि म्हणून जन्मला व त्रिलोकाच्या आदरास पात्र झाला. विष्णूच्या अनेक लीलावतारांत नारदाचा अवतार हा एक अवतार गणला गेला.

अशा थोर देवर्षी नारदाचा उपदेश ग्रहण करून ध्रुव झपाझप चालू लागल्यावर एकदम समोर "दादा! थांब जंगलात जाऊं नकोस!" असे म्हणत उत्तम रडत धावत आडवा येऊन उभा राहिला व हात धरून म्हणाला–"दादा, तू असा जंगलात निघून गेलास तर मी एकटयाने कोणाबरोबर हरिभजन करावयाचे! खेळायला तरी मला तुझ्या सारखा भाऊ कोठे लाभणार? माझी आई तुला फारच बोलली, पण तुझा माझ्यावर राग का?"



म्हणून जाऊं नकोस, ये! असे ओक्साबोक्शी रडू लागला.

ध्रुवाने उत्तमला मिठी मारली व म्हणाला–"माझ्या लाडक्या उत्तमा, मला जन्म दिल्याबद्दल माझ्या आईला सुद्धां थोरपण यायला नको का?"

"तरमग मी सुद्धां तुझ्या बरोबर जंगलात येतो. तू तपश्चर्या करशील तेव्हां तुला मी फळे फुले वगैरे आणून देईन." उत्तम म्हणाला.

ध्रुव म्हणाला–"तसं केलंस तर तुझी आई तुझ्यासाठी रडेल की रे! मी तुझा दादा ना! मग तू माझं ऐकलं पाहिजेस!"

ते ऐकून उत्तम तसाच रडत उभा राहिला. जागचा हालला नाही. त्याच वेळी सुरुची धावत आली व त्याला तिने मिठी मारली. परंतु उत्तम तिला झिडकारीत म्हणाला–"आई, तू मला शिवूं नकोस! तुझ्या मुळेच माझा दादा निघून जातो आहे!"

सुरुचीची मान लाजेने खाली झाली व ती म्हणाली–"होय बाबा! मीच पापिष्टी आहे, सर्व गोंधळ माझ्या मुळेच झाला!" असे ती म्हणत असतां उत्तानपादराजा स्वतः आला व ध्रुवाला मिठी मारीत म्हणाला–"ध्रुवा बाळा! थांब! हे सर्व माझ्या मंदबुद्धीमुळे घडले. माझे सिंहासन



हे तुझेच आहे. ये, बाळ!" तोपर्यंत ध्रुव पुष्कळच दूर निघून आला होता.

त्यानंतर नारद सुनीतीला म्हणाला–"माते, तू खरोखरीच रत्नगर्भा आहेस! तू आपल्या मुलाची काळजी मुळीच करू नकोस! स्वतः नारायण त्याच्या रक्षणाला समर्थ आहे!" असे सांगून नारद उत्तानपाद राजाला म्हणाला–"ही आपण सर्वांनी आनंद मानावयाची वेळ आहे. तुझे वडील, ध्रुवचे आजोबा असे स्वायंभु मनू त्यांच्या वंशाला ध्रुव मोठी कीर्ती संपादन करून देईल. यात कोणी कोणाला दोष देण्याचे कारण नाही. ही सर्व त्या नारायणाची इच्छा व संकल्प आहे!" असे सांगून नारदाने सर्वांचे सांत्वन केले.



ध्रुव मधुवनात "ओम् नमो नारायणाय" मंत्राचा जप करीत तपःश्चर्या करीत असतां यमुना नदीची मंदधारा त्या बरोबर ताल देत होती आणि क्रूर रानटी जानवरे त्याच्या चारी बाजूला आप्त मित्रांसारखी हिंडत होती. त्याच्या घोर तपःश्चर्येमुळे त्रिलोक हादरून गेला.

कोणी कोठेही तपश्चर्या करूं लागला की इंद्राला वाटे की आपले आसन बळकावण्याचा तो प्रयत्न आहे. म्हणून इंद्राने ध्रुवाच्या तपश्चर्येत विघ्ने आणायचा प्रयत्न सुरु केला. वज्रप्रहार करून त्याने पाऊस, वीज व गारांचा वर्षाव केला. परंतु ध्रुव जागचा हलला नाही. इंद्राने दगडांचा वर्षाव सुरू केला, तेव्हां विष्णूचे सुदर्शन चक्र ध्रुवाचे रक्षण करण्यासाठी त्याच्या डोक्यावर फिरत राहिले व सर्व दगड दूर जाऊन पडले.

तेव्हां नारद इंद्राला म्हणाला–"ध्रुवाला तू सामान्य बालक समजत आहेस का? तू त्याच्या केसालाही धक्का लावू शकणार नाहीस! विनाकारण तू भिऊं नकोस! इंद्रपद म्हणजे त्याला काही किंमतीचेही वाटत नाही, समजले का?"

ध्रुवाच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन विष्णूने त्याला दर्शन दिले. ध्रुवाने विष्णूच्या पायांना मिठीच मारली आणि त्याच्या प्रसन्न वदनाकडे एकाग्र होऊन आनंदाश्रु ढाळीत पहात राहिला. त्याच्या कंठातून शब्द उमटेना. त्याच्या मनात म्हणायचे होते–"देवा, तोंड भरून तुझी स्तुती करावी वाटते, पण मी अबोध बालक आहे, काय बोलावे तेच कळत नाही!"

विष्णूने आपला शंख ध्रुवाच्या गालाला लावला मात्र, लगेच वेदवेदांतातले सारभूत थोर स्तोत्र सामगानासारखे ध्रुवाच्या तोंडावाटे प्रगट झाले.

विष्णूने मंदहास्य करीत विचारले–"बाळा, ध्रुवा! माग, तुला काय हवं ते!"

ध्रुव म्हणाला–"हे परमपुरुषा! भ्रमर जसा कमळाला चिकटून राहातो तसे माझे





मन तुझ्या मधुर मंदहास्यवदनाच्या कमळावर नित्य खिळून राहील, एवढेच मला हवे आहे, याशिवाय काही नको!"

"तथास्तु! तू आपल्या राज्यात परत जा व धर्म व न्यायाने राज्य कर. त्यानंतर तू माझे स्वस्वरूप असलेल्या विश्वाच्या शिरोभागी असलेल्या ध्रुवपदाला पोहोंचशील! कल्पकल्पांतापर्यंत तू त्या पदावर स्थिर राहशील!" असे वरदान देऊन विष्णू अंतर्धान पावला.

विष्णूने ध्रुवावर अनुग्रह करण्यासाठी जो अवतार धारण केला त्याला 'ध्रुव नारायणावतार' हे नाव प्राप्त झाले.

ध्रुव माहिष्मती नगरीला परत आला. उत्तानपाद राजाने ध्रुवाचा राज्याभिषेक करून दिला आणि स्वतः वान-प्रस्थाश्रमात तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला.

उत्तमाचा विवाह झाला नव्हता. तो राजधर्माला अनुसरून प्रजेला हिंस्र पशूपासून काही त्रास होऊ नये यासाठी शिकारीस जाऊ लागला. हिमालय पर्वताच्या अरण्यात दुष्ट यक्ष रहात, त्यांनी त्याच्याशी वैर धरून त्याला ठार केले.

सुरुची पुत्रशोक अनावर झाल्याने तिकडे गेली आणि पेटलेल्या वणव्यात सांपडून जळून गेली.

ध्रुवाने यक्ष जातीचे निर्मूलन करण्यासाठी त्यांची राजधानी अलकापूरीवर स्वारी केली. क्षुद्र मायावी यक्षांनी मायाजालाचा प्रयोग करून पाहिला. ध्रुवाने नारायणास्त्राचा प्रयोग करून यक्षांचे मायाजाल छिन्नभिन्न करून नष्ट केले.

कुबेर ध्रुवासमोर हात जोडून शरण मागायला आला आणि त्याला अलोट संपत्ती व मूल्यवान भेटी देऊन त्याला त्याने खुष केले.

ध्रुवाला पुत्रसंततीचा लाभ झाला. त्याने एक आदर्श राजा म्हणून चिरकाल राज्य केले आणि स्वायंभू मनूच्या वंशाला कीर्तिलाभ करून दिला. शेवटी आपल्या थोरल्या मुलाचा राज्याभिषेक करून देऊन



बद्रिकाश्रमी प्रस्थान केले. तेथे विष्णूचे ध्यान धरून तपश्चर्या करीत त्याने स्वर्ण देह संपादन केला.

श्री विष्णूच्या आज्ञेने विष्णुदूत विमान घेऊन आले त्यांना विष्णूसारखेच चार हात होते.

ध्रुव त्यांना म्हणाला—"माझ्या आईला प्राप्त नाही ते पद किती ही उन्नत असले तरी त्याची मला गरज नाही!" विष्णुदूतांनी प्रथम एका विमानातून वर जात असलेल्या सुनीतीला दाखविले. तेव्हां ध्रुव विमानात बसला आणि अनुक्रमे ग्रह मंडल, नक्षत्र मंडल आणि सप्तर्षी पार करून ध्रुवपदापर्यंत प्राप्त झाला. ध्रुवपदाला विष्णुपद किंवा ध्रुवक्षिती असेही म्हणतात. विष्णूचे निवासस्थान जे वैकुंठ तेथेच आहे. ध्रुवक्षितीतच गोलोक आहे. गोलोकात विष्णू द्विभुज रूपात कृष्ण म्हणून व प्रकृती ही राधा म्हणून राहून वेणुगान करीत आनंदाने विहार करतात. गोलोकाच्या वर घोर अंधःकार पसरलेला असतो. त्या वैकुंठलोकात वास करतो. ध्रुव नित्य-निनिमष विष्णू अंधःकारापलीकडे विष्णूकडे एक टक पहात असतां त्याची ज्योति नित्य प्रकाशित होत असते. खुंटाला बांधलेल्या गाईसारखे सप्तर्षिमंडल ध्रुवाच्या चारी बाजूला प्रदक्षिणा करते. त्याच्या खाली त्यावेळी सर्व ग्रह मंडल व नक्षत्र मंडल चक्राकार फिरत असतात.

गोलोकाच्या खाली ब्रह्मदेव राहतो. तो सत्यलोक, पुढे जनलोक, महलोक, स्वलोक, भुवलोक, भूलोक असे ऊर्ध्वलोकात सात-लोक आहेत आणि भूलोकाच्या खाली अधोलोकांतील अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल व पाताळ असे सात लोक मिळून चवदा लोकांच्या वर विश्वशिखराच्या अग्रस्थानी राहून ध्रुव अचलावस्थेत राहून सर्व विश्वाला प्रकाशित करतो.

दीक्षा असावी, परंतु लहानथोर हाभेद न मानता कितीही मोठे ध्येय गाठणे अशक्य

असू नये. त्याचे उदाहरण म्हणजे पांच वर्षे वयाच्या ध्रुवाने तपश्चर्या करून जे साध्य केले ते होय!" या शब्दात सूत महर्षी ध्रुवचरित्र संपूर्ण करून पुढे सांगू लागले.

मत्स्य म्हणजे मासा. हा एक केवळ जलचर प्राणी आहे, तर कूर्म म्हणजे कांसव हे पाण्यातही व जमिनीवरही वास करणाऱ्या प्राण्यांपैकी एक आहे. पाण्यातून प्राणी जमिनीवर आला. म्हणजे जलचर अवस्थेतून भूचर अवस्थेत त्याने प्रवेश केला.

विष्णूने असाच कांसव होऊन कूर्मावतार धारण केला! असे सांगून सूत महर्षींनी कूर्मावताराची गाथा सुरू केली.

देव व दानव म्हणजे सुरासुरांनी क्षीर-सागराचे मंथन सुरू केले. त्यांना या समुद्रमंथनाने अमृत प्राप्ती होईल असा विश्वास होता.

अमृतप्राप्ती झाली तर ती सर्व आपल्यालाच प्राप्त होईल! असे भुजबला-वर आणि संख्याबळावर अवलंबून राहणाऱ्या राक्षसांना वाटत होते.

राक्षसांना अमृतप्राप्ती झाली व अमृतत्व लाभले तरी आपला बिघाड असा काय होणार? आपला सर्व भार त्या विष्णूवर तर आहे! असे देवांना वाटत होते.

क्षीरसागरात मंदर पर्वताला रवीसारखा उभा करून, वासुकी नागाला त्या रवीला बांधून समुद्रमंथन करावयाचे ठरले, परंतु मंदर पर्वताला आणून त्याला क्षीर समुद्रात आणून उभा करणे कोणाला शक्य नव्हते. म्हणून विष्णूने अनुग्रह करून ते काम केले आणि गिरिधारी ही कीर्ती संपादन केली.

राक्षसांनी वासुकीला त्याच्या तोंडा-कडून धरतो, असा हट्ट धरला. 'ते मान्य करा', असा सल्ला विष्णूने देवांना दिला आणि सर्व देवांना पुढे धरायला सांगून शेपटाचे टोंक स्वत: विष्णूने धरले. नंतर क्षीरसागराचे मंथन सुरू झाले.





# शंका समाधान

विंध्य पर्वताच्या पायथ्याशी एका खेड्यांत शंभू नांवाचा एक गरीब तरुण होता. तो डोंगराळ भागांत शेती करून आपल्या वृद्ध आईची सेवा करीत कशीबशी गुजराण करीत असे. एकदां त्याच्या मनांत एक शंका आली–"आपल्या बरोबरीचे इतर लोक आपल्या प्रमाणेच मेहनत करून श्रीमंत होत आहेत, मग आपण इतके कष्ट उपसुन सुद्धा आपल्याला आणि आईला पोटभर अन्न मिळण्याची मारामार का?"

त्या भागांत असणाऱ्यांच्या तोंडी–"शंका असेल तर आंगीरस मुनीला विचार." ही लोकोक्ति असायची. हे आंगिरस मुनी नासिक जवळच्या त्र्यंब-केश्वराच्या डोंगरांत तप करीत आहेत, असे सुद्धा म्हटले जायचे.

आपली शंका आंगीरस महामुनींना विचारून घ्यावी, असे शंभूने ठरविले, त्याने आपल्या वृद्ध आईला तो विचार मनात येतांच तिचे मत विचारले. म्हणाला–"आई, मी नाशकाला जावे, म्हणतो" तेव्हां तिने त्याला त्याच्या या विचारापासून परावृत्त करण्याचा कितीही प्रयत्न केला तरी त्याने आपला निश्चय सोडला नाही. व तो त्र्यंबकेश्वराकडे निघाला.

मार्गक्रमण करीत असतांना निबिड अरण्यांत त्याला एक झोपडी दिसली. भुकेने त्याचा जीव कासावीस झाला असल्यामुळे त्याने त्या झोपडीत पाऊल टाकले व झोपडीतील वृद्धेजवळ अन्न मागितले. म्हणाला–"माते, घासभर खायला वाढाल का? फार भूक लागली आहे." त्या वृद्धेने त्यास पोटभर वाढून तो कुठे जात आहे याची चौकशी केली.

शंभूने सर्व कांही सांगितले. म्हणाला–"मी किती कष्ट सहन करून काम केले



तरी माझे दारिद्र्य कां जात नाही, हे मी आंगीरस मुनींना विचारायला जात आहे. ते सर्व ऐकून म्हातारी म्हणाली–"बाबारे, माझी सुद्धा एक शंका महामुनीला विचारून घे. माझी नात अठरा वर्षांची आहे, दिसायला अतिशय सुंदर आहे पण तिला बोलता येत नाही. तिचे मुकेपण कसे जाईल हे राज विचारून येशील का?"

शंभूने 'हो' म्हटले व तो तेथून पुढे निघाला. चालतां-चालतां एका गांवाजवळ पोंचला. तिथे त्याला एक घर दिसले त्याने त्या घरच्या यजमानास विचारले–"महा-राज, मी फार दूरून चालत येतो आहे, भूक फार लागली आहे, कांही खावयास मिळेल का?"

त्या गृहस्थाने शंभूला आपल्या पंक्तीस बसायला सांगून पोटभर जेऊं घातले, व 'कोण? कुठला? कुठे जात आहे?' म्हणून विचारले.

शंभू म्हणाला–"कितीही कष्ट केले, तरी माझे दारिद्र्य कमी होत नाही, असे कां? हे विचारण्यासाठी मी त्र्यंबकेश्वरी असणाऱ्या आंगीरस महामुनीकडे जात आहे!"

ते ऐकून तो गृहस्थ म्हणाला–"तर बाबा, माझ्या बाबतीतही जरा विचारून घे, माझ्या परसांत संत्र्याचे एक झाड रसरसून वाढलेले आहे, पण कितीतरी दिवस झाले, त्या झाडाला अजून फळ येत नाही, आंगीरस मुनींना ते झाड कसे फळेल हे विचारून घेशील का?"

'बरे,' म्हणून शंभु पुढील मार्ग आक्रमूं लागला. जातां-जातां तो एका घनदाट-अरण्यांत पोंचला. तेथे त्याला एक आश्रम दृष्टीस पडला.

तो त्या आश्रमांत गेला, आणि त्याने तेथे एक मुनी होते, त्यांना मला थोडे जेवायला वाढाल कां? विचारले. शंभूचा थकलेला चेहरा पाहून त्या आश्रमांतील ऋषीने त्याला प्रेमाने पोटभर खाऊं घातले व विचारले की तो कुठे जात आहे?





शंभूने त्या ऋषीला आपले दारिद्र्य, व त्याच्या निर्मूलनाचा मार्ग विचारण्या-साठी आंगीरस महामुनीकडे जात असल्याचे कथन केले.

ते ऐकून ते ऋषी म्हणाले, "बाळ! तरमग आंगीरस महामुनींना माझ्या बाबतीतही थोडी विचारणा करून घे मी कितीतरी दिवसांपासून कांही सिद्धी प्राप्त करण्या-साठी साधना करतो आहे, पण किती वर्षं झाली तरी माझी साधना सफल होत नाही, काय कारण? तेवढे विचारून घेशील काय?"

"अवश्य विचारून येईन!" म्हणून सांगून शंभू त्र्यंबकेश्वराची वाट चालूं लागला. बऱ्याच कठीण प्रवासानंतर तो आंगीरस महामुनींच्या आश्रमाजवळ येऊन पोंचला. महामुनींनी त्याला प्रेमाने आंत बोलावून घेतले. स्नान, भोजन झाल्या-नंतर त्याचे येण्याचे कारण विचारले.

शंभू हात जोडून विनयाने म्हणाला, "महामुनी! मी आपल्याकडे चार शंकांचे निरसन करून घेण्यासाठी आलो आहे."

आंगीरस महामुनी म्हणाले–"बाबारे! माझ्या नियमांनुसार मी फक्त तीन शंकांचे निरसन करेन. तरी तूं एक प्रश्न वगळून बाकी तीन प्रश्न विचार, मी तुझे शंका समाधान करीन."

शंभू क्षणभर विचार करून आपल्या दारिद्र्याबद्दलची शंका न विचारण्याचे ठरवून, म्हातारीच्या मुक्या मुलीबद्दल,





गृहस्थाच्या वांझोटच्या झाडाबद्दल व सिद्धी प्राप्त करण्यासाठी तपाचरण करणाऱ्या ऋषीबद्दलच्या शंका विचारून, महामुनींनी त्यांचे केलेले समाधान ऐकून, विनम्र अभिवादन करून परत निघाला.

प्रथम तो तप:साधना करणाऱ्या ऋषी कडे आला, ऋषीने शंभूला बघतांच–"महा-मुनींनी काय सांगितले?" म्हणून विचारले.

शंभू म्हणाला–"तुमच्या डोक्यांत एक मणी आहे म्हणें, तुमची सगळी साधना त्या मण्यांत जात असल्यामुळे ती फलद्रुप होत नाही, तो मणी काढून टाकल्यास तुम्हाला सिद्धी प्राप्त होईल, असे आंगीरस महामुनींचे सांगणे आहे."

हे ऐकून त्या ऋषीला आश्चर्य वाटले, त्यांनी आपल्या जटा मोकळ्या केल्या तेव्हां जटेतून एक मणी निघाला. ऋषींनी तो मणी शंभूला दिला व म्हटले–"बाबारे, हा मणी तू ठेवून घे, मी सिद्धिसाधन करण्यास मोकळा झालो."

ऋषींचा निरोप घेऊन शंभू त्या गृहस्थाकडे निघाला.

शंभूला बघतांच त्या गृहस्थाने विचा-रले–"महामुनींनी माझ्या प्रश्नाचे उत्तर दिले कारे?"

शंभू त्यांना म्हणाला, "महामुनींनी सांगितले आहे की तुमच्या संम्याच्या झाडाखाली सुवर्णमुद्रांनी भरलेले नऊ कलश आहेत म्हणें. ते बाहेर काढल्यास झाडास डाळिंबे लागतील."

हे रहस्य बाहेर फुटणे बरे नव्हे, म्हणून त्या गृहस्थाने, त्याच रात्री, शंभूच्या मदतीने संम्याच्या झाडाखाली खणून पाहिले, जमीनींतून नऊ सुवर्ण कलश निघाले.

आश्चर्याने थक्क होऊन तो गृहस्थ शंभूला म्हणाला, "बाबारे! हे सर्व अगदी अकल्पित आहे., तरी तूं यांतून एक कलश घेऊन जा!"

ऋषीने दिलेला मणी व एक स्वर्णकलश घेऊन शंभू म्हातारीच्या झोपडीकडे निघाला.



म्हातारीने शंभूस बघतांच विचारले, "बाबारे! माझ्या नातीबद्दल महामुनी काय म्हणाले?"

"आजी! महामुनी म्हणाले की, तुझ्या नातीस तिच्या मनपसंत वर दृष्टीस पडतांच ती आपोआपच बोलूं लागेल," शंभू म्हणाला.

त्याचे बोलणें होत आहे तोच म्हातारीची नात तिथे आली.

शंभूला बघतांच तिचे गाल लाजेने आरक्त झाले. ती आजीला म्हणाली, "आजी हे कोण आहेत?"

तिचे बोलणे ऐकून म्हातारी आनंदून म्हणाली–"माझे आईग! तुला बोलतां आले, याचा अर्थ हा नवरा म्हणून तुला पसंत आहे. आतां मी तुमचे दोघांचे लग्न लावून देऊन सुखाने डोळे मिटण्यास मोकळी झाले."

शंभूचे लग्न झाले. तो बायकोला घेऊन मणी व सुवर्णमुद्रांचा कलश घेऊन घरी परतला.

दरम्यान शंभूची वाट बघून, रडून-रडून त्याची आई आंधळी झाली होती. शंभूचा आवाज ऐकून ती तृप्त झाली, पण ती त्याला बघूं शकली नाही. तिला फार फार वाईट वाटले.

शंभूने ऋषींनी दिलेला मणी काढून आईच्या डोळ्यासमोर धरून म्हटले–"हा मणी तरी दिसतोय का आई?" आईने तो मणी हातांत घेऊन डोळ्याच्या अगदी जवळ नेला व, "नाहीरे बाळा, कांहीच दिसत नाही" असे म्हणूं लागली तोंच तिच्या डोळ्यांना त्या मण्याचा स्पर्श झाला तत्क्षणी तिला पूर्ववत् दिसूं लागले.

ऋषींनी केलेल्या तप: साधनेमुळे त्या मण्यांत अलौकिक महिमा आहे, हे शंभूने ओळखले. त्या मण्याच्या प्रभावाने शंभूचे दिवस पालटले. तो आपल्या सौंदर्यवती पत्नी सह, आईची सेवा करीत सुखाने राहू लागला.





# अदृश्यकरण मंत्र

पुष्पकनगर नावाच्या गावी स्यमंतक नावाचा एक चोर रहात असे. तो रात्रभर चोऱ्या करी व दिवसा सभ्य गृहस्थासारखा वागे. तो चांगला श्रीमंतच नव्हे तर एक चांगला सुसंस्कृच तरुण आहे. असे समजून एका श्रीमंत माणसाने आपली मुलगी चंपावतीशी त्याच लग्न करून दिले.

चंपावती गुणवती होती व शीलवतीही होती. नीतिधर्म पालन करून रहावे असे तिला वाटे. आपला पती चोऱ्या करतो, हे कळायला तिला फार दिवस लागलें नाहीत. तेव्हां तिला अपार दुःख झाले. पतीला सन्मार्गावर आणण्यासाठी तिने अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिले. परंतु बायकोचा नीति बोध स्यमंतकच्या डोक्यात तिळ-मात्रही शिरला नाही.

काही काळ लोटल्यावर चंपावतीला एक मुलगा झाला. त्याचे नांव सुमन असे ठेवण्यांत आले. बापासारखाच मुलगा चोर होईल की काय ही भीती चंपावतीला रात्रं-दिवस वाटू लागली. तिने पुष्कळ विचार करून मुलाला पांचवे वर्ष लागतांच त्याला विद्याभ्यासासाठी वडिलांकडे पाठवून दिले. अठरावे वर्ष लागेपर्यंत सुमन आपल्या आजोळीच वाढला.

आपला मुलगा आपल्यासारखाच चौर्य-विद्येत निष्णात झाला पाहिजे, आजोळी राहून तो ही विद्या काय शिकणार असा विचार करून स्यमंतकने मुलाला आजोळ-हून परत बोलावून घेतले.

चंपावतीला काळजी वाटू लागली की मुलगा आतां बापाचा धंदाच शिकणार की काय? तिने मुलाला एकांतात बोलावून त्याचा बाप काय धंदा करतो आहे हे थोडक्यात समजावून सांगितले व म्हणाली— "तू मात्र नीतिधर्म पालन करून काहीतरी व्यापार कर! पण बापासारखा चोर मात्र होऊ नकोस, एवढीच माझी इच्छा आहे!"

"आई, तू काही काळजी करू नकोस!" सुमन म्हणाला.

त्यानंतर एका आठवड्याने स्यमंतकने मुलाला बोलावून म्हणाला—"मुला, धन संपादन करण्याचे अनेक मार्ग आहेत. परंतु चोरीचा धंदा त्या सर्वांत श्रेष्ठ! आज तू माझ्याबरोबर चल, मी तुला या धंद्यातील सर्व गुपित तुला शिकवीन."



"नको बाबा! चोरी करून जर कैद झालो तर तो अपमान सहन करावा लागेल त्यापेक्षा मरण आलेल बरे असे वाटेल. मी व्यापार करावा म्हणतो!" सुमन म्हणाला.

"तू मूर्ख आहेस! व्यापारात नफाच मिळेल, हे कशावरून? सर्व दैवावर अवलं-बून आहे! तू माझं ऐक आणि ही विद्या माझ्याजवळ शिकून घे!" बाप म्हणाला.

"बाबा मी व्यापार सुरू करतो. त्यात यश मिळालं नाही तर काही बिघडत नाही त्यानंतर चोरीचा धंदा सुरू करीन. चोरीच्यात शिकून नैपुण्य मिळविण्यासारखं असं आहेच काय? मला अदृश्य करण मंत्र येतो. त्याच्या सहाय्याने चोरीचा धंदा निर्विघ्नपणे चालेल. मला वाटेल तेव्हां मला अदृश्य होता येईल. कोणी माझा हात धरला तर तोही अदृश्य होईल. या विद्येचे प्रदर्शन मी गुरू व आईवडिलां-व्यतिरिक्त कोणासमोरही करून दाखवू शकेन."

स्यमंतक ते ऐकून म्हणाला—"या गप्पां-वर माझा विश्वास नाही!"

"असे असेल तर आज रात्रीच आपण एका घरी चोरी करायला जाऊं या. फक्त माझ्या मंत्राचा प्रताप कळावा यासाठी! पण तेथे चोरीमात्र करायची नाही. अगदी आवश्यक असेल तेव्हांच त्या मंत्राचा उपयोग करावयाचा, दुरुपयोग करणार नाही, अशी मी गुरु समक्ष शपथ घेतली आहे!" सुमन म्हणाला.

स्यमंतक त्या गोष्टीस कबूल झाला.




त्या दिवशी रात्री पिता पुत्र गावात निघाले. त्या गावात वज्रगुप्त नावाचा एक गर्भ श्रीमंत व्यापारी होता. त्याच्या घरासमोर दोघे थांबले. नंतर बापाचा हात धरून सुमन काहीतरी मंत्र म्हणू लागला. तो बापाला सावध करीत म्हणाला–"बाबा आतां तुम्ही काही बोलू नका! आपण कोणाला दिसणार नाही!"

त्या घराच्या चारी बाजूला कोटासारखी मोठी भिंत होती. तिच्यावर चढून उडी मारून जाण्याच्या विचारात स्यमंतक होता. त्याला अडवीत सुमन म्हणाला–"चांगला राजमार्ग असतां आपण आडवाटेने जाण्यात अर्थ काय?"

फाटकाजवळ पाहारेकरी उभा होता. तरी स्यमंतक व सुमन आत जाऊ लागले तरी त्याला ते कळलेच नाही असे दिसले. आत काही अंतर चालून गेल्यावर दोघे वाड्याच्या सिंहद्वारावर आले.

सुमन सिंहद्वार उघडे होते, त्यांतून आत जातांना बापाला हळूच म्हणाला–"सावध हं, माझा हात सोडू नका!"

आंत कसली तरी मेजवानी होती. कोणाचेंही या पिता पुत्रांकडे लक्षच गेलेलं दिसलं नाही. सुमन बापाला वाड्यातील सर्व दालनातून व लहान मोठ्या खोल्यांतून घेऊन गेला. एका खोलीत चार मोठी पेटारं होती. त्यांतून रत्ने व माणिक्ये व सोन्याचे दागदागिने भरलेले होते. रेशमी, मखमलीची व जरीची मूल्यवान वस्त्रे होती. सुमनने अडविले नसते तर बापाने चारसहा दागिने नक्कीच लांबविले असते.

पितापुत्र घरी परतल्यावर बाप म्हणाला–"तुझी ही मंत्रविद्या अद्भुत आहे. हा मंत्र तू मला शिकविणार नाहीस का?"

"कां नाही, शिकवीन!" सुमन म्हणाला.

नंतर सुमनने वडिलांना अदृश्य करण मंत्राची सिद्धी प्राप्त करणे कसे आहे हे समजावून सांगितले.

तो मंत्र शिकणाराने दररोज पुराण पोथी वाचन करावयाचे असते. नीतिग्रंथ वाचावयाचे असतात. एक तासभर पूजा करावयाची असते. हे सर्व यथाविधी केल्यानंतर रात्री झोंपायच्या आधी अदृश्य करण मंत्राचा जप शंभर वेळा करावयाचा असतो. तसे दहा वर्षे केले तर सिद्धी प्राप्त होते.

स्यमंतकने ती विद्या शिकून घ्यायचे ठरविले आणि निश्चय करून सुमनने सांगितल्या प्रमाणे पूजा, पुराण वाचन वगैरे नियमितपणे करू लागला. तेव्हां सुमन आईला म्हणाला–"आई, आतां दहा वर्षे बाबा चोरीच्या नादाला लागणार नाहीत. या अवधीत नीतिग्रंथ वाचतील व पुराण वाचन करतील. त्याचा परिणामचोरी करणे ही चूक आहे हे त्यांना सहजी कळेल. आतां मी व्यापार धंदा करायचा म्हटला तर काही विघ्न येणार नाही."

चंपावतीने मुलाला विचारले–"कायरे, तू ही सर्व सिद्धी कशी प्राप्त करून घेतलीस?"

आजोबांकडे राहात असतांना माझी ओळख वज्रगुप्तच्या मुलीशी झाली. ती माझ्यावर जीव द्यायला तयार आहे. तिच्या मदतीमुळे हे सर्व नाटक शक्य झालं." असे सांगून आदल्या दिवशी रात्री त्याने जे केले ते थोडक्यात सर्व सांगितले.

"म्हणजे तुझे बाबा चोर आहेत, हे त्या सर्वांना माहीत झाले का?" चंपावतीने भीत-भीत विचारले.

"नाही आई, बाबांची प्रकृती बरी नाही. त्यांना हल्ली धनार्जन करायला फार त्रास होतो. असं मी त्यांना सांगितले. त्यांना सर्व आजार विसरावा म्हणून हे अदृश्य करण मंत्राचं नाटक करणं जरूरीचं आहे असं सांगितले होते." सुमन म्हणाला.

स्यमंतक अदृश्यकरण मंत्र साध्य करून घेण्याच्या नादाला लागला आणि सुमनचे लग्न वज्रगुप्तच्या मुलीशी निर्विघ्न पणे पार पडले, त्यानंतर त्याने सासऱ्याकडून व्यापार कसा करावा हे शिकून घेतले आणि एक यशस्वी व्यापारी म्हणून मोठे नाव मिळविले.



# वासरा साठी

आळ्यासारखा हिंडणारा बंड्या एका नारळाच्या बागेच्या बाजूने जात असतां झाडाला खूप नारळ लागलेले पाहून झाडावर चढू लागला.

पाहरेकऱ्याने ते पाहिले व त्या बाजूला धावला आणि ओरडला–"कोण रे तो झाडावर चढतो आहे?"

बंड्या थोडा सुद्धा न कचरतां म्हणाला–"चढण्याच काम झालं खाली उतरतों आहे. वासरू मात्र दिसलं नाही."

"नारळाच्या झाडावर वासरं कसलं रे? डोकं आहे का ठिकाणावर?"

"तू म्हणतो आहेस ते ऐकून तू आमच्या मालकांसारखाच हुशार दिसतोस की रे! ते वासरू दिसलं नाही की झाडावर चढून, बिळांमध्ये, जिना चढून सगळं शोध म्हणतात. मी सांगतो ते त्यांना पटत नाही. तू जरा आमच्या मालकांकडे जाऊन मी वासरासाठी झाडावर चढलो होतो ही साक्ष देशील का? तुझे उपकार काही तरी करून फेडीन." बंड्या म्हणाला.

ते उत्तर ऐकून हा कोणीतरी मूर्ख भोळसट दिसतो आहे असे समजून पाहारेकरी बंड्याला झोपडीत घेऊन गेला आणि त्याला चार घास खायला घातले.






[१८]

[समुद्रकेतूच्या चांचेचोरांना वज्रमुष्टीने ठार केले. नंतर खाडीतील एका लहानशा बेटावरच्या समुद्रकेतूच्या गुप्तस्थानावर शिवदत्त आणि मंदरदेव हल्ला करण्यास आले. तेथे समुद्रकेतूने बंदी करून ठेवलेल्या शेंकडो गुलामांना त्यांनी सोडविले आणि सर्व मिळून समुद्रकेतूवर हल्ला करायला सिद्ध झाले. पुढे–]

वज्रमुष्टी व समुद्रकेतू या दोघांमध्ये एक भयंकर असे द्वंद्वयुद्ध सुरू झाले. एक दोन मिनिटांतच वज्रमुष्टिच्या तलवारीच्या आघाताने समुद्रकेतूची तलवार तुकडेतुकडे होऊन पडली. वज्रमुष्टीने आपली तलवार दूर फेंकून दिली व म्हणाला–"मुष्टि युद्ध करून तुला ठार करण्याची माझी इच्छा आज पूर्ण होणार आहे." असे म्हणत तो समुद्रकेतूच्या अंगावर धावला व त्याची कंबर धरून त्याला गुंडाळून ठेवलेल्या एखाद्या चटईसारखे समुद्रकेतूला जमिनीवर आडवा आदळला.

"आई, आई ग!" असे म्हणत समुद्रकेतू उठण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु तेवढ्यात वज्रमुष्टीने आपल्या बळकट हातांनी त्याची मान धरून आवळली आणि गरजला–"पापात्म्या तुला हेच प्रायश्चित्त!" नंतर त्याने समुद्रकेतूची मान




पिरगाळून त्याला अर्धमेल्या स्थितीत जमिनीवर आदळले. नंतर दातओठ चावून त्याला खूप लाथा मारल्या. समुद्रकेतू निश्चेष्ट झाला. काही वेळाने समुद्रकेतूचे जे अनुयायी अद्याप जिवंत होते त्यांच्या मुसक्या बांधण्यात आल्या. तोंपर्यंत हे युद्ध कसे थांबवावयाचे हे न कळल्याने चकित होऊन पहात उभे राहिलेले हरिशिखचे अनुयायी पुढे आले आणि विचारू लागले– "हे सर्व काय आहे? कोण तुम्ही?" आवाजावरून ते संतापलेले दिसत होते.

शिवदत्ताने घडलले वृत्त थोडक्यात सांगितले व म्हणाला–"हे पहा, आम्ही तुमच्या मकरमंडलाचे प्रमुख हरिशिख यांच्याशी मैत्री भावाने आलों आहों. तुम्ही एका मगरीला मकरदेवता मानून दररोज एक नरबली देतां आहां, असे आम्ही ऐकतो. त्या मगरीच्या भुताला ठार करू शकणारी व्यक्ती आमच्याबरोबर आहे." असे म्हणत शिवदत्ताने वज्रमुष्टीकडे बोट दाखविले.

इतक्यात देवमाया स्वयंप्रभेला घेऊन तेथे आली. ती सुखरूप असलेली पाहून सर्वांना आनंद झाला.

त्यानंतर हरिशिखचे सैनिक शिवदत्ताच्या इच्छेप्रमाणे त्याला मकरमंडलावर घेऊन गेले. हरिशिखने त्यांचे फार आनंदाने स्वागत केले व म्हणाला–"तुम्ही म्हणालात की मकरदेवतेला ठार करणारी व्यक्ती तुमच्यात आहे, म्हणे. होय का?"

ते ऐकून वज्रमुष्टी पुढे येऊन म्हणाला– "महाराज! मी लहान होतो तेव्हांपासून आपल्या शमन द्वीपातील मगरींची शिकार करायला शिकलों आहे. आपण कृपा करून मला ती मगर कोठे राहाते हे दाखविलेत तर मी तिला पापणी लवावयाच्या आत ठार करून दाखवितो."

वज्रमुष्टी म्हणाला ते ऐकून हरिशिख हंसून म्हणाला–"त्या मगरीची मूर्ख लोक भक्तिभावनेने पूजा करीत आले आहेत. परंतु तिचे नांव ऐकतांच सर्वांच्या अंगाचा थरकाप उडून जातो. तरी तुझ्यासारख्या एखाद्या गिड्ड्याच्या हातींच तिला मरण आहे, असंही आमच्यापैकी सर्वांना सांगण्यात आलं आहे व ते आम्हां सर्वांना खरे वाटत आहे. तुझ्या मालकाची परवानगी असेल तर तुझी कर्तबगारी पाहण्याचीही इच्छा आम्हांला आहे!"

शिवदत्ताने होकारार्थी मान हलविली. नंतर हरिशिखला नम्रपणे म्हणाला–"महाराज, या मगरीच्या त्रासातून तुम्हां सर्वांना सोडविण्याची जबाबदारी आम्ही घेतो. त्याबद्दल आम्ही तुमच्या थोडी मदतीची अपेक्षा ठेवली तर हरकत आहे का?"

हरिशिख स्मित करून म्हणाला–"मदत? मग ती कोणत्याही प्रकारची का असेना, आम्ही! मकरदेवता म्हणून म्हटली जाणारी ही पिशाचिणी म्हणजे माझ्या प्रजेला भयंकर भीती. त्यांच्या अंधविश्वासामुळे मी अलोट धन खर्च करून तिला तर बळी देण्यासाठी माणसांची खरेदी करीत आलो."

ते ऐकून शिवदत्तने हरिशिखला कुंडलिनी हंसद्वीप वगैरे बेटांचा वृत्तांत सांगून म्हणाला–"तुमच्याजवळ मोठे आरमार आहे आणि मोठे सैन्यही असल्याचे ऐकतो. आमचा देश क्रूर लोकांच्या हातात कष्ट सहन करीत आहे. स्वदेश मुक्तीसाठी तुमच्या मदतीची अपेक्षा आम्हांला आहे!" हरिशिखने सर्व हवी ती मदत करण्यास मान्य केले.



त्या दिवशी रात्री हरिशिखने शिवदत्त व मंदरदेव आणि त्याच्या अनुयायांना मोठी मेजवानी दिली. मकरमंडलाच्या सर्व प्रदेशातही पोचविण्यासाठी दूत पाठविण्यात आले. आपण कित्येक दिवसांपासून मकरदेवतेला ठार करणाऱ्या त्या गिड्याची वाट पहात होतों तो आला आहे. तो अंधविश्वासू अज्ञानी लोक जिला मकर देवता म्हणून मानीत आले त्या पिशाचिणीचा तो गिड्डा वध करणार आहे, अशी दवंडी पिटविण्यात आली.

दुसऱ्या दिवशी ऐन दुपारी मकरमंडलाचे सर्व रहिवासी मगर राही त्या जागेच्या आसपास जमले. तेथल्या एका टेकडी-









वरच्या शिखरावरून पाहिले की खाली एक नदी वाहात असेलेली दिसते. त्या नदीच्या काठाला एक गुहा होती ती त्या मगरीच्या राहण्याची जागा होती.

वज्रमुष्टी दोन लांब व धार असलेले सुरे घेऊन त्यांच्या मुठी चांगल्या दोरीने बांधून घेऊन ते सुरे आपल्या दोन्ही हातांत धरले आणि सर्व पहात असतां शिखरावरून नदीच्या डोहात उडी मारली. नंतर नदीच्या पलीकडल्या तीरावर जाऊन मगर राही त्या गुहेजवळ गेला.

वज्रमुष्टी गुहेजवळ पोचतांच गुहेतून एखाद्या डोंगरासारखी गलेलठ्ठ मगर 'आ' वासून बाहेर आली. तिच्या डोळ्यांतून जणुंकाही लाल ठिणग्या उडत होत्या. ती सरळ जाऊन वज्रमुष्टीवर तुटून पडली. परंतु वज्रमुष्टी एक पाऊलही मागे न सरकतां त्याने आपल्या हातांतील सुरे तिच्या तोंडांत जाऊ दिले. दोन्ही सुरे तिच्या खालच्या व वरच्या जबड्यात छान शिरले. ती सुऱ्या टोचल्याने कळा असह्य झाल्यामुळे तडफडू लागली आणि नदीत खोल जाण्याचा प्रयत्न करू लागली.

तीच योग्य संधी साधून वज्रमुष्टीने आपली तलवार उपसली आणि मगरीच्या पोटात खुपसली. तास अर्धातास नदीत मगरीला व वज्रमुष्टीवर हल्ला करण्याची



हिंमतच नव्हती. वज्रमुष्टी मात्र आत्म-विश्वासाने मगरीवर वार करीत होता. मगर मधूनमधून आपल्या शेपटीचे फटके वज्रमुष्टीला मारी. परंतु वज्रमुष्टी आपला बचाव करून मगरीवरच बगली वार करी. शेवटी मगर सर्व अंग छिन्न विछिन्न झाल्याने हतबल झाली. वज्रमुष्टीने तिला ओढून नेले.

डोंगरावरून सर्व लोक हे भयंकर द्वंद्व भयभीत व आश्चर्यचकित होऊन पहात होते. हरिशिख व त्याच्या प्रजेने मगर गतप्राण झालेली स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली आणि वज्रमुष्टीचा जयजयकार करू लागली. त्यानंतर एक आठवडाभर मकरमंडळात आनंदोत्सव होत राहिला.



हरिशिखने दिलेल्या वचनाप्रमाणे शिवदत्ताला एक मोठे आरमार आणि वीस हजार सैनिक दिले. एका शुभ मुहूर्तावर ससैन्य हंसद्वीप व कुंडलिनी दीपावर स्वारी करण्यासाठी निघाले. नरवाहन मिश्राचे राज्य संपुष्टात येण्याची वेळ जवळ येऊन ठेपली. त्यांच्या बरोबर देवमाया व स्वयंप्रभा सुद्धा होत्याच. तेव्हां देवमायाने स्वयंप्रभाही शमन द्वीपाच्या राजाची कन्या असल्याचे शिवदत्ताला सांगितले. शिवदत्ताने लगेच शमनद्वीपाला आपले दूत पाठविले. मंदरदेव आणि स्वयंप्रभेचा विवाह करून दिल्यास हंसद्वीप, कुंडलिनी द्वीप व शमनद्वीप यांचे सख्य कायम होईल असे त्याला वाटले.

राजकन्या सुखरूप असल्याचे आणि तिच्याशी हंसद्वीपाचा राजा मंदरदेव याच्याशी लग्नासाठी मागणी घालण्यात आल्याचे ऐकून शमन द्वीपाच्या राजा याला परमानंद झाला. तो सुद्धा आपले आरमार व सैन्य घेऊन कुंडलिनी द्वीपावर स्वारी करण्याच्या मोहिमेत जाण्यासाठी सिद्ध झाला.

नरवाहन मिश्रला हेरांनी बातमी दिली की कुंडलिनी द्वीपावर एक मोठे आरमार व सैन्य घेऊन शिवदत्त, मंदरदेव व राजा शमन येत आहेत. त्याच्या सर्वांगाचा थरकांपच उडाला. हंसद्वीप व कुंडलिनीद्वीपाचं रक्षण करणे आपल्या शक्तीबाहेरचे काम आहे, हे त्याला चांगले माहीत होते. तो निमूट पणे हंसद्वीप सोडून कुंडलिनी द्वीपावर पळून गेला. तेथेच त्याने आपले सर्व सैन्य नेऊन तेथून शत्रूला तोंड देण्याचे ठरविले.

अर्थातच कोणत्याही प्रकारची प्राणहानी न होतां शिवदत्त व मंदरदेवांनी हंसद्वीप काबीज केले. दुसऱ्या दिवशी त्यांनी कुंडलिनी द्वीपावर पाऊल ठेवले. किनाऱ्यावर कोठेही त्यांना नरवाहनाचा एकही सैनिक दिसला नाही.

ते पाहून शिवदत्तला फारच आश्चर्य वाटले. त्याने बेटावरची परिस्थिती पाहून यायला हेर पाठविले. सर्व परिस्थितीची कल्पना करून घेऊन हेर परतले व म्हणाले—

"आपण ससैन्य येत असल्याचे कळल्यावर, मागे ज्या रानटी जातीच्या लोकांवर नरवाहन मिश्रने अत्याचार केले होते त्यांनी एक जूट होऊन बंड केले आहे व त्यांनी कुंडलिनी नगराला वेढा दिला आहे."

ती बातमी ऐकून मंदरदेवाचा उत्साह थंड पडला—"मी प्रतिज्ञा केली होती की मी स्वत: त्या दुष्ट नरवाहनाचे डोके उडवीन. परंतु ती प्रतिज्ञा आतां अपूर्णच राहणार की काय असे वाटू लागले आहे."

नंतर शिवदत्तने पन्नास एक घोडे स्वारांना घेऊन पुढे जाण्यास वज्रमुष्टीला सांगितले. यदा कदाचित नरवाहन मिश्र अजून जिवंत असेल तर त्याचा वध करून ये असा निरोप त्याने भिल्लनायकाकडे पाठविला.

वज्रमुष्टी घोडे स्वारांसह कुंडलिनी नगरापर्यंत पोंचला तेव्हां भिल्लांचे सैन्य टोळधाडीसारखं नगरावर तुटून पडले होते. त्यांचे भाले बरछी व तलवारींनी शेकडो सैनिकांचा फडशा उडविला होता. वज्रमुष्टीने भिल्लनायकांना शिवदत्ताने दिलेला संदेश पोचविला. त्याच वेळी त्याला एक बुरुजावर भिल्लांनी मुसक्या बांधून उभा केलेला नरवाहन मिश्र दिसला.

वज्रमुष्टी ओरडून भिल्लांना सांगू लागला—"त्या दुष्टाला असहाय्य करु नका, थांबा!" असे म्हणत त्याने आपला घोडा



बुरुजाच्या दिशेने नेला. परंतु तेवढ्यात नरवाहन मिश्रला भिल्लांनी बुरुजावरुन खोल खंदकात ढकलले तेव्हां तेथे जमलेल्या भिल्लांनी जयजयकार केला. वज्रमुष्टी खंदकात उतरून गेला तोंपर्यंत नरवाहन मिश्र गतप्राण झाला होता.

दोन तीन तासांनी शिवदत्त, मंदरदेव व राजा शमन तेथे येऊन पोंचले. भिल्लनायकांनी मोठ्या उत्साहाने त्यांचे स्वागत केले. लगेच हंसद्वीप व कुंडलिनी द्वीपाचा मंदरदेव राजा झाल्याचे शिवदत्ताने जाहीर केले. नरवाहन मिश्राने भिल्लांचे जे जे प्रदेश बळकावले होते ते सर्व त्यांना परत देण्यात आले.

एका आठवड्यानंतर मंदरदेव व स्वयंप्रभा यांचा विवाह समारंभ राजसी थाटाने पार पडला. शिवदत्ताने हरिशिखने पाठविलेल्या सैनिकांना मोठमोठी इनामें देऊन निरोप दिला. हरिशिखचे सर्व आरमार व सैन्य स्वदेशी परतले.

त्यानंतर एके दिवशी शिवदत्ताच्या इच्छेप्रमाणे मंदरदेवाने दरबार भरविला. कुंडलिनी, हंसद्वीपावरील सर्व प्रमुख नागरिक दरबारात हजर होते. शिवदत्त म्हणाला– "मी मनात योजलेले कार्य पूर्णपणे यशस्वी झाले आहे. आतां मला कोणतीही इच्छा नाही. मी संन्यास घेऊन ईशभजन करण्यासाठी अरण्यवास घेणार आहे.

ते ऐकून मंदरदेवासह सर्व दरबारी व प्रमुख नागरिक थक्क झाले. त्यांनी सर्वांनी शिवदत्तला विनंती केली की त्याने राजाचे प्रधान म्हणून किंवा राजगुरू म्हणून राहून राज्य कारभार चालवायला मंदरदेवाने मार्गदर्शन करावे. परंतु शिवदत्ताने ते मान्य केले नाही. तो मंदरदेव व राजसभेतील सभासदांना संबोधन करून म्हणाला–

"राजा व प्रजा यांनी परस्परांवर प्रेम करून कसे रहावे. हे आतांपर्यंत कुंडलिनी व हंसद्वीपावरील निवसितांना चांगले कळू लागले आहे असे मी मानतो चित्रसेन व समरसेन यांच्या राजवटीत व नरवाहन मिश्रच्या राजवटीत जे जे सुख दुःख प्रजेला भोगावे लागले तो अनुभव लक्षात ठेवून राजा व प्रजा परस्पर प्रेमाने वागले, सर्वांनी आपापल्या धर्माचे व कर्तव्याचे पालन केले तर सर्व सुखासमाधानाने राहू शकतील असे मला वाटते!"

शिवदत्त म्हणाला ते ऐकून सर्वांनीटाळ्या वाजवून त्याचा गौरव केला. नंतर शिवदत्ताने सर्वांना नमस्कार करून सर्वांचा निरोप घेतला. राजा व प्रजा त्याच्या बरोबर निरोप द्यायला राजधानीपासून चार पांच मैल गेले. तेथे शिवदत्ताने पुन्हां नमस्कार केले व अरण्यात प्रवेश केला.

(संपूर्ण)



# सूज्ञ सैनिक

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ पुन्हां गेला, प्रेत प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या, दिशेने चालू लागला; तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! या मध्यरात्रीच्या वेळी तू इतक्या सोशीकपणाने इतके श्रम करीत आहेस, त्याचे कारण काय असू शकेल, कळत नाही. कीर्ती संपादन करण्यासाठी, धनलोभाने किंवा कोणाला तरी दिलेल्या वचनाचे पालन करण्यासाठी तू हे श्रम करीत असशील तर मात्र शेवटी तुला दुःखीच व्हावे लागेल. या जगात काही शाश्वत नाही, तेव्हां माणसाने कोणतीही आशा बाळगून अंगाबाहेर कष्ट सहन करू नये. त्याचे एक उदाहरण म्हणून मी, तुला विभिन्नवृत्ती करणाऱ्या व विभिन्न



प्रकारचे स्वभाव असणाऱ्या निरनिराळ्या तिघां व्यक्तींची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक " असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका जंगलात एका लहानशा गावात एक गरीब माणूस रहात असे. त्याच्या कुटुंबात त्याची बायको व लग्नाचे वय झालेल्या तीन मुली होत्या. मुलींची लग्ने करावयाची म्हणजे पैसे पाहिजेत. ते कोठे मिळणार म्हणून तो गरीब माणूस सर्वदा दुःखी व विचार मग्न असे.

एकदां त्याची बायको त्याला म्हणाली— " असा विचार करीत बसून राहिलांत तर आपल्यावर आणखी जास्त प्रसंग ओढवितील. तुम्ही महाराजांच्या सैन्यात भर्ती होऊन युद्ध करीत असतां घायाळ झालात, म्हणून नाही का तुम्हांला नोकरी सोडावी लागली. तुम्ही राजाकडे जाऊन सर्व माहिती सांगून मदत मागितलीत तर तो तुम्हांला थोडीफार मदत नक्कीच करील."

त्या गरीब सैनिकाला बायकोचा सल्ला पसंत पडला. राजा धर्मपरायण आहे, हे त्याला चांगले माहीत होते. म्हणून तो राजाच्या दर्शनासाठी राजधानीकडे निघाला.

तो एकेकाळी राजाच्या पदरी नोकरीला असल्याकारणाने त्याने विनंती केल्याबरोबर राजाच्या दर्शनासाठी परवानगी मिळाली. गरीब सैनिकाने तो ज्या कामासाठी आला होता ते निवेदन करून थोडी मदत करावी, अशी विनंती केली.

राजाने खूप सहानुभूती दाखविली व म्हणाला—" सामान्य परिस्थिती असती तर मी तुला नक्कीच मदत केली असती. परंतु या वर्षी महापुराने आपल्या राज्याच्या उत्तरेकडील पन्नासवर गांवांचे फार मोठे नुकसान झाले. त्या गावांच्या पुर्नस्थापनेसाठी व्यवस्था होईपर्यंत कोणालाही, कोणत्याही प्रकारची मदत करू नये अशी आज्ञा मी कालच खजिनदाराला दिली आहे. वस्तुस्थिती अशी आहे की त्या गांवांना जितक्या मदतीची गरज आहे तितके धन राज्याच्या खजिन्यात आज नाही."

" क्षमा करावी महाराज! परिस्थिती इतकी वाईट असेल या गोष्टीची मला कल्पनाही नव्हती. तर निरोप द्यावा!" असे म्हणत तो गरीब सैनिक तेथून निघाला.

तो आपल्या गावी जात असतां काळोखात जंगलातली वाट चुकला. त्यात विजाचमकू लागल्या आणि ढगांचा गडगडाट सुरू होऊन मुसळधार पाऊस पडू लागला. बिचारा गरीब सैनिक विचार करू लागला की आसरा कोठे मिळणार म्हणून चहूंकडे पाहू लागला, तेव्हां त्याला एका टेकडीला लागून असलेले एक पडके घर दिसले.

तो त्या घरात पाऊल टाकणार इतक्यात त्या घरातून एक कोल्हा व एक रानटी मांजर बाहेर पळाले. काही वटवाघळे 'किचकिच' करीत उडाली. एका पडक्या भिंतीच्या बाजूने एका सापाचा फुतकार ऐकू आला.

आता पुढे काय करायचं या विचारांत सैनिक पडला असतां गडगडाटा पाठोपाठ डोळ्यांना दिपवून टाकणारी एक वीज चमकली, त्या उजेडात एक भूत त्याच्या दिशेने येत असलेले सैनिकाला दिसले.



लगेच तो सैनिक तेथून पळून जाण्यासाठी मागे फिरला. परंतु त्याच्या आधी ते भूत पुढे जाऊन दारांत उभे राहिले. आतां आपले मरण चुकत नाहीं, असे मनात पक्के समजून अगदी शेवटचा प्रयत्न म्हणून तो सैनिक डोळे वटारून व धाडस करून त्या भुताकडे पाहू लागला.

" तुला भिण्याचं काही कारण नाही. मी भूत असलो तरी मी तुझा काय बिघाड केला?" भुताने विचारले.

ते ऐकून सैनिक धैर्याने म्हणाला— " असं का! मी सुद्धा तुझं काही नुकसान करण्याच्या हेतूने आलो नाही. मला आपल्या वाटेने जाऊं दे!"



भूत मोठ्याने हसू लागले. म्हणाले—"तुझ्या मनांत आलं तरी तू माझं काही नुकसान करू शकणार नाहीस! एवढं मात्र खरं तू प्रयत्न केलास तर माझ्यावर एक उपकार करू शकशील. या क्षणी माझ्या मनात तुझं काही तरी हित करावं असे आहे. तुला काही पैशाची गरज आहे का?"

"पैसे म्हणतोस? होय हवे आहेत!" गरीब सैनिक म्हणाला.

"किती?" भुताने विचारले.

"सुमारे तीस सोन्याची नाणीं तू दिलीस तर माझ्या तिघां मुलींची लग्नं निर्विघ्नपणे पार पडतील." गरीब सैनिक म्हणाला. ते ऐकून भूत मोठ्याने हसू लागले. सैनिकाने चकित होऊन विचारले—"कां रे असा हसतो आहेस?"

"तू अगदी भोळा सांबच दिसतो आहेस! या जवळच्या गुहेत जेवढे सोनं आहे ते सर्व मी तुला देईन. ते तीस लक्ष स्वर्ण नाण्यां-हून कमी नसावे. त्याबद्दल तू मला एक मदत केली पाहिजेस. श्रीक्षेत्र गया येथे जाऊन तू शास्त्रोक्त पद्धतीने माझे श्राद्ध केले पाहिजेस!" भूत म्हणाले.

ही विचित्र इच्छा ऐकून आश्चर्यचकित झालेल्या सैनिकाला भुताने गुहेतील धनाची पूर्वकथा सांगितली ती अशी :—

दोन पिढ्या पूर्वीची गोष्ट आहे. या प्रदेशांत एक अट्टल लुटेरा डाकू रहात असे. त्याचे काही अनुयायी त्या धंद्यात चांगले निपुण होते. या अरण्यातून जे काही लोक जात येत त्यांना लुटून आणि जवळपासच्या गावातल्या श्रीमंतांच्या घरात दरोडे घालून, कधीकधी तर मोठमोठ्या शहरांतूनही दरोडे घालून जी लूट मिळे ती आणून तो या गुहेत जमा करी. तसे हे सर्व धन आपण समसमान वांटून घेऊं म्हणून तो आपल्या सहकाऱ्यांना सांगे. परंतु एकदां राजाच्या शिपायांनी त्या सर्वांना धरले. त्यावेळी दरोडेखोरांचा नायक एकटा निसटला. बाकी सर्व शिपायांशी झालेल्या चकमकीत प्राणांस मुकले.

त्या दिवसापासून दरोडेखोरांचा नायक गुहेतील धनावर सतत पहारा देत तेथेच राहू लागला. ते गुंप्तस्थान सोडून आणखी कोठे जाऊन राहिलो तर शिपायांची नजर पडेल असे समजून तो अरण्यात राहिला. एके दिवशी वाघाने त्याला ठार केले. तेव्हां पासून भूत होऊन तो तेथेच पाहारा देऊ लागला.

काही वर्षें लोटल्यावर त्या जंगलातून एक यात्रेकरू जात असलेला पाहून त्या भुताने त्याच्या जवळच्या धनाची गोष्ट त्याला सांगितली आणि भूतयोनी सारख्या निष्फळ जीवनांतून मुक्ती मिळण्यासाठी गयेला त्या यात्रे करूने त्याच श्राद्ध करावे असे सुचविले. त्या बद्दल त्या यात्रेकरूला गुहेतील सर्व धन मिळेल, असे सांगितले. तो यात्रेकरू ते धन पाहून भुरळला व त्याने गयेला जाऊन श्राद्ध करण्याचे मान्य केले. त्या प्रमाणे तो यात्रेकरू गयेला श्राद्ध वगैरे उरकून परतला. भुताने त्याला गुहेतील धन दाखविले. त्या भुताला मुक्ती मिळाली. धनलोभाने तो यात्रेकरू त्या गुहेजवळ एक घर बांधून तेथे राहू लागला. काही काळ लोटल्यावर तो मेला आणि आज-पावे तो त्या धनाच रक्षण करण्यासही भूत होऊन पाहारा देत आहे. ते भूतच तुझ्याशी आतां बोलत आहे."

"गयेला जाऊन मी सर्व श्राद्ध वगैरे सर्वं क्रिया कर्म करतो. ते धन कोठे आहे, तेवढे मला दाखव" सैनिक भुताला म्हणाला.
















"पहिल्याने गयेला जाऊन सर्व क्रिया-कर्म उरकून ये, त्यानंतर मी तुला ते धन दाखवितो." भूत म्हणाले.

गरीब सैनिकाने ते मान्य केले. वारा व पाऊस थांबल्यावर भुताने गरीब सैनिकाला त्या जंगलांतून बाहेर पडायची वाट दाखविली. सैनिकाने गयेला जाऊन शास्त्रोक्त पद्धतीने सर्व क्रियाकर्म केले आणि काही दिवसांनी त्या जंगलात परत आला.

भूत त्याला त्या पडक्या घराजवळ भेटले. म्हणाले–"मी तुझीच वाट पहात होतो. तू केलेल्या उपकारा बद्दल मी फार आभारी आहे. चल माझ्या बरोबर. मी तुला धन ठेवले आहे ती गुहा दाखवितों आणि या भूत योनींतून मुक्ती संपादन करतों!"

गरीब सैनिक भुताबरोबर गेला. त्या पडक्या घराच्या मागच्या बाजूला ती गुहा होती. त्या गुहेच्या तोंडावर एक मोठा दगड ठेवलेला होता. त्या दगडाच्यावर व खाली रानटी झाडे व वेली उगवल्या होत्या आणि तो दगड त्यांच्या खाली झाकलेला होता.

"धन आहे ती गुहा हीच. मी ही धोंड बाजूला सरकवून तुला ते धन दाखवितो." भूत म्हणाले.

गरीब सैनिक एक क्षणभर थांबून भुताला म्हणाला–"मी तुझा फार आभारी आहे. ती धोंड बाजूला सारण्याची गरज नाही." असे म्हणत त्या राज्याची राजधानी प्रतिष्ठानला निघाला.

तो राजाला भेटला व म्हणाला–"महा-राज, पुरामुळे निर्वासित झालेल्यांच्या पुर्नः स्थापनेसाठी आपल्याला किती द्रव्याची गरज आहे?"

तो प्रश्न ऐकून राजा चकितच झाला. काही दिवसांपूर्वीच तो सैनिक राजाकडे धन सहाय्य मागण्यासाठी आला होता ती गोष्ट राजाला आठविली. तरी राजाने त्याला विचारले–"वीस लक्ष स्वर्णमुद्रांची गरज आहे. तेवढे धन कोठे मिळण्याची शक्यता आहे का?"

"वीस लक्षच काय, आपण माझ्या बरोबर आल्यास मी आपणांला तीन लक्ष स्वर्णमुद्रा देऊ शकतो!" गरीब सैनिक म्हणाला.

ते ऐकून राजाला कमालीचे आश्चर्य वाटले या सैनिकाला वेडबीड तर नाही लागले! राजाच्या मनांत शंका आली. परंतु राजाला त्या सैनिकाच्या बोलण्यात विश्वास करण्यालायक ध्वनी उमटत अस-ल्याचा भास झाला. राजा आपला प्रधान सेनापती व काही अंगरक्षक बरोबर त्या सैनिकाबरोबर जंगलात गेला.

तिकडे गुहेत त्यांना स्वर्णमुद्रांची रास दिसली. राजा ते सर्वधन राजधानीत घेऊन गेला आणि पूर पीडित लोकांना सर्व तऱ्हेने मदत करायला प्रधानाला सांगून गरीब सैनिकाला म्हणाला–"या धनापैकी तुला हवं तितकं प्रथम तू घे, तेच योग्य होईल!"

"नको महाराज! हे सर्व धन पुरामुळे उध्वस्त झालेल्या लोकांना मदद करण्या-साठी खर्च करा. शिवाय मी आपणांला दान म्हणून जे दिले त्यांतले काही मागून घेणे योग्य नाही!" गरीब सैनिक म्हणाला.

"तुझं म्हणणे बरोबर आहे! तर मग माझ्या खजिन्यातले तुला गरज असेल



तेवढे मागून घे!" असे सांगून राजाने गरीब सैनिकाला पन्नास हजार स्वर्णमुद्रा दिल्या आणि दरबार भरवून त्याचा यथो-चित सत्कारही केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, अनेक शंका या गोष्टीवरून माझ्या मनात उठल्या आहेत. दरोडेखोरांचा नायक आणि यात्रेकरू जिवंत असेपर्यंत गुहेतील धनापैकी एक पैदेखील खर्च न करितां त्या धनावर कुत्र्यासारखे पाहारा देत राहिले आणि मेल्यानंतर त्यांना त्या धनाचा एवढा वीट का आला? गरीब सैनिकाला ते सर्व धन स्वतःच्या हक्काचे म्हणून वापरतां आले असते. ते तर त्याने केलेच नाही तर

ते पाहायला सुद्धा तयार झाला नाही. या शंकांचे समाधान कारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"चिक्कू लोक त्यांच्या जवळ जे धन असते त्याचा उपयोग पुढे करू असा विचार करून पैशाचा उपभोग घेत नाहीत. परंतु मेल्यानंतर भूत झाल्यावर त्यांना आपल्याला धनाचा काहीच उपयोग झाला नाही हे कळते. म्हणून सर्व धन कोणालातरी देऊन [illegible] करवून मुक्ती मिळविण्यासाठी [illegible]

आता गरीब सैनिक हा फार समजूतदार होता. गयेला जाऊन शास्त्रोक्त पद्धतीने श्राद्ध केल्याशिवाय भुताने धन दाखवायला नकार कां दिला हे त्याने चांगले ओळखले धनावर एकदां नजर पडली की आपल्या-सारखाच सैनिकही धनलोभाने तेथून हल-णार नाही, अशी भुताला शंकावाटली. कित्येकांचे मुडदे पाहून, वाटमारी करून व इतरांना खूप त्रास देऊन संपादन केलेले धन हे शापग्रस्त कसे झाले, गरीब सैनिकाला चांगले कळले होते. म्हणून त्याने ते धन आधी बघण्याचे ही नाकारले. कारण ते पाहिल्यावर यात्रेकरू तेथून हललाच नाही मेल्यावर भूत झाला आणि त्या धनावर पाहारा देत राहिला. त्या धनाची मालकी मिळविण्या ऐवजी, धनच आपला मालक होईल व त्यामुळे आपली दुर्दशा होईल हे वेळीच ओळखून सैनिक सावध झाला. दुःखी कष्टी लोकांच्या सहाय्यार्थ ते धन खर्चिले गेले तर त्या धनाला पवित्रता लाभेल, असे वाटून त्याने त्या धनातला काही भागही घेण्यास नकार दिला आणि पूर ग्रस्त लोकांना मदत देण्यासाठी त्या धनाचा उपयोग करावा, असा सल्ला त्याने राजाला दिला."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# हाडवैरी

शिवपूर नावाच्या गावी रामू आणि श्यामू नावाचे दोघे शेतकरी रहात असत. दोघांच्या घरांमध्ये घरे निरनिराळी दिसावी म्हणून एक लहानशी भिंत होती. दोघांची शेते सुद्धां आजूबाजूलाच होती. दोघे ही पिके काढण्यात निष्णात होते. परंतु दोघांचा परस्परांशी हेवादावा असे. गुप्तपणे ते दुसऱ्याचे कसे नुकसान होईल याचाच विचार करीत असत. दोघांच्या मनांत नेहमी द्वेषभाव असे.

एके वर्षी दोघांनी आपापल्या शेतांत ज्वारी लावली. पिके वर आली आणि डोळ्यांचे पारणे फिटल्यासारखे दोघांना वाटू लागले. पिकाची नासाडी पोपट वगैरे पाखरे करीत, म्हणून दोघे ही रखवाली करू लागले.

रामूच्या शेतातले पीक पाहून श्यामूचा जळफळाट होऊ लागला. याचे पीक फार छान निघाले आहे व त्याला खूप फायदा होणार. रामूच्या मनात अगदी तसेच विचार येऊ लागले. यावर्षी श्यामूच्या शेतात इतकं चांगले पीक निघाले आहे व ते सर्व त्याच्या कोठारात पोचते झाले तर त्याची मान वर होणार.

एकदां श्यामूची बायको त्याला म्हणाली–"अहो, ऐकलेत का? आपली शेजारीण उड्या मारते आहे, जमिनीला पायच लागत नाही जणूं! म्हणे, यावर्षी जे पीक निघेल ते सर्व विकून म्हणे तिचा नवरा तिला मोत्यांचा तन्मणी करून घालणार आहे. ती तन्मणी घालून मिरवू लागली म्हणजे मी कुण्या गळ्याने बाहेर जायचं का? माझी मान नाही का खाली होणार?" म्हणुन मुसमुसु लागली.

रामू आपल्या बायकोची समजूत घालीत म्हणाला–"घर झाडून पुसून घातलं



की झाला का सण? पीक जेव्हां हाती येईल आणि तो विकेल तेव्हांना तो तन्मणी करून बायकोच्या गळयात घालणार? त्याने मोत्याचा तन्मणी करून तिच्या गळयात घातला तर मी पोवळयाची माळ करून तुझ्या गळयात घालीन झालं!"

रामू व त्याच्या बायकोचे संभाषण भिंती आडून श्यामूच्या बायकोने ऐकले. नवऱ्याला गदागदां हालवून म्हणाली– ऐकलांत का तुमचा शेजारी वत्याची बायको काय म्हणत होतें ते! तुमचा शेजारी म्हणाला की तुमचं पीक तुमच्या पदरी पडलं तर ना, या सर्व उड्या? तो म्हणे, आपलं सर्व पीक विकून बायकोला पोवळयांची माळ घालणार आहे!"

ओसरीच्या भिंतीला टेकून बसलेला श्याम संतापून उठून उभा राहिला. आपले उपरणं झाडीत ते खांद्यावर टाकीत म्हणाला–"अस्सं, म्हणजे तो आमचं पीक आमच्या हाती लागू देणार नाही का? मी सुद्धां पाहातों की आमची मेहनतीची कमाई आमच्या हाती कशी लागत नाहीसें, आणि त्याचे पीक सुरक्षित पणे त्याच्या हाती कसे लागते, हें सुद्धां पाहातों!"

असे म्हणत तो लगेच निघाला ही आणि गावाच्या वेशीवर तलावाच्या काठी एक झोपडी बांधून राहणाऱ्या शंभू यांत्रिकाकडे गेला. शंभू भुताखेतांचा मांत्रिक होता.

श्यामू त्याला म्हणाला–"शंभू दादा! तू मला एक मदत केली पाहिजेस! रात्री निदान चारपांच तास तरी मला कोणते तरी जनावर व्हायचं आहे. त्यासाठी काही मंत्र किंवा-वनस्पती असेल तर सांग. त्याच्यासाठी जितके पैसे लागतील ते मी द्यायला तयार आहे!"

शंभू आपल्या झोपडीच्या छपरातून तीन लहान-लहान पुड्या काढून श्यामूला दाखवीत म्हणाला–"तुला घोडा किंवा बैल व्हायचं असेल तर त्यासाठी शंभर रुपये दिले पाहिजेस. तुला गाढव व्हायचं असेल तर फक्त पन्नास रुपये दिलेस तरी पुरतील!"

"माझ्या कामापुरते गाढव झालं तरी पुरेल!" असे सांगून श्यामूने शंभूला पन्नास रुपये दिले आणि पुडी घेऊन निघाला.

त्याच वेळी रामू तलावाच्या पश्चिमेला राहणाऱ्या दुर्गी नावाच्या चेटकिणीकडे गेला आणि म्हणाला–"अक्का, तू माझं एक काम करशील का? काही दिवसांपासून माझ्या मनात एक विचार घोळतो आहे, आपण कोणते तरी जनावर होऊन रात्री हिंडावे. आहे का एखादं भस्म किंवा जादू?" असल्यास मला ती लवकर दे. मी कितीहि किंमत मोजायला तयार आहे.

ती चेटकीण चकित होऊन विचारू लागली–"अरे रामू, भस्म किंवा मंत्र माझ्या जवळ पुष्कळ आहेत. परंतु तुला इंद्राचा ऐरावत किंवा पंचकल्याणी घोडा-बिडा व्हायचं असेल तर त्या जोगता मंत्र किंवा भस्म काही माझ्याकडे नाही. तू गाढव व्हायला तयार असशील तर पन्नास रुपयांवर काम भागेल, मी एक भस्म देतो, तुला चारपांच तास गाढव म्हणून रात्री हिंडतां येईल व रेंकतां येईल."



रामू एक क्षणभरच विचार करायला थांबला. नंतर म्हणाला–"अंधारात कोण पहायला येणार म्हणा, कसलं ही रूप असलं म्हणून काय हरकत आहे?" असे म्हणत त्याने दुर्गीला पन्नास रुपये दिले आणि भस्माची पुडी घेऊन निघून गेला. व रात्री एकमेकांनी दुसऱ्याच्या शेतात जाऊन नासधुस करण्याचे योजले.

रात्री श्यामूने रामूच्या शेतात पाहारा करायला कोणी नाही, हे पाहून शंभूने दिलेली पुडी खाऊन गाढव झाला आणि रामूच्या शेतात. शिरला. मनाला आलं तेवढी ज्वारीची ताटं खाल्ली आणि









शेतात हिडून सर्व पीक तुडवून त्याची नासाडी केली.

रामू त्याच वेळी दुर्गीने दिलेले भस्म खाऊन गाढव झाला आणि श्यामूच्या शेताची नासाडी करू लागला. रात्रभर दोन्ही गाढवें परस्परांच्या पिकांना वाटेला लावून आनंदाने शेतांच्या मधोमध असलेल्या बांधावर आली आणि त्यांनी परस्परांना पाहिलं.

त्यावेळी त्यांनी जो पराक्रम गाजविला होता तो आत्मनाशाला कसा कारणीभूत झाला हे त्यांच्या लक्षांत आलं. दोघांना परस्परांचा राग आला आणि दोघे परस्परांवर रेंकत परस्परांचे लचके तोडायला धांवले. दोघांनी परस्परां-वर खूप लाथा झाडल्या. गाढवांचं रेकणं ऐकून शेजारच्या शेतातले शेतकरी गंमत पहायला धावले, रामू व श्यामच्या शेतांची नासाडी झालेली त्यांना दिसली व त्यांना फार वाईट वाटलं. दोन्ही गाढवं परस्परांवर लाथा झाडीत असलेली ही त्यांना दिसली.

तोंपर्यंत सूर्योदयाची वेळ झाली होती. शेजारचे शेतकरी त्या गाढवांना मारायला काठ्या घेऊन धावले. परंतु भस्म औषधांचा प्रभावही तोंपर्यंत संपल्यामुळे रामू व श्यामूचं गाढव रूप जाऊन त्यांचं स्वस्वरूप त्यांना आलं.

शेतकरी त्यांना पाहून आश्चर्य चकित झाले व शुद्धी वर आल्या सारखे स्वतःला सावरून म्हणाले–"तुम्हीच का रामू आणि श्यामू ? तुमचं वैर या थराला पोंचलं तर ! गाढवाचीच कामे केलीत !"

तो अपमान दोघांनाही निमूटपणे सहन करावा लागला. दोघांचे डोळे उघडले.

दोघे परस्परांकडे पहात म्हणाले– "आपण दोघांनी अक्षरशः गाढवपणाच केला. यापुढे तरी दुसऱ्याचं वाईट न इच्छिण्याचं व मित्रत्वाने रहायचं ठरवूया !"





# उच्चनीच भेद

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एका सिंहाच्या रूपे अवतार धारण केला. तो सिंह आपल्या बायकोबरोबर एका पर्वताच्या गुहेत रहात असे. एकदां तो सिंह शिकारीला गेला असतां डोंगरावरून खाली त्याची नजर गेली. एका जागी हिरवेगार मैदान होते व त्यांत काही ससे व हरणे चरत असलेली त्याला दिसली. हरणें व ससे मधून-मधून उड्या मारीत असलेले पाहून त्यांची शिकार करण्याचा मोह सिंहाला आवरला नाही. त्याने त्यांच्यावर उडी मारली. ती चुकून तो तिथल्या एका तळ्या काठच्या चिखलात पडला. सिंहाला पाहून ससे व हरणे पळून गेली. चिखलांतून बाहेर निघण्याचा सिंहाने पुष्कळ यत्न केला. परंतु तो जितकी जास्त खटपट करी तितका जास्त चिखलात रुतत गेला. म्हणून जागचा हलल्या शिवाय पडून राहण्यातच शहाणपण मानून तो पडून राहिला. कोणी आपल्याला वांच-वायला येतो का, वाट पाहू लागला.

सिंह एक आठवडाभर भुकेतहानेने तडफडत त्या चिखलात पडून राहिला. एकदां एक कोल्हा पाणी प्यायला म्हणून त्या तळ्याजवळ आला. परंतु सिंहाला पाहून दूर जाऊन उभा राहिला. सिंह कोल्ह्याला पाहून म्हणाला–"कोल्होबा ! हे बघ, गेला एक आठवडाभर मी या चिखलात रुतून पडलों आहे. मेलों नाही, एवढेच. तू काही तरी करून मला वांचव, तुला पुण्य लागेल." सिंहाने कोल्ह्याच्या विनवण्या केल्या.

"तू तर भुकेलाच आहेस, तू बाहेर पडतांच मला खाणार नाहीस कशावरून ? तुझा काय विश्वास ?" कोल्हा म्हणाला.

"मी तुझ्या जवळ प्राणभिक्षा मागतो आहे, तुला खाईन का ? तू मला या

चिखलांतून वांचविलेस तर मी जिवंत असे पर्यंत तुझे उपकार मानीन, माझ्या बोलण्यावर विश्वास कर" सिह म्हणाला.

कोल्ह्याने सिंहाच्या बोलण्यावर विश्वास केला वाळकी लाकडे आणून चिखलांत टाकली. त्यांवर पाय ठेवून उभा राहिला व चिखलांतून बाहेर आला.

त्यानंतर दोघे मिळून जंगलात शिकारीला गेले. सिंहाने एक जनावर मारले व त्यावर आपली भूक भागविली.

"यापुढे आपण दोघे भाऊ भाऊ बरंका! तू एका जागी रहायचं आणि मी दुसऱ्या जागी, हे बरोबर नाही! तू आपल्या बायको मुलांना घेऊन ये आपण एकाच गुहेत राहूं...सिह म्हणाला. कोल्ह्याने ते मान्य केले आणि बायको मुलांना घेऊन येऊन सिंहाच्या गुहेतच राहू लागला.

सिंहाच्या बरोबर आपला संसार थाटल्याबद्दल त्याला मोठेपणा मिळाल्याचा परमानंद झाला व तो त्याची बायको व मुलं फार आनंदात होती खरी, परंतु आपण आपल्या जातीच्या लोकांपासून दूर झालो व त्यामुळे कष्ट सुख भोगावे लागेल ते भोगलेच पाहिजे, हे कोल्हा ओळखून होता. कोल्ह्याने जो त्याग केला होता, सिंहाला तो कळत होता. म्हणून आपल्या मित्राला कोणत्याही प्रकारे त्रास होऊ नये या गोष्टीची सिंह काळजी घेई. दिवसामागून दिवस आनंदाने जात होते. सिंह आपला मित्र कोल्हा याला जितक्या समबुद्धीने पाही तितक्या समबुद्धीने सिंहाची बायको कोल्ह्याच्या बायकोला पहात नसे. तिला वाटे की कोल्हीण ही किती झाली तरी खालच्याच जातीची. कोल्हीण आपली जात खालची आहे हे ओळखून होती म्हणून जास्त भांडाभांड झाली नाही. पुढे काही काळ लोटल्यावर सिंहाचे छावे व कोल्ह्याची पिले बरोबर खेळू व बागडू लागली. सिंहाच्या बायकोला तिच्या मुलांच्या अंगावर कोल्ह्याची पिल्ले चढून खेळत असलेली पाहून राग येई. सिंहाच्या मुलांना उच्चनीच भेद कळत नसल्यामुळे त्यांना कोल्ह्यांची पिल्लं त्यांच्या अंगावर चढली तरी त्याचे मुळीच गैर वाटत नसे.

परंतु सिंहाच्या बायकोला मात्र हे सर्व मुळीच पाहवले नाही. ती आपल्या मुलांना एका बाजूला बोलावून म्हणे–"अरे आपण कुलीन जातीचे, तुम्ही त्या नीच जातीच्या पिल्लांशी बरोबरीच्या नात्याने काय खेळता? त्यांच्या पासूनचार पावले दूरच रहात जा!"

सिंहाच्या मुलांच्या डोक्यात आई म्हणाली ते थोडे थोडे शिरू लागले. ती कोल्ह्याच्या पिल्लांना तुच्छतेने पाहू लागली व त्यांच्या बरोबर खेळत असतां त्यांच्यावर अन्याय करू लागले ते कोल्ह्याच्या पिल्लांना म्हणत–"तुम्ही खालच्या जातीचे आहां, आम्ही तुम्हांला पोसतों आहों. तुम्ही आमच्याशी बोलतांना उलट बोलतां कामा नये तुम्ही खालच्या जातीचे म्हणून आम्ही





काही बोललों, शिव्या दिल्या तरी मुकाट्याने ऐकून घेतले पाहिजे."

कोल्ह्याच्या बायकोला हे आवडले नाही व तिने सिंहाच्या बायकोचा भेदभाव नवऱ्याच्या कानावर घातला. दुसऱ्या दिवशी शिकारीला निघण्यापूर्वी कोल्हा सिंहाला म्हणाला–"सिंहा, तुम्ही मृगराजाच्या जातीचे. आम्ही सामान्य खालच्या जातीचे. म्हणून आपण एकत्र राहणे बरोबर नाही! आम्ही आपल्या जातीच्या लोकांमध्ये जाऊन रहावे, म्हणतो!"

आपल्या मित्राच्या बोलण्यात अकस्मात् झालेला हा फरक सिंहाने ओळखला व कारण विचारले. त्या दिवशी रात्री सिंह गुहेत परतल्यावर बायकोला म्हणाला–" तू कोल्ह्याच्या पिल्लांना पाहून कांही तरी तोऽून बोललीस व वागलीस म्हणे!"

"होय, ती खालच्या जातीची पिल्लं, त्यांनी आपल्या मुलां बरोबर बरोबरीच्या नात्याने खेळणंबागडणं मुळीच पसंत नाही. त्या कोल्ह्याने तुम्हांला कोणते औषध पाजले कोणास ठाऊक, तुमच्यात केवढा बदल झाला आहे! परंतु माझी मुलं बिघडलेली मला मुळीच पाहवणार नाही!"

"अस्सं! कोल्ह्याने मला कोणतें औषध पाजले ते मी तुला सांगतों, ऐक मी एकदां आठवडाभर घरी आलो नव्हतों, आठवतं का तुला? मी तो आठवडाभर भुकेला तहानेला एकाजागी चिखलात रुतून पडलो होतों. माझा जीव जायची स्थिती होती. त्यावेळी या कोल्ह्याने मला युक्ती करून वांचविले. त्या दिवशी कोल्ह्याने मदत केली नसती तर मी आंज नसतों व आपली मुलं ही नसती ज्यांनी मला प्राण भिक्षा घातली. त्यांच्या बरोबर उच्चनीच हा भेद कसा मानायचा? हा मूर्खपणाच नाही का? अशा मित्रांचा अपमान करणें म्हणजे रक्ताचा संबंध असलेल्यांचा अपमान करण्यासारखेच आहे!" सिंह म्हणाला.

सिंहाची बायको शरमिन्दा होऊन कोल्ह्याच्या बायकोची क्षमा मागू लागली. त्यानंतर सात पिढ्यांपर्यंत सिंह व कोल्हा यांचे वंशज त्याच गुहेत फार सख्यभावाने राहिले.





## बाबर

तुर्कस्तानातील फरगाना नांवाच्या एका छोट्या राज्याचा युवराज बाबर याचा जन्म इ. स. १४८३ मध्ये झाला. वडील वारल्यावर वयाच्या अकराव्या वर्षीच तो सिंहासनावर बसला. वडिलांच्या कडून तो तैमूरच्या वंशात व आईकडून चंगीजखानाच्या वंशात जन्मल्यामुळे बाबर फार हुशार होता.

त्याचे पूर्वज तैमूर याने समरकंद हे शहर जिंकले ही इच्छा बाबरच्या मनांत होती. सिंहासनावर बसल्या नंतर थोड्याच दिवसांनी त्याने समरकंदवर स्वारी केली. समरकंदचा सुलतान तेवढा सशक्त नव्हता. म्हणून बाबरशी युद्धकरणे त्याला शक्य झाले नाही.





परंतु बाबरला युद्धात विजयप्राप्ती होण्यापूर्वीच त्याचे स्वतःचे राज्य फरगाना यावर शत्रू चालून आल्याचे कळल्यावरून बाबरला परत फिरावे लागले. परंतु तो आपल्या राज्याच्या वेशीपर्यंत ही पोहचूं शकला नाही. त्याने आपले सैन्य काबुलाच्या दिशेने वळविले व तो प्रांत जिंकून तेथेच



काबूलाहून बाबरची दृष्टी हिंदुस्ताना-कडे वळली. त्या वेळचा दिल्लीचा सुलतान हा तेवढा बलाढ्य नव्हता. त्याचे अधिकारी प्रजेवर अत्याचार करीत होते. सुलतानाच्या जवळच्या नात्यातले आलमखान व दौलतखान दिल्लीची गादी बळकावण्याच्या प्रयत्नात होते.

आलमखान व दौलतखान दोघांनी मिळून बाबरकडे निरोप पाठविला की त्याने भारतावर स्वारी करावी. बाबरने अत्युत्साहाने पंजाबवर स्वारी केली व लाहोर शहर जिंकून दिल्लीकडे निघाला. त्याच्याशी युद्ध करण्याच्या हेतूने इब्रा-हिम लोदी याने घाईघाईने आपल्या सरदारांना व सेनापतींना बोलावून सैन्याची जमवाजमव केली.





दोन्ही सैन्ये पानिपतजवळ समोरासमोर उभी राहिली. बाबरकडे फक्त बारा हजारांचे सैन्य होते. परंतु त्याचे सर्व सैन्य युद्ध विद्येत निपुण व सुशिक्षित होते. शिवाय त्यांचे बाबरवर प्रेमही होते. इब्राहीम लोदीचे सैन्य एक लाखावर होते, परंतु कोणी उत्तम सेनापती नव्हता. त्यांना शिस्त लाव-

या सर्वांहून महत्वाची गोष्ट म्हणजे बाबरच्या सैन्याकडे असंख्य बंदुकी होत्या. बंदुकीची माहिती ही दिल्लीच्या सैन्याला नव्हती. बंदुकीच्या गोळया अकस्मात येऊन लागू लागल्याने इब्राहिमच्या सैनिकांपैकी अनेक घाबरून रणांगणावरून पळून गेले.





पहिले पानिपत युद्ध (१५२६) हे इतिहास प्रसिद्ध युद्ध होते. या युद्धात बाबरला विजयश्री मिळाली. युद्ध संपल्यावर बाबरने जी संपत्ती मिळाली ती सर्व आपल्या सैनिकांना वाटून टाकली. नंतर स्वदेशी न परत जाता दिल्लीलाच कायम राहू लागला

आणखी काही दिवसांनी बाबरने उदय-पूरचा रजपूत राजा राणा संग्राम सिंग याच्याशी युद्ध केले. त्या युद्धांत रजपूत सैन्य शौर्याने लढले. परंतु त्या युद्धातही बाबरच्या सैन्याने बंदुकीचा उपयोग केल्याने सहस्रावधी रजपूत रणांगणावर पडले आणि बाबरचा जय झाला.















इब्राहिम लोदी हा शूर नव्हताच. परंतु शूर व पराक्रमी असा राणा संग्राम सिंहावरही बाबरला जय मिळाल्यामुळे त्या काळच्या उत्तर भारतातील सर्व प्रमुख मुलुख बाबराच्या राज्यात आला. बाबरला साहित्याची फार आवड होती. त्याने लिहून ठेवलेले आत्मचरित्र 'बाबर-नामा' मूल्यवान पुस्तक आहे.

बाबरचा मुलगा हुमायून एकदा फार आजारी पडला. मोठमोठ्या वैद्यांनी व हकिमांनी औषधोपचार करूनही गुण पडला नाही. शेवटी बाबरने त्याचा मुलगा ज्या पलंगावर झोपला होता त्याला तीन प्रदक्षिणा घालून गुडघे टेकून देवाला प्रार्थना केली–"अल्ला ! माझ्या मुलाला वाचव, पाहिजे तर मुलाचा आजार मला देऊन मला उचल !" त्या घटके पासून हुमायूनला आराम पडू लागला.





हुमायूनचा आजार बरा होत गेला तसतशी बाबरची तब्येत जास्त जास्त बिघडू लागली. १५३० मध्ये तो पैगंबरवासी झाला. बाबरच्या आईचे पूर्वज मंगोल देशाचे निवासी असल्या कारणाने त्याने स्थापन केलेल्या राज-वंशाला मोंगल वंश हे नाव मिळाले. भारतात बाबरने स्थापन केलेला वंश १८५७ पर्यंत चालू होता.



# युवराजांचे मौन

वज्रपुरीचा राजा वज्रकेतू याला दोन मुलगे होते. त्यातला थोरला फार हुशार व गर्विष्ट होता. परंतु तो मोठा होऊ लागला तसतसा तो मंद दिसू लागला आणि कमी बोलू लागला. मुलांत होत चाललेला तो बदल पाहून राजाला काळजी वाटू लागली.

म्हणून एकदा राजाने प्रधानाला व राजगुरूला बोलावून मुलामध्ये होत चाललेला तो बदल कसा घालवायचा या विषयी त्यांचा सल्ला विचारू लागला. "मुलाला कोणी पहिल्या सारखं बोलका करील त्याला चांगलं इनाम द्यावं का?" असे राजाने गुरूला विचारलं.

राजगुरु म्हणाले–"महाराज, युवराजांचं हे मौन फार काळ टिकेलसे मला वाटत नाही. त्यासाठी महाराजांनी इतकी काळजी करण्याचं काहीच कारण नाही. कारण ते मुके नाहीत. व या बरोबर मनांत काही विचार घोळू लागतात, पण ते बोलून दाखविण्याचं धाडस होते नसल्याने असा मौनपणा माणसात आला तरी घाबरण्याचं कारण नाही. पूर्वी घडलेली एक गोष्ट मला आठवते. आपल्या शेजारचे राज्य नीलगिरी मधील युवराज सूर्यचंद्र याला बोलका करण्यासाठी आपल्या सारखेच त्या देशाच्या महाराजांनी केलेले प्रयत्न कदाचित आपल्याला माहीत नस-तील!" असे म्हणत राजगुरु ती कथा सांगू लागले–

नीलगिरीच्या राजाला पुष्कळ काळ लोटल्यावर एक मुलगा झाला. त्याने आपल्या मुलाचे नाव रविचंद्र असे ठेवले व मुलाचे सर्वलाड पुरविले.

मुलगा वाढत गेला तसतसा तो जास्त सुंदर दिसू लागला व त्याची हुशारी दिसू




लागली. त्याच्या संवयी व वागणूक पाहून सर्व त्याची वाखाणणी करीत. परंतु बारावे वर्षं लागले तरी त्याच्या तोंडावाटे एक शब्द ही कोणाच्या कानी पडला नाही. कधी ही त्याच्याकडे पाहीले तर तो कोणत्याः तरी विचारात मग्न असल्याचे दिसे. मधून मधून तो स्मित करत असलेला किंवा हंसत असलेला दिसे. त्याला मुका म्हणावे तर तसेही वाटत नव्हते. कारण एक दोनदां तो एकटा असला म्हणजे काही तरी गाणे गुणगुणत असलेला नोकरांना त्याचा आवाज ऐकू आला होता व राजालाही ती गोष्ट नोकरांकरवी कळली होती.

तरी युवराजाचे ते मुक्यासारखे वागणे पाहून राजाला फार काळजी वाटू लागली. युवराजाला जो कोणी बोलायला लावील त्याला मोठे इनाम दिले जाईल असे. राजाने जाहीर केले.

राजाची दवंडी ऐकून त्या देशातले च नव्हेतर परदेशातले हुशार व निपुण लोक सुद्धा युवराजाला बोलायला प्रवृत्त करण्यासाठी येऊ लागले. काही हुशार वैद्यांनी निरनिराळी औषधी वनस्पतींचा रस काढून युवराजाला पाजून पाहिला. आणखी काही जणांनी मोठमोठ्या पंडितांचा वादविवाद युवराजां समोर करविला. तो ऐकून कदाचित युवराज काही बोलेल असे त्यांना वाटले होते. आणखी काही जणांनी मंत्रतंत्राचा प्रयोग करून ही पाहिला. परंतु सर्वांचे प्रयत्न निरूपयोगी झाले.

एके दिवशी दुपारी जेवण वगैरे झाल्यावर राजावराणी अंतपुरात विश्रांती घेत असतां युवराज उद्यानात गेला आणि एका झाडाच्या सावलीत जाऊन बसला. त्याच्या बरोबर गेलेला नोकर काही अंतरावर उभा होता काही वेळाने एक पोपट झाडाच्या एका फांद्यांवर बसून किलकिलाट करु लागला. पोपटाच्या ओरडण्याचा युवराजांना त्रास होईल असे





वाटून नोकराने एक बारीक खडा घेऊन पोपटाला मारला. तो खडा त्याला मर्मी लागला व पोपट ओरडत जमिनीवर पडला.

लगेच युवराज धांवत पोपटाजवळ गेला आणि त्याला उचलून घेऊन हळुवारपणे त्याच्या अंगावर हात फिरवीत म्हणाला— "कांरे, बाबा! असा ओरडलास? तू ओरडलास म्हणूनच तुला लागलं नाही का?"

ते पाहून नोकर मोठ्या उत्साहाने ओरडत "युवराज बोलले! युवराज बोलले!" असे म्हणत अंतःपुराकडे धांवत गेला.

नोकराच्या तोंडी सर्व काही ऐकल्यावर राजा व राणी धावत बागेत आली त्यांच्या पाठोपाठ दासदासी ही धावल्या. परंतु सर्वजण पोंहोचे पर्यंत पोपट उडून गेला होता. युवराज पुन्हां नेहमी सारखा मौन पणे बसून राहिला.

राजाला नोकराचा फार राग आला व त्याने आज्ञा केली की, हा खोटे बोलला म्हणून याला फांशीची शिक्षा देण्यात यावी.

नोकर महाराजांचे पाय धरून सांगू लागला—"महाराज? मी खोटे बोललो नाही! खरोखरच युवराज बोलले होते! तरी राजाचे शिपाई त्याला कैद करून घेऊन चालले.

तो धावत येऊन युवराजांचे पाय धरून म्हणाला—"युवराज, माझी काही एक चूक नसेनां, खरं बोललो म्हणून मला फांशीची शिक्षा दिली जाते आहे! आणि तुम्ही सर्व पहात असून गप्प कां? पोपटाला थोडेसे



लागतांच तुमचे जे हृदय विरघळून गेले ते मला फांशीची शिक्षा दिली जात असतां मौन कसे? बोलून मला वांचवा!"

युवराजाने त्याला हात धरून उभे केले व म्हणाला—"तू बोललास म्हणून नाहीं का तुला ही शिक्षा मिळत आहे! तू मौन धारण केले असतेस म्हणजे तुला कसला ही त्रास झाला नसता!"

युवराजाला बोलतांना ऐकून राजाने आपल्या गळयातला रत्नहार काढून त्या नोकराला दिला. परंतु त्या दिवशी रात्रीच युवराजाने सर्वसंग परित्याग करून संन्यास ग्रहण केला.

गुरूच्या तोंडी रविचंद्राची गोष्ट ऐकून वज्रकेतू राजाने मुलाला योग्य मार्गावर आणण्याची जबाबदारी राजगुरूवर टाकली.

राजगुरू युवराजाला आपल्या बरोबर आपल्या आश्रमात घेऊन गेला. एका आठवड्यानंतर पुन्हां राजाच्या दर्शनासाठी आला. युवराज येतांच वडिलांना नमस्कार करून म्हणाला—"बाबा! तुम्ही आमचं गुरुकुल कधी पाहिले आहे का? तेथे मला कित्येक मित्र भेटले!"

मुलाला बोलतांना ऐकून आनंदाने राजगुरूला एका बाजूला बोलावून घेऊन जाऊन विचारू लागला—"गुरुवर्य, एक आठवडाच झाला असेल युवराजात हा बदल कसाकाय घडवून आणलात?

"महाराज, आपण एकुलता एक मुलगा म्हणून त्याला खूप लाडात वाढविलत, हे सर्व ठीक झाले. परंतु त्या व यातल्या मुलांना बरोबरीची मुलं खेळायला बोलायला हवी असतात ती युवराजाला मिळाली नाहीत. आईवडील मोठे म्हणून त्यांच्याशी बोलणे कठीण, नोकरांचाकरां जवळ काय बोलायचे? बरोबरच्या सवंगड्याशी जेवढा मोकळेपणा मिळतो तेवढा मोठ्या जवळ मिळत नाही. बरोबरचे सहपाठी मिळाल्या बरोबर युवराज मोकळे पणी बोलू लागला. एकटेपणा गेला. त्या पाठोपाठ मौन ही नाहीसे झाले!"





# गाणारे भूत व नाचणारे भूत

पंढरीच्या डोळयात फूल पडले आणि त्याचे डोळे कायमचे गेले. शिवू जन्मल्या पासून बहिरा होता, म्हणता, दोघांची लग्ने झाली होती आणि दोघे भीक मागूनच आपापल्या बायकांच्या उदरनिर्वाहापुरते मिळवीत.

त्यांच्या गांवापासून दहा कोसावर खंडोबाचे एक देऊळ होते. दरवर्षी खंडोबाचा उत्सव चार दिवस चाले, लोकांची खूप गर्दी होई त्या जत्रेला. त्यांच्या गावापासून खंडोबाच्या डोंगरापर्यंत जायला जी वाट होती त्या वाटेवर एक लहानसे जंगल होते. तरी पंढरी आणि शिवू दरवर्षी ते जंगल तुडवून जात आणि डोंगरावर चढायला ज्या पायऱ्या होत्या त्यांच्यापैकी एखाद्या सोयीच्या पायरीवर दोघे उपकरणे टाकून बसून रहात. संध्याकाळपर्यंत ओंजळभर पैसे प्रत्येकाजवळ जमा होत.

त्या वर्षीसुद्धा दोघे खंडोबाच्या जत्रेला हजर होण्यासाठी गेले आणि प्रत्येकाला सुमारे शंभर रुपये मिळाले, दोघे ते पैसे कमरेला खोचून आपल्या गावी निघाले. परंतु तोंपर्यंत काळोख पडायची वेळ झाली होती. म्हणून जंगलाच्या वाटेने जाणे जड जाणार असे दोघांना वाटू लागले.

"अरे पंढरी, आपलं चुकलं बघ, थोडे आधी निघालों असतों तर बरे झाले असते. वाटेत कोठे जिवाणू निघालं नाही म्हणजे पुरे. मध्यरात्रीपर्यंत तरी जंगला-पार गेलो नाही तर कोणता प्रसंग ओढवेल!" शिवू म्हणाला. त्याला किर्र झाडीमध्ये काळोखच चहूंकडे दिसत होता.

पंढरीने होकारार्थी नुसती मान हलविली शिवूचा हात घट्ट धरला. दोघे झपाझप पावले उचलू लागले. एका जागी कसलातरी आरडा-ओरडा ऐकू आला. पंढरीने शिवूचा



वाटले, म्हणजे आपण इतक्या कुरूप स्त्रीबरोबर का संसार करीत आलो! परंतु बायको मात्र नवऱ्याला चांगले दिसू लागल्याचा आनंद आवरू न शकल्याने शेजार पाजारच्या मैत्रिणींना ते सांगायला गेली.

तिकडे शिवू आपल्या घरी पोंचला. त्याने एकदां नाही दोनदां दार ठोठावले तेव्हां "आलों, आलों!" असा कर्कश पुरुष आवाजात कोणी तरी म्हटले.

"कोणीतरी पुरुष बोलल्यासारखं ऐकू आलं, कोण आलं आहे, आपल्या घरी?" शिवूने बायकोला विचारलं.

नवऱ्याचा बहिरेपणा जाऊन त्याला चांगलं ऐकू येऊ लागल्याचं कळतांच तिला परमानंद झाला व ती म्हणाली—"देवाच्या दयेने तुम्हांला ऐकू येऊ लागलं तर! माझा आवाज मेला असाच!"

तो आवाज असह्य झाल्याने शिवू म्हणाला—"अस्सं होय! तर मग तो असाच काही दिवस ऐकत राहिलो तर पुन्हां बहिरेपणा मला नक्कीच येईल! यापुढे तू माझ्यासमोर कधी तोंड उघडलंस तर पहा, खबरदार!"

बायकोचे डोळे पाण्याने डबडबले. ती तोंडाला पदर लावून निघून गेली.

त्या दिवशी रात्री शिवू जंगलाकडे निघाला तेव्हां त्याची पंढरीशी गाठ पडली. त्यांनी परस्परांना जे मानसिक दुःख झाले ते सांगितले आणि या संकटांतून मुक्त करण्याचा काही उपाय करायला भुतांकडे जात असल्यास त्यांनी परस्परांना सांगितले.

ते पोंचले तेव्हां या खेपेस स्त्रीभूत गाणे म्हणत होते आणि पुरुष भूत नाचत होते. त्या दोघांना आलेले पाहून त्या दोघां भुतांनी आपापले नृत्य गान बंद केले आणि विचारले—"पुन्हां परत आलांत?"

पंढरी म्हणाला—"माझी बायको म्हणजे शुद्ध त्राटका आहे! तिला रूप न रंग? मला डोळे देऊन तुम्ही मला हे कशाला दाखविलंत? आतां यातून मला मुक्ती तुमच्या हातूनच मिळेल!"

शिवू म्हणाला—"मला ऐकू येऊ लागलं हा शापच ठरला! अहो, माझ्या बायकोचा आवाज इतका कर्कश आहे की पुन्हां बहिरेपण येईल की काय वाटू लागलं आहे. यातून काय मार्ग काढायचा, तो तुम्हांलाच माहीत."

दोन्ही भुते चकित होऊन परस्परांकडे पाहू लागली. नंतर विचारू लागली—"आजपर्यंत त्यांनी तुम्हांला प्रेमानेच वागविलं होतं ना?"

"होय, आतांसुद्धां त्यांच्या प्रेमात कमतरता आलेली नाही. परंतु त्यांचे रूप आणि आवाज ऐकून इतका राग येतो आहे की...!" पंढरी व शिवू म्हणाले.

"इतके दिवस तुम्हां दोघांत असलेल्या व्यंग्याकडे दुर्लक्ष करून त्यांनी तुमच्यावर एवढे प्रेम केलं तेव्हां त्यांची मनं किती थोर असली पाहिजेत, विचार तरी केलात का तुम्ही दोघांनी?" पुरुष भुताने खडसावून विचारले.

ते भूत म्हणाले त्याचा अर्थ बोध झाल्यामुळे दोघे निरुत्तर परस्परांना पाहू लागले.

पुरुष भूत पुढे म्हणाला—"जन्मतः असलेली व्यंग दूर होऊ शकत नाहींत. ती ज्यांना आहेत त्यांना तुच्छ लेखणे हा अक्षम्य अपराध आहे. सर्व आयुष्यभर प्रेमाने दोघांनी संसार करावयाचा असतो हो ना. तुम्ही दोघांनी आपल्या बायकोचे रूप रंग व आवाजाकडे लक्ष न देतां त्यांचे गुण पहा व त्यांनी इतके दिवस तुमच्यासारखं व्यंग असलेल्यांबरोबर आनंदाने संसार केल्याबद्दल त्यांचे उपकार माना!"

शिवूला त्याची कानउघाडणी झाल्याचा व पंढरीला त्याचे डोळे उघडल्याचा अनुभव झाला. दोघे भुतांकडे त्यांनी केलेल्या उपकाराबद्दल कृतज्ञतेने पाहू लागले.

दोघांनी भुतांना वाकून नमस्कार केला व म्हणाले—"आमची चांगली कानउघाडणी केल्याबद्दल आणि डोळे उघडल्याबद्दल आम्ही आभारी आहों. आजन्म तुमचे उपकार विसरणे शक्य नाही?" असे म्हणत दोघे आपापल्या घरी गेले.











वाटले, म्हणजे आपण इतक्या कुरूप स्त्रीबरोबर का संसार करीत आलो! परंतु बायको मात्र नवऱ्याला चांगले दिसू लागल्याचा आनंद आवरू न शकल्याने शेजार पाजारच्या मैत्रिणींना ते सांगायला गेली.

तिकडे शिवू आपल्या घरी पोंचला. त्याने एकदां नाही दोनदां दार ठोठावले तेव्हां "आलों, आलों!" असा कर्कश पुरुष आवाजात कोणी तरी म्हटले.

"कोणीतरी पुरुष बोलल्यासारखं ऐकू आलं, कोण आलं आहे, आपल्या घरी?" शिवूने बायकोला विचारलं.

नवऱ्याचा बहिरेपणा जाऊन त्याला चांगलं ऐकू येऊ लागल्याचं कळताच तिला परमानंद झाला व ती म्हणाली—"देवाच्या दयेने तुम्हांला ऐकू येऊ लागलं तर! माझा आवाज मेला असाच!"

तो आवाज असह्य झाल्याने शिवू म्हणाला—"अस्सं होय! तर मग तो असाच काही दिवस ऐकत राहिलो तर पुन्हां बहिरेपणा मला नक्कीच येईल! यापुढे तू माझ्यासमोर कधी तोंड उघडलंस तर पहा, खबरदार!"

बायकोचे डोळे पाण्याने डबडबले. ती तोंडाला पदर लावून निघून गेली.

त्या दिवशी रात्री शिवू जंगलाकडे निघाला तेव्हां त्याची पंढरीशी गाठ पडली. त्यांनी परस्परांना जे मानसिक दुःख झाले ते सांगितले आणि या संकटांतून मुक्त करण्याचा काही उपाय करायला भुतांकडे जात असल्यास त्यांनी परस्परांना सांगितले.

ते पोंचले तेव्हां या खेपेस स्त्रीभूत गाणे म्हणत होते आणि पुरुष भूत नाचत होते. त्या दोघांना आलेले पाहून त्या दोघां भुतांनी आपापले नृत्य गान बंद केले आणि विचारले—"पुन्हां परत आलांत?"

पंढरी म्हणाला—"माझी बायको म्हणजे शुद्ध त्राटका आहे! तिला रूप न रंग? मला डोळे देऊन तुम्ही मला हे कशाला दाखविलंत? आतां यातून मला मुक्ती तुमच्या हातूनच मिळेल!"

शिवू म्हणाला—"मला ऐकू येऊ लागलं हा शापच ठरला! अहो, माझ्या बायकोचा आवाज इतका कर्कश आहे की पुन्हां बहिरेपण येईल की काय वाटू लागलं आहे. यातून काय मार्ग काढायचा, तो तुम्हांलाच माहीत."

दोन्ही भुते चकित होऊन परस्परांकडे पाहू लागली. नंतर विचारू लागली—"आजपर्यंत त्यांनी तुम्हांला प्रेमानेच वागविलं होतं ना?"

"होय, आतांसुद्धां त्यांच्या प्रेमात कमतरता आलेली नाही. परंतु त्यांचे रूप आणि आवाज ऐकून इतका राग येतो आहे की...!" पंढरी व शिवू म्हणाले.

"इतके दिवस तुम्हां दोघांत असलेल्या व्यंग्याकडे दुर्लक्ष करून त्यांनी तुमच्यावर एवढे प्रेम केलं तेव्हां त्यांची मनं किती थोर असली पाहिजेत, विचार तरी केलात का तुम्ही दोघांनी?" पुरुष भुताने खडसावून विचारले.

ते भूत म्हणाले त्याचा अर्थ बोध झाल्यामुळे दोघे निरुत्तर परस्परांना पाहू लागले.

पुरुष भूत पुढे म्हणाला—"जन्मतः असलेली व्यंग दूर होऊ शकत नाहींत. ती ज्यांना आहेत त्यांना तुच्छ लेखणे हा अक्षम्य अपराध आहे. सर्व आयुष्यभर प्रेमाने दोघांनी संसार करावयाचा असतो हो ना. तुम्ही दोघांनी आपल्या बायकोचे रूप रंग व आवाजाकडे लक्ष न देतां त्यांचे गुण पहा व त्यांनी इतके दिवस तुमच्यासारखं व्यंग असलेल्यांबरोबर आनंदाने संसार केल्याबद्दल त्यांचे उपकार माना!"

शिवूला त्याची कानउघाडणी झाल्याचा व पंढरीला त्याचे डोळे उघडल्याचा अनुभव झाला. दोघे भुतांकडे त्यांनी केलेल्या उपकाराबद्दल कृतज्ञतेने पाहू लागले.

दोघांनी भुतांना वाकून नमस्कार केला व म्हणाले—"आमची चांगली कानउघाडणी केल्याबद्दल आणि डोळे उघडल्याबद्दल आम्ही आभारी आहों. आजन्म तुमचे उपकार विसरणे शक्य नाही!" असे म्हणत दोघे आपापल्या घरी गेले.





# सत्यच यशाचे मूळ

नवनीतपूर नांवाच्या गावाचा सत्शील नावाचा राजा होता. नावाला अनुरूप असाच तो सत्यव्रतीही होता. तो स्वभावतः धर्मपरायण असल्याकारणाने तो एक आदर्श राजाही होता. त्याच्या घरी लक्ष्मी, कीर्ती, धर्म, सत्य, पवित्रता इत्यादी कायम राहतात असे लोक म्हणत.

देशाच्या भरभराटीचे मूळ कारण म्हणजे व्यापार. व्यापार वाढेल तर देश सर्वदा सुखी व संपन्न राहील असा विचार करून त्याने एक प्रधात पाडला. तो दररोज सकाळी उठून आपल्या वाड्याच्या अंगणात येऊन बसे आणि कोणीही काहीही विकायला आणलं की विकणारा सांगेल त्या किमतीला राजा ती वस्तु खरेदी करी. व्यापार धंद्यात ज्यांना तोटा होई ते त्यांच्या कडे पडून राहिलेला माल राजाकडे आणून विकीत. त्यामुळे त्यांचा तोटा बराच भरून येई.

नवनीतपूर गावी एक अत्यंत गरीब ब्राह्मण रहात असे. त्याने अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिले. परंतु दारिद्र्य त्याचा पिच्छा सोडीना. माझे हे दारिद्र्य कोणी विकत न घेतलेल्या मालासारखे माझ्याकडे पडून आहे. मी व्यापाऱ्यांसारखे हे दारिद्र्य राजाला विकले तर त्यात काय गैर होईल !" असा एक विचार त्याच्या मनात आला.

एके दिवशी त्याने आपल्या दारिद्र्याचा-मूर्तरूप असलेले फाटके कपडे, फाटकी घोंगडी, फटक्या वहाणा सर्व एकत्र करून त्यांचे गांठोडे बांधले आणि पूर्व दिशा फांकू लागण्याच्या आधीच ते बोचके डोक्यावर घेऊन घरा बाहेर पडला. राजवाड्या समोर येऊन तो ओरडू लागला–"घेणार कोणी दारिद्र्य हो, दारिद्र्य !"

तो आवाज ऐकून राजाने शिपायला पाठविले. म्हणाला–"पहा तर, कोण काय विकतो आहे ? त्याला बोलावून घेऊन ये !"

ब्राह्मण आला व आपल्या डोक्यावरचे गाठोडे उतरवून ते सोडले व म्हणाला–"महाराज, माझ्याकडे आहे ते सर्व विकायला घेऊन आलो आहे !"

राजा म्हणाला–"आहे तरी काय एवढं, पाहू दे तरी !"

"माझं दारिद्र्य, महाराज ! हे माझं स्वतःचे दारिद्र्य आहे !" ब्राह्मण म्हणाला.

राजा विचार करायला क्षणभरच थांबला असेल, ब्राह्मण एखाद्या व्यापाऱ्यासारखाच बोलत होता. त्याला नको असलेल्या वस्तूच तर त्याने विकायला काढल्या होत्या. असा विचार करून सत्यशील राजाने विचारले–"काय हो, तुम्ही आपलं दारिद्र्य कितीला विकणार ?"

"पांचशें स्वर्ण मुद्रांना !" ब्राह्मण निःसंकोच उत्तरला.

राजाने एकही शब्द उलट न बोलतां ब्राह्मणाला पांचशे स्वर्णमुद्रा दिल्या आणि ब्राह्मणाचे फटक्या कपड्यांचे गाठोडे कोठारात नेऊन ठेवायला शिपायला सांगितले.



त्या दिवशी रात्री राजा झोपल्यावर त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नांत त्याला एकदेवी रत्नाभूषणांनी मढलेली बाहेर जातांना दिसली. ती राजाचा निरोप घ्यायलाच आली होती.

राजाने तिला विचारले–"कोण हो बाई तुम्ही ? तू आमच्या घरी आलीस केव्हां आणि आतां कां जाते आहेस ?"

"मी आहे लक्ष्मी ! इतके दिवस किती आनंदाने मी तुझ्या घरी राहाले. परंतु आज तू दारिद्र्य विकत घेऊन घरात आणलं आहेस ! म्हणून आतां मी नाही राहणार तुझ्या घरात !" ती म्हणाली.

"तुझी मर्जी ! मी बोलाविले म्हणून तू नव्हती आलीस. स्वतःच विचार करून स्वबुद्धीने आली होतीस. तसंच कारण असेल म्हणून आतां जाते आहेस. मी नको कसे म्हणेन ?" सत्यशील म्हणाला.

लक्ष्मी गेल्यानंतर तिच्या पाठोपाठ त्याला आणखी एक स्त्री दिसली. ती सुद्धा बाहेर निघालेली पाहून सत्यशील राजाने लक्ष्मीला विचारले होते तसेच तिलाही विचारले.

"मी धर्मदेवता आहे! लक्ष्मीच निघून गेली तर मी राहून काय करू? तुझ्या काय कामाची? लक्ष्मी होती म्हणून तू इतके दिवस मला ठेवून घेऊ शकलास!" धर्मदेवता म्हणाली.

त्याच प्रमाणे न्यायदेवता सुद्धा जातांना म्हणाली–"जेथे धर्म नाही तेथे न्याय तरी कसा राहू शकेल?"

त्यानंतर कीर्तिदेवता सुद्धा राजाचा निरोप घेऊन निघून गेली. त्याच्यावर प्रेम करणाऱ्या देवता एकेक करून निघून जात असलेल्या पाहून राजा सत्यशील विचारांत पडला असतां आणखी एकदेवतापुढे आली.

"कोण ग, माते तू? तू कां निघालीस?" सत्यशील राजाने तिला विचारले.

"मी सत्यदेवता. बाकी सगळ्या निघून गेल्यावर तुझा माझ्यावर जेवढा विश्वास होता तेवढा पुढे राहील की नाही हा विचार करून मी सुद्धा जावं, म्हणते आहे!" ती देवी म्हणाली.

"माते, तू असलीस तर पुरे, असा विचार करून तर मी त्या सर्वांना घालवून बसायला सिद्ध झाले. त्या सर्व निघून गेल्या ते ठीकच झाले. परंतु तू निघून जाणे योग्य नाही. मी म्हणतो ते खरे नसेल तर न्याय देवतेला विचारून घे पाहिजे तर!"

"तुझ्यामुळे माझा काही अपमान किंवा नुकसान झालं नाही. म्हणून मी तुला सोडून जाणार नाही." असे म्हणत सत्य देवता आत परत निघून गेली.

त्या पाठोपाठ सर्व देवता झपाझप परत येत असलेल्या राजाला दिसल्या "तुम्ही सर्व मांझ्यावर नाखुष होऊन निघून गेला होताना? पुन्हां कां परतलात?"

"जेथे सत्य आहे तेथे आम्ही राहतो. आमच्या पाठोपाठ सत्यसुद्धा येईल से वाटले होते. आलं नाही. जेथे सत्य राहीले तेथे परतलो." देवता म्हणाल्या.






क्षीरसागराचे मंथन झाले तेव्हां राक्षस देवांची थट्टा करीत आपला भुजबळ दर्शवीत वासुकीची दोरी करून त्याच्या तोंडाकडून धरून ओढू लागले. देवांनी सुद्धां, आम्ही काही तुमच्याहून कमी आहों का असे सुचवीत शेपटीची बाजू धरून ओढायला सुरवात केली पण. तो ताण सहन न झाल्यामुळे वासुकी आपल्या अनेक तोंडांतून फेसाळ विष ओकू लागला.

हला हल विषाच्या ज्वाळा पसरू लागल्या कित्येक राक्षस तो ताप सहन न झाल्याने तडफडून भस्म झाले. हलाहल वणव्यासारखे पसरू लागले व त्रिलोक भस्म होणार की काय अशी शंका वाटू लागली. त्याच वेळी रवीसारखा वापरलेला मंदर पर्वत समुद्रात बुडू लागला देव व दानव "हरहर महादेव!" म्हणून शंकराची प्रार्थना करू लागले.

विष्णूने मोठ्या कांसवाचे रूप घेऊन कूर्मावतार धारण केला आणि मंदर पर्वताच्या बुडाखाली जाऊन बसला. आपल्या पायांनी त्याने मंदरपर्वताला समतोल उभा करून वर काढला. नंतर तो मधून मधून देवांच्या बाजूने हात लावून ओढी अशा कासव रूपाने विष्णू प्रगट झाला व समुद्र मंथन उत्तम तऱ्हेने होऊ लागले. आणि क्षीरसागर मंथनातून लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, चंद्र, कल्पवृक्ष, कामधेनू, ऐरावत हत्ती उच्चश्रवा अश्वसुरा नावाचे मद्य आणि अशीच रत्ने उद्भवली.












शंकराचा कंठ हल विषाने तप्त झाला होता, तो त्याने चंद्राला आपल्या शिखेत ठेवून त्याच्या हिम किरणांनी शांत केला.

लक्ष्मीने श्रीवत्स कौस्तुभादि मणी ओवून त्यांची वैजयंती माला विष्णूला घालून त्याला वरले. अशातऱ्हेने विष्णू लक्ष्मीकांत झाला.

सुरा मद्य पिऊन देव 'सुरा' झाले.

अगदी शेवटी अमृत निघाले. विष्णू आयुर्वेदाचा मूळ पुरुष म्हणून धन्वन्तरी अवतार धारण करून अमृत कलश होऊन प्रकट झाला. अनेक औषधी वनस्पती सुद्धा घेऊन तो पद्मासनावर बसून समुद्रातून अवतरला.

अमृत प्राप्तीसाठी क्षीरसागर मंथन केले तर सर्वप्रथम हलाहल विष उद्भवले. नंतर अनेक रत्ने निघाली ती निरनिराळ्या देवांनी घेतली. शेवटी अमृतप्राप्ती झाली. अनेक कष्ट सहन करून शेवटी अर्थसिद्धी प्राप्त झाली की आपण त्याला समुद्रमंथन केले असे म्हणू लागलो.

धन्वन्तरीच्या हातातील अमृत कलश हिसकावून नेऊन राक्षस "ते सर्व आमचेच!" असे म्हणू लागले. देव त्यांच्याशी भांडू लागले. देवादानावांच्या भांडणाला उग्र रूप येऊ लागले त्यावेळी 'थयथय' नाचत जगन्मोहिनी तेथे आली. तिला पाहून राक्षस तिच्यावर भाळले.

मोहिनी त्यांना म्हणाली–"तुम्ही ते अमृत इकडे माझ्या हातांत द्या, कसे ! मी ते वाटतें !"

जगन्मोहिनी आपल्याशी बोलली, एवढ्यावरच फुलून जाऊन राक्षसांनी तिला अमृत कलश दिला.

राक्षस एका बाजूला रांगेने बसले. दोघांच्या मध्ये जगन्मोहिनी नृत्य करीत पावले टाकीत अमृत वाटीत असल्याचे सोंग करू लागली.

होते आहे तरी काय, हे निश्चेष्ट होऊन देव पहात राहिले. राक्षस मोहिनीचे रूप लावण्य व नृत्य तन्मय होऊन पाहू लागले

देवांना सुद्धा ही जगन्मोहिनी ही कोण हे प्रथम कळले नाही तरी ती राक्षसांना न पाजतां देवांना येऊन पाजू लागली तेव्हां विश्वमोहिनी रूपात हा विष्णूच तर नाही अवतरला अशी शंका त्यांच्या मनांत आली तरी ती न दर्शविता ते गुपचुप अमृत-प्राशन करू लागले.

जगन्मोहिनीचे नृत्य म्हणजे विष्णूचीच लीला आहे हे देवांना चांगले कळले होते आणि ते अमृत प्राशन करून अमरत्व प्राप्त करीत होते; परंतु राक्षस मात्र जगन्मोहिनीच्या रूपावर स्वताला विसरून अमृताचा आस्वादही घेऊ शकले नाहीत.

तरी राहू नावाच्या एका हुशार राक्षसाला मोहिनीची लबाडी कळली. तो समुद्रातील सुप्रसिद्ध राक्षसीण सिंहिका हिचा मुलगा होता. तो फार मायावी होता.

जी लबाडी चालू होती ती सांगूनही ती समजण्या इतक्या स्थितीत ही इतर राक्षस नाहीत हे ओळखून राहू देवांचे रूप घेऊन देवांच्य पंक्तीत जाऊन बसला आणि त्याने अमृत प्राशन केले. सूर्य चंद्रांनी त्याला ओळखले व मंदर पर्वताच्या वरच्या टोकाला बसलेल्या बहुरूपी विष्णूला ते सांगितले. विष्णूने राहूवर आपले सुदर्शन चक्र सोडले.



राहू सुदर्शनचक्रा पासून स्वत चे रक्षण करण्याच्या हेतूने ग्रहमंडळात पळाला. सुदर्शन चक्राने त्याचा पाठलाग करून त्याचा शिरच्छेद केला. म्हणून त्याचे डोके व धड यांचे दोन नवीन ग्रह होऊन राहु व केतू नामे ग्रह मंडळात फिरू लागले. अमृताचा प्रभाव दोन्हींवर असल्याकारणाने ते दोन्ही ही जिवंत राहिले व म्हणून नऊ ग्रह झाले.

सूर्य चंद्रानी चहाडी केली म्हणून राहू व केतूचा त्यांच्यावर राग होता व ते मधून-मधून अमावास्येला सूर्याला आणि पौर्णिमेला चंद्राला गिळू लागले. अशा तऱ्हेने सूर्य-ग्रहणे व चंद्रग्रहणे होऊ लागली.



सर्व अमृत देवांना देऊन जगन्मोहिनी अंतर्धान पावली. सर्व राक्षसांना त्यांच्या मूर्खपणाची तेव्हां कोठे जाणीव झाली. तेव्हां पासून ते विष्णूचे व देवांचे हाडवैरी झाले.

अमृत मंथनाच्या संदर्भात विष्णूने कूर्मावतार, धन्वन्तरीचा अवतार आणि जगन्मोहिनीचा अवतार, असे तीन अवतार धारण केले.

धन्वन्तरी अमृता बरोबर अनेक औषधी वनस्पती आणि औषधी वेद म्हणजे आयुर्वेद घेऊन आला. म्हणून तो वैद्य शास्त्राचे अधिदैवत व वैद्यांचा कुळदैवत म्हणून पुजला जाऊ लागला.

जगन्मोहिनी ही विश्वमोहिनी नामें एक आदर्श सुंदरी म्हणून प्रसिद्ध झाली.

नारद जगन्मोहिनी अवताराची कीर्ती जगन्मोहिनी रागात वीणेवर गात कैलास लोकी गेला. पार्वतीनें ती कीर्ती ऐकली. "मूर्ख राक्षसांना फसवूं शकणारी, एवढ्या-वरून ती खरोखरीच जगन्मोहिनी म्हणविण्या लायक झाली का ?" अशी शंका पार्वतीने व्यक्त केली.

"होय माते, कोणी किती ही हुशार असला तरी त्याचे चित्त ही आकर्षित करण्याची शक्ती असलेली ती खरोखरच विश्वमोहिनी होती !" असे सांगून नारद निघून गेला.

पार्वतीने त्या गोष्टीचा उल्लेख शंकरा समोर केला. शंकराने फक्त स्मित केले व काही बोलला नाही. नंतर पार्वतीसह नंदीवर बसून वैकुंठ लोकी गेला व विष्णूला म्हणाला–"तू आपल्या जगन्मोहिनी अव-ताराचे पुन्हां एकदां दर्शन घडविशील म्हणून आलों आहों !"

"काही कारणास्तव रूप घ्यावेच लागते, नाही का ? परंतु तुझ्या सारख्या समोर ते रूप घेण्यात काय अर्थ ? ते नको !" असे म्हणून निमिषार्धात अंतर्धान पावला.

इतक्यात थोड्याच अंतरावर फुलांचा चेंडू करून त्याच्याशी खेळत असलेली जगन्मोहिनी प्रगट झाली. शंकर देहभान विसरून तिच्या पाठोपाठ निघाला. जगन्मोहिनी तेथून निसटली व आकाशात उडू लागली. शंकरही दोन्ही हात पंखा-सारखे हलवीत तिच्या पाठोपाठ उडत निघाला. तेव्हां पार्वती थक्क होऊन पहात जागच्या जागी उभी राहिली.

तीशीव मोहिनी लीला ब्रह्मदेवादी देव मोठ्या उत्साहाने पाहू लागले. नंदीसुद्धा थक्क झाला. नारद आपल्या वीणेवर शिवरंजनी राग वाजवूं लागला.

पुढे मोहिनी व पाठीमागून शिव सर्व विश्वभर पळत फिरू लागल्यासारखे दिसले. पार्वती कैलासाला निघून गेली.

जगन्मोहिनीच्या तेजो मंडलांत शिरून जणुकाही ओढून नेल्यासारखा शंकर विश्व-भर फिरला व शेवटी कैलासाला पोंचला, तेव्हां 'माझ्या अंगाला स्पर्श ही करू नका' असे नकारात्मक हात हलविणाऱ्या मोहिनी-जवळ येऊन तिच्या कंबरेला विळखा घालून शंकराने गुढगे टेकले.

"पाहिलंस का माते, तुझ्या यजमानांची लीला !" असे शंकर आणखी काय करतो हे भयभीत नजरेने पहात जगन्मोहिनी पार्वती जवळ येऊन उभी राहिली.

त्या पाठोपाठ विश्वमोहिनी रूप जाऊन त्या जागी विष्णूचा साक्षात्कार झाला.



"दादा ! तू विश्वमोहन जगन्मोहिनी रूपात केशवस्वामी आहेस ! हे सर्व तुम्हां दोघां शिवकेशवांचे लीला नाटकच नाही का ?" या शब्दात पार्वतीने विष्णूला विचारले.

"होय माते, तेवढेच हो !" असे म्हणत नारद महतीवीणा वाजवीत तेथे आला आणि जगन्मोहिनी व शिवरंजनी रागांत हरिहर स्तोत्र गात गात तेथून परत फिरला.

शंकर विष्णूला म्हणाला–"अमृताला सुद्धा विसरून तुझ्या जगन्मोहिनी रूपावर भाळलेल्या राक्षसांचे मला कौतुक करावेसे वाटते. रस पिपासा हेच असुरांचे वैभव आणि संपत्ती !"



विष्णु स्मित करून पार्वतीला म्हणाला– "ताई! आणखी काही कालानंतर शिव-रंजनी म्हणून आमची गंगा स्वर्गातून भूमी-वर उतरेल तेव्हां सुद्धां हा शंकर असाच स्वत:चं देहभान विसरून जाऊन तुला एक सवत घेऊन येईल की काय 'असे वाटू लागलं आहे!" असे म्हणत विष्णू अंतर्धान पावला वैकुण्ठ लोकी निघून गेला.

त्यानंतर काही काळ लोटल्यावर विष्णूने कर्दम प्रजापती व देवहुतीच्या पोटी पुत्र म्हणून जन्म घेऊन कपिलावतार धारण केला. तो बालपणापासूनच थोर ज्ञान प्राप्ती करून घेऊन घोर तपश्चर्या करून कपिल महामुनी म्हणून प्रसिद्ध झाला.

कपिलाने आई देवहुती हिला अनेक तत्वबोध केला. तो सांख्ययोग म्हणून प्रसिद्ध झाला. कपिलमुनी पाताळ लोकात एका गुहेत बसून अखंड तपश्चर्या करीत असतां पृथ्वीवर सगर चक्रवर्तीने शंभरावा अश्वमेध यज्ञ आरंभिला. इंद्राने अश्वमेध यज्ञाचा घोडा चोरला आणि कपिल मुनी तपश्चर्या करीत होते त्या गुहेत नेऊन लपवून ठेऊन दिला.

सगराचे एक हजार पुत्र त्या घोड्याचा शोध काढीत पाताळात खोल गुहा खणीत कपिल मुनी तपश्चर्या करीत होते तेथे गेले व तेथे त्यांना घोडा दिसला. कपिलानेच घोडा चोरून आणून ठेवला असला पाहिजे असें समजून कपिल मुनींवर ओरडले. कपिल मुनींचा तपोभंग झाला व त्यांनी डोळे उघडून त्यांच्याकडे पाहिले मात्र, सर्वच्या सर्व सगर पुत्र भस्म झाले आणि भस्माची एक मोठी रास जमली.

त्या भस्माच्या राशीवर विष्णुपादांतून जन्मलेली स्वर्गात मंदाकिनी नामें प्रसिद्ध पावलेली गंगानदी पृथ्वीवर आणून पितरांचा पुनरुद्धार करण्याचे ठरवून सगराचा नातू भगीरथ तपश्चर्या करू लागला. त्याच्या घोर तपश्चर्येवर प्रसन्न होऊन गंगा नदी प्रकट झाली. परंतु गंगाचा ओघ सहन करण्याची शक्ती पृथ्वीत नसल्या



व्यापाऱ्याची बायको एक वर्ष भर काझीच्या घरात कोणत्याही प्रकारचे भांडण तक्रार न होतां सुखाने राहिली. परंतु एकदां काजीची ओझरती नजर तिच्यावर पडली. तिचे सौंदर्य पाहून काझी आश्चर्यचकित झाला. त्याची सदाचार वृत्ती "भुर्र" दिशी उडून गेली. काय वाटेल ते करून व्यापाऱ्याच्या बायकोला फसवायचे त्याच्या मनात आले.

एके दिवशी काझीची बायको घरात लक्ष ठेव असे व्यापाऱ्याच्या बायकोला सांगून कोठेतरी गेली. ती गोष्ट काझीला पहिल्या पासूनच माहीत होती. ती निघून गेल्यावर तो घरी परत आला. तो सरळ व्यापाऱ्याची बायको होती त्या खोलीत गेला व म्हणाला–"मी धर्मभीरू आहे व सदाचारी आहे, हे सर्व जगाला माहीत आहे नाही का? तुला माझ्या समोर यायला इतके लाजायला काय झाल? मला पाहून न्यायचं म्हणजे घोर अन्यायच!"

ते ऐकून व्यापाऱ्याच्या बायकोला थोडा धीर आला.

"मला भूक लागली आहे, मला, वाढते-सका?" काझीने व्यापाऱ्याच्या बायकोला विचारले.

तिने काझीला वाढले आणि निघून गेली. तेव्हां काझीने जवळ कुपीत ठेवलेले बेशुद्ध करणारे औषध काढून खाद्यपदार्थात घातले व व्यापाऱ्याच्या बायकोला जाऊन म्हणाला–"मुली मी एकटाच जेवणार का? एकट्याने जेवणं म्हणजे फार मोठे पाप! ते पाप मला लागू नये म्हणून तू नावापुरतेच का होईना, थोडं खा!"

मोठ्यांनी सांगितलेले न ऐकणे योग्य नाही असे समजून व्यापाऱ्याच्या बायकोने चार घास खाल्ले आणि बेशुद्ध होऊन पडली.

नेमके त्याच वेळी कोणीतरी घरी आल्याचा आवाज ऐकू आला. आपण केलेल्या चूकी बद्दल पहिल्यानेच घाबरलेला काझी आणखी जास्त घाबरला आणि त्याने व्यापाऱ्याच्या बायकोला उचलून आपला पैसा अडका व दागदागिने ठेवायच्या माडीवरच्या खोलीत नेऊन ठेवले आणि बाहेर आला.

तेवढ्या वेळात काझीची बायको व मुलं घरात आली होती. काझीने बायकोला पाहताच खोटा राग दाखवीत विचारले–"घरदार वाऱ्यावर सोडून कोठे निघून गेली होतीस ग?"

"घरात लक्ष ठेव म्हणून मी व्यापाऱ्याच्या बायकोला सांगून गेले होते हो!" काझीची बायको भीत भीत म्हणाली.

"मी येऊन दोन तास झाले. घरात कोणी चिटपाखरूही नाही. वाटेल त्याच्यावर घर टाकून जायचं असतं का? घरातले कोणी काय उचलून नेले, त्या अल्लाहलाच माहीत!" काझीने बायकोला फैलावर घेतले. बायको व मलं आश्चर्यचकित झाली. कारण व्यापाऱ्याची बायको चांगली बाई आहे, हे सर्वांना माहीत होते.

ते सर्व असे बोलत होते, नेमका त्याच वेळी व्यापारी आला. त्याच दिवशी तो हिंदुस्थानातून परत आला होता.

"मी बायकोला घेऊन जायला आलो आहे!" तो म्हणाला,

"तुझी बायको कोणाला काही सांगि-तल्या–शिवाय कोठे गेली त्या आल्लाहलाच माहीत! काझी म्हणाला.

"काझी साहेब, अहो, थट्टा नको! बोलवा माझ्या बायकोला! व्यापारी म्हणाला.





व्यापाऱ्याची बायको एक वर्ष भर काझीच्या घरात कोणत्याही प्रकारचे भांडण तक्रार न होतां सुखाने राहिली. परंतु एकदां काजीची ओझरती नजर तिच्यावर पडली. तिचे सौंदर्य पाहून काझी आश्चर्यचकित झाला. त्याची सदाचार वृत्ती "भुर्र" दिशी उडून गेली. काय वाटेल ते करून व्यापाऱ्याच्या बायकोला फसवायचे त्याच्या मनात आले.

एके दिवशी काझीची बायको घरात लक्ष ठेव असे व्यापाऱ्याच्या बायकोला सांगून कोठेतरी गेली. ती गोष्ट काझीला पहिल्या पासूनच माहीत होती. ती निघून गेल्यावर तो घरी परत आला. तो सरळ व्यापाऱ्याची बायको होती त्या खोलीत गेला व म्हणाला–"मी धर्मभीरू आहे व सदाचारी आहे, हे सर्व जगाला माहीत आहे नाही का? तुला माझ्या समोर यायला इतके लाजायला काय झाल? मला पाहून न्यायचं म्हणजे घोर अन्यायच!"

ते ऐकून व्यापाऱ्याच्या बायकोला थोडा धीर आला.

"मला भूक लागली आहे, मला, वाढते-सका?" काझीने व्यापाऱ्याच्या बायकोला विचारले.

तिने काझीला वाढले आणि निघून गेली. तेव्हां काझीने जवळ कुपीत ठेवलेले बेशुद्ध करणारे औषध काढून खाद्यपदार्थात घातले व व्यापाऱ्याच्या बायकोला जाऊन म्हणाला–"मुली मी एकटाच जेवणार का? एकट्याने जेवणं म्हणजे फार मोठे पाप! ते पाप मला लागू नये म्हणून तू नावापुरतेच का होईना, थोडं खा!"

मोठ्यांनी सांगितलेले न ऐकणे योग्य नाही असे समजून व्यापाऱ्याच्या बायकोने चार घास खाल्ले आणि बेशुद्ध होऊन पडली.

नेमके त्याच वेळी कोणीतरी घरी आल्याचा आवाज ऐकू आला. आपण केलेल्या चूकी बद्दल पहिल्यानेच घाबरलेला काझी आणखी जास्त घाबरला आणि त्याने व्यापाऱ्याच्या बायकोला उचलून आपला पैसा अडका व दागदागिने ठेवायच्या माडीवरच्या खोलीत नेऊन ठेवले आणि बाहेर आला.

तेवढ्या वेळात काझीची बायको व मुलं घरात आली होती. काझीने बायकोला पाहताच खोटा राग दाखवीत विचारले–"घरदार वाऱ्यावर सोडून कोठे निघून गेली होतीस ग?"

"घरात लक्ष ठेव म्हणून मी व्यापाऱ्याच्या बायकोला सांगून गेले होते हो!" काझीची बायको भीत भीत म्हणाली.

"मी येऊन दोन तास झाले. घरात कोणी चिटपाखरूही नाही. वाटेल त्याच्यावर घर टाकून जायचं असतं का? घरातले कोणी काय उचलून नेले, त्या अल्लाहलाच माहीत!" काझीने बायकोला फैलावर घेतले. बायको व मलं आश्चर्यचकित झाली. कारण व्यापाऱ्याची बायको चांगली बाई आहे, हे सर्वांना माहीत होते.

ते सर्व असे बोलत होते, नेमका त्याच वेळी व्यापारी आला. त्याच दिवशी तो हिंदुस्थानातून परत आला होता.

"मी बायकोला घेऊन जायला आलो आहे!" तो म्हणाला,

"तुझी बायको कोणाला काही सांगि-तल्या–शिवाय कोठे गेली त्या आल्लाहलाच माहीत! काझी म्हणाला.

"काझी साहेब, अहो, थट्टा नको! बोलवा माझ्या बायकोला! व्यापारी म्हणाला.





"थट्टा नाही करीत, खरंच सांगतो, कोठे गेली आम्हांला नाही माहीत!" काझी म्हणाला.

"माझी बायको असं काही करणं शक्यच नाही. तुम्ही म्हणतां आहां त्यात काही तरी लबाडी आहे!" व्यापारी म्हणाला.

काझी रागाचा आव आणून म्हणाला–"मूर्ख माणसा! माझ्यावर हा अन्याय आहे! विनाकारण मला दोष देऊ नकोस! तुझी बायको कोठे निघून गेली, मला नाही माहीत. जा, तिला शोध कोठे हवा तो!

व्यापारी सरळ सुलतान दरबारी गेला आणि घडलेली गोष्ट निवेदन करून काझी विरुद्ध फिर्याद केली.

सुलतानाने काझीला बोलावून, जे घडले ते बरोबर सांगायला सांगितले.

काझीने खोटी जबानी दिली. तीन महिन्यापूर्वीच व्यापाऱ्याची बायको कोणालाही न सांगतां घरातून कोठे तरी निघून गेली. किती शोध केला तरी तिचा पत्ता लागला नाही.

"माझी बायको तसे करणे शक्यच नाही! काझी साहेब सपशेल खोटे बोलत आहेत!" व्यापाऱ्याने स्पष्टच सांगितले.

कोणी साक्षीदार असेलतर त्याला बोलावून आणायला सुलतानाने काझीला आज्ञा केली. काझीने आपल्या शेजारच्या गरीब लोकांना लांच देऊन खोटी साक्ष द्यायला पढवून आणले. सर्वांनी येऊन काझीने जबानी दिली होती तशीच साक्ष दिली. सुलतानाने व्यापाऱ्याच्या विरुद्ध निवाडा दिला. बिचारा व्यापारी हताश झाला.

सुलतान महंमदाला एकही व्यसन नव्हते. सामान्य प्रजेसारखा त्याचा पेहराव असे तो त्या पोषाखातच गावात हिंडे व प्रजा काय करते व काय बोलते हे पाही. त्या प्रमाणे तो त्या दिवशी रात्री गावांत हिंडत असतां तो एका दुकानाजवळ आला तेव्हां तेथे काही मुलं भीक मागत होती. त्यांनी आपल्या पैकी एकाला राजा केले व त्याला

सारखा निवाडा दिलास तर तुला राजपदावरून काढून टाकू, समजलें!"

सुलतान ते ऐकून चकित झाला. त्याने ते म्हणणाऱ्या मुलाला विचारले–"कायरे, सुलतान महंमदाचा न्याय निवाडा बरोबर नसतो का?"

"आजच सुलतानाने एक निवाडा दिला तोच पहा! काझी घेऊन आलेले साक्षीदार कसे होते हो? कोणी समजूतदार माणूस त्या साक्षीदारांवर विश्वास करील का?" तो मुलगा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सुलतानाने त्या मुलाला आपल्या घरी बोलावले "आज तूच निवाडा दे पाहूं!" असे सांगून सुलतानाने त्या मुलाला न्यायपीठावर बसविले. त्या मुलाने आदल्या दिवशी ज्या ज्या साक्षीदारांनी साक्ष दिली होती त्यांच्या पैकी प्रत्येकाला बोलावून विचारले–"तू व्यापाऱ्याच्या बायकोला कधी पाहिलेस का? तिचं वय काय असेल? तिचं रंगरूप कसं आहे?" सर्व साक्षीदारांनी व्यापाऱ्याच्या बायकोला पाहिल्याचे सांगितले परंतु तिचे वय व तिच्या विषयीचे इतर वर्णन त्यांना करतां आले नाही.

"तुम्ही खरं सांगता आहां की, फटके द्यायला सांगू?" मुलाने साक्षीदारांना विचारले.

तत्काळ सर्व साक्षीदार मुलाचे पाय धरून म्हणाले–"आम्हांला काही माहीत नाही. काझी साहबांनी सांगितल, तशी साक्ष आम्ही दिली.

त्यानंतर काझीला खरं सांगण्या व्यतिरिक्त मार्गच नव्हता. व्यापाऱ्याच्या बायकोला माडीवरून आणवून व्यापाऱ्याकडे पोंचते केले. सुलतानाने काझीला हद्पारीची शिक्षा करून त्याची सर्व इस्टेट व्यापाऱ्याच्या बायकोच्या नावे करून दिली.

तो स्वत: न्याय निवाडा बरोबर करू शकला नाही, परंतु ज्या मुलाने योग्य निवाडा केला त्याच्या योग्य शिक्षणाची व्यवस्था करून त्याला तो मोठा झाल्यावर आपला एक सल्लागार म्हणून नेमले.





# चिक्कू भूत

काशीनाथाला सर्व चिक्कू मारवाडी म्हणत त्याच्या चिक्कूपणा विषयी गांवकरी गोष्टी सांगत असत. त्याची बायको. जे समोर बेचव अन्न येई ते कसेतरी दोन्ही वेळा चार घास गिळे. स्वभावाने ती फार गरीब म्हणून निमूटपणे सर्व भागवून घेई!

आपल्या दुकानासाठी माल विकत आणायला काशीनाथाला नेहमी मोठ्या शहरात जावे लागे. असाच एकदां तो शहरात गेला आणि दुसऱ्या दिवशी उजाडतांच घरी परतला. पार्वतीने दार उघडले. तिच्या नाकांत लखलखणारी चमकी त्याला दिसली. काशीनाथ क्षणभरच थक्क होऊन तिच्याकडे पहात राहीला व संतापून ओरडला–"ही चमकी केव्हां करविलीस ग, माकड तोंडे! पाहतांपाहतां माझ घर झाडून रिकाम करशील की!"

"इश्श! इतक्या मोठ्याने काय बोलतां? आत आलांत की सर्व सांगते!" पार्वती बारीक नमत्या आवाजात म्हणाली.

काशीनाथ जोरज़ोराने 'हूं:' 'हूं:' करीत आत आला. तो आत येताच पार्वतीने त्याला सर्व या शब्दात सांगितले.

तिला उडदाचं पीठ म्हणजे डांगर फार आवडते. परंतु लग्न झाल्या पासून गेली पांच वर्षं तिला डांगराचा वासही मिळाला नाही. म्हणून तिने तिच्या जवळ जे चार पैसे होते ते खर्च करून उडदाचं पीठ, हिंग वगैरे बाजारातून आणलं.

ही डांगराची गोष्ट शेजार पाजारच्या कोणालाही कळू नये म्हणून रात्री सामसूम झाल्यावर उडदाची डाळ थोडी भाजून छान दळली व त्यात पापडखार, हिंग व तेल वगैरे घालून डांगराचे गोळे तयार केले.

श्री का. ना. सर्वटे

"इतके दिवस झाले, याघरात मी राहाते आहे, अमसुलाची चटणी किंवा कढी लिंबाशिवाय कसलाच वास मला आला नाही. वीट आला होता मला त्या अमसुलांचा. पण डांगराचा वास येताच जिवात जीव आला. इतका घमघमाट सुटला आहे तर डांगर चवदार झालं असणार! मला नाही का देणार चार गोळे?" असं म्हणत समोर सखी भूत उभे राहिले. भुताला पाहून पार्वतीच्या डोळ्यांची बुबुळंच बाहेर निघाल्या सारखी झाली.

"भिऊ नकोस पार्वती, अग मी कोणी परकी नाही! मी तुमच्या परसातल्या चिंचेच्या झाडावर राहाते" ती भुतीण गोड आवाजात म्हणाली.

ते ऐकून पार्वतीची भीती थोडी कमी झाली. तिने घाई घाईने जाऊन डांगराच्या चार गोळ्या आणून त्या भुतिणीच्या हातांत ठेवल्या.

ती भुतीण आनंदाने गुणगुणू लागली आणि डांगर खाऊं लागली. "मधून मधून मला असे डांगर बोलावून देशील का? तुझा नवरा नसेल तेव्हांच मला करून देत जा! मला पुरुषजातीची फार भीती वाटते बाई! तुझे हे उपकाराचं ऋण मी फेडल्या शिवाय राहणार नाही!" असं म्हणत ती भुतीण अदृश्य झाली.



ती गेल्यावर पाहिल तर डांगराच्या ताटलीत ही चमकी दिसली!

हे सर्व सांगून पार्वती पतीला म्हणाली– "आपण खर्च केला त्याच्या शंभरपट फायदा झाला!"

सर्व ऐकल्यावर काशीनाथाचे डोळे उघडले. इतके दिवस बायकोन कोणतेही पक्वान्न केले नाही याबद्दल तिच्यावर तोंड सुख घेत म्हणाला–"यापुढे तरी तू मधून मधून काही नवीन पक्वान्न करून त्या भुतीणीला घालीत जा. काही केलेस तर तिच्या पुरतेच हो! एवढे मात्र लक्षात असू दे!"

त्या दिवसापासून काशीनाथ त्या भुतीण साठी रात्री काम असो नसो,



कोठे कोठे जाऊ लागला. पार्वतीच्या हातात हलूहलू बिलवर, कानात कुड्या, बोटांत तीन चार अंगठ्या आल्या.

परंतु काशीनाथाचे तेवढ्यावर समाधान झाले नाही. त्याला भुताकडून पुष्कळ पैसे पाहिजे होते. म्हणून दररोज काळोख पडल्यावर रात्री चिंचेच्या झाडाखाली हात जोडून उभा राहून म्हणे–"अग ए भूतबाई! तू किती उदार हृदयाची आहेस ग! तू माझ्या बायकोला स्वतःच्या मुलीहून जास्त जवळची मानून काय काय देत आलीस. मला, एकदां दर्शन दे की ग!"

त्याने किती प्रार्थना केली, परंतु ती त्याच्या नजरेस पडली नाही. काय वाटेल ते करून त्या भुतिणीला भेटून तिच्या कडून मोठा गठ्ठा मिळविण्याचे ठरवून काशीनाथ एके दिवशी बायकोला म्हणाला– "हे पहाग, मला आज खरेदी साठी गावांत जायचं आहे." ते सर्व खोटंच होतं.

होय का? जाऊन या त्या भुतीणीला नारळाच्या दुधाची खीर फार आवडते. आज रात्री मी तीच करते!" पार्वती नवऱ्याला म्हणाली.

बायको सैंपाकघरात गेलेली पाहून काशीनाथ चटदिशी माळ्यावर चढून बसला. काही वेळाने वेलचीचावास सुटला व खीर तयार झाल्याचे काशीनाथाला कळले. चांगली रात्र झालेली होती.

पार्वती खिरीचं पातेलं घेऊन माजघरात आली आणि खीर खाऊ लागली. ती चमच्याने फुंकर घालून घालून खात होती. माळ्यावर बसून काशीनाथ भुताची वाट पहात बसला होता. तिच्या साठी बायको खीर बगळून ठेवील असे त्याला वाटत होते. परंतु बायकोने खिरीचे पातेले वाडग्यात रिकामे केले आणि भुरकून भुरकून खाऊं लागली.

आतां मात्र काशीनाथाला राहवले नाही. तो फणफणून खाली उडी मारून आला आणि ओरडला–"काय ग! इतका खर्च करून केलेली खीर तू सगळी खाऊन टाकलीस पोट भरून खायचं झालं तर तू तिला काय देणार?" असे म्हणत बायकोवर खूप कावला.

बायको घाबरून गेली व रडू लागली. आहे कोठे भूत? मी भात गिळून गिळून इतके दिवस काढले. आतां नुसत्या भाताच्या नावाने ओकारी येते. म्हणून मी भुताचं नाटक केलं होते. आपल्या घरात दहा माणसं जेवली तरी कमी पडणार नाही एवढी मिळकत आहे."

काशीनाथला बायको म्हणाली ते खरे न वाटून त्याने विचारले–"मग हे सर्व दागिने कोठून आले ग?"

"हे सर्व सोन्याचा मुलम्मा चढविलेले पितळेचे दागिने आहेत!" पार्वती म्हणाली.

काशीनाथ संतापला. त्याच्या डोळ्यातून ठिणग्या जणू काय तडतडून बाहेर येऊ लागल्या. त्याने दाराच्या आड एक काठी होती ती काढली आणि बायकोला मारणार इतक्यात "थांब, थांब! इतक्या रागात केलेले काम कधी हिताचं नसतं!" असं म्हणत एक भूत स्त्री समोर आली.

तिला पाहून काशीनाथा बरोबर पार्वती सुद्धा थरथर कांपू लागली. भुतीण– "घाबरू नकोस, असे म्हणत काशीनाथाला म्हणाली–"तुझ्या बायकोने हे जे नाटक केले त्यातले थोडे खरे व थोडे खोटे होते. मी तुमच्या परसातील चिंचेच्या झाडावर राहाते, हे खरे आहे."



ते ऐकून काशीनाथाला थोडा धीर आला. तो म्हणाला–"भाडं द्यावं लागू नये म्हणून तू त्या चिंचेच्या झाडावर राहू लागलीस का? आम्हां नवरा-बायकोच्या भांडणांत तुला तोंड खुपसायला कोणी सांगितलं ग? चालती हो, येथून!"

"मी जाते हो! परंतु जाण्यापूर्वी पार्वतीवर माझं जे थोडं प्रेम आहे त्यामुळे दोन शब्द तुम्हांला सांगते, मी जिवंत असतांना तुझ्या सारखीच चिक्कू होते, कांकण भर जास्तच! माझा नवरा जे मिळवी ते सर्व मी लपवून ठेवी व नवऱ्याला भात व चिंचेचं पाणी खूप तिखट घालून वाढी. दुर्दैवाने मी पुरून ठेवलेले सर्व पैसे चोरांनी चोरून नेले. त्या धक्क्याने मी मेले आणि भूत होऊन बसले, मी मेले म्हणून कोणी रडायला सुद्धा नव्हतं म्हणून मला फार वाईट वाटलं! चिक्कूपणा हा भुतासारखा असतो बघ! त्या पासून मुक्ती मिळविणे माणसाला अशक्य नसते. माणसात थोडे औदार्य असावे लागते. चिक्कूपणा मात्र मुळीच असू नये!"

काशीनाथाने ते सर्व ऐकले व त्याला वाटले की आपणही आपल्या चिक्कूपणामुळे शेवटी भूत तर होऊन जाणार नाही ना? त्याच्या सर्व अंगाला घाम सुटला. त्याने दोन्ही हात जोडून भुतीणीला नमस्कार केला व म्हणाला–"तुझे उपकार मी जन्मात विसरणार नाही. पुढे मी भूत होऊन त्या चिंचेच्या झाडावर बसू नये या साठी तू माझे रक्षण केलेस!"

"मी इतके दिवसांनी एक सत्कार्य करू शकल्या बद्दल मला फार आनंद होत आहे!" म्हणत चिक्कूभूत हंसत खिडकी वाटे पाहतां पाहतां अदृश्य झाले.

काशीनाथ बायकोला म्हणाला– "क्षमा कर मला, पार्वती! मी इतके दिवस तुला फार छळले. आतां तू त्या जुन्या काशीनाथाला विसर, आज पासून आपण लग्न करून नवा संसार मांडला आहे, असे समजून वागू या!"

ते ऐकून पार्वती देहभान विसरली व तिने नवऱ्याचे पाय धरले.






फार पूर्वी अवंती नगरीत एक म्हातारा व्यापारी रहात असे. तो ऐन वयात होता तेव्हां त्याने जगभर अनेक देशांशी व्यापार करून आणि स्वतःची जहाजे चालवून खूप पैसा कमाविला. कालक्रमाने त्याला वार्धक्य आले आणि काम करणे अशक्य होऊ लागले तेव्हां त्याने आपला सर्व धंदा मुलांवर टाकून धंद्यातून निवृत होण्याचा विचार केला. परंतु त्याच्या तिघांमुलां पैकी थोरले दोघे जीवदत्त आणि लक्ष्मीदत्त अगदी कुचकामाचे निघाले.

दोघे दुर्व्यसनात पडल्यामुळे घराबाहेरच नित्य रहात. सर्वात धाकटा पिंगळ याला विसावे वर्ष नुकतेच लागले होते. वृद्ध व्यापाऱ्याने काळजी मुळे खाटच धरली. मृत्युसमयी त्याने आपली सर्व मिळकत तिघांमुलांना व बायकोला समसमान वाटे करून देऊन टाकली. वडील वारल्यावर दोघां थोरल्या मुलांनी जीवदत्त आणि लक्ष्मीदत्त यांनी वाईट संवयी पहिल्या पासूनच लागल्या असल्या कारणाने मनाला वाटेल तसा खर्च करायला सुरवात केली. दोघे थोरले मुलगे दुर्व्यसनांत पडलेले पाहून त्यांच्या आईने आपल्या वांटयासह धाकटा मुलगा पिंगळ याच्याकडेच राहण्याचे ठरविले व राहू लागली.

जीवदत्त आणि लक्ष्मीदत्त दोघे त्यांच्या वांट्याला जे काही आले होते ते सर्व उडवून टाकल्यावर आईला शोधत



पिगळच्या घरी आले. पिगळने आपल्या थोरल्या भांवडांचे प्रेमाने आदरातिथ्य केले. परंतु त्या दोघांनी पिगळलां खूप वडविले आणि आईला आपल्या घरी येऊन रहायला सांगितले.

आईवर यत्किंचितही प्रेम नसतां दोघां वडील मुलांनी त्यांच्या घरी रहायला कोणत्या हेतूने बोलाविले असेल हे न समजण्या इतकी त्यांची आई खुळी नव्हती. वडिलांनी दिलेला वांटा सर्व उडवून टाकल्यावर आपल्या वांट्याला आलेले धन बळकावण्याच्याच हेतूने हे प्रेमाचे नाटक चालले आहे हे तिने ओळखले. ती त्यांना प्रेमाने म्हणाली–"तुम्ही स्वत: मिळवते आहां, काम धंदा करण्याची शक्ती तुमच्यात आहे. धाकटा अजून अजाण आहे, म्हणून त्याच्या जवळ राहून त्याचे मार्गदर्शन करतां येईल म्हणून मी त्याच्या बरोबर रहात आहे!"

ते ऐकून दोघे मोठे संतापले व म्हणाले– "बरंतर तू रहात्याच्या जवळ, आम्हांला काही हरकत नाही. परंतु आमच्या वडिलांनी तुला जो वांटा दिला आहे त्यातला आम्हां दोघांचा वांटा तू देऊन टाक आम्हांला."

"मी जिवंत असेपर्यंत तुम्हांला तुमचा वाटा कसा मिळेल? आईने विचारले.

"आमचा वांटा आम्हांला आतां मिळाला नाही तर त्यानंतर मिळेल याची शाश्वती आम्हांला वाटत नाही. ते पैसे पिंगळ बळकावील आणि तुला घराबाहेर हाकलून देईल!" दोघे म्हणाले.

दोघे थोरले भाऊ अशातऱ्हेने बोललेले ऐकून पिंगळला राहवले नाही. तो आईला म्हणाला–"तरमग तू त्या दोघांच्या जवळ कां नाही जाऊन रहात? तुझ्या मिळकतीतली एक पैदेखील मला नको!"

परंतु त्याच्या आईला ते पटले नाही. तेव्हां दोघा थोरल्यांनी संतापून आईला खूप बडविले पिंगळ आईला वांचवायला धांवला. तेव्हां जास्तच चिडून जाऊन त्यालाही त्यांनी खूप मारले.

आई घरांबाहेर धावली व शेजार पाजाऱ्यांना बोलावून घेऊन आली. त्या लोकांनी दोघां थोरल्यां भावांना खूप शिव्या दिल्या. तेव्हां दोघे घराबाहेर येत म्हणाले–"आम्ही लोक व्यवहार न कळणारी खुळीं मुलं राहलो नाही. तुम्हां दोघांना कोर्टात ओढूं आणि वडिलोपार्जित इस्टेट कोठे जाते, हे पाहूं!" असे धमका-विलेत ते दोघे निघून गेले.

एक आठवडाही गेला नसेल, दोघां थोरल्यांनी म्हणाले तसे केले. त्यांनी कोर्टात आई विरुद्ध व धाकट्या भावाविरुद्ध फिर्याद केली. म्हणून आईला व धाकट्या भावाला कोर्टाकडून समन्स आले. दोघे न्यायालयात गेले. न्यायाधिशाने, दोघां थोरल्यांकडून लांच घेतली असल्याकारणाने, आई व मुलाविरुद्ध निवाडा दिला.

पिंगळ व त्याच्या आईने त्यांच्यावर झालेल्या अन्यायाविरुद्ध वरील कोर्टात अपील केले. महिनाभर कोर्टात चकरा मारल्यावर शेवटी थोरल्या न्यायाधिशाने आई व धाकट्या मुलाच्या बाजूने निवाडा दिला.

निवाडा त्यांच्या बाजूने झाला खरा, परंतु मध्यस्थी करणारे लोक, वकील




वगैरेंना पुष्कळ पैसे द्यावे लागले. म्हणून पिंगळच्या वांट्याचे पैसे आणि आईच्या वांट्याचे पैसे सर्व खर्च होऊन गेले. जीवदत्त व लक्ष्मीदत्त तर पहिल्या पासूनचं सर्व घालवून बसले होते. आता दुसरा मार्ग उरला नाही म्हणून दारोदार फिरून भीक मागू लागले.

पिंगळने मात्र त्याच्यावर आलेल्या या दुर्दैवी संकटाची तेवढी फिकीर केली नाही. त्याने आईला धीर दिला. तो एक जाळे घेऊन नदीवर मासे धरायला निघून गेला. मासे धरण्याचा धंदा नवीन होता तरी संध्याकाळपर्यंत नदीत जाळे फेकून बरेच मासे त्याने पकडले ते मासे त्याने

मासळी बाजारात विकले आणि जे पैसे आले ते एका किराणा मालाच्या दुकानात देऊन घरी हवे असलेले सामान खरेदी करून घेऊन गेला.

अशा तऱ्हेने पिंगळ दिवसभर कष्टकरून मासे पकडू लागला व ते विकून घरी लागणारे सर्व सामान दररोज खरेदी करून घेऊन येऊ लागला. मायलेकाचे दिवस पिंगळच्या मिळकतीवर सुखाने जाऊ लागले. ती बातमी लवकरच दोघां थोरल्या भावांना कळली. ते दोघे पिंगळ नदीवर गेल्यानंतर रडत भीकमागत आईकडे आले व भुकेने जीव कासावीस झाल्याचे त्यांनी सांगितले. ज्या मुलांनी तिला मारले होते व तिला कोटति ओढले होते तरी त्या आईने मुलांची कीव येऊन त्यांना पोटभर जेवायला वाढले.

जीवदत्त व लक्ष्मीदत्त दोघांनी आईचे आभार मानले आणि पूर्वी त्यांनी जो दुष्टपणा केला होता त्या बद्दल पश्चात्ताप दर्शवून आईची माफी मागितली. आईचे मन विरघळले आणि धाकटा मुलगा नदीवर जाई तेव्हां येऊन जेवून जायला आईने आपल्या थोरल्या दोघां मुलांना सांगितले. अशा तऱ्हेने दोघे काही काम न करतां फुकटाचे जेवून जाऊ लागले. त्यांना आनंद झाला आणि ते गल्लोगल्ली फुशारक्या मारीत फिरू लागले.

पिंगळला हे सर्व माहीत नव्हते. तो मात्र दररोज सूर्योदय झाल्या बरोबर उठे आणि जाळे घेऊन नदीवर जात असे. एके दिवशी कां कोणास ठाऊक संध्याकाळ पर्यंत जाळे टाकून बसून राहिल्यावर ही त्याच्या जाळ्यात एकही मासा अडकला नाही. काय आपले दुर्दैव असा विचार करून सूर्यास्त होई पर्यंत तो खटपट करीत राहिला. परंतु त्याला काही मिळाले नाही तेव्हां जाळे खांद्यावर टाकून घरी परतला. दररोज संध्याकाळी तो ज्या दुकानातून सामान घेत असे त्या दुकानावरून च तो काही खरेदी केल्या शिवाय घरी जाऊं लागला तेव्हां दुकानदाराने त्याला हाक मारली.

पिंगळ दुकानदाराकडे गेला व त्याला त्या दिवशी एकही मासा न मिळाल्याने मिळकत न झाल्याचे सांगून पैसे नसल्यामुळे काही खरेदी करावयाची नाही, असे सांगितले. तेव्हां दुकानदार हंसून म्हणाला– "कायरे, तुला दररोज लागणारे सामान तू माझ्या दुकानातूनच खरेदी करून जातोस. एखाद दिवस तू पैसे दिले नाहीस म्हणून मी उधार देणार नाही का? जरूर असेल ते समान घेऊन जा, उद्यां दे पैसे!"

पिंगळने दुकानदाराचे आभार मानलेच त्याला दररोज सारखे लागणारे सामान घेऊन उत्साहाने घरी निघाला-आणि रोजच्या पेक्षा थोडा आधीच घरी आला. त्यावेळी पिंगळचे दोघे थोरले भाऊ मजेत जेवत आईशी गप्पा मारीत होते. एकाएकी





पिंगळ आलेला पाहून दोघे घाबरले आणि हात धुऊन माना खाली घालून पसार होण्याच्या विचारात होते.

पिंगळ दोघां भावाना प्रेमाने भेटून म्हणाला– "तुम्ही दोघे माझ्याकडे जी मीठभाकर आहे ती आनंदाने खा झाले गेले होऊन गेले. किती झालं तरी आपण एकाच आईवडिलांच्या पोटी जन्मलों ना!"

धाकट्या भावाने ते म्हटल्यावर दोघा मोठ्या भावांना अत्यानंद झाला. ते पिंगळच्या औदार्याची वाखणणी करून दुःख वाटल्याचे सोंग करीत म्हणाले–"तू इतका उदार व चांगला असशील ह्या गोष्टीची आम्हांला कल्पनाही नव्हती. नाहीतर आम्ही तुझ्या विरुद्ध खोटा खटला भरून मूर्खपणा केला नसता त्यामुळे आम्ही आपलं तर सर्व घालवूनच बसलो होतों, तुझं आणि आईचं होतं तेही वाया गेलं!"

पिंगळ व त्याच्या भावांमध्ये जे वैमनस्य होतें ते नाहीसे झाल्याचे पाहून आईच्या मनाचे समाधान झाले.

पिंगळ नित्याप्रमाणे दुसऱ्या दिवशीही जाळे खांद्यावर टाकून नदीवर गेला. त्या दिवशीही खूप प्रयत्न करून ही आणि सूर्यास्त होई पर्यंत पाण्यात जाळे टाकून बसूनही जाळ्यात एकही मासा सापडला नाही. तो आपल्या भाग्याला दोष देत घरी जात असतां दुकानदाराने त्याला बोलाविले आणि सर्व विचारून घेऊन त्या दिवशी सुद्धा पिंगळला दररोज लागणारे सामान उधार घेऊन जायला लावले.

अशातऱ्हेने लागोपाठ दहा दिवस पिंगळ नदी वरून रिकाम्या हाताने परत येत राहिला आणि शेवटी कंटाळून दोन कोसा-वर चिलका सरोवर होते तेथे अकराव्या दिवशी जाळे घेऊन गेला.

चिलका सरोवरात जाळे टाकून किना-ऱ्यावर येऊन तो बसला मात्र त्याला मैदा-नांतून आपला घोडा उडवीत एक घोडेस्वार येत असलेला दिसला तो येत असल्यांची पूर्वसूचना आकाशात उडणाऱ्या धुळीवरून त्याला मिळाली. हा घोडेस्वार कोण बरे असावा या विचारात पिंगळ असतां तो घोडेस्वार घोडा उडवीत पिंगळ होता त्या जागी येऊन थांबला व "पिंगळा! तू मला एक मदत करशील का?" म्हणत घोड्या-वरून उतरला.

परस्परांना कधी न भेटलेले व ओळख देख नसतां सरळ जवळ येऊन नाव घेऊन हा कोण हाक मारतो आहे बुवा, असा विचार करीत पिंगळ त्याच्याकडे पाहू लागला. तो त्या नवागंतुकाकडे पहात म्हणाला–"माझं नाव तुम्हांला कसे कळले! तुम्हांला कोणती मदत पाहिजे?"

तो प्रश्न ऐकून तो अनोळखी माणूस हंसून म्हणाला–"तुझं नाव काय कोणास ठाऊक? तू कोणत्या वेळी या चिलका सरोवरात मासे धरायला येशील, हे सर्व आमच्या गुरुजींनी मला तु जन्मायच्या













आधीच सांगितले होते. ती गोष्ट चाळीस वर्षांपूर्वीची बरं, मग मला मदत करशील का ?"

"ती मदत काय ते सांगाल का ! तुमचं नाव काय हे नाही तुम्ही सांगितलंत !" पिंगळने नम्रपणे विचारलं.

"माझे नाव मंडन तू मला मदत करणार ती तशी असाध्य व कठीण नाही ! माझे दोन्ही हात पाठीकडे दोरीने बांधून मला उचलून नेऊन सरोवरात टाक काही वेळाने माझे डोके नदीच्या पाण्यावर दिसेल तेव्हां जाळे टाकून मला बाहेर काढ. पाय वर आले तर तू हा घोडा घेऊन शहरात जाऊन कांचन मिश्र नावाच्या व्यापाऱ्याला दिलास म्हणजे तो तुला शंभर मोहरा देईल." तो नवखा माणूस म्हणाला.

पिंगळने मंडन म्हणाला तसे करण्याचे कबूल केले. मंडनने घोड्याच्या खोगिराला लोंबत असलेली दोरी सोडून आणली व पिंगळला दिली.

पिंगळने मंडनेचे दोन्ही हात पाठीमागे ओढून दोरीने बांधले आणि त्याला खांद्यावर उचलून घेऊन सरोवराच्या किनाऱ्यावर उभा राहून त्याला सरोवरात टाकले.

एक दोन मिनिटे सरोवरात लाटा उसळल्या व थोड्या वेळाने त्या विरल्यानंतर मंडनचे पाय पाण्यावर आलेले पिंगळला दिसले. बिचारा मेला तर !" असे वाटून पिंगळने मंडनने सांगितल्या प्रमाणे त्याचा घोडा घेऊन शहरात गेला. तेथे त्याला शहरातला प्रसिद्ध व्यापारी कांचनमिश्र याचे दुकान हुडकून काढायला तसा फारसा त्रास झाला नाही. कांचन मिश्राने पिंगळला व त्याच्या बरोबरच्या घोड्याला पाहताच "दुराशेचा परिणाम दुःख !" असे गुणगुणत म्हणत पेटीतून शंभर मोहोरा काढून मोजून पिंगळला देत म्हणाला–"मुला, ही गोष्ट गुप्तच राहू दे ! त्यात तुझं हितच आहे !"

(क्रमशः)





# वरशोधन

विक्रमदित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तुला या मध्यरात्रीच्या वेळी इतके परिश्रम करायला लावणारा कोणी असो, तुम्ही परस्परांची चूक दर्शविण्याच्या प्रयत्नात आहांत की काय अशी शंका माझ्या मनात येत आहे. लोक स्वतःचे जीवितही नाही तर आपल्या आप्तेष्टांचे जीवितही चांगल्या स्थितीत रहावे यासाठी झटतात. ही गोष्ट तुला माहीत नाही असे नाही. परंतु त्यासाठी करीत असलेल्या प्रयत्नात एकेकदा ते यशस्वी होतात व कधी कधी अयशस्वीही होतात. त्याचे मूळ कारण माणूस आपल्या बरोबरच्या लोकांविषयी जे अंदाज लावतो

     





त्याच्या वर अवलंबित असते. त्याचे एक उदाहरण म्हणून आणि त्यात तुझे हित होईल असे समजून सुदर्शन नावाच्या एका श्रीमंताची गोष्ट सांगतो." लक्ष देऊन ऐक असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सुदर्शन हा पुष्कळच श्रीमंत होता. त्याची एकुलती एक मुलगी अपूर्व सुंदर होती. तिचे लग्न करून द्यावे व जांवयाला आपली सर्व इस्टेट देऊन टाकावी असे सुदर्शनच्या मनात होते.

सुदर्शनचे चार बालमित्र होते. ते चौघे निरनिराळ्या चार गांवांत राहात. त्या-असल्याचे सुदर्शनला कळले. त्यांच्यापैकी एकाला निवडण्याच्या. हेतूने सुदर्शन एका-मागून एक त्या मित्रांच्या घरी वराच्या शोधार्थ निघाला.

सर्वांत प्रथम तो हरिपूरच्या चंद्रकांतला जाऊन भेटला. चंद्रकांत हा सुदर्शनहूनही अधिक श्रीमंत होता. त्याने फार प्रेमाने सुदर्शनचे आदरातिथ्य केले. चंद्रकांतचा मुलगा पुष्पकांत हा फारच देखणा होता आणि बोलण्यावागण्यात खूपच चांगला दिसला. सुदर्शनला तो फारच आवडला.

बोलण्याच्या संदर्भात सुदर्शनने चंद्रकांत-समोर आपल्या मुली विषयी बोलणे काढले. तिचं नाव चंपा होते ते ऐकून चंद्रकांत म्हणाला—"तू आपल्या मुलीचे नाव चंपा म्हणालास नाही का? माझ्या मुलाची फार लाडकी अशी एक घोडी आहे, तिचे नावही तेच आहे! ती घोडी पाहिली म्हणजे देवलोकांतील उच्चश्रवाच उतरला असावा असा भास होतो!" असे म्हणत सुदर्शनला चंद्रकांत आपली अश्वशाला दाखवायला घेऊन गेला.

तेथले घोडे पाहून चंद्रकांत थक्कच झाला. त्याच्या तोंडावाटे एकही शब्द फुटला नाही. आपली सर्व इस्टेट विकली तरी या घोड्यांची बरोबरी होणार नाही.

हरिपूरहून सुदर्शन शिवपूरला गेला. तेथे त्याचा मित्र भद्र हा रहात होता. त्यानेही सुदर्शनचे अत्यंत प्रेमाने स्वागत केले.

त्या गावात भद्रला लोक फार मानीत. गावात कोणतीही गोष्ट करावयाची झाली की गावकरी सर्वप्रथम भद्रकडे येऊन त्याचा सल्ला घेत.

सुदर्शन त्याला म्हणाला—"कायरे भद्र! तुला गावात एवढा मान व प्रतिष्ठा प्राप्त झाली असून तुला चंद्रकांत सारखे वैभव कसे काय लाभले नाही?"

"मला कोणत्या गोष्टीची उणीव आहे, सांग?" भद्र म्हणाला.

"तुझी सर्व इस्टेट मिळून चंद्रकांतच्या घोड्यांइतकी होईल की नाही असे वाटते! त्याच्या पंधरा घोड्यांपैकी प्रत्येकाची किंमत एक लक्ष सुवर्ण मुद्रा असेल." सुदर्शन म्हणाला.

भद्र एक क्षणभरच थांबून म्हणाला—"चंद्रकांतचे सर्व वैभव हे देखाव्याचे असते. आपले सर्व पैसे खर्च करून तो असलेच प्रदर्शन करीत फिरतो. मनात आलं तर मी तसे पन्नास घोडे विकत घेऊ शकेन. परंतु फायदा काय? माझा मुलगा दररोज घोडे उडवीत राहील!" व त्याच्या सारखाच आळशी बनेल.

भद्र तेवढ्यावरच थांबला नाही. म्हणाला—"घरात दासदासी भरल्या असल्या की घरातली माणसं आळशी होतात. दर-रोज पंचपक्वान्नं झडवू लागलं की प्रकृती





कायमची बिघडते. चार मजली वाडा बांधण्याचा प्रयत्न केला तर तो कोसळून जाण्याची नित्य भीती असते. एकूण चंद्रकांत पेक्षां जास्त धन असले तरी सामान्यांसारखं राहण्यातच शहाणपण आहे." हे तुला समजत नाही का?

भद्रचा मुलगा रुद्र सुद्धा वडिलांच्या म्हणण्याप्रमाणेच बोलत होता

सुदर्शनने आपल्या मुली विषयी भद्रच्या समोर एक चकार शब्दही काढला नाही. तो तेथे दोन दिवस राहिला आणि नंतर वरुणपूरला गेला.

तेथे त्याचा मित्र नागानंद अगदी सामान्य रीतीने रहात असे. तो सुदर्शनला अत्यंत प्रेमाने भेटला आणि त्याच्या घरच्या लोकांची चौकशी केली.

नागानंदाच्या मुलाचे नाव सत्यानंद होते. तो म्हणाला—"मी सुद्धा पुष्पकांतासारखे ऐटीत रहावे असे माझ्या बाबांना वाटते. ती इच्छा पूर्ण व्हावी म्हणून मी काही प्रयत्न करून पाहिले. परंतु त्या प्रयत्नांत बेताचेच यश आले. पूर्णपणे यशस्वी व्हायाचे म्हणजे पुष्कळ पैसे पाहिजेत. तसे पैसे मिळवायचे म्हणजे कोणतेही बरेवाईट काम करण्यात लाज वाटता कामा नये. वरुणपूर हे गांव आमच्या चांगल माहितीचे असल्या कारणाने मी आणखी एखाद्या नवीन गावी जाण्याच्या विचारात आहे. परंतू बाबांची तब्येत बरी नसते. म्हणून मला येथेच रहावे लागते आहे!"

सुदर्शनने तेथे देखील आपल्या मुली विषयी बोलणे काढले नाही. दोन दिवस नागानंदकडे राहून तेथून तो कृष्णप्रस्थनगरी जाऊन आपला मित्र सोमराज याला भेटला.

सोमराज त्याहूनही जास्त गरीबीत दिवस काढीत होता. सुदर्शनला त्याच्या घरी राहणं रास्त वाटत नव्हते. परंतु सोमराजने अत्यंत प्रमाने सुदर्शनचे आदरातिथ्य केले. दोन दिवस आपल्या मित्राला कोणत्याही गोष्टींची उणीव भासू दिली नाही.

सोमराज व त्याचा मुलगा भीमराज. दोघांची राहणी व वागणं सारखं होते. माणसाने सुखाने रहावयाचे असेल तर समाधानवृत्ती राखली पाहिजे, असे दोघांचेही मत होतं. जवळ असेल त्याच्यावर समाधान मानून, फुरसतीच्या वेळी या विश्वाची रीतनीत समजून घेण्यासाठी वेदांत ग्रंथांचे अध्ययन करून वेळेचा सदुपयोग दोघे करीत. त्यांना केव्हांही भेटावे ते दोघे नेहमी आनंदाने रहात.

मात्र सोमराजची बायको मात्र तिला दागिने नाहीत म्हणून, मोठा वाडा नाही म्हणून व दासदासी नाहीत म्हणून सर्वदा दुःखी कष्टी असे.

सोमराज सुदर्शनच्या समोरच बायकोला म्हणाला—"माणसाच्या लोभाला काही अंत आहे का? हे सर्व प्राप्त झाल्यावर देशाची राणी व्हावं असं वाटू लागतं. तुला कोणत्याही परिस्थितीत माणसाला असमाधान वाटते व अतृप्तीचाच अनुभव होतो. म्हणून लोभाला सोडलं तर कोणत्याही प्रकारचं दुःख माणसाला सहन करावं लागत नाही."

सुदर्शन आपल्या गावी परतला. बायकोजवळ चारही स्थळां विषयी बोलला. नंतर तिला विचारले—"नागानंदाचा मुलगा सत्यानंदला जांवई करून घेतले तर आपली मुलगी सुखी होईल असे मला वाटते."



बायकोने त्या गोष्टीस होकार दिला. काही दिवसांनी सत्यानंद आणि सुदर्शनची मुलगी चंपा यांचा विवाह थाटामाटाने पार पडला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, माझ्या मते सुदर्शनने आपल्या बालमित्रां विषयी व त्यांच्या मुलां विषयी जे मत करून घेतले ते चुकीचे होते. पुष्पकांत किती थाटामाटाने रहात होता. रुद्राच्या मनात व्यर्थ लोभ आणि द्वेष नव्हता. भीमराज वेदांत ग्रंथांचे अध्ययन करून जगाचा खरा अर्थ समजण्याच्या महत्वाकांक्षेत होता. त्या सर्वांना सोडून सुदर्शनने आपली मुलगी सत्यानंदाला द्यावी

ही चूक नाही का? परंतु सत्यानंद हा कष्टी खूप होता ते सोडा या शंकांचं समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर, तुला परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"सुदर्शनने जे ठरविले ते योग्यच होते. त्यात त्याची गुंज-भरही चूक नाही. पुष्पकांतला सुदर्शनची इस्टेट डोळ्यांत भरण्यालायक वाटली नाही. तो खूपच श्रीमंत् होता. त्याला दूसरे चंपा त्यांच्या कडच्या घोड्यांतली एक झाली असती, माणूस म्हणून तिचा आदर झाला नसता. आतां रुद्रची गोष्ट. त्याच्यात सत्य नावाची वस्तूच नाही. त्याच्या जवळ ते नाही ते सर्व अनावश्यक असे तो मानतो. त्याच्या जवळ ते नाही हे मानायलाच तो तयार नाही. आतां राहिला भीमराज याच्या मनात महत्वाकांक्षा, शिकारीचा नाद किंवा आवड निवड अशी नव्हतीच. तो आळशी ऐदी होता. अशा व्यक्तीला जांवई करून घेतले तर मुलीला जे कष्ट सहन करावे लागतील ते परमेश्वरच जाणे! सत्यानंदात स्पर्धा करण्याचीवृत्ती होती. त्याला प्रयत्न करून, श्रम करून मोठे व्हावं अशी महत्वाकांक्षा होती. परंतु आयुष्यात फक्त पैशासाठीच कष्ट करण्याची लोभीवृत्ती ही नव्हती. वडिलांची प्रकृती सुधारे पर्यंत त्यांच्या जवळ राहून त्यांची सेवा करण्याजोगी पितृभक्तीही त्याच्यात होती. अशी व्यक्ती सासऱ्याकडून मिळालेली इस्टेट चंद्रकांतच्या इस्टेटीहून जास्त वाढवू शकेल व आनंदाने राहील, हे स्पष्ट होत होते." म्हणूनच चंद्रकांत ने आपला जावई म्हणून सत्यानंदांचीच निवड केलीव योग्यच होती.

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन पुन्हां लोंबकळू लागला. (कल्पित)





# मैत्रीधर्म

नागपट्टणच्या जव्हेऱ्यांमध्ये देवगुप्त हा हा सर्वात श्रीमंत जव्हेरी होता. तो बालपणी नागपट्टणचा राजा विजयशीलच्या बरोबर एकाच गुरुकुलात शिकत असे. म्हणून विजयशील राजा झाल्यावरही देवगुप्त त्याला नेहमी भेटे व आपले मित्रत्वाचे नाते त्याने कायम ठेवले होते.

देवगुप्ताचा व्यापार परदेशांशी जहाजांतून होत असे. त्याला नेहमी व्यापारा निमित्ते देशांतराला जावे लागे. एकदा तो जहाजांतुन जायचे ठरवून राजाला भेटायला गेला.

राजा आपल्या बालमित्राला पाहून प्रेमाने भेटला व येण्याचे कारण विचारून घेऊन म्हणाला–"मित्रा, हा समुद्रावरचा प्रवास फार त्रासाचा असतो, बघ आपण आतां वृद्ध झालो, असे समज! असल्या कामांची जबाबदारी तू आपल्या मुलांवर कां टाकीत नाहीस? आतां तू विश्रांती घ्यावयाचं तुझं वय झालं आहे!"

"महाराज, व्यापारानिमित्ते हा माझा प्रवास शेवटचाच आहे. मी बरोबर मुलाला सुद्धा घेऊन जातो आहे. त्याला या व्यापाराची आवड पुष्कळ आहे, परंतु आवश्यक असलेला अनुभव मात्र मुळीच नाही. ह्या प्रवासात त्याला माझ्या बरोबर गेल्यामुळे बराच फायदा होईल, असं मला वाटतं आहे. त्यानंतर मी व्यापारातून आपलं अंग पूर्णपणे काढून घ्यायचं ठरविलं आहे!" देवगुप्त म्हणाला.

तो राजाचा निरोप घेऊन मुलाला बरोबर घेऊन गलबतात बसून परदेशी गेला. अनेक बेटांवर जाऊन त्याला फायदा होण्यासारख्या वाटल्या त्या वस्तू विकत घेतल्या व ज्या नको होत्या आणि ज्यांची किंमत चांगली मिळत होती त्या वस्तू

श्री मा. स. चव्हाण

विकीत एका वर्षानंतर स्वदेशी परतला. मध्यंतरी राजा विजयशील निवर्तला आणि त्याचा मुलगा गादीवर आला.

आपला बालमित्र एकाएकी निवर्तल्याचे ऐकून देवगुप्तला फार फार वाईट वाटले. नव्या राजाने राज्यव्यवस्थेत जी अदला-बदल केली होती ती कळायला त्याला फार वेळ लागला नाही. राजघराण्याचा एक आत्मीय म्हणून देवगुप्त नव्या राजाला भेटायला गेला.

परस्परांचे कुशल क्षेम विचारून झाल्या-वर जयशीलने त्याचा नवा राज्यकारभार कसा आहे, देवगुप्तला विचारलें. उत्तरा-दाखल देवगुप्त म्हणाला–"फार चांगला आहे! मात्र सरकारी अधिकारी पुण्यवान आहेत खरे. आपल्या वडिलांच्या कार-कीर्दीत ज्या मालावर व्यापाऱ्यांना एक दीनाराचा फायदा होत असे त्याच मालावर हल्ली त्यांना दहा दीनारांचा फायदा होतो आहे. शिपायांना त्या काळात फक्त गुन्हे-गारच भीत असत. परंतु आतां सर्व नाग-रिक शिपायांच्या नावाने थरथर कांपत आहेत. पूर्वी आम्ही धर्मकार्यांत मोकळ्या हाताने खर्च करीत होतो. ते आम्ही आतां आपल्या चिक्कू स्वभावाला अनुसरुन खर्च करण्याचे बंदच केले आहे. परंतु आज देव आणि राजा यात काही अंतर नाही असा प्रजेचा विश्वास झाल्याने आपल्या द्वारपाल-कांचे भाग्य उदयास आलं आहे!" असे सर्व त्याने राजाला सांगितले.

ते उत्तर ऐकून राजाला त्याचे अधिकारी लांच घेऊ लागल्याचे, प्रजा शिपायांना भीत असल्याचे आणि द्वारपालक राजाच्या दर्श-नाला येणाऱ्या नागरिकांकडून चिरिमिरी व इनाम वसूल करीत असल्याचे कळले.

त्याने देवगुप्तचे आभार मानले आणि एका महिन्याच्या आत बेइमान अधिकाऱ्यांना नोकरी वरून काढून टाकले आणि प्रजेचे प्रेम संपादन करून घेतले.

देवगुप्तला राज घराण्याशी जो स्नेहभाव होता तो कायम ठेवू शकल्याबद्दल फार आनंद झाला.





# मनोबळ

कोशल देशात समरपुंगव नावाचा एक पहेलवान होता. मल्लयुद्धात व मुष्टियुद्धात त्याने प्राविण्य संपादन केले होते आणि त्याची बरोबरी करु शकेल असा एकही पहेलवान आसपासच्या राज्यात नव्हता. त्याच्या शारीरिक बळाची कीर्ती इतकी पसरली होती की त्याचा प्रतिस्पर्धी होण्याचे साहस करायला कोणी सहसा धजत नसे.

समरपुंगवाला त्याच्याशी मल्लयुद्ध करून हारलेल्या लोकांना पाहून कधीकधी आश्चर्य वाटे. कारण त्यांच्या पैकी काही जण देहयष्टी व शारीरिक सामर्थ्यात त्याच्याहून जास्त होते, तर काही मल्लयुद्धाचा पूर्ण अनुभव असलेले व डांवपेंचात प्राविण्य संपादन केलेलेही होते. परंतु तरीही त्यांना समरपुंगवासमोर हार मानावी लागे. याचा अर्थ त्यांच्यात त्याचे प्रतिस्पर्धी होण्यापुरेशी काहीतरी उणीव नक्कीच होती.

एकदां तो आपले गुरु अजितमल्ल यांना भेटला व बोलतांना त्यांना त्याने विचारले– "उस्ताद! मी आपल्या बरोबरीच्या व काही तर काकण भर वरच्या दर्जाच्या पहेलवानांना सहजी माती चाटायला लावली. त्या बद्दल मला गर्व वाटत नाही. परंतु ते खरोखरीच माझ्या बरोबरीचे नव्हते का अशी एखाद वेळी शंका येते."

ते ऐकून अजितमल्ल स्मित करून म्हणाला– "हे पहा, मल्लयुद्ध किंवा मुष्टियुद्धासारख्या विद्यांतच नव्हे तर इतर विद्यांतही माणसाला फक्त शरीर-शक्ती अपुरी असते. त्याला इतर शक्तीची किंवा बळाचीही गरज असते.

त्या शक्ती कोणत्या असे समरपुंगवाने आपल्या गुरुला विचारले. परंतु अजितमल्ल



म्हणाला–"हे पहा, योग्य वेळी तुला सांगितल्याशिवायच त्यांचा साक्षात्कार होईल."

काही दिवसांनी समरपुंगव आपली बरोबरी करू शकणारा कोणी प्रतिस्पर्धी आहे का, हे पाहण्यासाठी देशोदेशी हिंडू लागला.

काही दिवसांनी तो अस्मक राज्यात आला. एका डोंगराळ प्रदेशातून जात असतां त्याला निकुंभ नावाचा एक राक्षस भेटला.

विशाल देह असलेला हा राक्षस डोंगराच्या एका गुहेत रहात असे. त्याला भूक लागली म्हणजे तो जवळपासच्या गावात शिरून माणसांना, गुरांढोरांना व कधी कधी जंगली जनावरांना धरूनही खाई. अखिल नांवाचा अस्मक देशाचा राजा होता. त्याने त्या राक्षसाला ठार करण्यासाठी अनेक वेळा आपल्या सैनिकांना पाठविले. परंतु कितीही सशस्त्र सैनिक त्याच्यावर चालून आले तरी त्यांना न भितां तो एकदां असा मोठा हुंकार काढी की सैनिकांची गाळणच उडून जाई आणि ते तत्क्षण समोरून पळून जात.

त्या राक्षसाला पाहून समरपुंगवात एकदम एक तऱ्हेचा नवीन उत्साह जागृत झाला. त्याने दंड ठोकून एक मोठी आरोळी दिली. राक्षस थोडाच का होईना, पण दचकला आणि समरपुंगवाकडे पाहून त्यानेही एक मोठ्याने हुंकार दिला. एक सामान्य माणूस आपल्याला आह्वान करीत असल्याचे पाहून त्याला थोडे आश्चर्यच वाटले, त्याच बरोबर थोडी भीतीही वाटली.

समरपुंगव मोठ्या उत्साहाने उडी मारून राक्षसाच्या अंगावर धावला, तेव्हां एका दगडाला त्याचा पाय लागला व तो दगड राक्षसाच्या पायावर जाऊन आदळला. तो टाळण्यासाठी राक्षस एका बाजूला सरकला खरा, पण त्याच वेळी समरपुंगवाने त्याच्यावर झडप मारली आणि त्याला जोराने एक ठोंसा दिला.

तो ठोसा लागतांच राक्षस जमिनीवर लोळू लागला एवढेच, नाही परंतु पडतां-पडतां बोंबला. तो उठून परत फिरला मात्र, समरपुंगवाने त्याला लाथा बुक्क्यांनी खूप बडवून काढले.

दोघांमध्ये काही वेळ दोन बैलांची झुंज होते तशी झुंज झाली व शेवटी समरपुंगवाच्या हाती राक्षसाने जमिनीला पाठ लावली व तो पुन्हां जागचा हालला नाही. तरी राक्षसाचा मार खाऊन समरपुंगवाला सुद्धा बरेच लागले होते. तो काही वेळ घेरी आल्या सारखा जमिनीवर निश्चेष्ट पडून होता.

राजाचे हेर दुरून हे द्वंद्वयुद्ध पहात होते. ते धावत पळत राजा अखिल यांच्याकडे गेले आणि या अपूर्व द्वंद्वयुद्धाचे वर्णन त्यांनी राजासमोर केले. राक्षसाची पीडा कायमची टळल्याबद्दल अखिलला मनातल्या मनांत फार आनंद झाला. परंतु लगेच दुसऱ्या क्षणाला थोडासा घाबरल्या-सारखा होऊन प्रधानाला म्हणाला–"निकुंभ राक्षसाचा वध करणारा जखमा बऱ्या होऊन उठेपर्यंत त्याचा कांटा आपण काढलेला बरा. चला तर निघा लवकर!"

निकुंभ राक्षसाला ठार करून देशावर एवढे उपकार करणाऱ्याचा वध करण्याचा विचार महाराजांच्या मनांत कां बरे आला, प्रधानाला कळेना.

राजा, मंत्री व काही सैनिक त्या डोंगराळ प्रदेशात पोंचले तोंपर्यंत लोक



समरपुंगवाच्या चारी बाजूला जमा होऊन किती श्रद्धा व भक्तीने त्याच्या सेवा शुश्रूषेला लागले होते.

ते पाहून राजाने आपली तलवार म्यानेत ठेवली व समरपुंगवाला नमस्कार करून म्हणाला–"निकुंभ राक्षसा सारख्याला ठार करणारे तुम्ही, त्याच्याहून भयंकर असाल असे आम्हांला वाटले होते; शिवाय आम्हांला असे वाटत होते की एक पीडा जाऊन दुसरी त्याहून मोठी डोक्यावर येऊन बसते की काय! तुम्ही शुद्धीवर येण्याच्या आंत तुमचा कांटा काढून टाकण्याच्या हेतूने आम्ही आलो होतो. त्याबद्दल आम्हांला लाज वाटते आहे."

"प्रजेला सुखी ठेवण्याची इच्छा असलेल्या कोणत्याही राजाच्या मनात तोच विचार येणार त्यात चूक काहीच नाही, महाराज!" समरपुंगव म्हणाला.

ते उत्तर ऐकून राजा म्हणाला–"तुमच्यात देवाचा अंश तरी असला पाहिजे, नाही तर अतीत शक्ती तुम्ही प्राप्त केल्या असाव्यात. मी मोठमोठया तुकडया शिपायांच्या पाठविल्या होत्या. परंतु निकुंभाचा हुंकार ऐकूनच त्यांची गाळण उडून गेली होती."

"माझ्यात दैवी किंवा अतीत अशी शक्ती मुळीच नाही. शारीरिक शक्तीबरोबर इतर शक्तीसुद्धा असाव्या लागतात, असे आमचे गुरुवर्य सांगत होते, त्याचा खरा अर्थ मला आताच कळला. त्या शक्ती म्हणजे मनोबळ, आत्मविश्वास आणि जिद्द! म्हणून मला राक्षसाला पाहल्यावर त्या राक्षसाशी मल्लयुद्ध करण्याचा उत्साह चढला, भीतीतर वाटलीच नाही." समरपुंगव म्हणाला.

इतक्या पराक्रमी वीर पुरुषात इतकी नम्रता असल्याचे पाहून राजाला आनंद झाला.

राजाने अत्यंत आदरपूर्वक त्याला राजधानीत बोलावून नेले व त्याचा यथोचित सत्कार करून काही काळ लोटल्यावर त्याला स्वदेशी जायला निरोपपण दिला.





# कर्मपरिपाक

गौतम बुद्धाच्या काळात अनाथपिंडक नावाचा एक धनशेट होता. त्याच्या मनात गौतम बुद्धावर अपार भक्ती होती. त्याने जेतवनात चौपन्न कोटी खर्च करून कित्येक आराम बांधले. तो नियमितपणे दिवसातून तीनदां बुद्ध भगवानाच्या दर्शनाला जात असे. कधीकधी स्वतः बुद्ध भगवान आपल्या शिष्यांसह त्याच्या घरी भिक्षेसाठी येत असत.

या अनाथपिंडकाचा सात मजली वाडा होता. त्याच्या चारी बाजूला सप्त कोट होते. त्यातल्या अगदी मधल्या कोट किल्लयात एक क्षुद्र देवता, म्हणजे भुतीण रहात असे, तिच्या बरोबर तिची मुलंबाळंही होती. त्या देवतेला बुद्धाचा भयंकर तिटकारा होता. म्हणून बुद्ध भगवान अनाथ पिंडकाच्या घरी येत हे तिला मुळीच आवडत नसे. ती मानव स्त्रीरूप घेऊन अनाथपिंडकाच्या खजिनदाराकडे गेली व म्हणाली–

"या घरात बुद्धाला कां येऊ देतां? अशा व्यक्तीने उंबरठा ओलांडून घरात येणे घराला अपशकुनासारखं आहे!" परंतु खजिनदाराने तिलाच खूप शिव्या देऊन हाकलून लावले. नंतर ती अनाथपिंडकाच्या मुलाला जाऊन भेटली व त्याला तिने तेंच जाऊन सांगितले. त्याच्या कडूनही शिव्या खाऊन ती क्षुद्र देवता परतली व त्यानंतर ती गप्प झाली.

अनाथपिंडकाचा खर्च दिवसेदिवस वाढतच गेला आणि प्राप्ती कमी होत गेली. व्यापारांत त्याचं लक्ष कमी होत गेलं. या शिवाय व्यापारात त्याला इतरत्र फार नुकसान सोसावं लागलं. बरोबरच्या व्यापाऱ्यांनी त्याच्याकडून अठरा कोटी रुपये कर्ज म्हणून घेतलं आणि ते त्यांनी

फेडलं नाही. नंतर अनाथपिंडकाने त्यांच्याकडे ते परत मागितले ही नाही. त्यानंतर आणखी अठरा कोटीचे धन त्याने हंड्यांमधून भरून ते अचिरवती नदीच्या काठी पुरून ठेवले होते. नदीला पूर येऊन पुराने काठावरची जमीन कापून निघाली व तिच्या बरोबर अनाथपिंडकाने पुरून ठेवलेले हंडे वाहून समुद्रात गेले.

या सर्वांचा परिणाम म्हणजे अनाथपिंडक स्वतःच अनाथ व गरीब होण्यात झाला. तरी त्याच्याकडे भिक्षेकरी येत आणि त्यांना तो भिक्षा घालीत राहिला. फरक एवढाच की आतां पक्वान्नां-ऐवजी तो फक्त पेज वाटीत असे.

एकदा स्वतः बुद्धाने अनाथपिंडकाला विचारले–"अजून दानधर्म चालूच आहे का?"

अनाथपिंडक अत्यंत दुःखाने म्हणाला–"प्रभो, मी अन्नदान करतों आहे, परंतु फक्त पेजच!"

बुद्ध भगवान अनाथपिंडकाच्या मनाला होत असलेले दुःख ओळखून म्हणाले–"बाबा रे, दुःखी होऊ नकोस. निर्मल हृदयाने केलेले अन्नदान, मग ती नुसती पेज असली तरी ते फार थोर असे अन्नदान होय!"

अनाथपिंडक गरीब झाला म्हणून क्षुद्र देवता धीर करून स्वतः त्यालाच जाऊन भेटली व म्हणाली–"कायरे बाबा, तू या बुद्धाच्या नादाला काय लागला आहेस? तू आपला व्यापारधंदा कर म्हणजे झालं! गेलेले धन पुन्हां परत मिळव! मी तुझ्या वाड्याभोवतीच्या चवथ्या कोट किल्ल्यात राहणारी देवता आहे. तुझ्या हिताचं म्हणून सांगते आहे!"

अनाथपिंडक तिला म्हणाला–"तू तत्क्षण माझ्या घराबाहेर चालती हो! यापुढे माझ्या घरात पाऊलही टाकू नकोस."

"जाईन नाहींतर बसून राहीन असं वाटलं का तुला? या घराहून चांगलं घर मला कुठे मिळणार नाही, असं वाटलं का तुला?" असे म्हणत ती क्षुद्र देवता आपल्या मुलांबाळांसह अनाथपिंडकाचे घर सोडून निघून गेली. परंतु किती शोध केला तरी तिला तितकं चांगलं घर मिळालं नाही. इतकं चांगलं घर सोडून निघाल्या बद्दल तिला पश्चात्ताप वाटू लागला. परंतु सोडून गेलेल्या घरात पुन्हां कोणत्या तोंडाने पाऊल टाकायचं? म्हणून ती ग्रामदेवतांचा सल्ला घ्यायला गेली.

"ते घर सोडून तू निघालीस ही तुझीच चूक! आतां पुन्हां तिकडे जायचं असेल तर एक काम कर! काही व्यापाऱ्यांनी अनाथपिंडका कडून अठरा कोटींचं कर्ज घेतलं आहे. तू त्याच्या कारकुनाच्या रूपात जाऊन त्या व्यापाऱ्यांकडून ते अठरा कोटी वसूल करून आण. नंतर त्याचे समुद्रात वाहून गेलेले हंडे हुडकून परत आण देन.





त्या हंड्यात अठरा कोटी धन आहे. एका जागी अठरा कोटीची मिळकत अनाथ पिंडकाची दडलेली आहे. ती आणून त्याच्याकडे पोचती कर. नंतर त्याच्या जवळ क्षमा माग." ग्रामदेवतांनीं तिला सल्ला दिला.

क्षुद्र देवतेने व्यापाऱ्यांकडून येणारे कर्ज अठरा कोटींचं वसूल करून आणलं. समुद्रात वाहून गेलेले अठरा कोटीचे धन असलेले हंडे हुडकून काढले आणि अठरा कोटीचे दडलेले धनही आणून अनाथ-पिंडकाला देत म्हणाली–"बाबा रे, माझं डोकं ठिकाणावर आलं. मला क्षमा कर आणि आपल्या घरात रहायला परवानगी दे!"

"ही क्षमा तू बुद्ध भगवानांकडे जाऊन माग!" अनाथपिंडक म्हणाला. ती त्याच्या बरोबर जेतवनात गेली आणि बुद्धाजवळ तिने केलेल्या कृत्याबद्दल क्षमा मागितली.

सर्व ऐकून घेऊन बुद्ध भगवान तिला म्हणाले–"दुष्कर्म करणारा त्याचे दुष्कर्म परिपक्व होईपर्यंत तो करतो आहे ते सत्कर्मच आहे असे मानतो. परंतु कर्माची फळे भोगायची वेळ आली की त्याला सत्याचा साक्षात्कार घडतो. त्याच प्रमाणे सत्कर्म करणारी व्यक्ती सुद्धां सत्कर्माची फळे फळास येईपर्यंत आपण दुष्कर्मच करतो आहों असे मानते. तिला सुद्धा फळे चाखायची वेळ आली म्हणजे सत्याचा साक्षात्कार घडतो. यापैकी पहिल्याचं उदाहरण म्हणजे क्षुद्र देवतेने केलेलं कर्म, आणि दुसऱ्या गोष्टीचं उदाहरण म्हणजे अनाथपिंडकाचे कर्म. हा सुद्धा आपण चुकत तर नाही, म्हणून मानसिक दुःख सहन करीत होता. परंतु कर्मफलाचा परिपाक झाल्यावरच दोघांना सत्कर्म कोणते व दुष्कर्म कोणते हे कळले!"

हे ऐकल्यावर क्षुद्र देवतेची बुद्धी पालटली. बुद्धासमोर तिने द्वेषबुद्धीचा परित्याग करून आपल्या मुलांबाळांसह अनाथ-पिंडकाच्या वाड्याभोवतीच्या चवथ्या प्राकारात जाऊन पुन्हां राहू लागली.





## हुमायून व शेरशाह

बाबरनंतर त्याचा मुलगा हुमायून इ.स. १५३० मध्ये वयाच्या तेविसाव्या वर्षी आग्रा राजधानी असलेल्या मोगल साम्राज्याच्या सिंहासनावर बसला. तो भोगविलासात बुडून राहिल्यामुळे त्याच्या वडिलांनी स्थापन केलेल्या साम्राज्याचे रक्षण करण्यालायक राज्यकारभारात लक्ष घातलं नाही.

त्याच सुमारास अफगाण शेरशाह हा भारतातील एक प्रमुख शासक म्हणून देशात आपला राज्यविस्तार करण्यात गर्क होता. बिहार प्रांतातील सशार जहागीरदाराचा मुलगा शेरशाह याचे मूळ नाव फरीद होते. बालपणी त्याच्या सावत्र आईने केलेला अपमान सहन न झाल्याने तो जोनपूरला पळून गेला.





फरीद ऐन तरुण वयात असतांना त्याने एकट्याने वाघाशी दोन हात करून त्याला ठार केले. त्या तरुणाने जे शौर्य व साहस दर्शविले त्यावर खूष होऊन बिहारच्या सुलतानाने त्याला शेरशाह ही उपाधी देऊन त्याचा गौरव केला. शेरशाह युद्ध विद्येतही निष्णात होता. युद्धविद्येत तो बाबरला आदर्श मानत असे.



निरनिराळ्या तऱ्हेने व्यूहरचना करून व एकामागून एक युद्धे जिंकून शेरशाह बिहारचा शासक झाला. दिवसेंदिवस शेरशाहची वाढती ताकद पाहून हुमायूनला त्याच्याशी युद्ध करावे लागले. अनेक युद्धे झाली व युद्धाची कमी आवड असल्या कारणाने जवळ जवळ सर्व युद्धांत हुमायूनचा पराभव झाला.

एकदा शेरशाहने घातलेला वेढा पाहून त्यातून निसटून जाण्याच्या प्रयत्नात असता हुमायूनला व त्याच्या सैन्याला गंगेत उड्या मारून जावे लागले. त्यात शेकडो सैनिक बुडून मरण पावले. हुमायूनला सुद्धा चांगले पोहोता येत नव्हते, म्हणून त्याचा जीव धोक्यात होता.





प्रवाहाचा वेग अनावर झाल्याने गटांगळ्या खात असलेल्या हुमायूनला पाहून एका भिश्त्याने आपल्या पाण्याच्या पिशवीत वारा फुंकून ती हुमायून जवळ फेकली. तिच्या सहाय्याने हुमायून वाचला व किनाऱ्यावर आला. अशा तऱ्हेने एका सामान्य भिश्त्याने दिल्लीच्या बादशहाचे प्राण वाचविले.



आपले प्राण वाचविणाऱ्याचे हुमायूनने आभार मानले व त्याला एक दिवसभर आपले सिंहासन देऊ केले. त्याने आपल्या त्या कृत्याचे स्मृति चिन्ह म्हणून चामड्याच्या पिशवीचे तुकडे करून ते आपल्या मित्रांना वाटले.

आपले सिंहासन वाचविण्यासाठी हुमायूनने केलेले सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. शेवटी शत्रूसमोर टिकाव न धरू शकल्यामुळे उमरकोट येथील एका हिन्दू राजाच्या आश्रयाला हुमायूनला जावे लागले. तेथेच त्याची बेगम हमीदा बानूच्या पोटी अकबरचा जन्म झाला.





शेरशाहने दिल्ली शहर काबीज केले आणि सर्व उत्तर भारत पादाक्रांत करून पूर्वेकडे बिहारपर्यंत आपला राज्यविस्तार केला. आपला अधिकार सर्वत्र सुस्थिर केल्यानंतर सुर वंशात जन्मलेल्या शेरशाहने राज्यव्यवस्थेत अनेक सुधारणा केल्या. म्हणून एक योग्य शासनकर्ता म्हणून तो प्रसिद्ध झाला.

शेरशाहने शेरखान असे नाव धारण करून रजपुतांशी अनेक युद्धे केली. कालिंजर किल्ल्याजवळ युद्ध चालू असता एकाएकी बंदुकीच्या दारूच्या सांठ्याला आग लागली. त्यावेळी शेरशाह जवळच होता. तो जखमी होऊन तत्काळ मरण पावला





शेरशाह मरण पावल्याची व त्यामुळ देशातली राजकीय परिस्थिती अस्त-व्यस्त झाल्याची वार्ता कंदहार मध्ये हुमायूनला कळली. हीच योग्य संधी समजून हुमायूनने भारतात यायचे ठरविले. पंधरा वर्षे राज्यच्युत होऊन पुन्हां राज्यप्राप्त करण्याच्या निश्चय करून हुमायून भारतात आला.

इ. स. १५२५ मध्ये त्याने अनुक्रमे लाहोर, आग्रा व दिल्लीवर सहजी अधिकार करून हुमायूनने पुन्हां मोगल वंशाचे शासन चालू केले. परंतु हे नवे वैभव उपभोगण्याचे भाग्य त्याला लाभले नाही. आपल्या वाड्यातील ग्रंथालयात जाऊन माडीवर जातांना जिन्यात पाय घसरून तो पडला व मरण पावला.





# अधू डोळेवाले

एक गावी तिघे भाऊ निरनिराळ्या घरांत शेजारी शेजारी रहात असत तिघांचेही डोळे अधू होते. कोणतीही वस्तु अगदी नाकाजवळ नेऊन पाहिल्याशिवाय त्यांना ती काय वस्तु आहे कळत नसे.

तिघे भाऊ एके दिवशी मोठ्या भावाच्या घरी जमून गप्पा मारीत बसले होते. मध्येच सर्वात मोठा भाऊ म्हणाला—"हे माहीत आहे का तुम्हांला, गेले काही दिवस मला बरंच चांगलं दिसू लागलं आहे बरं का! दुरून डांस दिसला तर नर आहे की मादी हे सुद्धां मी ओळखू शकतो."

"पुरे बुवा, तुझ्या या बढाया! एका आठवड्यापूर्वीच नाही का तू एका पाणक्याच्या कावडीवर आदळला होतास?" मधला भाऊ म्हणाला.

"दिवसाची गोष्ट राहू दे रे! थोडा काळोख पडला की किती छान व स्पष्ट दिसतं. काही काही जणांना रात्रींच दिसते, म्हणे!" थोरला म्हणाला.

"या सर्व गप्पा कशाला? खाऊन पाहिल्याशिवाय पदार्थाची चव कळत नाही. कोणाला किती दिसतं हे प्रत्यक्ष परीक्षा करूनच पाहूया! क्षणभरात कळेल." सर्वात धाकटा म्हणाला.

"परीक्षा कशी रे?" मधल्या भावाने विचारले.

"ऐका तर! आपल्या गल्लीच्या समोरच्या धर्मशाळेच्या दारावर त्या धर्मशाळेचे विश्वस्त. एक पाटी उद्यां बसविणार आहेत, त्या पाटीवर काय लिहिलं आहे, ते वाचून दाखविणे हीच परीक्षा. जो कोणी जास्तच जास्त जवळ जाऊन वाचील त्याला सर्वात कमी दिसतं असं समजावयास हरकत नाही. इतर दोघांना पैज हारणाराने पोटभर पंचपक्वान्नांच



"जेवण वाढायचं!" सर्वांत धाकटा म्हणाला.

दोघांथोरल्यांनी त्या गोष्टीस होकार दिला. धाकटे दोघे आपापल्या घरी गेल्यावर थोरल्याला काही सुचेना. कारण लिहिलेले नाकाजवळून पाहिल्याशिवाय त्याला वाचतां येत नव्हते.

बराच वेळ ही समस्या डोक्यात घोळत राहिल्यावर त्याच्या डोक्यात एकदम प्रकाश पडल्यासारखा एक विचार आला. धर्मशाळेत काम करणारा कारकून आहेच. त्याला विचारले तर पाटीवर काय लिहिले आहे ते तो सांगेल. तो विचार मनात येतांच थोरला निघाला व धर्मशाळेत पोंचला.

"कोठल्या तरी कामासाठी आलेले दिसतां आहां?" कारकुनाने विचारले.

"तुम्ही धर्मशाळेची पाटी उद्यां बसविणार आहांत, म्हणे! पाटीवर काय लिहिलं आहे!" थोरल्याने विचारले.

"तसं काही नाही हो! फक्त "श्रीराम-कृपा" म्हणून लिहवलं आहे!" कारकून म्हणाला.

थोरल्याला परमानंद झाला व तो कारकुनाचे आभार मानून घरी जायला निघाला. धर्मशाळेच्या दारातच समोरून दुसरा येत होता. परंतु दोघांचे डोळे अधू म्हणून परस्परांना कळलं नाही.

थोरल्याच्या मनात जो विचार आला होता तोच मधल्याच्या मनांतही आला होता. त्याने सुद्धा धर्मशाळेच्या कारकुनाला जाऊन थोरल्याने विचारले तसेच पाटीवर काय लिहिले असल्याचे विचारले.

प्रत्येक जण तोच तोच प्रश्न विचारीत असलेला पाहून कारकुनाने थोरल्याला जे उत्तर दिले होते तेच दिले. परंतु मधल्याचे तेवढ्यावर समाधान झाले नाही. म्हणून त्याने विचारले—"पण काय हो, पाटी कोणत्या रंगाची आहे, आणि तिच्या वरची अक्षरे कोणात्या रंगाची आहेत?"

"पांढऱ्या संगमरमरी दगडावर सोनेरी अक्षरे कोरलेली आहेत." कारकून म्हणाला.






मधला निघून गेल्यावर काही वेळाने सर्वांत धाकटा आला. त्याने थोरल्याने विचारल्या सारखेंच विचारले व कारकुनाने तसेच उत्तरही दिले.

"परंतु "श्री रामकृपा" हे लिहिणाऱ्या दानकर्त्याने आपलं नाव छोट्या अक्षरांत लिहिलेच असेल की?" सर्वांत धाकट्याने विचारले.

"छोट्या अक्षरात 'अमका अमका' असे लिहिले आहे. ते कोणत्या रंगात लिहिलं आहे, तुम्ही विचाराल, तर लाल रंगात!" स्मित करीत कारकून म्हणाला.

तिघे भाऊ "मी जिंकलो! मी जिंकलो!" असे मनात म्हणत रात्री छान झोपले. उजाडतांच सर्व थोरल्याच्या घरी जमले. पाटीवर काय लिहिलं आहे हे वाचून दाखविण्याची घाई तिघांनाही होती. म्हणून वेळ न घालविता तिघे निघालेच. थोरला एकाएकी थांबला व धर्मशाळेकडे पहात म्हणाला—"आतां आणखी पुढे जायची गरज काय? पाटीवरची अक्षरे येथूनच दिसत आहेत! वाचू का, "श्रीरामकृपा!"

ते ऐकून धाकटे दोघे चकितच झाले. क्षणभरच 'हारलो' असे वाटून भ्याले. तरी मधला स्वतःला सावरून विचारू लागला—"पाटी कोणत्या रंगाची आहे आणि अक्षरे कोणत्या रंगाची रे?"

थोरल्याला खड्डयात पाय पडल्यासारखं वाटलं. म्हणाला—"रंग? तुला दिसतोय वाटतं रंग?" त्याने मधल्याला विचारले.

"रंग कां नाही दिसत? पांढऱ्या शुभ्र संगमरमरी दगडावर सोनेरी अक्षरे कोरलेली नाही का दिसत?" मधल्याने विचारले.

तुम्ही दोघं उगाच कां भांडतां आहां? त्या पाटीवर लहान अक्षरांत लिहिलं आहे ते वाचतां येते का पहा जरा?" धाकटा म्हणाला.

"पाटीवर छोटी अक्षरे सुद्धा आहेत वाटते?" थोरल्या दोघांनी विचारले.

"दिसत आहेत तर! लाल अक्षरात "अमका अमका" असं स्पष्ट लिहिलं आहे. तुमच्या दोघांच्याहून माझेच डोळे बरे आहेत म्हणावयाचे!" सर्वात धाकटा म्हणाला.

थोरला, तो जिकणाऱ्याच्या बाजूचाच आहे हे दर्शविण्या साठी म्हणाला–"तुझी दृष्टीच आपल्या तिघांत चांगली आहे! त्यानंतर माझा नंबर. मी मोठमोठी अक्षरे ओळखली नाही का! तुम्ही दोघं आणखी पुढेपुढे जात होतां, मी येथेच थांबलो, नाही का? म्हणून तुला व मला मधल्याने जेवा-यला वाढलं पाहिजे!"

मधल्याने आपला विरोध दर्शवून म्हटले– "फळीचा रंग अक्षरांचा रंग सुद्धा न कळ-णाराला जिकला, कसे म्हणतां येईल?"

तिघांचा वादविवाद बराच वेळ झाल्या-वर तिऱ्हाइताकडून निवाडा करून घ्यायला तिघांनी मान्य केले. तेवढ्यात धर्मशाळेचा कारकूनच तिकडे आला. थोरला त्याला म्हणाला–"तुम्ही कोण, माहीत नाही, तुम्हीच काय तो निवाडा द्या! या धर्म-शाळेच्या पाटीवर "श्रीराम कृपा" लिहिलं आहे हे, खोटं आहे का?"

"नाही." कारकून म्हणाला.

"फळी पांढऱ्या संगमरमरी दगडाची आणि अक्षरं सोनेरी रंगाची आहेत की नाहीत?" मधल्याने विचारले.

"होय" म्हणाला कारकून.

"छोट्या लाल अक्षरांनी "अमुका" असं लिहिलं आहे की नाही?" सर्वांत धाकट्याने विचारलं.

"होय!" म्हणाला कारकून

पुन्हा तिघे "माझी नजर चांगली!" म्हणून भांडू लागले.

कारकुनाने त्या सर्वांना गप्प रहायला सांगून म्हटले–"कोणाची दृष्टी चांगली आणि कोणाची वाईट हे मी नाही सांगत, सर्वांची नजर सारखीच अधू आहे. कारण धर्मशाळेच्या दारावर अजून पाटी बस-विलेलीच नाही!" असे सांगून तो तेथून निघून गेला.





# सामंत राजा

कोशल साम्राज्याचा अधिपती राज्यवर्द्धन राज्य करीत असतां त्याच्या अधीन अनेक सामंत राज्ये होती. अशा राज्यांपैकी विंध्य पर्वताच्या परिसरात रत्नगिरी नावाचे एक राज्य होते. तेथे आनंद नावाचा सामंत राजा राज्य करीत असे.

या सामंत राजाचा स्वभाव थोडा विचि-त्रच होता. राज्य कारभारांत काही प्रश्न उपस्थित झाला की तो घाईघाईत काही तरी निर्णय करून परिणामी संकटांत सांपडे.

एकदा आनंदला वाटले की त्याच्या प्रधा-नाला राज्य कारभाराच्या बाबतीत सल्ला द्यायला काही असणे बरोबर होईल. त्या-प्रमाणे त्याने ती गोष्ट प्रधानाला सांगितली. प्रधानाला राजाचा तऱ्हेवाईक स्वभाव चांगला माहीत असल्यामुळे होकार देण्या व्यतिरिक्त काही सुचले नाही.

राजाने प्रथम दोन सल्लागार नेमले आणि एक महिना लोटायच्या आंत त्यांची संख्या पंधरा पर्यंत गेली. दुसरा महिना पुरा व्हायच्या आंतच प्रधान सहज बोलतां बोलतां म्हणाला–"महाराज इतके सल्ला-गार आपण नेमले आहेत की कोणाचा सल्ला मानावयाचा हेच मला कळेनासे झाले आहे. शिवाय त्यांच्या पगारासाठी खजि-न्यातले किती पैसे खर्च होत आहेत!"

लगेच राजाने सर्व सल्लागारांना बोला-विले आणि त्यांचा हुद्दा कमी करून त्यांना बिन पगारी मानसेवी सल्लागार म्हणून राजधानीच्या एकेका पेठेत नेमले. त्यांच्या मदतीने प्रजेच्या गरजा कळतील व खोटी न करतां त्या दूर करतां येतील.

एके दिवशी बाजार पेठेतला सल्लागार राजाच्या दर्शनाला येऊन म्हणाला–"महा-राज, व्यापाऱ्यांना सोयीचं होईल असे



बाजारपेठेत एकही देऊळ नाही. असे ऐक देऊळ बांधणं फार आवश्यक आहे. परंतु प्रधानाने खजिनांत पैसे फार कमी असल्याचे सांगितले.

राजा त्या सल्लागाराला म्हणाला–"प्रस्तुत परिस्थितीत बाजार पेठेतील व्यापारी वर्गाला सांगा की आठवड्यातून एक दिवस एकेक व्यापाऱ्याने पूजा करावी. तशी पुजा करण्यास एकेक दिवस वांटून देण्यास मी पुजाऱ्याकडे निरोप पाठवितो."

एक आठवडा जमतेम लोटला असेल सुतार, सोनार लोहार वगैरे धंदे करणारे त्यांना सुद्धा देवळात पूजा करायला एकेक दिवस वांटून द्यायला विनंती करू लागले. त्यांनी आपल्या पेठेतल्या सल्लागारा तर्फे राजाकडे आपले गाऱ्हाणे पोचते केले. एका आठवड्यात सातच वार असल्या कारणाने या सर्वांना त्यांच्या नावे एकेक वार ठरवून देणे कसे शक्य होईल ? मंत्र्याने शंका केली.

परंतु राजाने आपल्या प्रधानाला भोळा सांब समजून रागाने म्हटले–"प्रजेची इच्छा पूर्ण न करतां तुच्छतेने त्यांच्याशी बोलणे शहाणपणाचे नाही !"

मंत्री थक्क होऊन म्हणाला–"महाराज, पण आठवड्यात सातच वार असतात !"

"ते मला माहीत नाही, असे वाटले का तुम्हांला ? यापुढे दर आठवड्यांत दहा वार राहतील !" राजा म्हणाला.

"आपली मर्जी. महाराज ! परंतु आठवड्यांतील सातच वारांना नावे आहेत. बाकीतीन दिवसांना काय म्हणावयाचे ?" प्रधानाने विचारले.

"ही काय मोठी समस्या झाली का ? एका वाराला चक्रवर्तीचे नाव द्यायचं दुसऱ्या एकाला माझं नाव द्या आणि तिसऱ्या वाराला तुमचं नाव द्या !" राजा म्हणाला.

यापुढे एका आठवड्यात दहा दिवस राहतील, ही बातमी राजधानीभर पसरली. ते ऐकून कुबेरासारखा गर्भ श्रीमंत म्हणून प्रसिद्ध असलेला व्यापारी राजाकडे येऊन म्हणाला–"प्रभो, धर्मकार्यासाठी आपल्याला पैशाची गरज असल्याचे व तेवढे पैसे खजिन्यात नसल्याचे कळले. म्हणून आपल्या सेवेशी एक लक्ष वराह सुवर्णमुद्रा खजिन्यात पाठवीत आहे. आठवड्यात दहा ऐवजी अकरा दिवस असल्याचे जाहीर करून अकराव्या दिवसाला माझे नाव देण्याची कृपा करावी."

ते ऐकून राजाने खूप होऊन आठवड्यात अकरा दिवस राहतील असे जाहीर करून त्या वाराचे नाव वराह शेट्टी ठेवले. प्रजेला हे सर्व पोरकट पणासारखे वाटले. सामंत राजांना हे सर्व कळले व त्यांनी रत्नगिरीचे राज्य बळकावण्यासाठी कट केला.

या सर्व गोष्टी हेरांकरवी राज्यवर्द्धन चक्रवर्तीला कळल्या. त्याने विचार केला की सामंत राज्यांमध्ये आपसांत भांडणे झाली तर सर्व साम्राज्यावरच संकट येईल असा विचार करून त्या सर्वांना राजधानीत बोलावून घेतले.

राज्यवर्द्धन चक्रवर्तीने दरबार भरवून रत्नगिरी राज्याचा सामंत राज्यकारभारात किती दक्ष आहे हे सांगून म्हणाला–"याच्या सारखा आपल्याला सल्लागार मिळाला तर साम्राज्याचं किती हित होईल ? म्हणून मी या सामंत राजाला आपला सल्लागार म्हणून नेमतो."

राज्यवर्द्धन म्हणाला ते ऐकून एका आनंद सामंताशिवायबाकीसर्व चकित झाले. राजाने तत्काळ आनंद चा मुलगा सत्यदेव याला रत्नगिरी राज्याचा सामंत राजा म्हणून नेमले.

सर्व सामंत राजे निघून गेल्यावर राज्यवर्द्धन चक्रवर्तीने सत्यदेवला निरोप देतांना म्हणाला–"तुला मी सिंहासनावर कां बसविले हे तुला कळालेच असेल. तुझ्या वडिलांच्या सल्लयाची मला तशी काहीच गरज नाही. त्यांच्या सल्ल्यामुळे तुला राज्यकारभार करण्यात कठीण जाऊ नये म्हणून त्यांना मी आपल्या दरबारात स्थान देऊ केले आहे !"

सत्यदेवने चक्रवर्तीचे आभार मानून रत्नगिरीला गेला अनुभवी प्रधानाच्या सल्ल्याप्रमाणे राज्य करू लागला योग्य सामंत राजा म्हणून त्याचा नावलौकिक झाला.












# मंद बुद्धि

गणपतरावांना नोकराशिवाय पांच मिनिट सुद्धा निश्चितपणे रहाणे शक्य नव्हते. त्यांचा देहच अगडबंब. हातातून काही निसटून जमिनीवर पडले की वाकून ते उचलायचे म्हणजे त्यांना स्वर्ग आठवे. घरची भरपूर श्रीमंती असल्या कारणाने त्यांना नित्य एक नोकर ठेवणे त्यांना अशक्य नव्हते. मोठा देह आणि खूप पैसे यांच्या बरोबर गणपतरावांना रागही तितकाच जास्त दिवसाच्या वर कोणताही नोकर टिकत नसे. तो एक महिना सुद्धा टिके तो एवढ्यासाठी की महिना संपल्याशिवाय पगार मिळणे शक्य नव्हते. पैश्याकरतांतर रहाणे भाग होते.

म्हणून गणपतराव अगदी कंटाळून गेले त्यांनी नोकर ठेवतांना त्याच्या कडून कबूल करून घ्यायचे ठरविले की लागोपाठ सहा महिने खाडा केल्याशिवाय काम केले तरच सहा महिन्यांच्या शेवटी पगार दिला जाईल. म्हणून नोकर मिळणेच कठीण होऊ लागले. अशा परिस्थितीत मंद बुद्धी त्यांच्याकडे कामाला लागला. तो अतिशय बावळट गबाळा होता.

मंदबुद्धीला त्याचा म्हणण्या लायक कोणी नातेवाईकच नव्हता. त्याच्या डोक्यांत ब्रह्मदेवाने बुद्धी नावाची वस्तु घातलीच नव्हती. त्याला कधी राग येतच नसे. गणपतराव सांगत तसे तो डोळे, मिटून काम करी. कित्येक दिवसांनी गणपतरावांना मनासारखा हा नोकर मिळाला होता.

एके दिवशी रात्री गणपतराव आपल्या झोपायच्या खोलीत झोपले असतां त्यांना माज घरांतला दिवा मालवला नाही वाटत अशी शंका आली. त्यांनी मंदबुद्धीला माजघरांतला दिवा मालवून यायला सांगितले. मंदबुद्धी दिवा मालवायला गेला. तोंपर्यंत तेवत असलेला दिवा मंदबुद्धीच्या दुर्दैवाने वाऱ्याने त्या पूर्वीच विझला होता. म्हणून तो परत पेटवण्याकरीता काडेपेटी नाही म्हणून.

मालकाने दिवा मालवायला सांगितला होता ना! त्यांनी म्हटलेले काम डोळे मिटून करावयाचे! असा विचार करून मंदबुद्धी शेजारच्या घरी काड्याची पेटी मागायला गेला.

शेजाऱ्याने विचारले—"तुमच्या घरात काड्याची पेटी नाही का रे?"

"कोठे आहे, कोणास ठाऊक, काळोखांत दिसली नाही." मंदबुद्धी म्हणाला.

"आमच्या घरात एकच पेटी आहे. रात्री अपरात्री लागेल. म्हणून मी तुझ्या बरोबर येतो, चल." म्हणत शेजारी गणपतरावांच्या घरी आला.

मंदबुद्धीने दिवा लावला व लगेच मालवून टाकला आणि शेजाऱ्याची काड्याची पेटी देत म्हणाला—"आतां तुम्ही गेलात तरी चालेल."

शेजारी आश्चर्यचकित होऊन म्हणाला—"कायरे, तुला दिवा मालवायचाच होता तर तू लावलासच कशाला?"

"अहो, मालकांनी दिवा मालवायला सांगितला होता. मी मालवायच्या आतच तो विझला होता म्हणून पुन्हां लावून माल विला." मंद बुद्धि म्हणाला.



ते उत्तर ऐकून शेजारी गणपतरावांना जाऊन भेटले व घडलेला वृत्तांत सांगितला व म्हणाला—"तुझा हा नोकर सांगकाम्या आहे. तू सांगितलस तसं डोळे मिटून करतो. मूर्ख आहे! स्वतःचं डोकं वापरत नाही! याला थोडं शिकविलंस नाही तर कधी एकाएकी फार मोठं नुकसान होण्याची शक्यता आहे." असे सांगून त्याने गणपतरावांना पंचतंत्रातल्या दोन गोष्टी सांगितल्या.

त्या ऐकून गणपतराव घाबरूनच गेले. परंतु मंदबुद्धी सारख्या नम्र गुणी नोकराला घालवून बसणं गणपतरावांना आवडलं नाही. त्यांनी पुष्कळ विचार करून दुसऱ्याच दिवशी गांवातल्या शाळा मास्तरांना बोला-

वून मंदबुद्धीला दररोज शिकवायला सांगितले.

मास्तर फार चांगले गृहस्थ होते. ते दररोज येऊन मंदबुद्धीला खूप लक्ष देऊन शिकवीत. त्याला कसे सांगितलं तर कळेले याचा खूप विचार करून शिकवीत. त्याला कसे सांगितलं तर कळेले याचा खूप विचार करून शिकवीत. एका महिन्याच्या आंत मंद बुद्धीचा विकास होऊ लागला.

मंदबुद्धीत घडून आलेला बदल पाहून मास्तर गणपतरावांना भेटून म्हणाले– "त्याला कसे शिकवायचे याचा नीट विचार करून कोणी आजपर्यंत त्याला शिकविलेच नव्हते. तसा तो फार हुशार व समजूतदार आहे!"

गणपतरावांनी मंदबुद्धीच्या हुशारीची परीक्षा घेऊन पाहिली व त्याच्यात बदल झाल्याची त्यांची खात्री झाली. त्यांनी शाळामास्तरांना योग्य इनाम निरोप दिला.

त्याच्या दुसऱ्या दिवसापासून मंदबुद्धीने गणपतराव सांगत ते. काम जसेच्या तसे करायचे सोडून दिले. प्रत्येक कामातल्या साधकबाधक गोष्टींचा विचार करून, हे काम करणे चूक, हे काम करणे बरोबर असा गणपतरावांना उपदेश करू लागला.

गणपतरावांना परिस्थिती पुन्हा मूळ पदावर आल्या सारखे वाटले. त्यांना मूळ रागच जास्त! ते त्याला म्हणाले–"तू लहानसान कामांत आपलं डोकं हवं तेवढं वापर. परंतु इतर बाबतीत मी सांगतो तसे करीत जा."

"म्हणजे काय हो! तुम्ही चूक करीत असलांत तर ती मला नाही खपणार. ती चूक म्हणून मी सांगून टाकणार तुमच्याच हितासाठी!" मंदबुद्धी म्हणाला.

"अस्सं, तर मग आत्तापासून तुला नोकरीवरून कमी करतो. चालता हो!" गणपतराव म्हणाले.

"नाही, मला तुमच्या बरोबर राहणंच बरं वाटतं. मी कोठेही जाणार नाही!" मंदबुद्धी म्हणाला.

दोघे गावातल्या न्यायाधिशाकडे गेले आणि घडले ते त्याला सांगितले.

मंदबुद्धी म्हणाला–"पहा हो! ह्यांनी मला चांगलं शिकविलं आणि माझी बुद्धी तल्लख व्हावी, या साठी एवढे श्रम केले. पण त्याचा फायदा काय? माझ्या त्या बुद्धीचा त्यांनाच उपयोग झाला आणि ते मला नोकरीवरून काढून टाकीत आहेत! मला येथून काढून टाकलं तर मला कोण काम देणार हो?"

"गणपतराव म्हणाले तसे तू वागला असतास तर ही सर्व भानगड झालीच नसती!" न्यायाधीश म्हणाला.

"थोडी बुद्धी असलेला कोणीही असो, ते म्हणतात तसे अक्षरअक्षर करावयाचं असेल तर मला पुन्हां मंदबुद्धी करा, म्हणावं!" मंदबुद्धी म्हणाला.





गणपतराव राग अनावर आल्याने ओरडले– "मूर्खा, तुला बुद्धीमान करणाऱ्या शाळामास्तराला बोलवून तुला पुन्हां मंदबुद्धी करून टाका, म्हणून सांगू का ?"

मंदबुद्धी न्यायाधिशाला म्हणाला– "ऐकलंत का हो! हे काय म्हणत आहेत ते! आता मला ज्या गुरुवर्यांनी शिकवून तयार केले ते माझ्या डोक्यातून बुद्धी कशी काढून टाकणार हो ? हे असंच काहीतरी बोलत राहतात!"

न्यायाधीश लगेच म्हणाला– "गणपतराव, तुमचा हा नोकर तुमची सर्व कामे करायलाच नव्हे तर तुम्हांला वेळोवेळी सल्ला द्यायला सुद्धा उपयोगी पडेल. त्याला कामावरून तुम्हांला काढता येणार नाही ! तसे करावयाचेंच झाले तर त्याला कोठे तरी कामावर लावून द्या !"

ते ऐकून गणपतराव हतबुद्ध होऊन किंकर्तव्यविमूढ झाल्या सारखे न्यायाधिशाच्या तोंडाकडे पाहू लागले. तेव्हां न्यायाधीश स्मित करून म्हणाला– "गणपतराव, इतकं मनाला लावून घेऊ नका. हुशारी, नम्रपण असले गुण असलेल्या याला मंदबुद्धी म्हणून सांगणारा म्हणून तुमच्याकडे याला पाठविणारा मीच! तुम्ही गावातले एक प्रतिष्ठत गृहस्थ आहां ! तुम्हांला फक्त भयंकर राग येतो. बाकी सर्व तुमच्यात चांगलं आहे. नोकरांच्या बाबतीत तुम्हांला इतका जो त्रास होतो त्यांतून तुम्हांला मुक्त करण्यासाठी चांगला नोकर शोधून देण्याची जबाबदारी मी आपल्यावर घेतली."

"अस्सं! मग इतका वेळ का नाही सांगितलंत ? असं म्हणत गणपतराव मंदबुद्धीकडे वळून म्हणाले– "कायरे तु मंदबुद्धीचे किती छान सोंग केले होते मरे ! झालं गेलं होऊन गेलं! माझ्या सारखा तुला मालक मिळाला व तुझ्या सारखा हुशार मला नोकर मिळाला, हे दोघांचं सुदैवच म्हणावयाचं !"




विष्णू जयविजयांना म्हणाला– "ऋषीमुनींचा शाप अमोघ असतो. माझ्याशी मित्रभावाने राहून सात जन्मांनंतर तुमचा उद्धार होईल. नाहीतर शत्रुत्वाने वागून तीन जन्मातच माझ्या हातून तुम्हांला मुक्ती मिळेल. तुम्ही तुम्हांला काय पाहिजे ते सांगा.

जयविजयांनी परत विष्णूच्या सेवेला लवकर हजर व्हायला यावे, म्हणून तीन जन्मातच उद्धार व्हावा असे इच्छिले.

तेव्हां सनकसनंदादी मुनी जयविजय दोघे शहाणे असल्याचे ओळखून विष्णूला म्हणाले– "तुला रागद्वेष हे सारखेच वाटतात. तुझ्यापाशी शत्रुत्व ठेवणारे जास्त लवकर तुझ्यापाशी येतात, हे आम्हांला आतांच कळले! तुझ्या द्वारपालकांवर राग दर्शवून आम्ही जी घाई केली त्याबद्दल लाज वाटते. आम्हांला क्षमा करा." असे सांगून लक्ष्मीनारायणांचे अनेक प्रकारे स्तोत्र गात निघून गेले.

जयविजय हे कश्यप प्रजापतीची पत्नी दिती हिच्या पोटी हिरण्यकश्यप आणि हिरण्याक्ष या नामे जन्मले. दितीची मुलं म्हणून दैत्य म्हणजे राक्षस होऊन जन्माला आले.

दोघे भाऊ फार शूर व पराक्रमी निघाले. दोघांनी ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या केली आणि मोठमोठे वर प्राप्त केले आणि विष्णूचे वैरी म्हणून प्रसिद्ध झाले. हिरण्यकश्यप राक्षसांचा राजा झाला.

५. वराहवतार व नरसिंहावतार



त्याने विष्णूवर विजय मिळविण्याची प्रतिज्ञा केली.

हिरण्याक्षने विष्णूला चीड यावी यासाठी घोर कृत्ये करून भूमीला गणंगळत नेऊन रसातल समुद्रात ढकलले. भूमी रसातलाच्या बुडापर्यंत जाऊन बुडली. भूदेवीने विष्णूचे स्मरण करून तिचा उद्धार करायला त्याची करुणा भाकली.

विष्णूला भूदेवीची कीव आली व त्याने दशावतारापैकी तिसरा अवतार वराहावतार धारण केला.

ब्रह्मदेव यज्ञ करीत असतां यज्ञकुंडातून शुभ्र कांती असलेली एक ठिणगी उडाली. त्या ठिणगीला मोठी होत होत गेल्यावर एका रानडुकराचे रूप आले. त्या डुकराला विष्णूचा अवतार मानून ब्रह्मादी देव यज्ञ-वराह, श्वेत वराह, आदि वराह या नावे त्याची स्तुती करू लागले.

तो यज्ञ वराह वाढत वाढत ब्रह्मांडा एवढा वाढला. त्याचे चारही पाय बळकट होते. त्याची कातडी पोलादी कवचा सारखी टणक आणि त्याला वज्रासारखे लांब व बळकट सुळे होते. त्याचे डोळे लाल अग्नी सारखे होते. मानेपासून शेपटापर्यंत उभे बोचणारे सोनेरी रंगाचे केस होते. असा तो वराह हुंकारल्या बरोबर सर्व विश्व हादरले. यज्ञवराहाच्या नाकावर खड्गासारखे शिंग तळपत होते.

वराहावतार विद्युतवेगाने रसातलाकडे पळत गेला. त्या वेगामुळे सर्व दिशा दचकल्या प्रलयकाळांतला वायू सुरू झाला.

रसातल समुद्रांत बुडी मारून जाऊन खाली बुडाला बुडून गेलेली पृथ्वी आपल्या शिंगावर उचलून घेतली.

त्याच वेळी हिरण्याक्षाने वरुणावर स्वारी करून त्याला युद्धाला आह्वान केले.

वरुण त्याला म्हणाला–"अरे वेड्या, तुला युद्ध करावयाचेच असेल तर रसातळाला जाऊन भूमीचा उद्धार करण्यासाठी गेलेल्या यज्ञवराहाशी कर!" हिरण्याक्ष लगेच फिरला आणि त्वेषाने जाऊन





वराहावताराला त्याने टक्कर दिली. विराट रूपात असलेल्या विष्णूशी हिरण्याक्ष मोठ्या शौर्याने लढला. आपली गदा विष्णूच्या गदेवर जोराने हाणून ती पाडली व मोठा पराक्रम केल्या सारखा पहात उभा राहिला. विष्णूने त्याच्या शौर्याची स्तुती केली आणि पुन्हां गदा धारण केली. दोघांचे घोर गदायुद्ध झाले. शेवटी वराहावताराने आपले शिंग हिरण्याक्षाच्या पोटात खुपसून त्याला ठार केले.

वराहावतार धारण केलेल्या विष्णूचे भूदेवीने वरण केले. वराहमूर्तीने भूदेवीला उचलून घेऊन मांडीवर घेतले. ब्रह्मदेवादी देवांनी पुष्पवृष्टी करून जगपती विष्णूची अनेक प्रकारे स्तुती केली.

डुक्कराचे रूप घेऊन आपल्या धाकट्या भावाचा वध करणाऱ्या विष्णूवर सूड उगवण्याचे ठरवून प्रथम ब्रह्मदेवाकडून वरप्राप्ती करून घेण्यासाठी निघून गेला. त्यावेळी त्याची राणी लीलावती ही गरोदर होती.

तिच्या गर्भातील शिशूचा वध करण्यासाठी इंद्र माया करून तिच्याकडे जात असतां आकाशमार्गे नारद त्याला वाटेत भेटला आणि म्हणाला–"इंद्रा! तू हे काय काम करायचे डोक्यात घेतले आहेस? तू हा प्रयत्न सोड. सर्वदा आणि सर्व परिस्थितीत हिरण्यकश्यप सूड भावनने विष्णू विषयी विचार करीत असल्या कारणाने लीलावतीच्या पोटात जो बालक आहे, त्याच्या मनात विष्णुभक्ती निर्माण झाली आहे. विष्णूची लीला अशी अगाध आहे. लीलावतीच्या पोटी एक घोर विष्णुभक्त जन्माला येणार आहे. म्हणून तिच्या वाटेस जाऊ नकोस आणि आल्या वाटेने परत जा." असे इंद्राला सांगून नारद लीलावतीला आपल्या आश्रमात घेऊन गेला.

आश्रमात नारद वेदांताविषयी बोले व विष्णूची लीला वर्णन करून सांगे तेव्हां लीलावतीच्या पोटांतील शिशू लक्ष देऊन सर्व ऐके आणि 'हो' कार ही देई!



लीलावती बाळंत होऊन तिला मुलगा झाला.

हिरण्यकश्यपने घोर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न केले आणि त्याच्याकडून एक फार मोठा वर प्राप्त केला. भूमीवर आकाशांत, रात्री किंवा दिवसां, घरांत किंवा घरा बाहेर, प्राण्याच्या हातून अगर माणसाच्या हातून किंवा देववगैरे स्वर्गातील निवासियांच्या हातून जीवकोटि किंवा जडपदार्थांच्या मुळे, या सृष्टीत जे काही आहे, त्यांच्यापैकी कोणाच्याही मुळे आपणांस मरण येणार नाही असा अमोघ वर प्राप्त केला. ब्रह्मदेवाने त्याने जोजो वर मागितला सर्व ऐकून "तथास्तु!" म्हणाला.

वरप्राप्ती झाल्यानंतर गर्वाने हिरण्यकश्यप नारदाच्या तोंडून मध्यंतरी ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या ऐकून हिरण्यकश्यप नारदाच्या आश्रमात गेला. त्याने मोठ्या उत्साहाने मुलाचे बारसे करून मुलाचे नाव प्रह्लाद असे ठेवले. नंतर त्याला त्याच्या आईला थाटामाटाने वाजत गाजत राजवाड्यात घेऊन गेला.

हिरण्यकश्यपूने इंद्राचा पराभव करण्याचे ठरवून स्वर्गावर स्वारी केली आणि इंद्राचे आसन बळकाविले. सर्व दिक्पालांना त्याने जिंकले. देवांना ढोरांसारखे बडवून काढले. शचीचा अपमान करायला गेला तेव्हां लीलावती आडवी उभी राहिली. हिरण्यकश्यपूने गर्वांध होऊन मुनींच्या आश्रमांना आगीलावल्या. ज्यांचा ज्यांचा विष्णूवर विश्वास होता त्यांची कत्तल केली. विष्णूचा विरोध करणे हेंच त्याच्या आयुष्याचे एकमात्र ध्येय होते. विष्णूला चीड येण्यासाठी जे काही करणे शक्य होते ते सर्व त्याने केले. तरी विष्णू त्याच्या वाटेला गेला नाही. हिरण्यकश्यपूने वैकुंठावर स्वारी केली. परंतु तेथे त्याला विष्णू दिसला

"मला भिऊन पळून गेला, भितरा!" असे म्हणत हिरण्यकश्यपु परत फिरला.

प्रल्हाद दिवसे दिवस जसा वाढत गेला तसतसा विष्णूच्या नामाचा जप अधिकाधिक करू लागला. असा कुलद्रोही आपल्या वंशात कां जन्मावा? हीच चिंता हिरण्यकश्यपूला सतावू लागली. त्याने आपले गुरू पुत्र चंडामार्कांना प्रल्हादकडे लक्ष द्यायला सांगून त्याला विद्याध्ययन करायला लावायला सांगितले.

प्रल्हादने गुरुकुलात रहात असतां हरिध्यान करीत असतांच सर्व अध्ययन संपविले आपल्या सह पाठी मुलांना विष्णु भक्तीचा उपदेश करून त्यांना मोक्ष प्राप्तीच्या मार्गाला लावले.

चंडामार्क प्रल्हादला त्याच्या वडिलांकडे घेऊन गेले. हिरण्यकश्यपूने मुलाला मांडीवर घेतले व म्हणाला—"बाळारे, तू जे अध्ययन आजपर्यंत ते तुला कितपत कळले हे कळावे म्हणून तू एखाद पद म्हण पाहूं!"

प्रल्हाद म्हणाला—"बाबा, गुरुजींनी मला जे काही शिकविले ते मी लवकरच शिकलो. सर्व विद्यांत श्रेष्ठ विद्या म्हणजे विष्णूच्या चरणी एक चित्ताने मन लावणे होय! विष्णूचे स्मरण ज्या जन्मात होते तोच खरा जन्म!"

हिरण्यकश्यपूने मुलाला मांडीवरून खाली ढकलले आणि रागाने चंडमार्कांना म्हणाला—"हेच का तुम्ही याला शिकविलेत?"



चंडामार्क दोघे थर थर कांपत म्हणाले—"आमची चूक काहीच नाही. आमच्यावर रागावू नका!" या शब्दात विनंती करून प्रह्लाद गुरुकुलात राहून काय करीत होता व तो कसा वागला, सविस्तर वर्णन करून सांगितले. हिरण्यकश्यपू मुलाला म्हणाला—"त्या विष्णूने डुकराचे रूप घेऊन तुझ्या चुला त्याला ठार केले. तो आपल्या राक्षस जातीचा हाडवैरी आहे. तू त्या विष्णूची स्तुती गाणे हा अक्षम्य कुलद्रोहाचा अपराध आहे. तू हा विष्णु भक्तीचा नाद सोड त्याला विसर."

"तू दानवेश्वर आहेस, मला शिक्षा करणेच तुला योग्य आहे. परंतु



लोखंडाचा तुकडा लोहचुंबका जसा चिकटतो तसेच माझे मन विष्णुचरणी लीन झाले आहे. मकरंद जसा मंदार पुष्पाला चिकटल्यावर सोडीत नाही, तसेच विष्णूचे विस्मरण मला शक्य नाही. माझ्या जिवात्जीव असे पर्यंत विष्णु नाम स्मरण जाणे शक्य नाही. हा जीव सुद्धा त्या विष्णूचाच आहे.

अजून नाकसुद्धां सरळ दिसत नसलेला बालक प्रल्हाद म्हणाला ते ऐकून चिडून जाऊन हिरण्यकश्यप संतापून म्हणाला– "तर मग तुला मरण निश्चित समज! तुला आहार, जल प्राशन काही मिळू न देतां तू उपाशी व तहानेला मर!" असे म्हणत प्रल्हादाला त्याने अंधार कोठडीत टाकले.

पुत्रप्रेमाने लीलावतीला प्रल्हादाचे ते हाल पाहवले नाहीत. दिवसामागून दिवस जात होते.

लीलावतीचा शोक न पाहवल्यामुळे हिरण्यकश्यपने तुरुंगाचे दार उघडवले आणि हरिभजनात तल्लीन झालेल्या प्रल्हादाला पाहिले. इतके दिवस अन्नपाण्या वाचून राहूनही तो कसा जिवंत राहिला असे आश्चर्य चकित होऊन पाहू लागला. त्याला भयंकर राग आला व त्याने प्रल्हादाला हत्तीच्या पायाखाली तुडवायला सांगितले.

हत्ती सिंहाला पाहून जसे भितात तसे प्रल्हादाला पाहून भ्याले. माहूतांनी अंकुश मारून त्यांना चालवले. म्हणून प्रल्हादावरून ते चालून गेले तरी त्याच्या अंगाला थोडा देखील अपाय होऊ दिला नाही.

प्रल्हादावर साप सोडण्यात आले. परंतु ते वेटोळे करून व फडा काढून प्रल्हादावर त्यांनी जणूकाही छत्रच धरले.

हिरण्यकश्यपूने पर्वताच्या कड्यावरून प्रल्हादाचा कडेलोट करविला. त्याला आगीत टाकविले, समुद्रात टाकविले. त्याला कालकूट प्यायला लावले, हे सर्व करून ही प्रल्हाद सुरक्षितच असलेला पाहून हिरण्य-

कश्यप त्याला म्हणाला–"तू मरत नाहीस, ह्याचे गुपित काय, कळूदे तरी!"

प्रल्हाद हसत म्हणाला–"ह्यात गुपित असे काहीच नाही. हत्तींत, सांपांत, दगडा-धोंडयांत, अस्तीत समुद्रात, विषात, सर्वांत, तुमच्यात, माझ्यात विष्णू आहे, हे सत्य तुम्हांला दिसत नाही! तुम्ही मला ठार करणे आणि मी जिवंत राहणे, ही सर्व त्या नारायणाची लीलाच आहे, बाबा!"

ते ऐकून हिरण्यकश्यपला जास्तच राग आला. प्रल्हादाला फरफटत ओढत नेत त्याने आपली गदा हातात घेतली. लीलावती ते दृश्य पाहून मूर्च्छितच झाली. चारही बाजूला राक्षस थक्क व भयभीत होऊन निश्चेष्ट उभे होते.

सभा मंडपासमोर लोखंडाचा मोठा जयस्तंभ होता. हिरण्यकश्यपूने प्रल्हादाला तो लोहस्तंभ दाखवून विचारले–"कायरे, कुलद्रोही! तो माझा विजयस्तंभ आहे. माझ्या धाकटया भावाला ठार करणाऱ्या त्या विष्णूशी मी युद्ध करून मी त्याला तुझ्या समोरच ठार करतो व त्याच्यावर सूड उगवितो. त्यात आहे का तुझा तो विष्णू?"

"ती शंका करण्याचे कारणच नाही! तो सर्व व्यापी आहे. त्या खांबातही आहे!" प्रल्हाद म्हणाला.

हिरण्यकश्यपाने चरचरा जाऊन स्तंभावर गदाप्रहार केला. प्रलय काळातला भयंकर आवाज झाला. चतुर्दश भुवने हादरली. प्रलयकालातले भयंकर ढग गडगडू लागले. स्तंभ दुभंगला तेव्हां विजेच्या चक चकाटा पाठोपाठ दशावतारातीला चवथा नरसिंहावतार प्रगट झाला. त्याचे डोके सिंहाचे व देह माणसाचा होता. हाताला सिंहाची नखे होती व त्या पूर्वी सृष्टीत कधी दृष्टीस न पडलेले रूप घेऊन नरसिंहाने प्रलय भयंकर गर्जना केली. पांच जन्य शंखांचा ध्वनी झाला. त्याच्या चारी बाजूला सुदर्शन चक्र फिरत होते.





# अट्टल चोर

रुमानियाच्या राजधानीत एक अट्टल चोर रहात असे. तो एकदां एका खेडे गावात जात असतां त्याला आणखी एक चोर भेटला. तो खेडे गावांतला चोर चोरी करायलाच शहराकडे जात होता. परस्परांशी बोलतांना परस्परांची वृत्ती एकच असल्याचे दोघांना समजले.

शहरातला चोर खेडेगावातल्या चोराला म्हणाला–"पाहूया तुझी हुशारी. तू त्या समोरच्या झाडावर चढून कावळयाच्या घरटयांत जी अंडी आहेत ती उचलून घेऊन ये, कावळयाच्या नकळत." खेडेगावातल्या चोराने झाडावर चढून अंडी उचलून खिशात टाकली आणि झाडावरून उतरुन खाली आला. कावळयाला काहीच कळले नाही. खेडे गावातला चोर झाडावरून उतरल्यावर खिशांतून अंडी काढून दाखवू लागला. पण अंडी नव्हतीच. तेव्हां शहरांतील चोराने आपल्या खिशांतून ती काढून दाखविली. खेडे गावातील चोराने शहरांतील चोर मोठा असल्याचे काही बोलल्या शिवाय मान्य केले.

दोघांनी त्या रात्री राजाच्या खजिन्यांत चोरी करायचे ठरविले. रात्र पडल्यावर दोघे एका आडोशाच्या बाजूने राजवाडयाच्या छपरावर चढून गेले आणि छप्पराला कांचेचे एक तावदान होते त्यांतून शिरून राजवाडयातल्या सर्व खोल्या फिरून आले. शेवटी जेथे खजिना होता त्या खोलीत गेले. त्या खोलीत मोठमोठया पिपात सोन्याच्या मोहोरा भरून ठेवलेल्या होत्या.

मोठ्या चोराने धाकटया चोराला छपरावरच्या खिडकीतून दोरीसोडून खाली उतरविले. छोटया चोराने पिशवी भरून मोहोरा भरून घेतल्या व दोरीच्या सहाय्याने वर चढून गेला. नंतर दोघे राजवाडयातून

रुमानियातील लोककथा



पळून गेले. दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर राजा नित्याप्रमाणे आपला खजिना पहायला गेला आणि त्याला कोणीतरी आत येऊन गेल्याचा संशय आला. त्याने चवकशी केली–"आत कोण आलं होतं?"

पाहारेकरी म्हणाला–"कोणी नाही महा-राज!" राजा खजिन्यातून सरळ तुरुंगाकडे गेला आणि तेथे चोरी करून कैदेत पडलेल्या एका म्हाताऱ्या चोराला त्याने विचारले–"कोणी तरी माझ्या खजिन्यात शिरून दोन हजारावर मोहोरा चोरून नेल्या आहेत. भिंतीला कोठें भोंक वगैरे नाही!"

"भोंक कोठें तरी असणारच! तुम्ही नीट तपास करून नाही पाहिलात! तुम्ही खजिन्यात धूर करा व धूर कोठून बाहेर जातो, हे पहा."

राजाने तसे करून पाहिल्यावर छप्पराच्या एका तावदानांतून धूर बाहेर जात असल्याचे आढळले. ते कळतांच म्हातारा चोर म्हणाला–"तो चोर पुन्हा त्या तावदानाच्या वाटेनेच खजिन्यात चोरी करायला येईल. म्हणून त्या तावदानाची वाट बंद न करतां तावदानाच्या खाली मोठ्या पिंपात चिकट गुळाचा पाक भरून ठेवा. चोर सरळ त्याच्यात उतरेल व तुम्हांला सांपडेल."

म्हाताऱ्या चोराने सुचविल्या प्रमाण घडले. दोघे चोर मिळून त्या खजिन्याच्या छपरावरच्या तावदानाजवळ आले. त्या खजिन्यात पुष्कळ मोहोरा होत्या. राजाला चोरीचा सुगावा लागण्याच्या आत आणखी सोने चोरून न्यायचा त्यांचा विचार होता.

छोटा चोर दोरीला धरून खाली उतरला आणि सरळ गुळाच्या पाकात पडला.

"दादा! आपण फंसलो. मी हालचाल न करतां येण्याइतका कशात तरी अडकलो आहे. मला वर ओढणे तुला शक्य नाही. मी जिवंतपणें कोणाच्या हाती लागू नये, असं काही तरी विष मला देऊन तू निसटून जा! छोटा चोर मोठ्याला म्हणाला.

"छोटू! भिण्याचं कारण नाही. माझ्या जवळ मेल्यासारखं इतरांना वाटावं असे औषध आहे. ते तू गिळून टाक. उद्यां येऊन मी तुला वाचवितो." असे सांगून दोरीच्या आधारे खाली येऊन छोट्या चोराला काही तरी औषध देऊन निघून गेला.

दुसऱ्या दिवशी राजाने खजिन्यात येऊन पिंपात अडकलेल्या चोरास पाहिले. तो आनंदाने म्हणाला–"चोर सांपडला! तुझा शेवट आला, चोरा!" परंतु मेला अस-ल्याचे कळल्यावर राजाचा उत्साह थंड पडला.

"हे चोर मोठे वस्ताद दिसत आहेत!" म्हातारा चोर म्हणाला.

"म्हणजे एकाहून अधिक चोर आहेत, म्हणतोस का? याच्या शिवाय आणखी एकजण आहे का?" राजाने चकित होऊन विचारले.

"आणखी एक जण नसेल तर हा कसा मेला? कारण आत्महत्या करून घेणे शक्यच नव्हते त्याला. गुळाच्या पाकात अडकला एवढ्याने मरण यायचे कारण नाही. तरी त्या दुसऱ्याचोराला पकडण्याला एक उपाय आहे. याच्या प्रेतासाठी तो नक्की येईलच. राजधानीच्या मुख्य द्वारा बाहेर एका खुर्चीवर याचे प्रेत एका खुर्चीवर बसवून ठेवून त्याच्यावर पाहारेकरी नेमा."

म्हाताऱ्या चोराने सांगितल्या प्रमाणे मोठ्या चोराने आपल्या साथीदाराला



सोडविण्याचा प्रयत्न चालू ठेवला होता. त्याने एक पांढरा घोडा, एक गाडी आणि चार बुदले भरून ताडी विकत घेतली. त्यानंतर त्याने म्हाताऱ्याचे सोंग घेतले. नंतर त्याने नगराच्या द्वारा पासून सुमारे दीडशे फुटावर गाडीला बांकडी पाडून ठेवली आणि ओरडला–"मेलो, माझी गाडी उलटली की हो! गाडीत ठेवलेले ताडीचे बुदले गेले, वांचवा हो वांचवा!"

छोट्या चोरावर पाहारा देणारे पाहारेकरी म्हणाले–"अरे म्हाताऱ्या आम्हांला एक बुदला दिलास तर तुझी गाडी सरळ उभी करून देऊ!"



"मी नको म्हटलं का मालक! एक घ्या, दोन घ्या!" मोठा चोर म्हणाला.

पहारेकऱ्यांनी गाडी सरळ उभी करून दिली– व एक ताडीचा बुदला उचलून घेऊन गेले आणि एकेक करून पाळी पाळीने प्याले. चोराने त्या ताडीत झोपेचे औषध घालून ठेवले होते, ते त्यांना माहीत नव्हते! ते ढारांढूर झोपले तेव्हां मोठ्या चोराने येऊन छोट्या चोराकडे बोट दाखवून विचारले–"हा कोण हो?"

पाहारेकऱ्यांचा नायक म्हणाला–"हा एक चोर आहे!"

"होय का, मग हा माझा घोडा चोरून तर नेणार नाही?" मोठा चोर म्हणाला.

"म्हाताऱ्या, तुझं डोकं तर फिरलं बिरलं तर नाही? तो मेला आहे, दिसत नाही का?" नायकाने विचारले.

"तो नक्कीच माझा घोडा पळवून नेईल. चोरावर विश्वास ठेवू नये!"

"तोंड बंद कर, म्हाताऱ्या! तो तुझा घोडा चोरून घेऊन गेला तर मी तुला दुसरा घोडा विकत घेऊन देईन,

त्यानंतर पाहारेकरी सर्व ताडी पिऊन झिंगूनच नव्हे, तर बेशुद्ध होऊन पडले. लगेच मोठा चोर छोट्या चोराजवळ गेला आणि त्याच्या तोंडात कसला तरी द्रव पदार्थ टाकला. थोड्याच वेळाने छोटा चोर हालचाल करू लागला व त्याने डोळे उघडले.

"हे पहारे, छोटू, पाय काढ येथून, हे लोक बराच वेळ झिंगून पडून असणार. तू घोड्यावर बसून आपल्या घरी निघून जा. मी उजाडल्यावर येऊन भेटतो." थोरला चोर छोट्याला म्हणाला. छोटा चोर घोड्यावर बसून निघाल्या बरोबर गाडीजवळ येऊन झोपला असल्याचे सोंग करून पडून राहिला.

नंतर काही वेळाने पाहारेकऱ्यांना एकेक करून जाग आली. मेलेल्या चोरा बरोबर घोडा सुद्धा नाहीसा झालेला पाहून ते थक्कच झाले. नायकाने डोळे चोळून



पुन्हां पुन्हां लक्षपूर्वक पाहिले, म्हणाला–"म्हाताऱ्याने म्हटलं तसंच झालं?"

त्याने जाऊन झोपेचे सोंग करून राहिलेल्या चोराला जागा करून म्हणाला–"मी हे सर्व पाहून थक्कच झालो, बाबा! तू कसं म्हणालास न जाणे, पण तू म्हणालास तसं च झालं बघ! चोर दिसत नाही, घोडा ही दिसत नाही! महाराजांना येथे घडलं ते सांगितलं तर ते आमची चामडीच लोळवितील! तुझ्या घोड्याची दुप्पट किंमत देतो. येथे घडले ते कोणाला सांगू नकोस."

मोठ्या चोराने तो ज्या कामासाठी तेथे आला होता ते कामतर झालेच, शेंकडो रुपये सुद्धा मिळवून तो पसार झाला.

राजाने घडलेले सर्व सांगितल्यावर म्हातारा चोर म्हणाला–"मी तुम्हांला पूर्वीच नव्हते का सांगितले की तो, अट्टल चोर असला पाहिजे म्हणून? मोठे इनाम देण्याचं जाहीर केल्या शिवाय तो तुमच्या नजरेसही पडणार नाही."

राजाला त्या वस्ताद चोराच्या बुद्धिमत्तेची खात्री पटली. त्याने चोराला मोठे इनाम मिळेल असे जाहीर केले.

मोठा चोर येऊन म्हणाला–"महाराज, मीच तो चोर आपण जाहीर केलेले इनाम घेण्यासाठी आलो आहे."

"पण तूच तो चोर हे मला कसे कळणार?" राजाने विचारले.

चोर दूर एक जण बैलाला हांकत घेऊन चालला होता त्याला दाखवून म्हणाला–"तो बैल मी चोरून आणू शकेन!" त्या बैलाला हांकत नेणारा छोटा चोर होता.

"तू तो बैल आणलास तर मी मान्य करीन!" राजा म्हणाला.

मोठा चोर तिकडे गेला आणि बैलाला नेणाऱ्या जवळ काहीतरी बोलला आणि बैलाला हाकणारा कपाळावर हात मारून पळून जात असलेला दिसला. राजाला ते सर्व खरे वाटले. त्याने चोराला खूप इनाम देऊन निरोप दिला. ते वांटून घऊन दोघे चोर आनंदाने राहू लागले.





# खरे आभूषण

रात्री आठ वाजण्याच्या सुमारास एकाएकी मोठी सर आली म्हणून गंगाधरने बाहेरचे दार आणि त्याबरोबर खिडक्या सुद्धा बंद केल्या. सोसाटयाच्या वाऱ्या-बरोबर पावसाचे थेंब पडू लागले व त्यामुळे भयंकर आवाज होऊ लागला. तो ऐकून त्याची सहा वर्षांची मुलगी विद्या घाबरून जाऊन आईला घट्ट धरून बसली.

"घाबरू नकोस ग माझे आई!" असे म्हणत गंगाधरने मुलीला उचलून घेतले. तेवढ्यात बाहेरचे दार कोणीतरी वाजविले.

गंगाधरने जाऊन दार उघडले. पावसाने ओला चिंब झालेल्या, त्याचा मित्र नारायणा बरोबर आणखी एक जण आत आला. नारायणाला पाहून विद्या थोडी हसली. तिची भीती ओसरली होती. गंगाधर व नारायण दोघे बालमित्र होते. नारायणाला शहरात नोकरी लागली होती.

गंगाधर आनंदाने बायकोला ओरडून म्हणाला—"गायत्री, हा पहा तुझा दादा आला आहे!" गायत्रीने दोघांना भिजलेले पाहून कोरडे कपडे बदलायला आणून दिले.

नारायणाने कपडे बदलून विद्याला घेतले व म्हणाला—"एका कामावर रंगपूरला निघालो होतों. वाटेत पावसाने घेरले. तेव्हांच हा रघुनाथ भेटला. हा आमच्याच गावचा." असे सांगून रघुनाथाची व गंगाधराची ओळख करून दिली.

गायत्रीने लगेच सैपाक करून पाहुण्यांना वाढले. बाहेरच्या खोलीत दोघांसाठी तिने अंथरुणे घालून तयार ठेवली.

"मी मामांच्या जवळच झोपणार गोष्टी ऐकत!" विद्याने हट्ट केला.

"अग वेडे, आत्तांच पहा किती रात्र उलटली आहे ती! तुझे मामा प्रवासात दमून भागून आणि वर ओलेचिंब भिजून आले आहेत. आतां ते गोष्टी नाही सांगणार!" या शब्दात गायत्रीने मुलीला रागावून अडविण्याचा प्रयत्न केला.

"काही हरकत नाही ग ताई! मी विद्याला झोप येईपर्यंत गोष्ट सांगतो." नारायण म्हणाला!

विद्या नारायणजवळच गोष्टी ऐकत पडून होती. एका तासाभराने तिला झोप लागली. नारायण सुद्धा दमला असल्याकारणाने त्याला ही लगेच झोप लागली. त्याची झोप मोडली तोंपर्यंत चांगले उजाडले होते.

रघुनाथ त्यापूर्वीच उठला होता. त्याने नारायणाला विचारले—"बरं तर तू आणखी काहीवेळ थांबणार आहेस की माझ्या बरोबर येणार आहेस?"

विद्या उठली तर आपल्याला जाऊ देणार नाही, हे ओळखून नारायण, गंगाधर व त्याची बायको गायत्रीने जेवून जा, म्हणून पुष्कळ आग्रह केला तरी न थांबतां, रघुनाथबरोबर निघाला.

चांगली उन्हे निघाल्यावर विद्या उठली आणि विचारू लागली—"नारायणमामा कोठे गेला?" तिने घरभर हुडकून पाहिले.

गायत्री मुलीला आंघोळ घालायला मागच्या बाजूस घेऊन जातांना म्हणाली—"तुझा मामा, बाजारांतून तुझ्यासाठी खाऊ आणायला बाजारात गेला आहे!"



ती मुलीला आंघोळ घालीत होती आणि तिचे लक्ष मुलीच्या मानेकडे गेले. सासूने नातीला प्रेमाने तीन तोळयाची सोन्याची माळ घातली होती ती तिच्या गळयात नव्हती. संध्याकाळीच मुलीने हट्ट केला म्हणून पेटीतून काढून गायत्रीने मुलीच्या गळयात घातली होती.

गायत्री घाईघाईने ओटीवर आली आणि विद्या झोपली होती ती गादी व पलंगपोस पांघरूण वगैरे झाडून पाहिले. माळ कोठेही दिसली नाही. तिच्या डोळयांना पाणी आले. तिने रडे आवरून धरले. सासूबाईनी त्यांच्या स्वतःच्या लग्नात घातलेल्या बांगड्या मोडून किती प्रेमाने



नातीला ही माळ करून घातली होती. ती गेली म्हणजे केवढी मोठी ठेव गेली! एका आडवड्याने नातीला पहायला येत असल्याचे सासूने पत्रही लिहिले होते.

बायकोच्या- तोंडून सोन्याची माळ नाहीशी झाल्याचे ऐकून गंगाधरने सुद्धा सर्व घर हुडकून पाहिले. पण व्यर्थ!

गायत्री दु:खी मनाने म्हणाली– "रात्रीच्या रात्री माळ नाहीशी झाली, हे एक आश्चर्यच म्हणावयाचे! कदाचित दादाने मुलीला माळ बोचेल म्हणून काढून तर ठेवली नसेल?"

गंगाधरच्या मनातही तेवढीच आशा उरली होती. दोन दिवसांनी परतीच्या वाटेवर नारायण विद्याकरितां खेळणी घेऊन परतला.

गंगाधरने त्याला घडले ते सांगितले व म्हणाला–"बोचेल म्हणून काढून तर ठेवली नाहीस ना, वाटले आम्हांला."

नारायण काही वेळ विचार केल्यावर म्हणाला–"नक्कीच हे काम त्या गाढवाचे असले पाहिजे!"

"तो तसा आहे का रे?" गंगाधरने आश्चर्य चकित होऊन विचारले.

त्याच्याशी माझी फक्त तोंडओळखच आहे, तसा तो माझा घनिष्ट मित्र नाही! तू चल माझ्या बरोबर त्याच्या घरी जाऊन विचारू या. जरूर पडली तर धमकी देऊन ही पाहूया!" नारायण म्हणाला.

दोघे शहरात पोचले तोपर्यंत दुपार झाली होती. ' जेवून खाऊन थोडीशी विश्रांती घेऊन संध्याकाळी रघुनाथाच्या घरी गेले. त्यावेळी रघुनाथ भाजी लावली होती त्यांच्या आळयांत पाणी घालीत होता. त्याने नारायण व गंगाधरला आलेले पाहिले व थोडा वेळ दचकल्यासारखा झाला. नंतर स्वत:ला सावरून म्हणाला– "या, या, अवचित पाहुणे!"

नारायण त्याला म्हणाला–"इथला कोतवाल, गंगाधराचा मावसभाऊ. त्यांच्या घरी काही मंगलकार्य आहे, म्हणून गंगाधर आला आहे. तुला भेटायला जाऊ या, म्हणाला म्हणून घेऊन आलो."

रघुनाथ त्यांना बाहेर ओटीवर बसायला सांगून घरात जाऊन बायकोला विचारू लागला–"मुलगी कोठे आहे?"

खेळायला गेली असल्याचे बायकोने सांगताच रघुनाथ थोडा घाबरल्यासारखा होऊन म्हणाला–"तू लवकर मागच्या दाराने जाऊन मुलीच्या गळयातलीमाळ काढून आण!"

"एवढं काय बुडालं? पोर येईल काळोख पडायच्या सुमारास!" बायको म्हणाली.

"पहिल्याने मी सांगतो ते कर!" रघुनाथ बायकोला थोडया करडया आवाजात म्हणाला.

ती दहा पंधरा मिनिटांतच घाबऱ्या-घाबऱ्या येऊन म्हणाली–"अहो, हे पहा काय झालं ते! रस्त्यावर खेळत असलेल्या मुलांनी सांगितले की कोणी लांब दाढी-वाल्याने खायला खाऊ देतो म्हणून सांगून मुलीला बोलावून नेलं म्हणे! तो तिच्या गळयातली माळ चोरून न्यायला त्याने तसं केलं असावं.

माळेची गोष्ट ऐकतांच रघुनाथाचे सर्व अंग थरारलं. बायकोला गप्प करायला



गेला, परंतु ती घाबरली होती म्हणून गप्प राहिली नाही.

नारायण मध्ये म्हणाला–"मुलांना अंगावर काही दागिना घालून रस्त्यावर खेळायला जाऊ देणे म्हणजे विकत घेतलेले दुखणं आहे! ती माळ कशी होती हे सांग. कोतवालाकडे फिर्याद करून पाहू!"

फिर्याद शब्द ऐकतांच रघुनाथाच्या सर्वांगाला घाम सुटला. विद्याच्या गळया-तली माळ चोरल्याची गोष्ट सहजी बाहेर पडेल. ती गोष्ट कोतवालाच्या कानी पडणे म्हणजे कैद आणि तुरुंगवास!

असा विचार करून रघुनाथ गंगाधराचे दोन्ही हात धरून कांपऱ्या आवाजांत

म्हणाला–"तुम्ही मला क्षमा करा! आमच्या मुलीच्या गळ्यातली माळ तुमच्या विद्याची आहे. मी रात्री ती चोरली. आमची ही मुलीला एक माळ करा हो, म्हणून सारखी पाठीस लागली होती. ते सामर्थ्य माझ्यात नव्हतं. तुम्ही फिर्याद करू नका. अब्रू ही प्राणापेक्षा जास्त असते, हे मी तुम्हांला सांगायला हवं का?"

गंगाधर अगदी सौम्य स्वरांत म्हणाला–"हे पहा रघुनाथ, बायकोला आपण सदुपदेश करू शकलो नाही की असे प्रसंग ओढवतात. मुलांना उत्तम आभूषण, म्हणजे उत्तम विद्या देणे होय! परंतु लहानपणापासून त्यांना सोन्याचांदीच्या दागिन्यांची हौस लावणं हा शुद्ध अविवेक आहे! पहिल्याने तुझी मुलगी कोठे आहे, शोध काढू या, चलं!"

इतक्यात रघुनाथची मुलगी खाऊची पुडी घेऊन हसत घरात आली. तिच्या गळ्यात विद्याची माळ पाहताच रघुनाथची बायको आनंदाने ओरडली–"कोठे गेली होतीस ग माझे आई? तो दाढीवाला तुला कोठे तरी उचलून घेऊन गेला, असे वाटले होते आम्हांला!"

खाऊचा पुडा सोडीत रघुनाथची मुलगी म्हणाली–"तो मामा नवीनच या गावात नोकरी साठी आला आहे. मी अगदी त्याच्या मुलीसारखी आहे, असे तो म्हणाला. काही वेळ माझ्याशी गप्पा मारून मला हलवायाच्या दुकानात घेऊन गेला आणि हा खाऊ विकत घेऊन दिला."

रघुनाथच्या बायकोने मुलीच्या गळ्यातील माळ काढून गंगाधरच्या हाती देत म्हटले–"माझ्या मूर्खपणाचा परिणाम हे चोर होतील असे मला वाटले नव्हते! मुलांना सोन्याचे दागिने नाही, त्याहून जास्त मोलाची विद्या देणे आवश्यक आहे, हा बोध तुमच्याकडून आज मिळाला."

गंगाधर माळ खिशात ठेवीत रघुनाथाच्या मुलीला प्रेमाने पोटाशी धरून म्हणाला–"देवाच्या कृपेने ज्याची वस्तू त्याच्याकडे सुखरूप पोचती झाली!"






[२]

[अवंती नगरीत तिघ भावंडे होती. सर्वांत धाकटा पिंगळ मासे धरायला चिलका सरोवरावर गेला. तेथे मंडन नावाच्या एका इसमाने त्याला हात बांधून सरोवरांत टाकायला पिंगळला सांगितले. त्याप्रमाणे करून पिंगळ शहरात गेला व कांचन मिश्र नावाच्या व्यापाऱ्याकडून त्याने शंभर मोहोरा मिळविल्या. पुढे–]

कांचन मिश्राने दिलेल्या शंभर मोहोरा घेऊन पिंगळ आनंदाने दुकान दाराकडे गेला. दुकानदार पिंगळला त्या दिवशी फार आनंदाने आलेला पाहून म्हणाला–"कायरे पिंगळ, आज नशीब पुन्हां उदयास आलेले दिसते आहे! पुष्कळ मासे सांपडलेले दिसत आहेत!"

त्यावेळी पिंगळला एकदां मनात आले की त्याला शंभर मोहोरा कशा मिळाल्या हे सांगून टाकावे. परंतु तेवढ्यात त्याला कांचन मिश्राने बजावून सावध करून ठेवले होते ती गोष्ट आठवली. म्हणून मोठे संकट टळल्या सारखे सोंग करून म्हणाला–"गेल्या दहा दिवसांत आज काय ते चार मासे जाळ्यात सांपडले. नाहीतर गेले काही दिवस नशिबाने पाठ फिरविली होती.

त्यानंतर पिंगळने दुकानदाराकडून गेले काही दिवस जी उधारी काढली होती



तिचा सर्व हिशोब करून सर्व पैसे देऊन टाकले आणि त्याला हवे होते ते सामान विकत घेऊन सरळ घरी गेला.

तो घरी गेला तेव्हां त्याचे दोघे थोरले भाऊ भिंतीला टेकून पेंगत होते. आई त्याला पाहतांच पुढे आली व त्याच्या हातांतले तिने सामान घेतले. पिंगळने तिला आणलेले सर्व सामान काय आणले आहे ते सांगितले व म्हणाला–"आज इतक्या दिवसांनी भाग्य पुन्हां उदयास आले. लवकर सैंपाक कर!"

थोड्याच वेळात सैंपाक तयार झाला. पिंगळच्या बरोबर जीवदत्त व लक्षदत्त सुद्धा जेवायला बसले आणि भराभर जेवून आनंदाने बाहेर निघून गेले. थोरले भाऊ निघून गेल्यावर पिंगळने खिशांतून मोहोरा काढून आईला दाखविल्या.

मोहोरा पाहून आईला आश्चर्य वाटले व तिने चकित होऊन विचारले–"इतके पैसे कसे मिळाले रे?" पिंगळने काही लपवालपवी न करतां घडले ते सर्व सांगून टाकले.

ते सर्व ऐकून घेऊन ती म्हणाली–"पिंगळ! तुला आज हे पैसे कसे मिळाले हे आणखी कोणाला कळले तर बरं नाही रे, बाबा! आतां यापुढे तू कधी चिलका सरोवराच्या बाजूला जाऊच नकोस!"

आईला वाटत असलेली भीती पाहून पिंगळ हसून म्हणाला–"मी केले त्यात गुन्हां असा काय होता? तो आला होता त्यानेच आपले हात बांधून मला त्याला पाण्यात फेंकून द्यायला सांगितले होते आणि त्यामुळे तो पाण्यात बुडून मेला. तरी ही गोष्ट कोणाला कळू नये याची काळजी घेतली पाहिजे."

"तुला तुझे भाऊ कसे आहेत, हे माहीतच आहे!" त्यांच्या कानावर ही गोष्ट जाता कामा नये, सावध रहा!" आई म्हणाली.

दहा दिवसांनंतर त्या दिवशी रात्री पिंगळ थोडा निश्चित पणे झोपला. दुसऱ्या दिवशी उजाडतांच तो जाळे घेऊन चिलका सरोवराकडे निघाला. दुपारपर्यंत तो जाळे टाकून बसला होता, पण एक मासादेखील जाळ्यात सांपडला नाही. तो हताश होऊन घरी परत जावे असा विचार करू लागला, तेवढ्यात त्याला दुरून एक घोडेस्वार जोराने येत असलेला दिसला.

पिंगळ आश्चर्य चकितच झाला. कारण घोड्यावरून येणारी व्यक्ती काल घोड्यावरून आलेल्या मंडनसारखीच होती. काल सरोवरात बुडून मेलेला आज भूत होऊन तर आला नसेल ना? पिंगळला असे साहजिकच वाटले. इतक्यात घोडा जवळ आला. घोडेस्वार हसत घोड्यावरून खाली उतरून म्हणाला–"पिंगळ! मला तुझी थोडी मदत हवी आहे!"

पिंगळने भयभीत नजरेनेच त्याच्याकडे पाहिले. ही नवीन आलेली व्यक्ती मंडनसारखीच दिसते आहे. परंतु वयाने थोडी लहान दिसते आहे. घोड्याचा रंगही दुसराच आहे. त्यावरून नवीन आलेली व्यक्ती भूत नसल्याची खात्री झाली व त्याला थोडा धीर आला.

"माझं नाव तुम्हांला कसं काय कळलं? माझ्याकडून तुम्हांला कशा स्वरूपाची मदत हवी आहे?" पिंगळने त्या व्यक्तीला विचारले.



तो प्रश्न ऐकून तो घोडेस्वार मोठ्याने हंसला व म्हणाला–"पिंगळ, मला तुझं नाव कसं कळलं, मी कोणत्या कामासाठी आलो आहे, हे तुला माहीत नाही. माझे नाव अनुरूप, तुझी मदत घेणारा मंडन हा माझा थोरला भाऊ. मला तशीच मदत तुझ्याकडून अपेक्षित आहे."

"मंडन तुझाच भाऊ का? तो कोठे आहे?" पिंगळने विचारले.

अनुरूप पोट धरून 'खो' 'खो' करून मोठ्याने हसून सरोवराकडे बोट दाखवून म्हणाला–"कदाचित तो त्यात अजून असेल किंवा आतापर्यंत जलचर प्राण्यांनी त्याचा फराळ केला असेल."




"म्हणजे काल इकडे घडले ते तुम्हांला सर्व माहीत आहे, म्हणावयाचे?" पिंगळने आश्चर्य करीत विचारले.

"होय, मला सर्व माहीत आहे. मला तशीच तुझ्या कडून मदतीची अपेक्षा आहे!" अनुरूप म्हणाला.

"करीन, परंतु मी मदत करीन त्याबद्दल मोबदला या खेपेस तीनशे मोहोरा होईल!" पिंगळ म्हणाला.

अनुरूप मोघाने हंसून पिंगळच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला—"होय, तू दोनशे मोहोरा मागशील, ही शंका माझ्या मनात आधीच होती. म्हणून कांचन मिश्रा जवळ मी ती व्यवस्था पूर्वीच करून ठेवली आहे. परंतु मी सरोवरांतून जिवंत परत येणार नाही. असे तुला कसे काय वाटले?" अनुरूपने विचारले.

नंतर पिंगळने दोरी आणून अनुरूपचे दोन्ही हात पाठीमागे आणून घट्ट बांधले आणि त्याला खांद्यावर उचलून घेऊन सरोवराच्या काठावरून सरोवरांत फेंकून दिले. अनुरूप सरोवरात पडण्यापूर्वी म्हणाला—"पिंगळ, जर माझं डोकं पाण्यावर तरंगू लागलं तर चटदिशी जाळं टाकून मला धर बरं का!" एवढे त्याने ओरडून सांगितले.

पिंगळ जाळे घेऊन काठावर तयार उभा राहिला होता. सरोवरात काही वेळ लाटा आल्या आणि कमी झाल्या. एक दोन मिनिटांनंतर पाण्यावर काही बुडबुडे आले आणि काही वेळाने अनुरूपचे पाय पाण्यावर दिसू लागले.

"मेला विचारा!" असे मनात म्हणत पिंगळ अनुरूपच्या घोड्यावर बसून मागे वळून न पाहातां शहरांत निघून गेला.

कांचन मिश्राने त्याला येत असलेला पाहून दुरूनच म्हटले—"दुराशा ही दुःखाचं कारण होते!" ते तो थोडे मोठ्यानेच म्हणाला आणि त्याने पिंगळला दोनशे मोहोरा दिल्या.

"दुराशा कोण करते आहे? मी? या दोनशे मोहोरांसाठी मी केलेले कष्ट एवढे तेवढे नाहीत! याचा विचार केला नाहीस!" पिंगळ कांचन मिश्राला म्हणाला.

ते ऐकून कांचन मिश्राने त्याला ती गोष्ट न पटल्या सारखी मान हलवीत म्हटले—"दुराशा तुझी नाही, त्या दोघां मेलेल्यांच्या विषयी मी म्हणतो आहे. तू जे काम करतो आहेस ते बाहेर पडले तर त्यामुळे तुझ्यावर जे संकट येईल त्याची कल्पना करणे तुला तेवढे कठिण जाणार नाही! तुझ्या मनान ही दुराशा डोकावते आहेच! काल शंभर मोहोरा, आज दोनशे!"

"उद्यां तीनशे मोहोरा! त्यांहून कमी असतील तर मी कोणाला ही मरायला मदत करणार नाही." असे म्हणत पिंगळ घरी निघाला.

त्या दिवशी रात्री पिंगळने आईला दोनशे मोहोरा दिल्या. त्या मोहोरा पाहून आईचे अंग नखशिखांत थरारले. म्हणाली—"बाबा रे, आता यापुढे तरी तू त्या सरोवराच्या बाजूला फिरकू नकोस! मला, कां कोणास ठाऊक, फार भीती वाटते आहे!"

"काही भिण्याचे कारण नाही! एवढी मात्र काळजी घे की ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळतां कामा नये!" पिंगळने आईला साध केले.



त्या दिवशी रात्री पिंगळला चांगली झोपही लागली नाही. उजाडताच जाळे खांद्यावर टाकून चिलका सरोवरावर गेला. त्याने सरोवराकडे पाहिले परंतु दृष्टी बाहेरच मैदानाकडे होती.

ऐन दुपारी मैदानात धूळ उडू लागली आणि पिंगळला एक घोडेस्वार घोडा उडवीत येत असलेला दिसला. पाहातां पाहातां तो घोडेस्वार जवळ आला व म्हणाला—"पिंगळ, माझं नाव पद्मपाद. तू मला थोडी मदत कर!"

"मदत ना, करतो की! या सरोवरात

पडून आत्महत्या करून घेणाऱ्या प्रत्येकाला मदत करणेच तर माझे काम आहे. पण त्या बद्दल तीनशे मोहोरा द्याव्या लागतील!" पिंगळ म्हणाला.

"त्यात काय? मी ही मेलो तर कांचन मिश्र तुला तीनशे मोहोरा देईल." असे म्हणत पद्मपादने घोड्याच्या खोगिराला लोंबत असलेली दोरी सोडून आणून पिंगळच्या हातात दिली.

पिंगळने दोरीने पद्मपादचे दोन्ही हात मागे वळवून बांधले व त्याला खांद्यावर उचलून घेऊन सरोवराच्या काठावरून त्याला पाण्यात फेकले आणि म्हणाला– "बिचारा मेला!" नंतर मागे फिरून तो घोड्याजवळ आला.

पिंगळने मागे वळून सरोवराकडे पाहिले ही नाही आणि घोड्यावर टांग टाकून बसला आणि आतां निघणार इतक्यात त्याला सरोवरातून पद्मपादचा आवाज ऐकू आला–"पिंगळ! मला लवकर जाळे टाकून बाहेर काढ! तुला पुण्य लागेल!" तो ओरडून सांगत होता.

पिंगळ घोड्यावरून उडी मारून उतरला आणि सरोवरात जाळे टाकून त्याने पद्मपादला बाहेर ओढून काढले. पद्मपाद धापा टाकीत पाण्याबाहेर आला. त्याच्या हातात दोन मगरीची पिल्लं होती.

पिंगळ त्यांच्याकडे आश्चर्याने पहात काही विचारणार इतक्यात पद्मपाद घोड्याजवळ गेला आणि त्याच्या पाठी वरच्या एका पिशवीतून एक कांचेची बरणी काढली. त्याने ती मगरीची पिल्लं त्या बरणीत टाकून झांकण लावले.

पिंगळ पद्मपादकडे व त्या मगरीकडे सशंक दृष्टीने एकदां पाहून म्हणाला– "पद्मपादा! तू फार नशीबवान खरा! तू जिवंत बाहेर आलास! बरं तर मला मिळावयाच्या तीनशे मोहोरा?"

पद्मपाद मोठ्या प्रेमाने पिंगळला मिठी मारून म्हणाला–"पिंगळ! तुला त्या तीनशे मोहोराच काय, लक्षावधी कोट्यावधी मोहोरा देतो! जगात तुला सर्वात श्रीमंत करून टाकतो. परंतु तू माझ्या बरोबर भल्लूक पर्वतावर आले पाहिजेस!"

"भल्लूक पर्वत? ते नाव ऐकूनच मी भ्यालो आहे. आमच्या आईने त्या पर्वताविषयी पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत! ते डोंगर म्हणजे भुतांपिशाच्चांच्या राहण्याचे ठिकाणच आहे, असे ऐकतो." पिंगळ म्हणाला.

"भुतं आणि पिशाच्चं तुझा काही बिघाड करू शकणार नाहीत. या जगात तिघेच तिथे मोठे मांत्रिक आहेत. त्यांतल्या दोघांचा बळी तूच या सरोवरात दिला आहेस. आतां उरला तो मी एकटा!" पद्मपाद म्हणाला.

"तू काय म्हणतो आहेस, ते मला नाही कळले?" पिंगळ म्हणाला.

"असं होय! तुझ्या मदतीची मला गरज आहे, म्हणून तुला मी सर्व सांगतो





एक." असें सांगून पद्मपाद पुढे सांगू लागला.

"आम्ही तिघं भावंडं, आमचे बाबा फार मोठे मांत्रिक होते. त्यांनी आपल्या मंत्रशक्तीच्या बळाने कित्येकांचे हितच केले, कित्येकांचं नुकसान ही केलं. त्यांनी लहानपणापासूनच आम्हां सर्व भावंडांना कोणत्याही प्रकारचा पक्षपात केल्याशिवाय मंत्रविद्या शिकविली. उतारवय झाल्यावर मृत्यूपूर्वी आम्हां सर्वांना आपली सर्व स्थावरजंगम इस्टेट सारखी वाटून दिली. परंतु त्यांनी त्याना माहीत असलेली मंत्र विद्या लिहिली होती, ती पुस्तके मात्र आम्हां कोणालाही न देतां असें सांगून ठेवले होते की तुमच्यापैकी जो कोणी अधिक शक्तिशाली असेल त्याला ती मिळतील." असे सांगून त्यांनी डोळे मिटले.

ते वारल्यावर लगेच आम्हां भावांमध्ये चढाओढ वाढली, वैर वाढले. प्रत्येकाच्या मनात ती पुस्तके हस्तगत करण्याची महत्वाकांक्षा वाढली आणि परस्परांवर मंत्रशक्तीचा आम्ही प्रयोग करू लागलो आणि दुसऱ्याचा शेवट कसा होईल हे पाहू लागलो.

आम्ही परस्परांचा शेवट करण्याच्या प्रयत्नात मग्न असतां आमच्या वडिलांना ज्या गुरूंकडून मंत्रविद्या प्राप्त झाली होती ते आमच्या घरी आले. त्यांनी आमच्या मधील वैमनस्य पाहिले व त्यांना फार वाईट वाटले. त्यांनी तिघांना एका जागी बोलवून बसायला सांगितले आणि म्हणाले—"तुमचे वडील मागे ठेवून गेलेल्या पुस्तकांविषयी तुम्हांला काहीच माहीत नाही. म्हणून तुम्ही भांडतां आहां. तुमच्यापैकी जो कोणी सर्वात अधिक शक्तिशाली असेल त्याला ती पुस्तके मिळतील, असे त्यांनी सांगितले होते, नाही का? म्हणून त्या पुस्तकांत जे मंत्र आहेत ते तुम्हांला प्राप्त व्हावेत असे वाटत असेल तर त्यापूर्वी पुष्कळ काही करणे आवश्यक आहे. 'ते काय?' असे आम्ही सर्वांनी विचारल्यावर ते सांगू लागले. (क्रमश:)





# दोघे कवी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुझी निश्चयी वृत्ती आणि दृढ संकल्प वाखाणण्या सारखाच आहे. कित्येक राजकर्त्यांना राज्यव्यवस्थेविषयी असलेली आस्था कवित्वशक्ती किंवा इतर कलांविषयी असत नाही. परंतु आपण कवि व विद्वानांचे मोठे आश्रयदाते आहों अशी कीर्ती संपादन करण्याची तीव्र इच्छा असल्या कारणाने दरबारात कधीकधी अयोग्य कवि व पंडितांचा सुद्धा सत्कार होतो. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला जयवर्मा नावाच्या राजाची गोष्ट सांगतो. ती लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



मालव देशाचा राजा जयवर्मा याच्या राज्य सभेत नित्य कोणता तरी सांस्कृतिक कार्यक्रम होत असे. एकदां एका हरिदासाने आपल्या कथाकथन चातुर्याने आपल्या श्रोतृवृंदाला मंत्रमुग्ध करून सोडले.

जयवर्माने त्या कथेकऱ्याचा फार मोठा सत्कार केला व म्हणाला– "आपण आमच्या दरबारात रहायला काही हरकत आहे का? मी आजपर्यंत आपल्या सारख्या कथेकऱ्याला कधी पाहिले नाही!"

ते ऐकून तो हरिदास म्हणाला–"प्रभो! ह्यांत माझे थोरपण असे काहीच नाही. आपल्या देशात नागेश्वर शास्त्री व गंगाधर शास्त्री असे दोन कवी आहेत. ते राजाश्रय मिळावा यासाठी कविता करीत असतात. त्यांनी लिहिलेल्या उत्तमोत्तम कवितांच्या आधारे मी ही हरिकथा सादर केली. तेव्हां थोरपणा त्यांचा आहे, माझा नाही."

राजाच्या मनात तत्काळ त्या दोघां कवींना आपल्या दरबारात बोलावण्याची तीव्र इच्छा उपजली. त्याने त्या दोघांसाठी दोन मेणे पाठविले. काही दिवसांनी दोघे कवी राजदरबारात आले. राजाने त्या दोघांच्या उतरण्यासाठी निरनिराळ्या महालात व्यवस्था केली. त्याने स्वतः त्या दोघांच्या दर्शनास जाऊन त्यांची कविता ऐकली. त्यांच्या प्रत्येक काव्यात अपूर्व असे भाव व्यक्त होत होते. परंतु राजाच्या मनात एक शंका होती. नागेश्वर शास्त्री व गंगाधर शास्त्री या दोघांपैकी कोणाचे कवित्व श्रेष्ठ म्हणावयाचे?

राजाने आपल्या मनातील ही शंका आपल्या दरबारी कवींसमोर प्रगट केली व त्यांची काव्ये वाचून आपली शंका दूर करावी असे त्यांना सांगितले. दुसऱ्या दिवशी सर्व कवी व पंडितांनी एक मताने निवेदन केले– "महाराज, त्यांची काव्ये वाचून आम्ही आपले देहभानही विसरून गेलो. त्यांची ही काव्ये अत्यद्भुत अशीच आहेत! परंतु त्यांतील कोणते थोर हे सांगणे कठिण आहे. क्षमा करावी, प्रभो!"

पंडितांचे उत्तर ऐकून राजाचा हट्ट जास्तच वाढला. त्याने आपल्या प्रधानाला बोलवून विचारले– "माझ्या मनातील शंका दूर व्हायला काही उपाय नाही का? नागेश्वर शास्त्री व गंगाधर शास्त्री यांनी रचलेली काव्ये वाचून त्यांचे थोरपण समजतील असे कोणी थोर विद्वान आपल्या राज्यात नाहीत का?"

मंत्री विचार करून म्हणाला–"प्रभो, हे कवी सामान्य कवी नाहीत. म्हणून अशा कवींचे थोरपण ओळखणं त्यांचे त्यांनाच शक्य आहे."



जयवर्माला ही सूचना पसंत पडली. तो गंगाधर शास्त्र्यांनी लिहिलेले एक काव्य घेऊन नागेश्वर शास्त्र्यांकडे गेला व म्हणाला–"कविवर्य! आपण हे काव्य वाचावे आणि निःपक्षपणे आपले मत द्यावे. या देशात हा निर्णय देण्याची शक्ती फक्त आपल्यातच आहे."

नागेश्वर शास्त्र्यांनी सर्व काव्य लक्षपूर्वक वाचून काढले आणि राजाला म्हणाले– "प्रभो, हे काव्य निःसंदेह थोर काव्य आहे. गंगाधर शास्त्री खरोखरच माझ्याहून श्रेष्ठ कवी आहेत."

जयवर्मा नागेश्वर शास्त्र्यांचा विचार ऐकून थक्कच झाला. त्यानंतर त्याने नागेश्वर शास्त्र्यांचे एक काव्य गंगाधर शास्त्र्यांकडे देऊन घडलेले वृत्त सांगितले व म्हणाला–"नागेश्वर शास्त्र्यांनीच स्वतः कबूल केल्यावर आपणच थोर कवि म्हणून मला वाटले. तरी आपण हे काव्य वाचून नागेश्वर शास्त्र्यांविषयी आपले मत सांगावे ही माझी इच्छा आहे!"

गंगाधर शास्त्र्यांनी नागेश्वर शास्त्रांचे काव्य वाचून राजाकडे जाऊन निवेदन केले– "प्रभो! हे काव्य फारच मोठे काव्य आहे व नागेश्वर शास्त्रीच माझ्याहून थोर कवी आहे!"

आतां काय करावे, हे जयवर्माला सुचेना. त्याने जे घडले ते प्रधानाला









सर्व सांगितले व म्हणाला–"यांचे थोरपण कळणे आपल्याला तरी शक्य नाही!"

प्रधान काही वेळ विचार करून म्हणाला–"प्रभो, या कवींच्या काव्यातील गुणांव्यतिरिक्त त्यांची नम्रता सुद्धा वाखाणण्यासारखी आहे. यांच्याकडून सत्य काय आहे, हे काढून घ्यायचे असेल तर एक युक्ती करावी लागेल. काव्य कर्त्यांचे नाव सांगितल्यामुळे ते आपल मत बरोबर देत नाहीत. आपलं थोरपण स्वत: च्या तोंडाने न सांगणे हे थोर कवीचे लक्षण आहे, नाही का?"

प्रधानाने जे सुचविले ते राजाला पटले. त्याने नागेश्वर शास्त्र्यांनी लिहिलेले आणखी एक काव्य गंगाधर शास्त्र्यांकडे नेऊन म्हणाला–"कविवर्य! माझ्या दरबारात सुपद्य नावाचा एक भाट आहे दरबारात नित्य एक न एक काव्य ऐकत राहिल्याने त्याला काव्य स्फूर्ती झाली व त्याने हे काव्य लिहिले. ते मला तितके आवडले नाही. परंतु काव्यातील गुण दोष कळण्या इतके माझं ज्ञान नाही. म्हणून आपण हे काव्य वाचून आपलं मत द्यावं!

गंगाधर शास्त्र्यांनी ते काव्य वाचले आणि राजाला म्हणाला–"हे काव्य अगदीच पोरकटासारखं आहे. त्या भाटाला कवी व्हायचं असेल तर त्याला फार मेहनत घ्यावी लागेल."



त्यानंतर राजा गंगाधर शास्त्र्यांचे आणखी एक काव्य नागेश्वर शास्त्र्यांना देत म्हणाला–"आमचा दरबारी भाट सुपद्य याने हे काव्य लिहिले आहे. ते वाचून आपले काय ते मत द्यावे."

नागेश्वर शास्त्र्यांनी ते काव्य वाचले व म्हणाले–"प्रभो! हे काव्य कोण्या थोर कवीने लिहिल्यासारखं आहे. शब्द प्रयोग संगीतयुक्त आहेत आणि कवितेत अंतरार्थ व भाव ओतप्रोत भरलेला आहे. एका शब्दात सांगावयाचे तर आपल्या भाटाच्या जिव्हेवर सरस्वतीच जणुकाही बोलते आहे!"

ते ऐकून राजाला आनंद झाला. त्याने प्रधानाकडे निरोप पाठविला. प्रधान आल्यावर म्हणाला–"आपण गंगाधर शास्त्र्यांचा चांगला सत्कार केला पाहिजे! या दोघां कवींत हेच जास्त मोठे असल्याचे स्पष्ट झाले आहे." इतके सांगून त्याने घडलेले वृत्त सांगितले.

प्रधान ते ऐकून एकदम म्हणाला–"महाराज, आपण सत्कार करायचाच झाला तर नागेश्वर शास्त्र्यांचाच केला पाहिजे, गंगाधर शास्त्र्यांचा नाही!"

प्रधान म्हणाला ते ऐकून राजा विचार-मग्न झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, मला ह्यात एक शंका आहे. गंगाधर शास्त्र्यांचा सत्कार करण्याचा विचार करून राजाने जेव्हां प्रधानाचे



मत ऐकले तेव्हां त्याला प्रधानाचा राग न येतां तो विचारमग्न कसा काय झाला? काव्य कोणी लिहिले आहे हे माहीत नसतांना नागेश्वर शास्त्र्यांनी लिहिलेले काव्य चांगले नाही असे गंगाधर शास्त्र्यांनी मत दिले. या उलट काव्य कोणी लिहिले हे माहीत नसतांना नागेश्वर शास्त्र्यांनी गंगाधर शास्त्र्यांचे काव्य वाचून ते एका महाकवीचे काव्य असल्याचे सांगितले. यावरून गंगाधर शास्त्रीच थोर कवि असल्याचे सहजीच सिद्ध झाले नाही का! या शंकेचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"नागेश्वर शास्त्री व गंगाधर शास्त्री दोघे ही एकाहून एक थोर कवी होते, यात शंका नाही. परंतु त्या दोघांपैकी एकाचाच सत्कार करावयाचा झाल्यास कवि म्हणूनच नव्हे, तर त्यांच्या विशिष्ट गुणावरूनही विचार करायला हवा. त्या दोघांत गंगाधर शास्त्री अहंकारी आढळले. राजा नागेश्वर शास्त्र्यांकडे गेला तेव्हां त्यांनी गंगाधर शास्त्री थोर कवि असल्याचे सांगितले. आतां गंगाधर शास्त्र्यांचीच गोष्ट पहा. त्यांनी नागेश्वर शास्त्र्यांचे काव्य वाचून तो शुद्ध पोरकटपणा असल्याचे सांगितले. त्या काव्यातील थोरपण गंगाधर शास्त्र्यांना कळलंच नाही. कारण ते काव्य सुपद्य भाटाचे असल्याचे राजाने सांगितले होते. म्हणून त्यांनी ते लक्षपूर्वक वाचलेही नसावे. अगदी पहिल्यानेच लिहिलेले काव्य म्हणून प्रोत्साहनार्थ दोन शब्द बोलायला हवे होते. तो थोरपणा गंगाधर शास्त्र्यांत नव्हता. या सर्व कारणांमुळे प्रधानाने सांगितल्याप्रमाणे राजाने नागेश्वर शास्त्र्यांचा सत्कार करणेच योग्य होईल असा सहाजीकच विचार केला असावा."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ नाहीसा झाला आणि प्रेतासह झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# गमतीची खरेदी

चक्रवरपुर नावाच्या गावी चंदूलाल नावाचा एक दुकानदार होता तो जुन्या मालाची खरेदी व विक्री करी.

एकदा तो खरेदी विक्रीच्या कामात गर्क असतां खंडू नावाचा एक तरुण एक घोंगडी उचलून गुंडाळून घेऊन आला आणि चंदूलालला विचारू लागला–"एक नवीन घोंगडी विकत घ्यायची झाली तर किमत किती होईल? सांगाल का जरा!"

चंदूलाल थोडासा चिडक्या स्वरात खंडूकडे पाहून म्हणाला– "आमच्या दुकानात जुन्या वस्तूंचीच खरेदी विक्री होते. नव्या वस्तूंची किमत आणखी एखाद्या दुकानात जाऊन विचारा."

"हे जुन्या मालाचे दुकान आहे, हे मलाही माहीत आहे. तर अशा जुन्या मालाची किमत नव्या मालाची किमत पाहूनच नाही का ठरवावी लागत?" खंडूने विचारले.

ते उत्तर ऐकून चंदूलाल हसत म्हणाला– "मी नव्या मालाच्या किमतीच्या पावपट किमतीला जुना माल विकत घेतो. त्यावर एखाद रुपया जास्त लावून तो माल विकतो. तुमच्या या जुन्या घोंगडीची किमत नवी असेल तर वीस रुपये होईल."

खंडू आश्चर्य चकित होऊन विचारू लागला– "म्हणजे या घोंगडीची किमत पांच सहा रुपयांहून जास्त देण्याची गरज नाही म्हणतां!"

चंदूलालने घोंगडी लक्षपूर्वक पाहून म्हटले–"या घोंगडीची किमत तेवढी येणे सुद्धा अशक्यच. रंग फिक्का पडला आहे. म्हणून चार रुपयेच येणे शक्य आहे!"

"अगदी शेवटचे म्हणून विचारतो आहे, काय किमत होईल तेबोला!" खंडूने विचारले.

चंदूलालने घोंगडी हातात घेऊन घडी उलगडून लक्षपूर्वक पाहिली व म्हणाला–







"ही तर फार जुनी घोंगडी आहे! वीण विरळ आहे. तीन रुपयांहून जास्त या घोंगडीला मिळणार नाहीत."

खंडूने लगेच खिशातून तीन रुपये काढले व चंदूलालच्या हातात ठेवीत म्हणाला—"म्हणजे तुम्ही हिची किंमत तीन रुपये ठरविलीत म्हणावयाची! बर तर घेऊन जातो घोंगडी!"

चंदूलाल आपल्या हातातील तीन रुपयांकडे चकित होऊन पहात म्हणाला—"तुम्ही मला तीन रुपये देता आहां आणि घोंगडी घेऊन जातां आहां, म्हणजे काय?"

"ही तुमच्या दुकानातलीच तर आहे! बाहेर लोंबत असलेली पाहून आवडली म्हणून भाव ठरवून घेऊन जावी म्हणून घेऊन आलो होतो." खंडू म्हणाला.

चंदूलाल खंडूकडे रागाने पहात म्हणाला—"ही घोंगडी आमची आहे का? हिची किंमत एका चिट्ठीवर लिहून चिट्ठी चिकटविली होती घोंगडीवर ती काय झाली?"

"ती चिट्ठी सुटून खाली पडली होती, ती मी उचलून खिशात ठेवली." असे म्हणत खंडूने खिशातून चिट्ठी काढून दाखविली.

चंदूलाल चिट्ठी पहात म्हणाला—"घोंगडीची किंमत दहा रुपये स्पष्ट लिहिली आहे की! हवी असेल तर तेवढी किंमत देऊन घेऊन जा!"

"या घोंगडीची किंमत तीन रुपयांहून जास्त होणार नाही असं तुम्ही स्वतःच म्हटल्यावर दहा रुपये देऊन ही विकत घेणारा कोणी वेडाच असेल का हो?" असे म्हणत खंडू दुकानात खरेदीला आलेल्या गिऱ्हाइकांकडे पाहू लागला.

त्या सर्वांनी खंडू म्हणाला ते बरोबर असल्याचे सांगितले.

माल खरेदी करायला आला आहे की विकायला आला आहे हे कळू न देतां चलाखीने किंमत ठरवून घेऊन खंडूने फायदा करून घेतल्याबद्दल खंडूचे कौतुक करीत दुकानदाराने खंडूला तीन रुपयांनाच ती घोंगडी दिली.





# तीर्थयात्रेपासून पुण्यलाभ

रामपूर नावाच्या गावी शामू व गोपू नावाचे दोन शेतकरी होते. एकदां केव्हांतरी जमिनीच्या खरेदीवरून दोघांचे काही तरी भांडण झाले आणि ते वाढत जाऊन परस्परांवर सूड उगवण्यापर्यंत मजल गेली.

शामूचे काही मित्र त्याने दिलेल्या चिथावणीवरून लहान सहान गोष्टीवरून गोपूची खुरापत काढायला पुढे होत. गोपूसुद्धा आपल्या मित्र मंडळींना चिथावणी देण्यात काही कमतरता करीत नसे व त्यांना शामूच्या मित्रांशी भांडण काढायला प्रोत्साहन देई.

गावातली ही स्थिती पाहून गावा शेजारच्या ओढ्याकाठी झोपडी बांधून राहणाऱ्या साधूला फार त्रास होऊ लागला. त्याने शामू व गोपू दोघांना बोलावून एकदां नाही, दोनदां बोलावून समजावून सांगितले की, बाबांनो, अशा रोजरोजच्या भांडणांत दोघांचेही हित नाही. परंतु त्याचा काही अनुकूल परिणाम झाला नाही.

एकदां शामूच्या मनांत तीर्थाटन करण्याचा विचार आला आणि तो विचार साधूला कळविण्यासाठी साधूच्या दर्शनाला जाऊन म्हणाला—"मी आपल्या काही गांवकऱ्यांबरोबर रामेश्वरच्या तीर्थदर्शनाला जातो आहे. आपणही आपल्या शिष्यांसह आमच्या बरोबर आलात तर आम्हांला फार आनंद होईल."

"मला कशाला रे ही तीर्थयात्रा वगैरे? तुम्ही जाऊन या!" साधू म्हणाला.

शामू अत्यंत नम्रपणे म्हणाला—"तुम्ही खर्च वगैरेची काळजी करू नका. मी ते सर्व पाहून घेईन!"

साधू स्मित करून म्हणाला—"माझ्यावर तुझे प्रेम व भक्ती पाहून मला आनंदच



होतो आहे. पण अशा या तीर्थयात्रेमुळे काही विशेष फायदा होतो, असे मला वाटत नाही."

ते उत्तर ऐकून शामू ने चकित होऊन विचारले–"सर्व गोष्टी माहीत असणाऱ्या तुमच्या सारख्यांनीच असे म्हटल्यावर मी काय बोलणार? तीर्थयात्रा केल्याचा काही फायदा नाही असे वाटतं का तुम्हाला?"

साधू एक क्षणभर थांबून म्हणाला– "ते मी तुम्ही तीर्थयात्रा करून परत आल्यावर सांगेन. तू यात्रेला जातोच आहेस तर माझं एक काम कर!" असे म्हणत साधू आपल्या झोपडीत जाऊन एक लहानसे गाठोडे घेऊन आला आणि ते श्यामूला देत म्हणाला–"हे तू सर्व पुण्यक्षेत्रांत घेऊन जा आणि ज्या ज्या जागी तू तीर्थस्नान करशील त्या त्या जागी हे गाठोडे पाण्यात बुडव व परत मला आणून दे!"

शामू ते गाठोडे घेऊन निघून गेला. त्यानंतर एका तासाभरानेच गोपू साधूच्या दर्शनाला आला. साधूने त्याला तो सुद्धां दक्षिणेकडील तीर्थदर्शनाला जात आहे का, विचारले.

"दक्षिणेकडील रामेश्वराचे दर्शन घेऊन येणे हे काही मोठं पुण्यकार्य आहे का, बुवा? मी आपल्या गावकरी मित्रांबरोबर उत्तरेकडील तीर्थदर्शनाला जातो आहे, हिमालयातील तीर्थक्षेत्रांत सुद्धा जाणार आहे, आपण आपल्या शिष्यांसह आमच्या बरोबर चलावे, ही विनंती आहे!" गोपूने नम्रपणे विनंती केली.

"हेच मला शामू सुद्धा काही वेळापूर्वी दक्षिणेकडील तीर्थ दर्शनाला निघण्यापूर्वी येऊन म्हणाला होता. परंतु या तीर्थयात्रां पासून काही विशेष लाभ आहे असे नाही मला वाटत." साधू म्हणाला.

ते उत्तर ऐकून गोपूचं तोंड लहान झालं. म्हणाला–"बुवा! फायदा होतो की नाही, हे आपण परत आल्यावर पाहू. शामू आपल्या मित्रांबरोबर तीर्थाटनाला निघत आहे. तुम्हीच सांगा, मी त्याच्याहून कोणत्या बाबतीत कमी आहे? मी थोडच्याशा मोठ्याच तीर्थयात्रेला जातो आहे. आपण आमच्या बरोबर येऊन आम्हांला हिताच्या चार गोष्टी प्रवासात सांगत रहा!"

"इतक्या प्रेमाने तू बोलावतो आहेस, आणि तुला निराश करीत असल्या बद्दल मला फार वाईट वाटते आहे. तरी मी तुला एक काम सांगतों आहे तें करशील का? मी तुझ्या बरोबर माझ्या ऐवजी एक गाठोडे देतो." असे म्हणत साधूने गोपूला एक गाठोडे दिले आणि काय करावयाचे ते सांगितले.

शामू व गोपू आपापली, तीर्थयात्रा संपवून मागेपुढे सहा महिन्यांनी परतले आणि दोघांनी साधूने त्यांना दिलेले गाठोडे साधूकडे सुरक्षितपणे दिले.

दुसऱ्या दिवशी साधूने आशीर्वाद देण्यासाठी दोघांना प्रसाद घ्यायला, म्हणजे जेवायला आपल्या झोपडीत बोलाविले.

जेवायला शामू व त्याची मित्रमंडळी एका पंक्तीत व समोरच्या पंक्तीत गोपू व त्याची मित्रमंडळी बसली. साधूने आपल्या शिष्यांना दोन्ही पंक्तीत बसलेल्याना वाढायला सांगितले. शामू व गोपू बरोबर त्यांची मित्रमंडळी प्रत्येक पदार्थ खाऊन त्या पदार्थांची वाखाणणी करू लागले.



साधू त्यांना म्हणाला– "बाबांनो, तीर्थयात्रा करून आलेल्या तुम्हां सर्वांसाठी मी एक खीर मुद्दाम निराळी केली आहे. ती तुम्ही आतां खाता आहां त्या पदार्थापेक्षा चांगली आहे." असे सांगून शिष्यांना खीर वाढायला सांगितले.

खीर चाखून पाहतांच सर्व तोंडे वाकडी करून साधूकडे पाहू लागले. साधूने त्यांना विचारले–"खीर आवडली नाही का?"

"अगदी कडू आहे हो!" सर्व म्हणाले.

"असं! असणारच, कारण ही खीर कार्ल्यांची आहे. परंतु ती कार्ली तुमच्या बरोबर. सर्व तीर्थक्षेत्रांत स्नान करून व देवदर्शनही करून आली आहेत. म्हणून त्यांचा कडूपणा जाऊन त्यांच्यात गोडपणा आला असेल असे मला वाटले होते." साधू म्हणाला.

साधू म्हणाला त्यात काही तरी गूढ अर्थ असला पाहिजे असा विचार करून सर्वांनी हात धुतले व साधूचा निरोप घ्यायला आले.

साधू सर्वांना म्हणाला–"कार्ली हा एक केवळ जड पदार्थ आहे. म्हणून एवढी मोठी तीर्थयात्रा करूनही त्यांच्या नैसर्गिक गुणात काही बदल झाला नाही. परंतु आपण माणसं आहों, आपण विचार करतो. त्यांच्या सारखे नाही. आपण कित्येक गोष्टी शिकतो. तुमच्यात तीर्थयात्रा करून आल्यामुळे पुष्कळ बदल झाला असेल असे मी मानतो."

शामू व गोपू ते ऐकतांच परस्परांचे हात हातांत घेऊन साधूसमोर येऊन नम्रपणे म्हणाले–"बुवा! तुम्ही कान पिळून आमचे डोळे चांगले उघडलेत. आजपासून आमचा परस्परांशी प्रेम व सद्भावच राहील, वैर मुळीच राहणार नाही. सर्व गांवकरी सख्ख्या भावंडासारखे परस्परांशी प्रेमाने वागतील."

साधू त्यांना आशीर्वाद देत म्हणाला– "हेच तीर्थयात्रेचे पुण्य होय!"





# गिड्डा वामन

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एका ब्राह्मणाच्या पोटी पुत्र म्हणून अवतार धारण केला. ते गिड्डे होते, म्हणून लोक त्यांना गिड्डू वामन म्हणत. वामन लहानपणीच तक्षशिलेला गेला व एका गुरुकुलात धनुर्विद्येचा अभ्यास करून त्या विद्येत निष्णात झाला.

त्यानंतर धनुर्विद्येच्या साह्यानेच उदर-निर्वाह चालवावा असा विचार वामनाच्या मनात आला. म्हणून तो अनेक देशात हिंडला आणि तेथील राजकर्त्यांना भेटून त्याला उत्तम धनुर्विद्या येत असल्या कारणाने दरबारात नोकरी द्यायला विनंती केली. परंतु वामन गिड्डा असल्या-कारणाने त्याला कोणीही दरबारात स्थान दिले नाही.

दरबारात नोकरी मिळावी म्हणून काय करावं, आणि आपण संपादन केलेल्या विद्येचा कसा उपयोग करावा, या गोष्टीचा विचार करीत वामन एका गावी राजरस्त्याने जात असतां त्याला रस्त्याच्या कडेला एक उंच व धिप्पाड माणूस हातमागावर विणीत बसलेला दिसला. वामनने त्याचे नाव विचारले.

त्या विणकराने त्याचे नाव 'भीमसेन' असल्याचे सांगितले.

गिड्डू वामन म्हणाला–"काय रे, तू एवढा उंच व धिप्पाड आजानुबाहू आहेस. नावही भीमसेनच आहे, मग हे असले कोष्टयाचे काम काय करतोस?"

"मी तरी काय करू? मला विणतां येते. त्याशिवाय मला एकही काम येत नाही." भीमसेन म्हणाला.

"खूप पैसे मिळवायला मी तुला एक युक्ती सुचवितो! येतोस का तू माझ्या बरोबर?" वामनने विचारले.



भीमसेनाने आनंदाने होकर दिला आणि वामनबरोबर निघाला. दोघे काही दिवसांनी काशीला आले.

"तू राजाच्या दर्शनाला जाऊन तू धनुर्विद्येत निष्णात असल्याचे सांग आणि दरबारात नोकरी द्यायला विनंती कर! तुझा हा धिप्पाड देह पाहून व तुझे भीमसेन हे नाव ऐकून राजा नक्कीच तुला पदरी ठेवून घेईल!" वामनने सुचविले.

"पण कायरे, मला धनुर्विद्या कोठे येते आहे?" भीमसेनने विचारले.

"येत नसली तरी हरकत नाही. मी त्या विद्येत निष्णात आहे. तू मला आपला सहायक शिपाई म्हणून नेम. गरज पडेल तेव्हां मी तुला सर्व मदत करीन." वामनने भीमसेनाला समजावून सांगितले. त्याप्रमाणे भीमसेन काशीच्या राजाच्या दर्शनाला गेला आणि स्वत: धनुर्विद्येत निपुण असल्याचे सांगून चांगली नोकरी संपादन केली. दर पंधरवड्याला त्याला एक हजार रुपये पगारावर नोकरी मिळाली. वामन त्याचा नोकर म्हणून कामाला लागला.

त्याच सुमारास काशी राज्यावर एकाएकी एक संकट ओढवले. काशी नगराच्या जंगलात एक वाघ रहात असे. तो काशीला यणाऱ्या रस्त्याने जंगलातून जो कोणी येई त्याला ठार करून खाई. ते कळतांच राजाने भीमसेनाला बोलावून जंगलातील वाघाला ठार करून अगर जिवंत पकडून प्रजेचे रक्षण करण्यास आज्ञा केली.

भीमसेनने होकार दिला व वामनला घेऊन म्हणाला–"हा माझ्यावर प्रसंगच आला की रे! मी त्या वाघाला कसा काय मारणार? ह्या संकटातून सुटण्याचा उपाय सुचव!"

"मी सांगतो ते ऐक. तुला एकट्याने त्या वाघाला ठार करतां येणार नाही. गावाबाहेर जातांच हजार दोन हजार गावकऱ्यांना जमवून वाघ राहातो त्या जागी जा; वाघाची डरकाळी कानी पडतांच तू कोणत्या तरी झुडपात लपून बस. एखादी लता तोडून ती घेऊन तयार बस. लोक सर्व मिळून त्या वाघाला ठार करतील. तू तोंपर्यंत झुडपातच लपून रहा. वाघ मेलेला दिसतांच तू बाहेर ये आणि रागाचा आव आणून म्हण, वाघाला लतेने जिवंत बांधून राजाकडे घेऊन जाऊन आपले कौशल्य दाखवावे म्हणत होतो. एका वाघाला मारायला इतके जण कशाला धावायला हवे होते हो! राजाला सांगून तुम्हां सर्वांना फाशीची शिक्षा देववावी म्हणतो!" असे म्हणत खूप आरडा ओरडा कर. लोक घाबरून म्हणतील, 'आपण नाही मारलं बुवा! आपण नाही मारलं!' आणि पळून जातील. तू वाघाला बांधून नेऊन राजा समोर ठेव. तूच मारलेस वाघाला असे सांग. कोणीही गांवकरी तू मारले नाहीस असे म्हणण्याची छाती करणार नाही." वामनाने ही युक्ती सुचविली.

भीमसेनाने वामनाने सुचविले तसे अक्षरश: केले. गावकऱ्यांनी वाघाला ठार करतांच भीमसेन एक लता घेऊन झुडपाआडून बाहेर आला व तो थोडा नजरेआड होताच लोकांनी वाघाला ठार केल्याबद्दल गावकऱ्यांवर त्याने खूप राग



काढला. वाघाला ठार करणाऱ्यांचे डोके उडवितो, म्हणाला. गावकरी घाबरून जाऊन आपापल्या वाटेने निघून गेले.

नंतर भीमसेन राजधानीत वाघाला घेऊन गेला व राजाचे दर्शन करून म्हणाला–"महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणे मी वाघाला ठार केले आहे. आता राजरस्त्याने जाणाऱ्यांना कोणतेही भय किंवा भीती नाही!"

राजा भीमसेनाच्या पराक्रमावर खूष झाला. भीमसेनाच्या शौर्य व साहसाची कीर्ती राज्यभर पसरली. स्वत:ची प्रशंसा व स्तुती ऐकून भीमसेनाला तो फार मोठा शूर असल्याचे वाटू लागले. त्याने

आपला नोकर वामन हा काय कामाचा असा आव आणून त्याच्याशी बोलायला सुरवात केली. वामनाने ते ओळखले.

आणखी काही दिवसांनी काशीराज्यावर शत्रू एक मोठे सैन्य घेऊन चालून आला. त्याने काशीच्या राजाला धमकी देऊन निरोप पाठविला–"शरण मागतोस की युद्धाला तयार होतोस?"

राजाने भीमसेनाला बोलावून घेतले व म्हणाला–"तू बरोबर वाटेल तेवढे सैन्य घेऊन जा, आणि शत्रूचा पाडाव कर!" राजाने त्याला कवच धारण करायला सांगून धनुष्य बाण व शस्त्रास्त्रांनी सज्ज करून एका हत्तीवर बसवून निरोप दिला.

भीमसेनावर मोठे संकट ओढवले आहे, हे वामनाने ओळखले. तो धनुष्य बाण घेऊन भीमसेनाच्या मागे हत्तीवर चढून बसला. त्यांच्या आजूबाजूला घोडे स्वारांचे सैन्य व पायदळ सैन्य चालत होते. हत्ती चालू लागला व सैन्य रणांगणावर येऊन पोचले.

शत्रूचे अफाट सैन्य समोर पाहून भीमसेनाच्या छातीत धडकीच भरली. तो हत्तीवरून उतरून पळून जायचा विचार करू लागला. ऐन वेळेवर वामनाने त्याला धीर दिला. त्याने त्याला हत्तीवर नीट बांधून बसविले नसते तर भीमसेन हत्ती-वरून खाली पडून हत्तीच्या वघोड्यांच्या पायाखाली चिरडून मेला असतां.

त्यानंतर वामनाने स्वतः कडे सेनापतित्व घेतले, त्याने हत्तीला तुफाना सारखे शत्रुसैन्यावर सोडले आणि शत्रूवर शरवृष्टी करून शत्रूला माघार घ्यायला लावले. तो शत्रूच्या राजाच्या अगदी जवळ गेला. शत्रुसैन्यात पळापळ सुरू झालेली पाहून वामनने शत्रूला, तो घायाळ झालेल्या स्थितीत कैद केले.

विजयी होऊन सैन्य परत आल्यावर खरा धनुर्विद्येत निष्णात कोण, हे राजाला कळले आणि राजाने वामनालाच आपला सेनापती म्हणून नेमले. वामनाने भीमसेनाला अनेक वस्तू भेट म्हणून देऊन त्याला निरोप दिला.



# अकबर बादशाह-१

हुमायून वारला तेव्हां त्याचा मुलगा जलालुद्दीन महंम्मद अकबर हा पंजाबात होता. अकबर चवदा वर्षांचा असतांनाच मोगल साम्राज्याच्या गादीवर आला. हुमायूनचा मित्र बैरामखान ह्याने अकबराचे संरक्षण केले.



साम्राज्याची सूत्रे हाती घेतांच अकबराला अनेक प्रश्नांना तोंड द्यावे लागले. शेरशाहच्या वंशज हेमू नावाचा सेनापती दिल्ली व आग्रा शहरांवर चालून आला. अकबराचे सैन्य व हेमूचे सैन्य यांचे युद्ध पानिपतच्या मैदानावर झाले. तेच युद्ध पानिपतचे दुसरे युद्ध म्हणून प्रसिद्ध झाले.





युद्धाच्या सुरवातीला हेमूच्या सैन्याला तोंड देणे अकबरच्या सैन्याला कठिण जाऊ लागले. आतां अकबरांचा पराभव होतो की काय वाटू लागले. परंतु अकबराचे नशीब बलवत्तर होते, म्हणून हेमूला एक बाण लागून तो घोड्यावरून खाली पडला. ते पाहून हेमूचे सैन्य किंकर्तव्य विमूढ परि-स्थितीत सापडले. म्हणून अकबराला



हेमूला कैद करून अकबराच्या सैनिकांनी अकबरासमोर हजर केले शत्रूचे ऋण राखू नये, या म्हणीला अनुसरून बैरामखानाने तत्क्षण हेमूचा वध करण्यास सल्ला दिला. परंतु नि:सहाय शत्रूला अशाप्रकारे ठार करणे अकबराला रुचले नाही. तेव्हां बैरामखानाने स्वत: तलवार उपसून हेमूचा शिरच्छेद केला.

अकबर व बैरामखानांचे स्वभाव परस्पर विरुद्ध असल्या कारणाने परस्परांमध्ये मतभेद व संशय वाढत गेले. अकबरावर अधिकार गाजविण्याचा बैरामखानाने प्रयत्न केला. ते अकबराला आवडले नाही व त्याने बैरामखानाला अधिकारपदा-वरून काढून टाकले. बैरामखानाने बंड केले, परंतु अकबराच्या हाती तो कैद झाला. शेवटी अकबराच्या अनुमतीने तो मक्केला जात असतां.





त्याच्या अनेक शत्रूंपैकी एकाने, जो एक अफगाण होता, बैरामखान कोणत्या वाटेने जात आहे याची माहिती काढून वाटेत लपून राहून त्याचा तलवारीने खून केला.

दुसरे पानिपत युद्ध जिंकल्याबद्दल अकबराला फार मोठी कीर्ती मिळाली. परंतु त्याला विजयाचा गर्व चढला नाही. त्याने मोठमोठ्या रजपूत संस्था-निकांशी मैत्रीचे संबंध जोडले. जयपूरचा राजा बिहारीमल्ल याच्या मुलीशी लग्न करून मैत्री पक्की केली.





त्यानंतर आपले साम्राज्य वाढविण्याचा त्याने निश्चय केला. अकबराची दुसरी राणी दुर्गावती राज्य करीत असलेल्या गोंडवाना राज्यावर होती. पती निवर्तल्यानंतर आपला लहान मुलगा वीरनारायण याच्या नावे राणी दुर्गावती राज्यकारभार पहात होती.

गोंडवाना जिंकण्याच्या हेतूने अकबराने आपला सेनापती आसफखान याला पाठविले, अकस्मात झालेल्या या स्वारीला तोंड देणे राणी दुर्गावतीला कठिण वाटत होते. तरी तिने व तिच्या सैन्याने अकबराच्या सैन्याशी शौर्य व साहसाने युद्ध केले.














राणीने स्वत : सेनापतित्व ग्रहण केले आणि अन्यायाने स्वारी करणाऱ्या अकबराच्या पन्नास हजारावर सैन्याला तोंड दिले. युवराज वीरनारायण सुद्धा रणांगणावर आला. आसफखानाने युवराजाला कोणत्याही प्रकारे कैद करण्याच्या हेतूने व्यूह रचला.

बाण लागल्याने युवराज जखमी झालेला पाहून आसफखानाने युवराजाच्या चारी बाजूला घेरा घातला. ती बातमी कळतांच राणी दुर्गावती ससैन्य तेथे आली व शत्रूशी युद्ध करून तिने युवराजाला सोडवून राजवाड्यात पाठविले. युवराजाच्या रक्षणासाठी अर्धे अधिक सैन्य गेल्याने राणीचा पक्ष कमजोर झाला. आतां पराभव निश्चित हे ओळखून राणीनेआत्महत्या करून घेतली.





राणी दुर्गावतीला वीरगती मिळाल्या-वर युवराज वीरनारायणाने सेनापतित्व स्वतःकडे घेतले. अकबराचे सैन्य मोठे असल्याचे माहीत असूनही वीर नारायणाने जिवात जीव असेपर्यंत शत्रूशी युद्ध करून शेवटी वीरगती प्राप्त केली.



# स्वकष्टार्जित कमाई

रुद्रपूर नावाच्या गावी नारोबा नावाचा एक लोहार रहात असे. तो सुऱ्या, विळे, कुदळी, कुऱ्हाडी, पाहारी वगैरे लोखंडी वस्तू तयार करीत असे.

लोखंडाच्या या वस्तू तयार करणे सोपे काम नव्हते. जळत्या भट्टीला भात्याने वारा करून त्यात लोखंड तापवून लालबुंद करावे लागे तसं तापलेले लोखंड गार व्हायच्या आत ऐरणीवर ठेवून घणाचे घाव घालून ठोकावे लागे. नारोबाच्या अंगात शारीरिक बळ खूप होते आणि घाम गाळून काम करायला उत्साहही होता.

नारोबाच्या मुलगा धोंडू भयंकर आळशी होता. त्याला कारण त्याची आई रखमा-बाई. रखमाबाईला मुलाने विस्तवाजवळ बसून काम करणे आवडत नसे. त्याचा मामा नोकरी करून पैसे मिळवी. तसे तिच्या मुलाने सुद्धा एखादी नोकरी करावी, विस्तवाजवळ बसून काम करणे बरोबर नाही, असे तिला वाटे. म्हणून तिने मुलाला पाटी पेन्सिल व पुस्तके विकत घेऊन शाळेत घातले.

नारोबाला हे सर्व मुळीच आवडले नाहीं. आपल्या कुळाची वृत्ती न करणे त्याला व इतरांना शोभणारी गोष्ट नाही असे त्याला वाटे. परंतु बायकोच्या विरुद्ध बोलण्याची त्याची छाती नव्हती.

धोंडू शाळेत जाऊ लागला खरा, परंतु विद्या त्याच्या डोक्यात शिरेच ना. "नाही तर नाही रे, भात्याजवळ बसून भाता चालवायला काय हरकत आहे रे, मुला?" असे नारोबा त्याला म्हणून थोडा रागावे. परंतु भाता करीत बसण्यापेक्षा रस्त्यावर उनाडक्या करणे धोंडूला जास्त बरे वाटे. म्हणून बापाच्या नजरेसमोर कधी न पडायचेच त्याने ठरविले.








घोंडू हळूहळू मोठा झाला. नारोबा विचार करू लागला, 'आपल्या मागे हे दुकान बंद होणार की काय? मी जेवढी मिळकत केली आहे ती दोन तीन दिवसात हा पोरगा उडवून टाकील. त्यानंतर हातात करवंटीच ना?'

त्याने बायकोला बोलावून म्हटले– "आपल्या लेकाला तू 'न घरका न घाटका' करून ठेवला आहेस आतां तरी जागा हो, म्हणावं! कुळाची वृत्ती शिकून घे!" त्याने बायकोला निरनिराळ्या प्रकारे सांगितले.

"तुम्ही अशी घाई कशाला हो करतां? तो या खेड्यात राहणे शक्य नाही. कोणत्या तरी नोकरीच्या शोधार्थ आहे!" रखमाबाई मुलावरच्या प्रेमाने म्हणाली.

नारोबा संतापून म्हणाला– "काय नोकरी करणार तो? त्याला आणि तुला सुद्धा घामाची कमाई म्हणजे काय हे कळेल तर ना! मी जी मिळकत करून ठेवली आहे त्यावर पुढील आयुष्य घालवू, असा विचार करीत असेल कदाचित्! माझ्या स्वकष्टार्जितापैकी त्याला एक कवडीसुद्धा मिळणार नाही! मी काम शिकून करू लागलो तेव्हांपासून आजपर्यंत मी दररोज निदान तीन रुपये डोळ्या-समोर आल्याशिवाय दुकान बंद केले नाही. याला तीन पावल्या तरी मिळवून दाखव, म्हणावं!" नारोबा म्हणाला.

इतक्यात तेथे घोंडू आला. त्याला रखमाबाई म्हणाली–"काय रे, ऐकलेस ना? तुझे बाबा तुला उडाणटप्पू म्हणत आहेत! तुला तीन पावल्या सुद्धा मिळवितां येणार नाहीत, म्हणत आहेत बाबा!"

घोंडू म्हणाला–"एवढेच ना! चुटकी वाजविण्याच्या आत मिळवून दाखवितो!"

घोंडू निघून गेला. परंतु पैसे मिळविणे हे किती कठिण आहे, हे कळले तर ना? पैसे काय झाडाला लागतात का? दुपारपर्यंत खूप हिंडला आणि डोके दुखू लागले. तेव्हां घरी येऊन आईला म्हणाला–"आई माझं डोके दुखते आहे. उन्हात फिरत होतो इतका वेळ!"

"आणलंस का रे काही मिळवून?" रखमाबाईने विचारले.

"नाही आई, जेवण झाल्यावर जातो पुन्हां!" घोंडू म्हणाला.

घोंडू जेवून खाऊन झोपला तो संध्या-काळी उठला. बापाने दुकानातून परत आल्यावर विचारले–"आणल्या का रे तीन पावल्या?" तर काय उत्तर द्यायचे? हा विचार करीत असतां त्याला एक गोष्ट सुचली. "आई, उद्यां मिळवून आणतो. आजपुरत्या तू आपल्या जवळच्या तीन पावल्या दे!"

बापासमोर मुलाची मान खाली होईल असे समजून रखमाबाईने तीन पावल्या काढून मुलाला दिल्या.

नारोबा काळोख पडेपर्यंत दुकानात काम करीत राहल्यावर दुकान बंद करून घरी आला. घोंडूने ऐटीत खिशातून तीन पावल्या काढून बापाच्या हातात देत म्हटले–"ह्या पहा!" नारोबाने त्या तिन्ही पावल्या लक्षपूर्वक खाली वर करून पाहिल्या व विचारले–"कोठल्यारे या?"

"सकाळपासून संध्याकाळपर्यंत बैला-सारखे काम करून मिळवून आणल्या आहेत!" ऐटीत उत्तर दिले घोंडूने.



"ही तुझी कष्टार्जित मिळकत नाही!" असे म्हणत नारोबाने त्या तीन पावल्या पेटलेल्या चुलीत फेकल्या.

दुसऱ्या दिवशी रखमाबाई मुलाला म्हणाली–"आज तरी मिळवून आण!" त्या दिवशी घोंडूने आईच्या नजरेआड तिच्या पेटीतून एक रुपया काढून घेतला आणि हलवायाच्या दुकानात तो मोडून एका पावलीची भजी व गुळदाणी घेऊन खाल्ली आणि उरलेल्या तीन पावल्या संध्याकाळी बापाच्या हातांत टाकल्या व म्हणाला–"ह्या मिळविल्या बघ!"

पहिल्या दिवशी सारख्याच तीन पावल्या हातात घेऊन नीट पारखून पाहून नारोबा

म्हणाले–"ही तुझी कष्टार्जित कमाई नाही! मला तू फसवू नकोस!" असे म्हणत नारोबाने त्या तीनही पावल्या चुलीत फेंकून दिल्या.

तिसऱ्या दिवशी धोंडूला आईच्या पेटीत काही मिळालं नाही. शिवाय स्वकष्टार्जित कमाई नाही हे बापाला कळेल ही भीती ही वाटली. आज खरोखरच स्वकष्टार्जित कमाई करून आणायचा त्याने निश्चय केला. त्या दिवशी रुद्रपूरला शनिवार असल्याने आठवड्याचा बाजार होता, तो बाजारात गेला आणि ओझे वाहून कमाई करू लागला. काळोख पडू लागेपर्यंत काम करूनही एक पावलीचीही कमाई झाली नाही. दुसऱ्या दिवशी उजाडतांच येऊन दुकानदाराची पेटी उचलून घरी पोचतो असे सांगून धोंडूने एक पावली मागून घेतली. दुसऱ्या दिवशी तशीच मेहनत करून आणखी एक पावली मिळविली आणि तिसऱ्या दिवशीही ओझी वाहून एक पावली मिळविली. संध्याकाळी घरी गेल्यावर बापाला तीनही पावल्या देत म्हणाला–"या घ्या तीन पावल्या!"

परंतु बापाने पूर्वी सारख्याच त्या तीन पावल्या चुलीत फेंकून दिल्या.

धोंडू चवताळून ओरडला–"बाबा, मी या स्वतःच्या मेहनतीने मिळवून आणल्या आहेत!" आणि विस्तवांतून तीनही पावल्या बाहेर काढण्याच्या खटपटीला लागला.

ते पाहून बाप स्मित करून म्हणाला–"बाळा, ही खरोखरच तुझी गाढी कमाई आहे! आतांपर्यंत मी दोनदां चुलीत पावल्या टाकल्या, पण तुला त्याचे काहीच वाटले नाही. कारण ती स्वकष्टार्जित घामाची कमाई नव्हती. आज तू पैसे मिळवून आणल्याची माझी खात्री झाली आहे. स्वकष्टार्जित कमाईचा कमाई करणाऱ्याला अभिमान वाटतो. फुकटाच्या कमाईची किंमत वाटत नाही!"

त्यानंतर धोंडू मेहनत करून पैसे मिळवू लागला व एक चांगला नागरिक झाला.



# अपशकुन

पशुपती कोणत्या तरी घाईच्या कामाने तालुक्याच्या गावी निघाला. ऐनउंबरठा ओलांडीत असताना शेजाऱ्याच्या गड्याचा मुलगा डोक्यावर नवे मडके घेऊन समोर आला. पशुपती थबकला.

"शकुन चांगला नाही. असल्या अपशकुनामुळे नुकसानच होतें. घरात येऊन हातपाय धुऊन काही वेळ गेल्यावर निघालात तर बरं होईल." नवऱ्याला निरोप द्यायला बाहेरच्या दारापर्यंत आलेली बायको म्हणाली.

"ह्या शकुन अपशकुन आणि मुहूर्त वगैरेवर माझा मुळीच विश्वास नाही." असे म्हणत पशुपती न थांबतां निघाला. परंतु ठरल्या प्रमाणे नवरा न परतलेला पाहून बायको काही तरी अनपेक्षित घडलं असावं, असे समजून रामशास्त्र्यांकडे गेली आणि सर्व वृत्त सांगितले.

"अपशकुनाचा दोष टळावा म्हणून शांत केली पाहिजे. शंभर रुपये खर्च येईल." असे शास्त्रीबुवा म्हणाले. पशुपतीच्या बायकोने शंभर रुपये दिले. शास्त्रीबुवांनी शांत केली.

आणखी दोन दिवस गेल्यानंतर पशुपती घरी परतला. बायकोच्या तोंडी सर्व ऐकून घेऊन पशुपती म्हणाला–"अपशकुनाचे फळ असे भोगावे लागले तर!"





# स्वार्थी पंडित

मराळ देशात पुष्पकांत नावाचा राजा राज्य करीत असतां त्याच्या दरबारात मुचिकुंद नावाचा एक पंडित होता. तो फार स्वार्थी व अहंभावी होता: प्रथम त्याच्या आश्रयाला राहून, त्याची सेवा करून व त्याचे हात गरम करून दिल्या-खेरीज कोणाला दरबारात पाऊल टाकणे शक्य नव्हते. या कारणासाठी कित्येक योग्य पंडित व कवींना राजाश्रय न मिळाल्याने परदेशात जावे लागले.

अशा परिस्थितीत कृष्णकांत नावाचा एक तरुण पंडित गुरुकुलात आपला विद्याभ्यास संपवून राजाश्रय घेण्यासाठी मराळ देशाच्या राजधानीत आला. थोड्याच दिवसात त्याला राजदरबारची परिस्थिती आणि मुचिकंदच्या स्वार्थपरतेची माहिती कळली. कृष्णकांतने आपल्या एका नातेवाईकाच्या मदतीने राजनर्तकी मंदारमाला हिचा परिचय करून घेतला. मंदारमाला कृष्णाकांतच्या पांडित्यावर खूष झाली व तिने राजाशी ओळख करून द्यायचे कृष्णकांतला वचनही दिले.

एक दिवशी मंदारमालाने राजसभेत नृत्य करायला जात असतां कृष्णकांतला सुद्धा बरोबर यायला सांगितले. राजनर्तकी बरोबर तिचा साथीदार म्हणून कृष्णकांत जात असल्यामुळे द्वारपालकाने त्याला अडविले नाही.

आपले नृत्य वगैरे संपल्यावर मंदारमाला कृष्णकांतचा परिचय करून देत राजाला म्हणाली—" महाराज, हा कृष्णकांत नावाचा एक तरुण युवक पंडित आहे. हा आमच्या गुरुवर्यांच्या धाकट्या बंधूचा मुलगा आहे. आपल्या दरबारी आश्रय मिळावा म्हणून आला आहे."

राजा कृष्णकांतकडे कुतूहल पूर्वक पाहात असतां कृष्णकांत म्हणाला—" महाराज, मी काशी क्षेत्रात विद्याभ्यास संपवून आलो आहे. मी पंच महाकाव्यां बरोबर षड-शास्त्रांचे अध्ययनही केले आहे. आशु-कविताठी करतो :"

श्री ल. ना. साळवी



राजा मान हलवून थोडा हसला. ते पाहून मनात चलबिचल होत असल्याने मुचिकुंद हेळणेच्या स्वरात म्हणाला— "इतकी विद्या संपादन केलेल्या पंडिताला पंडिताच्या मदतीने राजाश्रयास येण्याचे न सुचतां एका नर्तकीच्या शिफारसीची गरज भासावी का? काय पण दुर्दैव आहे!"

लगेच कृष्णकांत राजाला म्हणाला— "महाराज, अहंकार व स्वार्थ बुद्धी नसलेला खरा पंडित असतो. म्हणून आपल्या दरबारात जे थोर पंडित आहेत त्यांच्या व्यतिरिक्त कोणाची मदत घ्यावी हा विचार येऊन राज नर्तकीच्या आश्रयाला जावे लागले."

ते ऐकतांच राजाच्या कपाळाला आठ्या पडल्या व त्याने एकदां मुचिकंदाकडे सहेतुक पाहिले. मुचिकंद थोड्याशी करड्या स्वरात म्हणाला—" काल नाही तर परवा विद्याभ्यास संपवून आलेल्या पंडितात इतका नीच भाव! का! महाराज, आपण आतांच्या आतां या घमेंड खोराला दरबाराच्या बाहेर हाकलून द्यावे."

कृष्णकांत मंदहास करीत मुचिकुंदला म्हणाला—" बरोबरच्या पंडिताला दरबारातून काढून टाकायला सांगण्याची ही पद्धत नव्हे! शक्य असेल तर शास्त्रार्थात पराभव करावा! तेव्हां महाराजांची क्षमा मागून मी स्वतःच दरबारातून निघून जाईन! तसे झाले नाही तर आपण केलेल्या दुर्वर्तनाबद्दल आपल्यालाच क्षमा मागावी लागेल."

राजाने मुचिकुंद व कृष्णकांतच्या मध्ये शास्त्रार्थ करण्याचे ठरविले.

मुचिकुंदने कृष्णकांतला अनेक प्रश्न विचारले. त्याने सर्व प्रश्नांची सयुक्तिक उत्तरे दिली व सभासदांनी त्याचे कौतुकही केले.

आता प्रश्न करण्याची पाळी कृष्णकांत वर आली. मुचिकुंदला त्याने विचारले–"मी तुम्हांला तीनच प्रश्न विचारतो. आपण योग्य ते उत्तर द्यावे!"

"दहा जणांत वांटलेले थोडेसे वाढते ते काय? उत्तम प्रश्न म्हणून म्हणविणारे ते काय? उत्तम गुरु कसा असावा?" कृष्णकांतने हे तीन प्रश्न विचारले.

हे प्रश्न ऐकतांच मुचिकुंदला राग आला. व त्याने तोंडाला आली ती उत्तरे दिली. त्या पैकी एक ही उत्तर बरोबर नसल्याचे कृष्णकांतने सांगितले.

"तर मग तूच काय ती योग्य उत्तरे सांगून महाराजांकडून आणि सभासदांकडून शाबासकी मिळव!" मुचिकुंद म्हणाला.

कृष्णकांत म्हणाला–"दहा जणांत थोडे वाटल्यावर वाढणारा तो आनंद! शंका समाधानाकरितां विचारलेला प्रश्नच उत्तम प्रश्न म्हणविला जातो. प्रश्नाचा उपयोग ज्ञानप्राप्ती असल्या कारणाने विद्यार्थ्यांत ज्ञान पिपासा उत्पन्न करणाराच थोर गुरु. अशी तृष्णा असणाऱ्याचे कधीच समाधान होत नाही. आणखी ज्ञान मिळावं म्हणून त्याची ज्ञानतृष्णा वाढतच जाते!"

राजाने समाधान झाल्यासारखी मान डोलविली. सभासदांनी आनंदातिरेकाने टाळ्या वाजविल्या. मुचिकुंद पराभव झाल्या मुळे मान खाली घालून बसला. तेव्हां कृष्णकांतने, मुचिकुंदने कित्येक योग्य पंडितांचा स्वार्थ बुद्धीने केलेल्या अपमानाचे वर्णन करून सांगितले.

सर्व ऐकून घेतल्यावर राजा रागाने म्हणाला–"मी अशा मूर्खाला एक थोर पंडित म्हणूनआपल्या दरबारात ठेवले होते!"

कृष्णकांत म्हणाला–"महाराज! आतां घडले यावरून मुचिकुंद मध्ये जो गर्व आणि स्वार्थ बुद्धी होती त्यांचा शेवट झाला असावा, असे मला वाटते. आपण त्यांना क्षमा करावी!"

राजाने मौनपणे होकारार्थी मान हल-विली. मुचिकुंदने राजाला व कृष्णकांतला कृतज्ञता पूर्वक नमस्कार केला आणि मान खाली घालून सभेतून निघून गेला.



# कर्ज वसूली

नरसोबा कोणाकडून कर्ज घेई ते परत फेडण्याच्या वेळी अनेक भानगडी करी. एकदां त्याने शेजारच्या रामरावांकडून मोठा प्रसंग आल्याचे सांगून दोनशे रुपये कर्जाऊ घेतले. त्यानंतर चारपांच महिने गेले तरी कर्जाची रक्कम फेडण्याचे नाव नाही. घरी येऊन कोणी विचारले तर कोणाकरवी घरात असूनही घरात नाही असे सांगवी.

एक दिवशी नरसोबा आठवड्याच्या बाजारात दुभती गाय विकत घ्यायला जात आहे असे रामरावांना कळले. ते थोड्या उशिरां बाजाराला गेले. नरसोबाला त्याला हवी होती तशी गाय मिळाली नाही.

दोघे काळोख पडू लागल्यावर घरी येत असतां रस्त्याच्या बाजूला असलेल्या झाडीतून एक जण एक जाडजूड दांडके घेऊन आला व त्यांना दरडावून म्हणाला–"शहाणपणाने जवळ असतील ते पैसे काढून द्या, नाहीतर डोकी फुटतील."

चोर जवळ यायच्या आत नरसोबा त्याच्या जवळची पैशांची पिशवी रामरावाला देत म्हणाला–"या पिशवीत तीनशे रुपये आहेत. मूळ व व्याजाची रक्कम जाऊन जी रक्कम उरेल ती मागाहून दिली तरी चालेल."

चोराने पिशवी हिसकावून घेतली आणि पळून गेला.

दुसऱ्या दिवशी रामरावांनी गड्याच्या हाती नरसोबाकडे वीस रुपये पाठवून ही चिट्ठी पाठविली–"नरसोबा, तुझे कर्ज फिटले. रात्री जो चोर आला होता तो सोंगा माझा गडीच होता. मूळ व व्याज जाऊन उरलेले वीस रुपये सोबत पाठवीत आहे."





# हुबेहूब तसवीर

चिखल गावचे इनामदार चितू तात्या यांना कोणी व्यर्थ आडंबर केलेले आवडत नसे. त्यांच्या आश्रयाला राहणारे त्यांच्यात जे गुण नाहीत ते सांगून त्यांची खोटी प्रशंसा करून इनामदारांना खूष करण्याचा प्रयत्न करू लागले की अशा लोकांची पाठ थोपटण्या ऐवजी ते त्यांना फैलावरच घेत.

चितूतात्यांच्या वाड्यात त्यांच्या पूर्वजांच्या मोठमोठ्या तसबिरी होत्या. त्या चित्रांत असलेले त्यांचे सर्व पूर्वज तेजस्वी, व शूर, वीर व गंभीर चेहऱ्याचे असलेले चित्रित होते. आपल्या पूर्वजांचे खरे खुरे रूप, सौंदर्य व स्वभाव कसे होते हे त्यांनी गावातल्या वडील धाऱ्या लोकांच्या तोंडी ऐकले होते. आपल्या आश्रयदात्यांना खूष करण्यासाठीच चित्रकारांनी त्यांच्या रूप सौंदर्याचे होते नव्हते ते चित्र थोडे वाढवून व चित्रित केले असावे, असे चितूतात्यांना वाटत असे.

चितूतात्यांच्या मनात आपले पूर्ण तैलचित्र काढवून घ्यावे असे आले. परंतु त्यात उगाच आपल्याला खूष करण्यासाठी वाढवून काहीच चित्रित न करतां जसे आहे तसेच हुबेहूब चित्र असावे अशी त्यांची इच्छा होती. माधवनगर संस्थानात राहणारा गोविन्दभट हा चित्रकार उत्तम चित्रकार असून नैसर्गिक व हुबेहूब चित्र काढण्यात हुशार असल्याचे त्यांनी ऐकले होते. म्हणून त्यांनी त्याला बोलवून घेतले आणि म्हणाले–"तुम्ही थोर चित्रकार असल्याचे मी ऐकले आहे. असतील नसतील ते गुण आणि रूपरंग न दर्शविता, जसे आहे तसेच हुबेहूब चित्र काढले पाहिजे. तसे केलेत तरच मी तुम्हांला द्यावयाचे ठरविले आहे ते इनाम मिळेल."

गोविंदभटाने होकार देऊन तसवीर काढायला सुरवात केली व थोड्याच दिवसात तसवीर पुरी झाली. नंतर तीत थोडाफार सुधार करून ती दाखवायला इनामदारांकडे घेऊन गेला व म्हणाला–"प्रभो, आपण हुकूम केल्याप्रमाणे आपले यथातथ्य चित्र तयार केले आहे. एकदां आपण पहावे!"

गोविंद भट म्हणाला त्यात खोटे असें काहीच नव्हते. कारण त्याने खरोखरच इनामदारांचे जसेच्या तसेच स्वाभाविक चित्र काढले होते. परंतु गोविंदभटाची परीक्षा घेण्याच्या हेतूने इनामदार म्हणाला–"तुझ्या चित्रकलेची वाखाणणी न करतां मी विचारले की हे माझेच हुबेहूब रूप आहे तर ते तू कसे सिद्ध करशील?"

गोविंद भट म्हणाला–"प्रभो! आपली तसवीर काढून झाल्यावर मी रामपूरचे इनामदार रघुनाथराव यांना दाखविली. त्यांनी हे आपले प्रतिरूप असल्याचे तत्क्षण सांगितले."

ते ऐकून आश्चर्य चकित होऊन इनामदार म्हणाले–"हे पहा रघुनाथराव व आमच्या कुटुंबात फार जुने वैर आहे. शिवाय त्याला चित्रकला म्हणजे काय याचा गंधही नाही. अशा व्यक्तीस माझी तसवीर दाखविण्यात तुमचा काय हेतू होता, मला कळले नाही."

"रघुनाथराव व आपल्या मध्ये वैरभाव आहे, हे मला माहीत आहे. म्हणून त्यांना चित्र दाखविले की ते काही आडपडदा न ठेवतां खरखरं तेच सांगण्यात संकोच करणार नाहीत, असे मला वाटले. म्हणून मी















त्यांना दाखविले. आपल्या उजव्या कान-शिली खाली पडलेला जखमेचा वण कसा छान काढला हे सांगून ते म्हणाले–"तू संकोच सोडून जसा आहे तसेच चित्र काढलं आहेस. त्यांना राग आला तर काय होईल ते तूच पहा म्हणजे झालं!"

"अस्सं होय!" असे म्हणून एक क्षण थांबून गोविंद भटाला विचारले–"येथल्या दरबाऱ्यांपैकी कोणाला दाखविलेस का?"

"होय, दाखविले की, दिवाण साहेबांना राणीसरकारांना! त्यांचे मत त्यांना आपणच विचारावे!" गोविंद भट म्हणाले.

चितूतात्यांनी दिवाणांना निरोप पाठवून ते आल्यावर त्यांना आपल्या तस-बिरीविषयी त्यांचे मत विचारले.

"गोविंद भटाने चितारलेल्या चित्रात मला एक दोष दिसला. त्याने आपल्या पूर्वजांच्या चित्रांसारखे भव्य रूप आपल्या या चित्रांत चितारले नाही. वस्तुत: आपले रूप म्हणजे श्री कृष्णदेवरायांसारखे भव्य गंभीर आहे!" दिवाण म्हणाला.

नंतर इनामदारांनी आपली तसवीर आपल्या पत्नीस दाखविली. चित्राकडे ध्यान पूर्वक पहात त्या बाई म्हणाल्या–"या चित्रात तुमचं व्यक्तिमत्व तुमच्या पूर्वजांहून कोणत्याही प्रकारे कमी नाही, परंतु वयाच्या बाबतीत तुमच्या आतांच्या वयापेक्षा चित्रातलं वय पांचसहा वर्षे जास्तच दिसतं आहे."

चितूतात्या ते ऐकून मंदहास करीत गोविंद भटाकडे पहात म्हणाले–"माझ्या विषयी श्रद्धा व भक्ती असल्या कारणाने दिवाण आणि माझ्यावरील प्रेमानुरागामुळे महाराणी चित्रा विषयी यथातथ्य ते सांगू न शकणे साहजीक आहे. म्हणून माझ्या विषयी सद्‌भाव नसलेल्या इनामदार रघुनाथचे मतच जास्त बरोबर आहे. माझे चित्र तुम्ही खरोखरच यथातथ्य हुबेहूब असेच काढले व थोर चित्रकार म्हणून नावलौकिक वाढविला हे ठीक च झाले!"

नंतर गोविंदभटाचा मोठ्या थाटामाटाने इनामदारांनी सत्कार केला.






हिरण्यकश्यपाने प्रल्हादाला मिठी मारून म्हटले–"प्रल्हादा! तुझ्यामुळे मला माझा हाडवैरी विष्णू ह्याच्यावर सूड उगवायला संधी मिळत आहे!" असे म्हणत हिरण्यकश्यपाने आपली गदा उचलली आणि नरसिंहावतार घेऊन आलेल्या विष्णूशी द्वंद्वाला पुढे सरसावला. शेवटी नरसिंहाने भयंकर गर्जना केली आणि हिरण्यकश्यपावर झडप मारून त्याला उचलले आणि सभामंडपाच्या द्वारा जवळ घेऊन गेला.

दाराच्या उंबरठ्यावर बसून नरसिंहाने हिरण्यकश्यपाला मांडीवर उताणे झोपविले आणि आपल्या तीक्ष्ण नखांनी हिरण्य-कश्यपाचे पोट फाडून त्याला ठार केले.

राक्षस वीर नरसिंहावर हल्ला करायला धावले. विष्णुचक्राने त्यांचा संहार केला.

नरसिंहाने आंतड्यांचा हार स्वतःच्या गळ्यात घालून घेतला आणि उग्र अट्टाहास केला. ते उग्ररूप पाहून सर्व देव भयभीत झाले. त्यावेळी प्रल्हाद नरसिंहावतार रूपातील विष्णूचे स्तवन करू लागला.

आपल्या वडिलांची अन्त्येष्टी वगैरे करून राज्यव्यवस्था पहा, असा प्रल्हादाला नरसिंहाने आशीर्वाद दिला नरसिंहावतारा-तील विष्णू अंतर्धान पावला. जयविजय यांचा अशातऱ्हेने पहिला जन्म संपला.

विष्णूच्या आज्ञेप्रमाणे प्रल्हादाने चिरकाल राज्य केले व आपला पुत्र विरोचन याचा राज्याभिषेक करून विष्णूची भक्ती



करण्यासाठी वानप्रस्थाश्रम ग्रहण केला. विरोचनानंतर त्याचा मुलगा बली गादीवर आला. क्षीरसागराचं मंथन झालं त्यावेळी उच्चश्रवा नावांचा जो घोडा निघाला होता तो बलीने बळकावला होता. राक्षसांचा शिल्पकार मयासुर याने त्याला भूमीवर, पाण्यावर आणि अंतरिक्षांत चालू शकणारं एक वाहन यार करून दिलं.

अमृत त्यांना मि नये यासाठी जी लबाडी झाली होती त्याचा प्रतिकार करण्याच्या हेतूने बलीने देवांशी युद्ध सुरू केले. अमृत प्राप्तीच्या सहाय्याने देवांनी राक्षसांना शौर्य व साहसानं तोंड दिले. बलीचे इंद्राशी भयंकर युद्ध झाले. देव-दानवांची समोरासमोर व गनिमी काव्याने अनेक युद्धे झाली. या युद्धात राक्षसांचा पूर्ण पराभव झाला. राक्षसांचे गुरू शुक्राचार्य यांनी संजीवनी विद्येचा प्रयोग करून राक्षसांना पुनर्जीवित केले.

पराभव झाल्याने बलीचे धैर्य खचले नाही. द्विगुणित उत्साहाने त्याने राक्षस सैन्यांची जुळवाजुळव केली आणि सर्व भूमंडल जिंकले आणि त्याच्यावर उत्तम तऱ्हेने राज्य करू लागला आणि बलीचक्रवर्ती या नामे प्रसिद्ध झाला. शुक्राचार्यांनी त्याच्या हस्ते शंभर अश्वमेघ यज्ञ करविले.

बलीचा उत्साह वाढला व त्याने स्वर्गावर स्वारी केली. त्याच्या समोर टिकाव न लागल्याने इंद्रादी देव स्वर्ग सोडून अरण्याच्या आश्रयाला गेले. दिक्पाल बली चक्रवर्ती समोर नमले. बलीचक्रवर्तीचे राज्य स्वर्ग, मृत्यु व पाताळ लोकांत निरंकुश झाले. बली धर्म व न्यायाने राज्य करीत असतां इंद्राची आई अदिती पती कश्यप महर्षी यांच्या कडे गेली व आपली अपत्ये जे देव व इंद्र वगैरे, शची सह अरण्यात पळून गेले असल्याचे सांगून त्यांना परत स्वर्गाचे राज्य प्राप्त होईल असा काही मार्ग सुचविण्यास सांगितले.

त्यासाठी विष्णूचे स्मरण करून व्रते व अनुष्ठाने करण्यास कश्यपाने सांगितले. अदितीने त्या प्रमाणे व्रते व अनुष्ठाने करून विष्णूला प्रसन्न केले. विष्णूने तिच्या पोटी जन्म घेऊन देवांवरचे हे संकट दूर करण्याचे वचन दिले.

त्या प्रमाणे विष्णूने कश्यप व अदितीच्या पोटी वामनरूपात म्हणजे एका गिड्डाच्या रूपात जन्माला येऊन दशावतारापैकी पांचवा वामनावतार धारण केला.

वामन उपनयन संस्कार झाल्यावर वेदांचे अध्ययन पूर्ण करून व इंद्राचा धाकटा भाऊ म्हणून अदिती मातेच्या घरी वाढू लागला. त्यावेळी बली नर्मदा तीरी सर्व यज्ञ यागात श्रेष्ठ असा विश्वजित् याग करण्यात गुंतला होता. बली मोठ मोठी दाने करीत होता.

वामन एका बटूच्या रूपे कृष्णाजिन, कमंडल वगैरे धारण करून, एक छत्री घेऊन व खडाव घालून ब्रह्म तेज चेहऱ्यावर झळकत आहे अशा थाटाने बली चक्रवर्ती कडे आला. हळूहळू पावले टाकीत एका गोंडस बालकाला येत असलेला पाहून यज्ञमंडपातले सर्व लोक कुतूहलाने वामनाकडे पहात राहले. बली चक्रवर्ती वामनाला आनंदाने सामोरा गेला.

वामनाला पाहून बली चक्रवर्तीला अत्यानंद झाला. त्याने वामनाला विचारले— "बाळा, कोण रे तू? तुला बटूरूपात



आम्ही पहिल्यानेच पाहातो आहे. कोठे जाण्याचा विचार आहे?"

वामन म्हणाला—"मी तुझ्याच कडे आलो आहे, राजा! मी कोणाचं नाव सांगू, सर्वच माझे आहेत! परंतु मी तूर्त एकटाच आहे. एक भिक्षुक आहे! तुझे आजोबा पण शूरवीर होऊन गेले. आपल्या पराक्रमाने तू आपली कीर्ती, त्रिलोकात स्थापन केली आहेस!" ते ऐकून बली थट्टा करीत म्हणाला—"तुझं बोलणं मोठे विचित्र दिसतं आहे! तू माझ्या पराक्रमाच्या गोष्टी बोलत आहेस. माझ्याशी द्वंद्व युद्धाला तर आला नाहीस ना? मी यावेळी यज्ञ दीक्षा घेतली आहे



व म्हणून मला युद्धाचा उत्साहही नाही!"

"हे बली चक्रवर्ती, हे तू काय म्हणतोस? तू माझ्याशी थट्टा करीत असं बोलतो आहेस! परंतु तुझ्या थोर पराक्रमाच्या गोष्टी दिगदिगन्तात पसरल्या आहेत. तुझ्याशी बरोबरी मी काय करणार? तू जे दान करून एवढी कीर्ती संपादन केली आहेस ती ऐकून मी तुझ्याकडे एक याचक होऊन आलो आहे!"

"असं होय! मग तू काय वाटेल ते माग, मी द्यायला सिद्ध आहे!" बली म्हणाला. तेव्हां शुक्राचार्यांनी बलीला बाजूला बोलावून सावध केले—"तो वामन बटू नसून, स्वतः विष्णूच ते रूप घेऊन आला आहे! तुला फसवून तुझे सर्वस्व हरण करण्यासाठी आला आहे! त्याला कसलेही दान करण्याचा विचार सोड!"

बली म्हणाला—"विष्णू सारखा पराक्रमी माझ्याकडे भिक्षुक होऊन आला आहे; हे माझं केवढे भाग्य? एवढेच नव्हे तर माझा मोठा विजयच नाही का? मी दान करण्याचं वचन दिलं आहे, आतां नकार देऊन असत्य भाषण करू का?"

"आत्मरक्षणासाठी हे सत्य व हे असत्य असे मनात धरून बसतां कामा नये! अशा धर्माचं पालन करणं म्हणजे आत्महत्येसमान आहे!"

"त्याने माझे काही केले, मी काही ही झालो तरी तो माझा पराभव होऊ शकत नाही, मी दानवीर, धर्मवीर म्हणूनच म्हणविला जाईन! शिबीचक्रवर्ती सारखी दानशूर म्हणवून घेण्याची महत्वाकांक्षाही माझ्या मनात नाही. मी देतों असे सांगून भीतीने आतां देत नाही असे सांगून भितरा म्हणवून घेऊ का बली म्हणाला.

ते ऐकून शुक्राचार्यांना भयंकर राग आला. म्हणाले—"मी तुझा गुरु म्हणून तुझ्या हिताचे ते सांगितले व ते न ऐकतां तू माझा सदुपदेश धिक्कारून हट्टाला पेटला आहेस. तर तू आपलं राज्य व सर्वस्व घालवून बसशील, असा मी तुला शाप देतो."

बली म्हणाला—"गुरुदेव! मला शाप दिलात, तो व्यर्थच झाला. कारण मी सर्व गोष्टींना तयार होऊनच दान करायला सिद्ध झालो आहे ना! गुरूच्या उपदेशाचा धिःकार करून मी जो शाप मिळविला तो विष्णूनेच देवविला ही गोष्ट त्या विष्णूला माहीत झाली आहे. आता त्याने मला अन्यायाने फसविले असे होणार नाही. तुमच्या शापाचा परिणाम मला शेवटी हिताचाच ठरेल. म्हणून मी हा शाप आनंदाने स्वीकारतो."

ते ऐकून शुक्राचार्य निरुत्तरच झाले बली वामनाकडे जाऊ लागला तेव्हां शुक्र म्हणाला—"हे दानवनाथ! विष्णू भिक्षा मागायला येऊन तुला भिकारी किंवा आणखी काय करील, माहीत नाही. तुझं हे त्रिलोकाधिपत्य, सर्व वैभव व संपदा ही इतके कष्ट करून कशाला संपादन केलीस? देह असेल तर ना हे सर्व उपयोगी रहाते!"

बली म्हणाला—"राज्य, संपत्ति व वैभव ही शाश्वत नाहीत; ही जशी आली तशीच जाणार नाहीत का? हे शरीर देखील शाश्वत नसतंच!"

शुक्र म्हणाला—"तुझा हा नाश तुझ्या एकट्याचाच नाही, दानवकुलाचा आहे, हे तुला कळायला हवे!"



"एवढेच नव्हे, एका दानवकुलोत्पन्नाने धर्माचे पालन केले आणि विष्णूला भिक्षा घातली. अशी दानवकुलाची कीर्ती सुद्धा होईल नाही का?" असे म्हणत बली वामनाजवळ गेला.

दानवराज्ञी विंध्यावलीने स्वर्णकलशाने पाणी ओतले व सोन्याच्या ताम्हनात वामनाचे पाय धुतलेले पाणी आपल्या मस्तकावर सिंचन करून बली वामनाला म्हणाला—"हे वामनरूपा! तुझ्या सारख्याने माझ्याकडे दान भिक्षा मागायला याव हे माझं सुकृतच म्हटलं पाहिजे! तुला जे पाहिजे असेल ते माग! राज्य, संपदा, राजवाडा, मणी, सुंदर स्त्रियां, उपजाऊ



जमीन सर्व साम्राज्य, किंबहुना माझा हा देह सुद्धा तुझाच आहे !"

वामन म्हणाला–"हे महाबली, जरा थांब ! तू हे सर्व जे म्हणालास त्याची मला काय गरज? कृष्णाजन धारण करणाऱ्या माझ्यासारख्या ब्रह्मचाऱ्याला फक्त तीन पावलां एवढी जागा मला पुरे ! तीन पावला एवढी जमीन ही दिगन्तपर्यंत पसरलेल्या साम्राज्यातला अगदी लहानसा तुकडा सुद्धा मला तो त्रिलोक मिळाल्यासारखाच आहे !"

"ठीक तर ती तीन पावलंभर जागा घे !" असे म्हणत बली जलकलशाने अर्घ्य देऊ लागला तेव्हां तोटीतून पाणीच आले नाही. कारण शुक्र सूक्ष्म रूप धारण करून तोटीच्या तोंडाजवळ येऊन बसले व पाणी पडू दिले नाही.

वामनाने दर्भाची काडी घेऊन तोटीत काही अडकले असल्यास ते काढण्यासाठी कोरून पाहिले. त्यामुळें शुक्राचार्यांचा एक डोळा फुटला व ते एकाक्ष झाले. अडथळा बाजूला होताच बलीच्या हाताने वामनाच्या ओंजळीत पाणी पडले. दानविधी पूर्ण होताच बली म्हणाला–"आतां तू आपल्या पावलांनी मोजून जागा घे !"

वामनाचा देह एकाएकी वाढला आणि त्याला विराट रूप आले. लांबी रुंदी एवढी वाढली की सर्व पृथ्वी एका पावलाने व्याप्त झाली. वामनाच्या विराटरूप पावलाची सावली सर्व भूतलावर पसरली व सर्वत्र अंधकार पसरला. नंतर सर्व आकाश दुसऱ्या पावलाने मोजले गेले. सूर्यचंद्र व सर्व नक्षत्रमंडल त्याच्या पावलाला लागलेल्या रेणुकणासारखे दिसू लागले. तेव्हां ब्रह्मदेवाने आपल्या कमंडलातल्या पाण्याने विष्णुपादावर अभिषेक केला. त्या विष्णुपादावरून घसरून जे पाणी वाहू लागले ते आकाशगंगा होऊन स्वर्गात मंदाकिनी नामे वाहू लागले.

"बली चक्रवर्ती! मी आपले तिसरे पाऊल कोठे ठेवू ?" असे त्रिविक्रम वामनाने

विचारले. बली म्हणाला–"हे त्रिविक्रमा! हे पहा, माझे डोके, यावर ठेव!" असे म्हणत बलीने समोर डोके वाकविले.

विष्णूने आपले विराटरूप सोडले आणि स्वस्वरूप वामनरूपे प्रकट होऊन आपले तिसरे पाऊल बलीच्या डोक्यावर ठेवले व म्हणाला–"बली, माझ्या दोन पावलांनी पृथ्वी व आकाश दोन्ही व्याप्त केले पण तिसरे पाऊल तुझ्या सर्व डोक्याला ही व्याप्त करू शकत नाही!"

तेव्हां प्रल्हादाने येऊन म्हटले–"माझा नातू बली तुझा शत्रू होऊच शकत नाही! त्याच्यावर करुणा, कृपा कर!" या शब्दात प्रल्हादाने विनविले.

बलीची राणी विंध्यावली म्हणाली– "हे वामन श्रेष्ठा! माझ्या पतीस कोणत्याही प्रकारची हानी होणार नाही, असा अनुग्रह करणेच तुला योग्य होईल!"

वामन म्हणाला–"माते! कोणालाही तुझ्या पतीस केव्हांही कशा प्रकारची ही हानी करणे शक्यच होणार नाही! म्हणून तर मी एक याचक होऊन आलो व दान मागितले; त्याचे धर्मबल असेच आहे!" नंतर प्रल्हादाकडे वळून म्हणाला–"बली मला किती प्रियपात्र आहे, माहीत आहे का?" असे म्हणत वामन विष्णुरूपात लांब वेताच्या दंडा सहित प्रकट झाला.

नंतर म्हणाला–"हे बली चक्रवर्ती! आजपर्यंत तुझी बरोबरी करू शकेल असा कोणी जन्मलाच नाही व पुढेही जन्मणार नाही! आदर्श शासन करणाऱ्या चक्रवर्तीत तुझेच नाव प्रथम राहील. मी तुला सुतलांत पाठवीत आहे. तू पाताळ लोकाचा अधिपती म्हणून राहशील आणि शांति व सुखपूर्वक चिरंजीवी होशील. तुझी राणी, तुझे आजोबा प्रल्हाद तुझ्या बरोबरच राहतील. तुझ्या सुतालाचे द्वारावर मी सर्वदा दिसेन व सर्वदा दंडपाणी म्हणून सर्वांचे रक्षण करीत तुझे रक्षण करीन!" असे म्हणत वामन अंतर्धान पावला.





# तीन प्रश्न

एकदां एका राजाला विचार करीत असतां सहज मनांत आले, कोणतेही काम केव्हां सुरू करावे? कोणाचा सल्ला घ्यावा? अनुसरण करण्यासारखा उत्तम धर्म कोणता?

त्याने या प्रश्नांची जो उत्तम उत्तरे देईल त्याला मोठे इनाम मिळेल असे दवंडी पिटवून राज्यभर जाहीर केले.

दवंडी ऐकून पुष्कळ विद्वान मंडळी राजाकडे आली. कोणतेही काम केव्हां सुरू करावे, या प्रश्नाचे उत्तर काही जणांनी दिले की, पंचांग पाहिले तर शुभ मुहूर्त कळतो. काही जण, जे काम असेल त्याला अनुरूप योग असतो म्हणाले. आणखी काही जण म्हणाले, गरजेप्रमाणे काम आधी किंवा नंतर करावे लागते!"

कोणाचा सल्ला घ्यावा या प्रश्नाचे उत्तर काही जणांनी मंत्र्यांचा सल्ला घ्यावा असे दिले. आणखी काही जणांनी विद्वानांचा सल्ला घ्यावा, म्हटले. काही जणांनी सामंतांचा सल्ला घ्यायला सांगितले.

उत्तम धर्म कोणता या प्रश्नाचे उत्तर काही जणांनी शास्त्रज्ञान संपादन करणे सुचविले तर काही जणांनी व्रते अनुष्ठाने करण्याचा सल्ला दिला. आणखी काही जणांनी युद्ध करणेच श्रेष्ठ धर्म सुचविले.

इतक्या जणांनी इतकी उत्तरे दिली, परंतु राजाला त्यातले एकही उत्तर समाधानकारक वाटले नाही.

राजधानीला लागून एका जंगलात एक ऋषी रहात होते आपण त्यांच्याकडे जाऊन प्रश्न विचारून पहावे, असे राजाला वाटले.

ते ऋषी आपल्या आश्रमाबाहेर कधी पडत नाहीत आणि आश्रमात सामान्य लोकांनाच प्रवेश आहे, असे राजाला कळले. म्हणून राजा सामान्य प्रजेच्या वेषात,



बरोबर काही अंगरक्षकांना घेऊन गेला. बाहेरच तो घोड्यावरून उतरला आणि एकटा आश्रमात गेला आणि ऋषींच्या पर्णशाळे जवळ आला.

त्या वेळी ऋषी पर्णशाळेच्या समोर लावलेल्या झाडांची आळी साफ करीत होते. राजाने त्यांना नमस्कार केला व तो नमस्कार स्वीकारून ऋषी आपल्या कामात गर्क झाले.

राजा त्यांना नम्रपणे म्हणाला—ऋषी वर्य, मी आपणाला तीन प्रश्न विचारून त्यांची उत्तरे आपणांकडून मिळतील या आशेने आलो आहे. कोणतेही काम केव्हां सुरू करावे? कोणाकोणाचा सल्ला मान्य करावा? आचरणात आणण्यासारखा उत्तम धर्म कोणता?"

राजाचे प्रश्न ऐकेपर्यंत स्वस्थपणे बसलेले ऋषी उत्तर न देतां पुन्हा आपल्या कामात गर्क झाले. तेव्हां राजा त्यांना म्हणाला—"आपण थोडी विश्रांती घ्यावी, मी आपले काम करतो." राजाला कुदळ देऊन ऋषी जमिनीवर उताणे निजले.

राजाने चार आळी खणून गवत वगैरे काढून झाडाला पाणी घालायला तयार करून ठेवली आणि पुन्हा आपले तीन प्रश्न ऋषीला विचारले. परंतु ऋषीने उत्तर दिले नाही आणि राजाच्या हातातून खुरपे घेऊ लागला. राजाने खुरपे दिले नाही. सूर्यास्त होईपर्यंत राजा आळी करीत राहिला. काम संपले. राजाने खुरपे खाली जमिनीवर ठेवले. आणि ऋषीला म्हणाला—"ऋषीवर्य आपण थोर ज्ञानी पुरुष म्हणून आपली कीर्ती ऐकून आपल्या शंकांचं समाधान मिळावं म्हणून आपणां कडे आलों आहे. आपणांला ते शक्य नसेल तर सांगावे, मी आपल्या वाटेने निघून जाईन."

"कोणीतरी येतो आहे, पाहूया तरी विशेष काही आहे का!" ऋषी म्हणाले. राजाने मागे वळून पाहिले तेव्हां त्याला जंगलातून एक माणूस येत असलेला दिसला. तो आपले पोट दोन्ही हातांनी घट्ट आवळून धरून येत होता. त्याच्या हातांच्या बोटां-तील फटींतून रक्त बाहेर येत होते. तो राजा होता तेथपर्यंत कसाबसा आला आणि कण्हत बेशुद्ध होऊन पडला राजाने व महर्षीने त्याचे कपडे बाजूला सारून पाहिले तर त्याच्या पोटाला मोठी जखम झालेली दिसली. राजाने बराच वेळ पाण्याने ती जखम धुतल्यावर त्याने काही तरी प्यायला मागितले. राजाने पर्णशाळेत जाऊन पाणी आणून त्याला पाजविले.

इतक्यात चांगला काळोख पडला. राजा व ऋषी दोघांनी मिळून त्या घायाळ व्यक्तीस पर्णशाळेच्या आतल्या बाजूला उचलून नेले. राजा हाताचीच उशी करून झोपला आणि उजाडल्यावर उठला.

राजा जागा झाल्याचे पाहून ती घायाळ झालेली व्यक्ती खाटेवरून उठून म्हणाली—"महाराज, मला क्षमा करावी!"

"तू कोण? तुला मी कां क्षमा करावयाची?" राजाने विचारले.

"आपण मला ओळखत नाही, परंतु मी आपणांस ओळखतो. तुम्ही एकदां माझ्या वडील भावाला फाशी दिलीत आणि त्याची सर्व इस्टेट स्वाधीन करून घेतलीत. तेव्हां मी आपल्याला ठार करून सूड उगवायचे ठरविले होते. म्हणून मी आपला शत्रू आहे. आपण ऋषींच्या दर्शनाला गेले



असल्याचे ऐकून आश्रमातून आपण परताल त्या वेळी वाटेत आपल्याला ठार करण्याच्या हेतूने मी एका झुडपात लपून बसलो होतो. परंतु आपण आला नाहीत, हे पाहून मी झुडपांतून बाहेर आलो व आपणाला शोधत निघालो. परंतु आपल्या अंगरक्ष-कांनी मला ओळखले आणि माझ्यावर वार केला. मी कसातरी त्यांच्या हातातून निसटून आलो. परंतु तुम्ही माझी जखम धुऊन रक्त थांबविलेत. तसे तुम्ही केले नसतेत तर रक्तस्राव होत राहिला असता व मी मेलो असतो. मी आपणांला ठार करायला निघालो होतो, या उलट आपण माझं रक्षण केलेत. आतां तुम्ही मला

**जिवंत सोडलेत तर माझी मुले आपले दास म्हणून काम करायला तयार राहतील !"**

आपल्या शत्रूशी इतक्या सहजी मैत्री जोडली गेल्या बद्दल राजाला फार आनंद झाला. राजाने त्या व्यक्तीला राजवैद्याकडे पाठवून चिकित्सा करून त्याच्या भावाची इस्टेट परत करण्याचे वचन दिले.

राजा पर्णशाळेतून बाहेर आला त्यावेळी ऋषी आळी करीत असलेले दिसले. राजाने जवळ जाऊन नमस्कार केला व विचारले– "ऋषीवर्य ! माझ्या प्रश्नांची उत्तरे आपण दिली नाहीत !"

ऋषी हंसून म्हणाले–"तुझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळाली आहेत. कळली नाहीत का ? काल तू माझा अशक्तपणा पाहून माझी कीव येऊन स्वत खुरपे घेऊन आळी करीत राहिलास. तू निघून गेला असतास तर त्या माणसाने तुझा वध केला असता. म्हणून त्या संदर्भात काम सुरू करायला योग्य वेळ किंवा मुहूर्त कोणता तर तू आळी केलीस तो. तुला योग्य व्यक्ती पाहिजे होती, ती मी ! आणि तू मला मदत केलीस तोच योग्य धर्म होय ! नंतर तो मनुष्य धावत आला त्याची तू सेवाशुश्रूषा केलीस ती वेळच योग्य मुहूर्त. योग्य व्यक्ती तो मनुष्य आणि त्याला तू मदत केलीस हाच तुझा योग्य धर्म. तेव्हां लक्षात ठेव, चांगली वेळ किंवा मुहूर्त आतांच या क्षणीच ! कारण त्याच क्षणी आपल्या अंगात शक्ती असते. त्यानंतर काय होईल कोणाला माहीत ? नंतर उत्तम सल्ला देणारा कोण, हा प्रश्न आपल्याला इतर किती असले तरी काय फायदा ? ते वेळेवर भेटतीलच याची काय शाश्वती ? नंतर आपला मुख्य धर्म काय ? जवळच्या व्यक्तीला मदत करणे हाच धर्म होय ! कारण मानव धर्म हा जवळच्या व्यक्तीला मदत करणे हाच आहे !"

राजाला सर्व प्रश्नांची समाधानकारक उत्तरे मिळाल्याबद्दल फार आनंद झाला. राजाने ऋषीचे आभार मानले आणि राजधानीत परतला.



# वैद्याला पडलेला त्रास

वैद्यक शास्त्रात अपर धन्वन्तरी म्हणून प्रसिद्ध पावलेल्या नारायणशास्त्र्यांना एके दिवशी अर्धी रात्र उलटल्यावर, सुमारे एका कोसावरच्या कमलापूर गांवच्या जमिनदाराकडून निरोप आला की जमिनदार साहेबांच्या आजारी वडिलांना पहायला यावे.

तो निरोप घेऊन येणाऱ्या नोकराला नारायण शास्त्र्यांनी म्हटले–"कायरे, अर्धी रात्र उलटली, थंडी पडली आहे, तरी सुटका नाही तर चल. पण गाडी कोठे आहे ?"

"मालक घाईत ती गोष्ट विसरले. आपण चाल तच जावे लागणार !" नोकर म्हणाला.

नारायण शास्त्र्यांनी तरी लगेच एका बैलाची एक गाडी ठरविली आणि कमला पूरला निघाले. वाटेत गाडीचे चाक मोडले. चहू कडे काळोख आणि थंडीमध्ये त्रास सोसून त्यांना पायपीट करीत जमिनदाराच्या घरी जावे लागले. जाऊन पाहिले तर जमिनदाराच्या वडिलांना तसे फार काही झाले नव्हते. प्रकृती तशी बरीच दिसली. नारायण शास्त्री जमिनदाराला म्हणाले–"तुम्ही लवकर आपल्या सर्व नातेवाइकांना बोलावून घ्या !"

बाबांचा जीव धोक्यात असल्याशिवाय नारायण शास्त्री असे सांगणार नाहीत असा विचार करून जमिनदाराने बैलगाड्या, मेणे, पालख्या पाठवून जवळपासच्या गावांत राहणाऱ्या सर्व नातेवाइकांना बोलावून घेतले.

नारायण शास्त्र्यांनी जमिनदाराला एक औषधाची पुडी दिली आणि बाहेर दारात एक पालखी रिकामी होती तीत जाऊन बसले. आपल्या वडिलांची तब्येत इतकी गंभीर असतांना वैद्यबुवा कां निघाले, हे जमिनदाराला कळेना. म्हणून त्याने त्यांना जाऊन विचारले–"माझ्या बाबांच्या जिवाला तसा काही धोका नाही ना ?"

"तसं काही असतं तर मी कशाला निघालों असतों ? या मध्यरात्री मला इकडे यायला किती त्रास झाला हे तुम्हांला कळावे म्हणून मी तुमच्या सर्व मित्र मंडळींना व नातेवाइकांना बोलायला सांगितलं." एवढे सांगून नारायण शास्त्री निघाले.



## चांदोबातील नवलाई

### अगाध समुद्राच्या तळातला ठेवा



इ. स. १६२२ या वर्षी अमेरिकेतील फ्लोरिडा सामुद्रधुनीत एक मोठे तुफान आले होते. तेव्हां सॅण्टा मार्गरिटा आणि अटोका नावाची स्पॅनिश गलबते उलटली आणि तीनशे ऐंशी खलाशांसह सुमारे सहाशे कोटी डॉलर्स किमतीचे सोने समुद्रात बुडाले. त्यानंतर मेल फिशर नावाचा निधीचा शोध लावणारा अन्वेषक समुद्राच्या तळाशी पडलेल्या त्या सोन्यातले दहा टक्के सोने काढू शकला.

### वाळवंटात देवमासे

जियोफे फॅक्स या भूगर्भ शास्त्रज्ञाला सहाराच्या वाळवंटात तेलाचा शोध काढीत असतां देवमाशाचे अवशेष सांपडले. सुमारे चार कोटी वर्षांपूर्वी जिवंत असलेल्या देवमाशांच्या अवशेषाव्यतिरिक्त दगड रूपात पालटलेले मासे, मगरी यांची हाडे सांपडल्यामुळे सहाराचे वाळवंट (आफ्रिका खंड) हे एक महासागर होते हे कळते.



## तुम्हाला माहीत आहे का ?

१. गोव्याचे जुने नाव काय ?
२. आग्रा हे नाव कसे आले ?
३. दार्जिलिंगला ते नांव कसे मिळाले ?
४. काशी हे एकच शहर असून त्याला काशी आणि वाराणसी अशी दोन नावें कशी आली ?
५. आशिया खंडात सर्वात मोठे गुलाबाचे उद्यान कोणते ?
६. जगांत सर्वात उंच जागी असलेल्या रेल्वे स्टेशनाचे नाव काय ?
७. जगात सर्वात मोठी संगमरमरी दगडाची मशीद कोठे आहे ?

(समाधान : पान ६४)



# अनमोल ठेव

फार पूर्वी विक्रमसेन नावाचा राजा अमरावती राज्याचा अधिपती होता. त्याच्या मनात 'हांजी हांजी' करणाऱ्या अधिकाऱ्याविषयी थोडादेखील प्रेम किंवा आदरभाव नव्हता. कारण ते नेहमी राजाची खुशामत करीत–"तुम्ही इन्द्रासारखे चंद्रासारखे आहां! आपल्या राज्यात आपली प्रजा स्वर्गसुख उपभोगीत आहे!" वगैरे. राजाला हे मुळीच आवडत नसे.

म्हणून राजा मधून मधून वेष पालटून राज्यात हिंडे. तो एखाद्या सामान्य प्रजेसारखा दिसे. प्रजा आपल्या राज्यात खरोखरीच सुखी आहे की कष्ट भोगते आहे, हे त्याला प्रत्यक्ष पहायला मिळे. त्याला राजभोगापेक्षां खेडोपाडी जे अन्न मिळे तेच जास्त रुचकर वाटे.

एकदां राजा वेष पालटून एका जंगलातून जात असतां त्याला कोणीतरी दूर पावा वाजवीत असल्याचा आवाज ऐकू आला. राजा तो आवाज आला त्या दिशेने चालू लागला. थोडे अंतर चालून गेल्यावर राजाला एक धनगराचा मुलगा झाडावर बसून पावा वाजवीत असलेला दिसला. त्याचे वय सुमारे सोळा वर्षांचे होते. जुने फाटके कपडे घालून तो मुलगा असला तरी तो मुलगा एखाद्या राजबिंड्यासारखा होता. आपल्या सारखा वेष पालटून कोणी युवराज तर नसेल, असा संशयही राजाच्या मनात आला. राजाने त्याच्याशी बोलून चवकशी करून पाहिले तेव्हां त्याचे आईवडील फार गरीब असल्याचे त्याला कळले.

त्या धनगराच्या मुलाचे नांव सांब होते. राजाने विचारलेल्या सर्व प्रश्नांची त्याने योग्य ती उत्तरे दिली. त्याला कपट, लपवालपवी काही एक माहीत नव्हते.

श्री श्री. ना. सुखठणकर



"सांब, तू माझ्या बरोबर येशील का? मी तुझ्या अन्नवस्त्राची सर्व व्यवस्था करून देऊन तुला नोकरी देतो" राजा म्हणाला.

सांबने होकार दिला.

अमरावती नगरीत पोचल्यावर राज-वाड्यात पाऊल टाकल्यानंतर आपल्याला घेऊन आलेला थोर पुरुष त्या देशाचा राजा असल्याचे सांबला कळले. त्याने मनातल्या मनात राजाचे आभार मानले.

सांबने धनगराचे कपडे काढून राजाला शोभतील अशी वस्त्रे धारण केली. रत्नाभूषणे घातली. एक सुंदर फेटा बांधला. त्याला लिहितां वाचतां येत नव्हतं की राजसभेत बोलतांही येत नव्हते. त्याला सर्व शिक्षण देण्यात आले. काही काळ लोटल्यावर राजाने सांबला आपल्या खजिन्याचा अधिकारी म्हणून नेमले. कोटयावधी रुपयांच्या अनमोल वस्तू असलेल्या खजिन्यावर खजिनदार म्हणून सांबहून जास्त विश्वासपात्र माणूस राजाला दुसरा कोणी दिसला नाही.

खजिनदाराचे पद ग्रहण करण्यापूर्वी सांब राजाच्या परवानगीने एकदा आपल्या गावी जाऊन आई वडिलांना भेटून आला. तो प्रदेश आणि तेथील सर्व वस्तू मन भरून पाहून आला. त्याने आपला पावा मनसोक्त वाजवून घेतला. नंतर नातेवाइकांचा, मित्रांचा आणि सर्वांचा निरोप घेऊन कामावर रुजू झाला.

त्याच्या नातेवाइकांनी त्याला विचारले—"राजाचा दरबार कसा आहे?" त्याचे उत्तर देत तो म्हणाला—"तुम्ही राजदरबारी नोकरी करण्याचा विचारही मनात आणू नका. तुम्ही आहांत ते सुख तुम्हांला राजदरबारी मिळणार नाही."

त्यानंतर सांब अमरावतीला गेला आणि खजिनदाराचे पद त्याने स्वीकारले.

काही काळ लोटल्यावर राजा परलोकी गेला व त्याचा मुलगा राजा झाला. राजाच्या अधिकाऱ्यांच्या डोळयांत सांबला मिळालेले ते पद नेहमी सलत असे.



आतां नवा राजा सिंहासनावर आल्या-बरोबर ते अधिकारी राजाचे कान भरू लागले. "महाराज, आपल्या वडिलांचा विश्वास संपादन करून या सांबने सर्व खजिना रिकामा केला आहे. म्हणून त्याच्यावर सतत नजर ठेवणे आवश्यक आहे!"

आपले अधिकारी आपल्या हिताची म्हणून एखादी गोष्ट सांगू लागले तर तिकडे राजा दुर्लक्ष कसे करील? म्हणून राजाने त्यांना विचारले—"सांब जी लबाडी करतो आहे किंवा त्याने केली आहे ती बाहेर काढण्यासाठी काही उपाय सुचवाल की नाही?"

"आपल्या आजोबांच्या काळातली रत्नखचित मूठ असलेली एक तलवार खजिन्यात होती. ती आणून दाखवायला सांगावी!" एका कट करणाऱ्या अधि-काऱ्याने सुचविले.

राजाने सांबला बोलावून आजोबांच्या काळातली रत्नखचित मूठ असलेली तलवार आणून दाखवायला सांगितले.

सांब म्हणाला—"महाराज, आपल्या-वडिलांनी तलवारीच्या मुठीतली रत्ने काढून त्यांची आभूषणे करविली आहेत."

ती गोष्ट खरी असल्याचे सिद्ध झाले. त्या गोष्टीस साक्षीदार पुष्कळ जण होते.



राजा दुष्ट अधिकाऱ्यांना म्हणाला—"सांब तर या बाबतीत पूर्णपणे निर्दोषी दिसतो आहे!"

"महाराज, खजिन्यात असलेल्या सर्व वस्तूंची यादी करून घेऊन यायला खजिन-दाराला सांगावे. जुन्या यादीशी जुळवून ही नवी यादी पहावी. ज्या वस्तू गहाळ झाल्या असतील त्यांच्या संबंधी जाब विचारावा!" अधिकाऱ्यांनी सुचविले.

राजाने सांबने सर्व वस्तूंची यादी तयार करून आणली. ती जुन्या यादीशी जुळवून पाहिल्यावर एकही वस्तू गहाळ झाल्याचे आढळले नाही. राजाने स्वतः आपल्या अधिकाऱ्यांसह तपासणी केली

होती. खजिना पाहून राजाला फार आनंद झाला. सर्व वस्तू यथास्थान सुंदर तऱ्हेने नीटनेटक्या ठेवल्या होत्या. म्हणून तपासणी करणे सोपे गेले व पाहणाराला कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाही.

राजा खजिन्यातून बाहेर पडण्यापूर्वी सांबने जी व्यवस्था केली होती ती उत्तम असल्याचे सांगून निघणार इतक्यात दुष्ट अधिकाऱ्यांनी भिंतीला एक कपाट चोर दरवाज्या सारखे असल्याचे दाखवून त्यात काय ठेवले आहे ते दाखविण्यास सांगितले.

राजाने तो चोर दरवाजा उघडण्यास सांगितले. नंतर विचारले–"त्या वस्तू तू दिलेल्या यादीत कां दिल्या गेल्या नाहीत?"

"महाराज, क्षमा करावी. त्या जागी ठेवलेल्या सर्व वस्तू म्हणजे माझी अनमोल ठेव आहे. म्हणून आपल्याला दिलेल्या यादीत त्यातली एकही वस्तू नाही!" सांब म्हणाला.

ते ऐकून अधिकाऱ्यांनी केलेल्या सर्व तक्रारी खऱ्या आहेत म्हणावयाच्या असे राजाला वाटले. म्हणून राजा दरडावून म्हणाला–"प्रथम ते दार उघड!"

सांबने ते लोखंडी दार उघडले. त्या मागच्या भिंतीतल्या खोलगट जागी धनगराचे एक कांबळे, जुन्या वाहाणा आणि एक पावा आढळला.

राजा आश्चर्यचकित होऊन पाहू लागला. "हीच का तू म्हणालास ती अनमोल ठेव!" राजाने विचारले.

"महाराज, मी आपल्या वडिलांच्या काळात दरबारी नोकरीला लागलो त्या पूर्वी माझी इस्टेट ती एवढीच होती. मी सुखी होतो, तो नोकरीला लागलो त्या पूर्वीच्या काळातच." सांब म्हणाला.

सांब म्हणाला ते ऐकून राजाचे डोळे चांगले उघडले. सांबवर मयत राजाचा जेवढा विश्वास होता त्याहून जास्त विश्वास कनकसेन राजाचा बसला. त्याच्या विरुद्ध चाहाड्या सांगणाऱ्यांना राजाने दरबारातून काढून लावले.






[ ३ ]

[ पिंगळच्या मदतीने पद्मपाद सरोवरातून दोन मगरीची पिल्लें घेऊन बाहेर आला. नंतर पिंगळला आपला परिचय देऊन भल्लूक पर्वतावर बरोबर चलायला सांगितले आणि आपल्या वडिलाच्या वृद्ध गुरुंनी महामायिक नावाच्या मंत्रवेत्याविषयी सांगितलेला वृत्तांत पिंगळला सांगितला. पुढे.... ]

भल्लूक पर्वताच्या गुहेत वाहणाऱ्या एका नदीच्या डोहात एक जुनाट पडके देऊळ होते. त्या देवळात महामायिक नावाच्या एका मोठ्या मांत्रिकाने समाधी घेतली. त्याने समाधी घेतली त्या जागी तीन विशिष्ट अशा वस्तू होत्या. त्यांतली पहिली म्हणजे त्याच्या बोटातील अंगठी! ती अंगठी धारण करणाऱ्याला जमिनीतले काहीही, उदाहरणार्थ पुरलेला ठेवा दिसत असे. दुसरी वस्तू म्हणजे हिरेजडित मूठ असलेली एक तलवार! त्या तलवारीतून उडणाऱ्या ठिणग्यांमुळे, कितीही मोठा पराक्रमी शत्रू असो त्याचा नाश करायला त्या ठिणग्या समर्थ होत्या. तिसरी वस्तू म्हणजे सोन्याचा एक भूगोल! तो भूगोल ज्याच्या जवळ असेल त्याने तो भूगोल फिरविला तर जगातील कोणाही देश काबीज करावयाचा झाला तर त्याला ते



करणे क्षणार्धात शक्य होते. अशा त्या मंत्रशक्ती असलेल्या अनमोल वस्तू होत्या.

परंतु महामायिकाच्या हातांतून त्या तीन वस्तू मिळवायच्या झाल्या तर प्रथम चिलका सरोवरात मगरीच्या पिल्लांच्या रूपे राहणाऱ्या त्याच्या शिष्यांना पकडणे आवश्यक होते. त्या साठी पिंगळ नावाच्या एका कोळ्याच्या मदतीची गरज होती त्यानंतर त्याच्याच मदतीने महामायिकाची अंगठी, तलवार आणि भूगोल यांची प्राप्ती करून घेणे शक्य होते. या तीन वस्तू संपादन करणाऱ्या व्यक्तीसच पिंगळच्या वडिलांनी मागे सोडलेल्या मंत्र ग्रंथांचा उपयोग होणे शक्य होते.

"आमच्या वडिलांच्या गुरूने एवढे सांगून आम्हां तिघांच्या तोंडाकडे खोल नजरेने पाहिले. चिलका सरोवरात मगरीचे रूप धारण करून राहणाऱ्या महामायिकाच्या शिष्यांना पकडून आणायचे असे म्हटल्यावर माझ्या अंगावर शहारे उभे राहिले. थोर मंत्रवेत्ता असलेल्या महामायिकाच्या शिष्यांशी, त्यांत ते मगरीच्या रूपात सरोवराच्या तळाशी असतांना युद्ध करणं कसे शक्य होईल?

"माझे इतर दोघे भाऊ सुद्धा माझ्या सारखेच घाबरून गेले होते. गुरू आम्हां तिघांकडे पाहूनच जणु कांही मोठ्याने हसून म्हणाला—"महामायिकाच्या शिष्यांना जिंकायला मी पूर्वी सांगितलेल्या पिंगळ कोळ्याची तुम्हांला चांगली मदत मिळेल. परंतु या प्रयत्नात कदाचित् तुम्ही स्वतःचे प्राणही गमावून बसाल. ही गोष्ट मी तुम्हांला आधीच सांगून ठेवतो!"

"आम्हां तिघां भावंडांपैकी सर्वात प्रथम मंडन धीर करून म्हणाला—"मी तयार आहे, या गोष्टीस! आमच्या वडिलांनी मागे सोडलेले मंत्रग्रंथ मला माझ्या प्राणापेक्षा जास्त प्रिय आहेत!"

"त्याने असे म्हटल्यावर मला आणि अनुरूपला सुद्धा धीर आला. आमचं साहस वाढलं. आम्ही त्या महामायिकाच्या शिष्यांशी दोन हात करायला तयार आहों असे म्हटले. तेव्हां गुरूने चिलका सरोवरावर जाण्याची वाट आम्हांला सांगून तुझ्या करवी आपले हात पाय बांधवून सरोवरांत पडल्यावर आम्ही काय करावयाचे हे विस्तृतपणे सांगितले."

"बरे तर मी तुम्हांला जी मदत करायला हवी होती ती केली. आतां मी भल्लूक पर्वतावर तुमच्या बरोबर येण्याची गरज काय?" पिंगळने विचारले.

पद्मपाद तो प्रश्न ऐकून काही वेळ विचार करून पिंगळच्या खांद्यावर हात ठेवून आणि मैत्रीचा आव आणून म्हणाला—"पिंगळ! तुला माझी भीती वाटते आहे असे दिसते आहे. परंतु हे लक्षात ठेव, माझ्याकडून तुझे नुकसान तर काहीच होणार नाही, उलट होईल तो पुष्कळ फायदाच होईल! महामायिकाने समाधी घेतली आहे त्या पडक्या देवळात तुलाच प्रवेश करावयाचा आहे. ते काम आणखी कोणाच्या हातून होण्यासारखे नाही!"

"मला कोणत्याही प्रकारचा त्रास किंवा माझे नुकसान होणार नाही याची तू शपथ घेऊन हमी देतोस का?" पिंगळने पद्मपादला विचारले.

पद्मपादने तशी शपथ घेतली. तेव्हां पिंगळला आईची आठवण झाली. "मी



भल्लूक पर्वतावरून किती दिवसांनी परत येईन?" पिंगळने विचारले.

"दोन महिन्यांनी; त्याहून जास्त वेळ लागणार नाही. परंतु तू तिकडून घरी परत येशील तेव्हां असा राहणार नाहीस. तुला मी या जगातला सर्वात श्रीमंत करून टाकीन, तुला हे मी वचन दिले आहे ना?" पद्मपाद म्हणाला.

"तू ते तेव्हां म्हणालास ते राहू दे. मी आतां या वेळी इतका गरीब आहे की माझ्या जवळ फुटकी कवडी सुद्धा नाही, मी दोन महिने घरी गेलो नाही तर माझी आई आणि भाऊ कसे जगतील?" पिंगळने विचारले.







पद्मपादने घोड्याच्या खोगिराला लोंबत असलेली एक पिशवी काढून आणली आणि तीतून एक हजार मोहोरा काढून पिंगळला देत म्हणाला—"हे पैसे तू आपल्या आईला देऊन ये, तुझी कोणत्याही प्रकारे काळजी करण्याचं तिला कारण नाही. उद्यां तू याच जागी याच वेळी मला येऊन भेट."

पिंगळ पद्मपादने दिलेले पैसे घेऊन अत्यंत आनंदाने आपल्या घरी गेला. तो घरी पोंचला तेव्हां त्याचे दोघे भाऊ घरी नव्हते. त्याची आई एकटी मुलाची वाट पहात होती. पिंगळने बरोबर आणलेल्या एक हजार मोहोरा आईच्या समोर ओतल्या. ती भीतीने थरथर कापू लागली.

"अरे पिंगळ, इतके पैसे कोठून आणलेस रे? मला तरी भीती वाटते बाई!" आई म्हणाली.

पिंगळने घडलेली गोष्ट सांगितली आणि दोन महिन्यांनी तो सुखरूप परत येईल आणि त्या साठी आईने घाबरण्याचे काहीच कारण नाही असे आईला समजावून सांगितले.

"मांत्रिकांच्या बोलण्यावर व चांगुलपणावर माझा विश्वास नाही. हा पद्मपाद इतरांसारखा नाही, असे तू म्हणतोस. देवाच्या कृपेने तुझ्यावर कोणत्याही प्रकारचे गंडांतर आल्याशिवाय भल्लूक पर्वतावरून तू सुखरूप परत यावास म्हणून मी बत्तीस कोटी देवांना सांकडे घालते." पिंगळची आई म्हणाली.

दुसऱ्या दिवशी पद्मपादने सांगितलेल्या वेळी पिंगळ चिलका सरोवराच्या काठी गेला. काठावर पद्मपाद एकटा वाट पहात बसलेला होता. त्याच्या शेजारी एका पिशवी शिवाय घोडा किंवा इतर काही वाहन नव्हते.

पिंगळ पद्मपाद जवळ आल्याबरोबर म्हणाला—"काय रे पद्मपाद, आपण पायींच जायचं का?"

"पायी? ते तर अशक्यच! भल्लूक पर्वतापर्यंत पोचायचे म्हणजे दोनतीनशे मैल जावयाचे आहे. एवढे प्रयाण करावयाचे म्हणजे गप्पा नाही. सामान्य घोडे सुद्धां कामाचे नाहीत. दोन दिवसांनी एक पर्वदिवस येत आहे. त्या दिवशी आपण त्या पर्वतापर्यंत पोंचले पाहिजे आपली वाहनें ही पहा!" असे म्हणत पद्मपादने एक चिमूट भरून माती घेतली व ती मंत्रवून जमिनीवर टाकली.

तत्क्षण जमीन फुटली आणि तिच्यातून डोके वर करून रेंकत दोन गाढवे बाहेर उडी मारून आली. त्यांच्या पैकी एकाच्या पाठीवर पद्मपादने आपल्या जवळची पिशवी टाकली आणि स्वत: पाठीवर बसला. पिंगळ थोडा कचरला. त्याला भीती वाटली. त्याला काय करावे सुचेना. दुसऱ्या गाढवाकडे पहात नुसता उभा राहिला. जागचा हलला ही नाही.

"पिंगळा! अरे ते तुझे वाहन, चटदिशी त्याच्या पाठीवर बस! आपण जायचं







आहे ती जागा फार दूर आहे. तरमग आतां निघू या!" पद्मपाद हंसत म्हणाला.

"ही सामान्य गाढवे नाहींत. एक तऱ्हेची भुतेंच आहेतसे वाटते! मला भीति वाटते, बुवा!" पिंगळ म्हणाला.

"ती सामान्य गाढवे नाहींत हे खरे आहे! भुते असली म्हणून काय झाले? आपण सांगू तशी वागतात. वायुवेगाने, नव्हे मनोवेगाने ही धावतात. मी बरोबर आहेच ना! तू भिण्यासारखं काहीच नाही." पद्मपाद म्हणाला.

पद्मपाद असे म्हणाल्यावर पिंगळला धीर आला. तो निर्भयपणे गाढवावर जाऊन बसला. लगेच दोन्ही गाढवे जोराने रेंकली आणि काही वेळ हवेत तर काही वेळ जमिनीवर धावली.

ठीक काळोख पडू लागण्याच्या सुमारास ते एका जंगलात पोंचले. पद्मपाद प्रथम गाढवावरून उतरला व म्हणाला—"पिंगळ, आज रात्री आपण येथेच विश्रांती घेऊ या. उरलेले अंतर उद्यां कापून काढत येईल." पिंगळ फार दमला होता. म्हणून तो लगेच त्या गोष्टीस कबूल झाला.

तेथे हिरवळ होती तीवर काही वेळ विश्रांती घेतल्यावर पिंगळला आंघोळ करावीशी वाटली. परंतु जवळपास कोठे पाण्याचे चिन्हही दिसत नव्हते. त्याने पद्मपादला विचारले. पद्मपाद जंगलाकडे बोट दाखवून म्हणाला—"तिकडे जंगलात एक तलाव आहे. तिकडे जाऊन आंघोळ करावयाची आहे. तिकडे तू कोणाला पाहिलंस तर भिण्याचं मुळीच कारण नाहीं." असे तो कां म्हणाला हे पिंगळला मात्र कळले नाही. तो झाडांच्या खालून सावधपणे चालत काही वेळाने एका तलावाच्या जवळ आला. त्या तलावाचे पाणी स्फटिकासारखे स्वच्छ होते. ते पाहून पिंगळला फार आनंद झाला. तो घाईघाईने तलावात उतरायला धावला. परंतु तितक्यात तो प्रदेश कोणाच्या तरी आरोळीने हादरून गेला "मला सोडवा! मी तुम्हाला मदत करीन. मला...!"



पिंगळ ती आरोळी ऐकून घाबरून गेला. त्याची नजर तो आवाज आला त्या दिशेला वळली.

तलावाच्या काठावरच एका जागी त्याला दोन मोठ्या खडकांना बांधून ठेवलेल्या साखळदंडांनी बांधून ठेवलेला एक भयंकर आकृतीचा महाकाय काळा राक्षस दिसला. पिंगळला पायाखालची जमीन सरकल्या सारखे वाटले व मागे फिरण्यासाठी त्याच्या मनात एक विचार आला, परंतु तेवढ्यात बळकट साखळदंडांनी भयंकर राक्षसाला बांधून ठेवले आहे, ही गोष्ट त्याला आठवली. म्हणून तो जागच्या जागी थबकला.

"मालक, प्रभो! माझे हातपाय बांधले आहेत हे साखळदंड तुम्ही मेहरबानी करून तोडून मला वांचवा! तुम्हांला वाटेल ती मदत करायला मी तयार आहे" अशा विनवण्या करीत त्या राक्षसाने काकुळतीने पिंगळकडे पाहिले.

तो पर्यंत पिंगळला चांगला धीर आला होता. तो धीर करून त्या राक्षसाजवळ एक एक पाऊल टाकीत गेला. जवळ जाऊन पाहिले तेव्हां पिंगळला तो राक्षस जास्तच भयंकर दिसला. ताडाच्या खांबा सारखे त्याचे जाडजूड व लांब पाय, मधमाशांच्या पोळ्यासारखे त्याच्या छातीवरचे केस, हत्तीच्या कानांसारखे मोठे कान आणि आग पाखडणारे डोळे पाहून पिंगळच्या पायापासून डोक्यापर्यंतच्या सर्वांगावर शहारे उभे राहिले.

"मालक, माझं रक्षण करा! मला वांचवा! तुम्हांला वाटेल ती मदत मी करीन. या त्रिलोकांतल्या कोणत्याही लोकात तुम्हांला आपल्या खांद्यावर बसवून मी घेऊन जाऊ शकेन," तो भयंकर राक्षस म्हणाला.

पिंगळ ते ऐकून हंसला व म्हणाला—"तीन लोकच काय चवदा लोकांना मला

घेऊन जाऊ शकेल असे एक गाढव माझ्या जवळ आहे. तुला पाहिले तर तू गाढवापेक्षा शतपटीने बळकट आहेस आणि बुद्धिमान सुद्धा दिसतो आहेस! बरें पण तुझे नाव काय?"

"माझे नाव भल्लूक केतू!" नम्रपणे तो महाकाय म्हणाला.

"येथून थोडयाच अंतरावर एक भल्लूक पर्वत आहे, हे तुला माहीत आहे का?" पिंगळने त्या राक्षसाला विचारले.

"भल्लूक पर्वत म्हणतोस?" असे म्हणत तो राक्षस हंसला. त्याच्या हंसण्यात विकृतपणा स्पष्ट दिसत होत. म्हणाला– "मी एके काळी त्या भल्लूक पर्वताचा मालक होतो. एका मांत्रिकामुळे माझी ही दुरवस्था झाली आहे. तुम्ही मला या बंधनातून मुक्त केलेत तर त्या पर्वतावरचे सर्व वैभव तुम्हांला मिळेल, असे मी करीन!" भल्लूक केतू म्हणाला.

भल्लूक केतू म्हणाला ते ऐकून पिंगळच्या मनात मोह झाला. भल्लूक केतूच्या मदतीने भल्लूक पर्वतावरचे सर्व वैभव आपल्याला मिळू शकेल. त्यातले काही पाहिजे तर पद्मपादाला सुद्धा वांटा म्हणून देतां येईल.

"तर मग मी तुला साखळदंड तोडून मुक्त करतो. परंतु त्यानंतर तू माझं कोणत्याही प्रकारे नुकसान करणार नाहीस हे कसे मानावयाचे?" पिंगळने ही शंका केली.

भल्लूक केतू केविलवाण्या नजरेने पिंगळकडे पहात म्हणाला–"मी म्हणालो ते केले नाही तर माझे डोके फुटून माझ्या पायांवर पडेल, असा मला शाप आहे. तुमचे मी कोणत्याही प्रकारे नुकसान करणार नाही, असे वचन दिल्या नंतर स्वत:चे मरण ओढवून घेण्याव्यतिरिक्त आणखी काय होईल?"

पिंगळला भल्लूक केतू म्हणाला ते खरे वाटले. त्याने तलावाच्या काठावरचा एक मोठा दगड उचलला आणि साखळदंड तोडायला निघाला. इतक्यात पाठीमागून पद्मपाद ओरडून म्हणाला–"पिंगळ थांब!"

(क्रमश:)



# हास्य व रुदन

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, इतरांकडून सर्व कामे करविणे तुला आवश्यक असूनही तू या मध्यरात्रीच्या वेळी इतके कष्ट करीत आहेस हे पाहून मला फार वाईट वाटत आहे. तुला कंटाळा येऊ नये यासाठी मी एक गोष्ट सांगतो, ऐक!" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

भगवंताने रामचंद्राचा अवतार घेऊन ज्या आयोध्या नगरीवर राज्य केले त्या अयोध्येच्या सिंहासनावर एके काळी वीरकेतू नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या कारकीर्दीत अयोध्या नगरीत चोऱ्या होऊ लागल्या. प्रजा राजाकडे आपले

वेताळाच्या गोष्टी




गाऱ्हाणे घेऊन गेली. "महाराज, आम्हांला चोरां-पासून वाचवा. आम्ही किती प्रयत्न करून पाहिले, परंतु चोराचा पत्ता लागत नाही."

राजा वीरकेतूने आपल्या अत्यंत हुशार अशा हेरांना वेष पालटून रात्रभर गस्त घालण्यास सांगितले. राजाचे शिपाई रात्रभर डोळ्यात तेल घालून गस्त घालीत असूनही चोऱ्या यथाप्रकारे होतच राहिल्या. चोर गस्ती घालणाऱ्या शिपायांच्या नजरेस पडला नाही.

चोर फार चतुर असला पाहिजे, असे वाटून वीरकेतूने स्वतःच चोराला पकडण्याचे ठरविले आणि वेष पालटून निघाला. वेष पालटून राजा रात्री राजधानीत हिंडत असतां त्याला एका जागी एक माणूस विचित्र तऱ्हेने हिंडताना दिसला.

राजा तो माणूस होता त्या बाजूला चालू लागला. राजाला जवळ येत असलेला पाहून शंका वाटून त्या व्यक्तीने थोडयाशा रागातच विचारले—"कोण तू?"

"मी चोर आहे!" राजाने थोडक्यात उत्तर दिले.

"तर मग तू माझ्या सारखाच आहेस! आमच्या घरी जाऊया, चल! तुझे मी यथोचित आतिथ्य करीन!" ती व्यक्ती म्हणाली.

राजा त्या व्यक्तीबरोबर त्याच्या घरी गेला. ते घर म्हणजे जंगलातल्या एका गुहेत बांधलेले होते. चोराने राजाला एका खोलीत नेऊन बसायला सांगितले आणि "मी आलोच!" असे सांगून शजारच्या खोलीत निघून गेला.

तितक्यात एक दासी राजा होता त्या खोलीत येऊन म्हणाली—"कोण रे बाबा, तू? या अट्टल चोराचे हे गुप्तस्थान तुला कळल्यावर तुझी शंभर वर्षे भरलीच, समज!" या शब्दांत तिने राजाला सावध केले.

राजा लगेच त्या गुहेतून बाहेर पडला आणि सरळ आपल्या राजधानीत परतला. त्याने आपल्या बरोबर सशस्त्र शिपायांची एक तुकडी घेतली आणि चोराच्या गुहे-जवळ परतला, त्या चोराबरोबर राजाच्या शिपायांची मोठी चकमक उडाली आणि त्यात राजाचे पुष्कळ शिपायी मारले गेले. तरी शेवटी चोर राजाच्या हाती कैद झालाच. तो चोर राजाच्या इतक्या शिपायांना इतक्या धैर्याने तोंड देऊ शकला, याचा अर्थ तो स्वतःशूर होता.

राजाने चोराच्या मुसक्या बांधल्या आणि त्याला राजधानीत घेऊन गेला.

चोराची सुनावणी झाली. त्यात चोर कित्येक दिवस राजधानीभर कोणाच्या नजरेस न पडतां चोऱ्या करीत होता, हे सिद्ध झाले. चोरीला गेलेला सर्व माल चोराच्या गुहेतील घरात सांपडला.

राजाने चोराला फांशीची शिक्षा सांगून शिपायांबरोबर त्याला पाठवून दिले.

राजाज्ञेने शिपाई चोराला राजधानी बाहेर घेऊन जात असतां राजधानीतल्या प्रमुख व्यापाऱ्यांपैकी रत्नदत्त नावाच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याची मुलगी रत्नवती हिने चोराला पाहिले व आपल्या वडिलांना बोलावून म्हणाली—"बाबा, त्या चोराशी माझं लग्न करून द्या!" रत्नदत्त ते ऐकून थक्क होऊन मुलीच्या तोंडाकडे पहात राहिला.



कारण रत्नदत्ताला मूल नाही नाही म्हणतां कोठे एक मुलगी झाली होती. तिला त्याने खूप लाडात वाढविले होते. रत्नवतीचे रूपलावण्य पाहून कित्येक श्रीमंत वैश्य तरुणांनी तिला मागणी घातली होती. कित्येक राजकुमारांनी सुद्धा मागणी घातली होती. परंतु रत्नवतीने त्या सर्वांना नकार दिला एवढेच नाही तर तिला लग्नच करावयाचे नसल्याचे तिने आई-वडिलांना सांगितले होते.

रत्नदत्तने मुलीला विचारले—"काय ग, तू तर राजेराजवड्यांना सुद्धा नकार दिला होतास ना? तो या चोर लुटेऱ्यासाठीच का? याच्या सारखा नीच व दुष्ट आणखी

कोण असेल? त्याला फाशी देण्यासाठी शिपाई धरून घऊन जात आहेत. अशा व्यक्तीशी का तू लग्न करणार?"

रत्नवतीने वडिलांच्या म्हणण्याकडे लक्षच दिले नाही. अनेक युवराज व राजकुमार तिला मागणी घालायला आले असतां रत्नदत्तने मुलीला त्यांच्या पैकी एकाशी लग्न करून घ्यायला सुचविले होते. परंतु तिने पित्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले व हट्ट धरून बसली.

"तो चोर असो आणि तो फाशी जावो की वधस्तंभावर चढो, मी त्याच्याशीच लग्न करणार. त्यालाच मी आपला पती मानते. माझं लग्न करून द्यायचे असेल त्याला आणून त्याच्याशी माझे लग्न करून द्या. तुम्हांला ते शक्य नसेल तर मी त्याच्या बरोबर देहत्याग करीन. मी कोणत्याही परिस्थितीत आपल्या निश्चयापासून ढळणार नाही." रत्नवतीने निक्षून सांगितले.

ते ऐकून रत्नदत्त घाबरून गेला. मुलगी आपला हट्ट कोणत्याही परिस्थितीत सोडणार नाही, हे त्याला स्पष्ट दिसले. तो धांवत महाराज वीरकेतूच्या दर्शनास गेला व हात जोडून म्हणाला—"महाराज, आपण आज ज्या चोराला धरले आहे, त्याला मला देऊन टाकावे. मी आपणांला त्याच्याबद्दल माझ्याकडे जे काही आहे ते सर्व म्हणजे शंभर कोटीचे सोने देतो!" परंतु राजाने ते मान्य केले नाही. अयोध्या राजधानीला कित्येक महिने ज्याने त्रासवून सोडले होते अशा चोराला सोडण्यास त्याचे मन मुळीच मानेना. रत्नदत्तने हताश होऊन घरी परतल्यावर रत्नवतीला स्नान करून वधू होऊन लग्नास तयार असलेली पाहिले.

रत्नदत्त अगदी निराश होऊन मुलीला म्हणाला—"मुली, माझ्या प्रयत्नाला फळ आले नाही. चोराला सोडायला राजा मुळीच तयार नाही. मी आपलं सर्व धन व संपदा द्यायला तयार असल्याचे सांगितले. परंतु काही उपयोग झाला नाही. तुझ्या मनाप्रमाणे लग्न होणे अशक्य!"

"लग्न होणार नसेल तर सहगमन आहेच आहे!" मुलगी म्हणाली.

रत्नवती पालखीत बसून वधभूमीकडे निघाली. तिच्या बरोबर रडत आई वडीलही निघाले. ते वधभूमीत पोचले तेव्हां चोराच्या गळयात तेव्हांच फास घातला होता. चोर त्यावेळी जीवन मरणाच्या मध्यदशेत होता.

रत्नदत्त आपल्या मुलीला घेऊन चोरा जवळ घेऊन गेला व म्हणाला—"हे पहा रे, ही माझी मुलगी, तुझ्याशीच लग्न करायचे म्हणून हट्ट धरून आली आहे!" ते ऐकून चोराने एकदां रत्नवतीकडे पाहिले व डोळयांतून दोन अश्रू ढाळले व त्या पाठोपाठ स्मित करून प्राण सोडले.

रत्नवती मनाशी ठरविल्याप्रमाणे पतीच्या देहा बरोबर स्मशानात गेली आणि चिता रचून तीवर पतीच्या देहाबरोबर स्वतः जाऊन बसली.





मनाने ज्या व्यक्तीस वरले होते त्याच्याशी विवाह झाला नसूनही त्याच्या देहाबरोबर सहगमनला तयार झालेल्या रत्नवतीची पतिभक्ती पाहून कालभैरवाला आनंद झाला व प्रगट होऊन म्हणाला–"मुली, तुझी पतिभक्ती असामान्य अशी आहे. तू वाटेल तो वर माग, मी देतो!"

"देवा! मी माझ्या आईवडिलांची एकुलती एक मुलगी आहे. मी गेले तर त्यांना पुत्रीविरहाच्या यातना आयुष्यभर सहन कराव्या लागतील. त्यांना चांगला मुलगा होईल असा अनुग्रह कर. त्याला पाहून ते मला विसरतील." रत्नवती म्हणाली.

कालभैरव स्मित करून म्हणाला–"तथास्तु! पण तू स्वतःसाठी काहीच मागून घेतले नाहीस! मागून घे! तुला काही नको का?"

"मला माझ्या पतीबरोबर सहगमन करण्याव्यतिरिक्त काहीच नको!" रत्नवती म्हणाली.

"ठीक, तर तुझी तीही इच्छा पुरी करतो!" असे म्हणत कालभैरवाने चोराला जिवंत केले आणि अंतर्धान पावला. रत्नदत्तने चोराला आदरपूर्वक घरी बोलावून नेले व थाटामाटाने त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले.

वेताळ येथवर कथा सांगून म्हणाला–"राजा! फास गळयात पडल्यावर मरण-समयी रत्नवती आपल्याशी लग्न करणार असल्याचे ऐकून चोर कां रडला? नंतर तो कां हसला? माहीत असून उत्तर दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन पडतील!"

विक्रमादित्य म्हणाला-"अकारण झालेल्या नात्याच्या लोकांचे ऋण फेडू शकत नाही याबद्दल प्रथम चोर रडला. कित्येक राज-कुमारांची मागणी लाथाडून ती मुलगी आपल्याशी लग्न करायला तयार झाली याबद्दल चोर हसला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





**फार** पूर्वी इंद्रप्रस्थ नगरात एक फार मोठा श्रीमंत माणूस रहात असे. काही काळ त्याने ऐहिक सुखोपभोगात काढल्यावर त्याच्या दैवाने पाठ फिरविली. एका काळचा श्रीमंत आज एक गरीब दरिद्री झाला होता.

त्या स्थितीत तो रात्री झोपला असतां त्याला वैकुंठपती विष्णूचा दृष्टांत झाला. विष्णू त्याला म्हणाला–"तू आतांच्या आतां पाटलीपुत्राला नीघ. तुला धनलाभ होईल. तुझे दैव पालटेल व तू पुन्हां श्रीमंत होशील."

स्वप्नात विष्णूने जे सांगितले त्यावर त्याचा विश्वास बसला व तो दुर्दैवी माणूस एकटा पायी चालत कित्येक दिवसांनी पाटलीपुत्राला येऊन पोचला. ते शहर त्याला अगदी अनोळखी होते. त्यात चांगला काळोख पडला होता.

त्याला समोर एक देऊळ दिसले. त्या देवळात शिरून तो सभामंडपात विश्रांती घ्यायला पडला आणि थोडयाच वेळात तो घोरू लागला. सर्व शहर गाढ निद्रेत असतां त्या देवळाला लागून असलेल्या एका घरात चोर शिरले. घरमालक चोरांची चाहूल लागून जागा झाला आणि ओरडू लागला–"चोर, चोर!" थोडयाच वेळात शेजारपाजारचे लोक धावून आले. चोर घाबरून गेले. त्यांनी घराच्या भिंतीवरून उडी मारली आणि देवळाच्या सभामंडपात जाऊन तेथून पोबारा केला. काळोखांत ते कोठल्या वाटेने गेले, कळले नाही. त्यांचा पाठलाग करीत आलेल्या लोकांनी देवळाच्या आवारात पुष्कळ शोध काढला आणि शेवटी त्यांनी सभामंडपात जाऊन पाहिले तेथे तो दुर्दैवी माणूस घोरत पडलेला

सौ. निर्मला डोईफोडे

दिसला. त्याच्या मुसक्या बांधून लोकांनी त्याला चांडालाकडे नेले.

दूरचा पायी प्रवास करीत आलेल्या त्या दुर्दैवी परदेश्याला पाहून चांडालाला तोच चोर असल्याची शंका आली. त्याने आपल्या नोकरांकरवी परदेश्याला खूप बडवून काढले व विचारले–"खरे सांग, कोण तू? चोरी करायला का आलास?"

तो हात जोडून म्हणाला–"अहो, मी चोर नाही. मी इंद्रप्रस्थचा राहणारा आहे. एका काळी मी मुबलक पैसा असल्याने सुखाने आयुष्य घालवीत होतो. दैवाने मला दोनदा फसविले. पहिल्याने मी सर्व धनवैभव घालवून बसलो. तेवढ्यावर दैवाचे समाधान झाले नाही म्हणून की काय, वैकुंठनाथाने स्वप्नात येऊन मला पाटलीपुत्राला जायला सांगितले आणि तेथे पुष्कळ धनलाभ होईल असेही सांगितले. त्या स्वप्नावर विश्वास करून मी पाटली-पुत्राहून इतका दूर चालत आलो आणि काल रात्री येथे पोचलो आणि थोड्या वेळा पूर्वी तुमच्या लाथा खाल्ल्या."

ते ऐकून चांडाल हसला व म्हणाला–"अरे वेड्या! कोणी स्वप्नात पाहिलेल्या गोष्टींवर विश्वास करतो का? काही दिवसांपूर्वी तो वैकुंठनाथ माझ्या सुद्धा स्वप्नात आला होता आणि म्हणाला की इंद्रप्रस्थ नगराच्या मोठ्या वडाच्या बुंधा-जवळ खणून पाहिले तर धनाचा मोठा सांठा सांपडेल. परंतु मी त्या स्वप्नावर विश्वास करून इंद्रप्रस्थ नगरी तुझ्या सारखा गेलो नाही. म्हणून तू वेड्यासारखा अशा स्वप्नावर विश्वास करून भटकू नकोस! जा परत आपल्या इंद्रप्रस्थाला."

सर्व धन घालवून बसलेला तो श्रीमंत माणूस इंद्रप्रस्थाला परतला त्याने चांडालाने सांगितलेल्या वडाच्या झाडाखाली खणून पाहिले तर त्याला खरोखरच धनाचा मोठा सांठा सांपडला. ते धन मिळाल्याने तो पुन्हां श्रीमंत झाला आणि सुखाने राहू लागला. अशा तऱ्हेने त्याला पडलेले स्वप्न खरे ठरले!





# कोंबडीची किम्मत

एका गांवात दगडू नावाचा एक लोहार रहात असे. एके वर्षी संक्रांत आली तेव्हां त्याच्या बायकोने त्याला एक कोंबडी विकत घेऊन यायला सांगितले. त्या गावातला मोठा शेतकरी खंडोजी याच्या कडे दगडू गेला आणि एक कोंबडी विकत हवी असल्याचे त्याला सांगितले.

खंडोजीने त्याला एक कोंबडी देत म्हटले–"तुझ्या हातात या कोंबडीची किंमत द्यायला पुरेसे पैसे नसले तरी हरकत नाही, नंतर दे. मी हिशोब लिहून ठेवतो." दगडूला इतक्या प्रेमाने त्याच्याशी बोलणारा गावात दुसरा कोणी दिसला नाही. म्हणून दगडूने खंडोजीच्या दया दाक्षिण्याची खूप स्तुती केली आणि कोंबडी घेऊन गेला.

त्या दिवशी दगडूच्या कुटुंबातील सगळ्यांनी कोंबडी खायला मिळाली याबद्दल देवाचे फार आभार मानले. काही दिवस लोटल्यावर दगडू खंडोजीकडे कोंबडीची किंमत द्यायला गेला.

तेव्हां खंडोजी म्हणाला–"बाबारे, मी थोडा गर्दीत आहे. तुझा हिशोब पहायला फार वेळ लागेल. नंतर ये, बरं का!"

"एका कोंबडीची ती किंमत किती आणि हिशोब कसला पहायचा हो? किती द्यायचे ते सांगा मी पैसे देऊन चालू लागेन!" दगडू म्हणाला.

"बाबारे, फार मोठा हिशोब आहे!" असे सांगून खंडोजीने दगडूला परत पाठविले.

दगडूने खंडोजीच्या घरी चार खेपा घातल्यावर खंडोजी कागद व पेन्सिल घेऊन बसला व बराच वेळ आंकडेमोड करीत राहल्यावर शेवटी म्हणाला–"त्या कोंबडीचा सर्व मिळून हिशोब केल्यावर दोनशे पन्नास रुपयांवर आणखी काही पैसे निघतात. वरचे पैसे सोडून दे, दोनश

पन्नास रुपये दे, तुझ्या नावावर लिहिलेली रक्कम जमा झाल्याचे लिहितो."

आपण खाल्लेल्या कोंबडीची किंमत अडीच शे रुपये असल्याचे ऐकून दगडूच्या तोंडातून काही वेळ शब्दच उमटला नाही.

"एका कोंबडीची किंमत अडीचशे रुपये? कधी ऐकली सुद्धा नाही. ती काय सोन्याची कोंबडी होती का हो?" दगडूने खंडोजीला विचारले.

"हिशोबात काही चूक नाही. पाहिजेतर तू तुला वाटेल त्याच्या कडून हिशोब करवून घे! तू विकत घेतलेल्या कोंबडीने आतापर्यंत किती अंडी घातली असती? त्या अंड्यांतून निघालेली पिल्लें मोठी होऊन त्यांनी किती अंडी घातली असती? त्या सर्वांची किंमत तूच द्यायला हवी!" खंडोजी म्हणाला.

ते ऐकून दगडू थक्कच झाला व 'आ' वासून खंडोजीकडे पाहू लागला.

"हा तुमचा सर्व हिशोब पोलीस पाटलांना विचारून समजून घेतल्या शिवाय मी एक दमडी देणार नाही!" दगडूने निक्षून सांगितले.

'खुशाल जाऊन विचारून ये! मी नको म्हटले का?" खंडोजी म्हणाला. पोलीस पाटील आपल्या बाजूनेच निवाडा देईल याची खात्री होती खंडोजीला.

दोघे मिळून पोलीस पाटलाकडे गेले. खंडोजी पोलीस पाटलाला म्हणाला—"पाटीलसाहेब या दगडूने गेल्या संक्रांतीच्या आधीच्या संक्रांतीला माझ्याकडून एक कोंबडी विकत घेतली. त्या कोंबडीची किंमत द्यायला आला. त्या कोंबडीने आतापर्यंत किती अंडी घातली असती आणि त्या अंड्यातल्या पिल्लांनी मोठी झाल्यावर किती अंडी घातली असती, तो सर्व हिशोब करून मी त्याला एकूण अडीचशे रुपये झाल्याचे सांगितले. तुम्ही सुद्धा पाहून हिशोबात काही चूक असेल तर सांगा. मला त्याचे पैसे लबाडीने कशाला हवेत हो?"

पोलीस पाटलाने सर्व हिशोब वर पासून खालपर्यंत लक्षपूर्वक वाचून पाहिला व म्हणाला—"काय रे, दगडू, हिशोबात तर काही चूक नाही!"

"मी आतां तर सांगितला, सर्व हिशोब! त्याला खरे वाटले नाही, म्हणून तुमच्याकडे आला. लिहितां वाचतां येत नाही ना, बिचाऱ्याला, मग हिशोब काय कळणार?" खंडोजी म्हणाला.

दगडू हताश होऊन सर्वांच्या तोंडाकडे पाहू लागला. तो पोलीस पाटलाचा निरोप घेऊन घरी जात असतां वाटेत गावचे कुळकर्णी भेटले. त्यांनी विचारले—"कायरे दगडू? बराच विचारात पडल्या सारखा दिसतोस? असे झाले तरी काय?" दगडूने घडलेले सर्ववृत्त थोडक्यात सांगितले.

"पोलीस पाटलांनी सुद्धां तुला बुड-विले तर! मी सांगतो तसे करतोस का? खंडोजीकडे उद्यां जा, आणि सांग, पाटलाला













घेऊन उद्या वडाच्या पारावर पंच बसवून काय तो न्याय निवाडा करवितो, त्यावेळी या म्हणावं. तुझ्या बाजूने मी साक्ष देतो, असेही त्यांना सांग!"

दगडूने खंडोजीकडे जाऊन ते सांगितले.

"पुन्हां पंच कशाला रे? पोलीस पाटलांनी सर्व सांगितलंच की!" खंडोजी म्हणाला.

"मला तुम्ही सांगितलेला हिशोब कळला नाही. पारावर चार लोक जे सांगतील ते मी करीन. कुलकर्णीअप्पा माझ्या तर्फे साक्ष देतो म्हणाले, कुलकर्णी-अप्पा म्हणजे तुम्हांला भिण्याचे कारण नाही." दगडू म्हणाला.

"मला कसली रे भीती?" असे म्हणत खंडोजीने पंचांचा निवाडा मान्य करण्याचे कबूल केले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी सर्व पारावर जमा झाले. परंतु कुलकर्णी अप्पांचा पत्ताच नव्हता. कुलकर्णीअप्पांनी सुद्धा आपल्याला फसविले की काय असा दगडूला संशय आला. सर्व जण दगडूकडे पाहून हसत असतां चांगला काळोख पडल्यावर कुलकर्णी-अप्पा आले.

"मला यायला थोडी उशीर झाला वाटतं! तसं काही विशेष नाही! मजूरांनी रोप तयार करण्याकरितां शेत नांगरून तयार केले होते. सुमुहूर्तावर बिया भाजून आणणे आवश्यक झाले. ते काम पुरे करून येतो आहे." कुलकर्णी म्हणाले.

"रोपासाठी बियाणं भाजून आणावे लागलं, म्हणजे हो काय, कुलकर्णीअप्पा? भाजलेलं बी रुजेल तरी का?" चेष्टा करीत पाटलांनी विचारलं.

"दगडूने खाल्लेल्या कोंबडीने अंडी घालून तिला पिल्लं नाही का झाली. तसंच भाजलेले बियाणं रुजणार का नाही, मला वाटलं!" कुलकर्णी म्हणाले.

सर्व खदखदां हसू लागले. पोलीस पाटलांनी काळोखातून केव्हां पाय काढला कोणाला कळलेच नाही. खंडोजीने कोंबडीची किंमत दगडूकडे मागण्याचे धाडस त्यानंतर केलेच नाही.





# नरकवासी

ब्रह्मदत्त काशी येथ राज्य करीत असतां तेथे एक श्रीमंत मोठा व्यापारी रहात असे. त्याला मित्रविंदक नावाचा एक मुलगा होता. हा मित्रविंदक म्हणजे एक आळशी उडाणटप्पू मुलगा होता. व्यापारी या जगाची यात्रा संपवून परलोकी निघून गेल्यावर त्याची बायको मुलाला म्हणाली—"बाबारे, दान धर्म कर, नीतिधर्माने रहा आणि चांगलं नाव मिळव!" तिने मुलाला अनेक प्रकारे सन्मार्गावर येण्यासाठी हितोपदेश केला. परंतु त्याने आईच्या बोलण्याकडे दुर्लक्षच केले.

त्याच सुमारास कार्तिक पौर्णिमा आली. मित्रविंदकाला त्याची आई म्हणाली—"बाळा रे! आज मोठा पर्व दिवस आहे. आज पहाटेच बौद्धविहारात धर्मोपदेश करतात. तू तेथे सर्वांबरोबर पूजा अर्चा करून धर्मोपदेश ऐकून ये. तू परत आल्यावर मी तुला एक हजार रुपये देईन."

पैशासाठीच का होईना, मित्रविंदक "बरे!" म्हणाला.

तो उपदेश ऐकायला गेला खरा, परंतु एका कोपऱ्यांत जाऊन झोपला. उजाडतांच उठून, तोंडबीड धुवून घरी परतला. मुलगा धर्मोपदेशकाला बरोबर घेऊन येईल असे समजून त्याच्या आईने सैंपाक वगैरे करून जेवणाची सर्व तयारी करून ठेवली होती. परंतु मुलाला एकटाच आलेला पाहून त्याची आई म्हणाली—"कायरे, धर्मोपदेश-काला बरोबर घेऊन आला नाहीस का?"

"त्यांना इकडे कशाला घेऊन यायचं ग आई? मला त्यांच्याशी काय काम?" मित्रविंदकाने विचारले.

त्याने जेवून घेऊन आईकडून एक हजार रुपये घेतले आणि मनाला



वाटले तिकडे निघून गेला. त्या पैशाच्या भांडवलावर त्याने व्यापार केला व लवकरच वीस लाख रुपये मिळविले.

त्याने विचार केला या भांडवलावर आतां समुद्रपार व्यापार करू या आणि आणखी पैसे मिळवू या! त्याने एक गलबत विकत घेतले व त्यात माल भरून समुद्रपार व्यापार करायला जात असल्याचे आईला सांगण्यासाठी गेला.

सर्व ऐकून घेऊन व डोळ्याला पाणी आणून आई म्हणाली–"बाळा रे, तू माझा एकुलता एक मुलगा! तुझ्या जवळ आतां इतके पैसे आहेत की रे, आणखी पैसे मिळवून काय करणार? समुद्रावरचा प्रवास धोक्याचा असतो. माझं ऐक आणि हा समुद्रपार व्यापार करण्याचा विचार सोड. सुखाने घरीच रहा!"

मित्रविंदकाने आईचे ऐकले नाही; आणि काय वाटेल ते होवो, जायचेच ठरविले. तिने त्याचा हात धरून न जाण्यासाठी किती विनवण्या केल्या. त्याने आईला बाजूला ढकलून स्वतःला सोडवून घेतले आणि निघून गेला.

त्याच दिवशी त्याचे गलबत सुटले.

समुद्रात पोचल्यावर एक आठवडाभर प्रयाण सुखाने झाले. परंतु आठव्या दिवशी गलबत जागचे हालेच ना. ऐन खोल पाण्यात ते उभे होते. याला कारण गलबतात बसलेलाच कोणी एक जण असावा, असे खलाशांना वाटले व त्यांनी चिठ्ठ्या टाकल्या आणि मित्रविंदकाचीच चिठ्ठी निघाली. खलाशांनी तीनतीनदां चिठ्ठ्या टाकल्या तरी मित्रविंदकाच्या नावचीच चिठ्ठी निघाली.

खलाशांनी एक होडके समुद्रात सोडून त्यात मित्रविंदकाला बसविले. आणि तत्क्षण गलबत वेगाने चालू लागले.

काही काळ लोटल्यावर मित्रविंदकाचे होडके एका बेटाला लागले. त्या बेटावर त्याला एक स्फटिक महाल दिसला. त्यात चार भुतिणी रहात होत्या. त्या आठवडाभर



मजेत रहात आणि नंतर एक आठवडाभर पापाचे प्रायःश्चित करण्यासाठी कठोर व्रते अनुष्ठाने करीत. मित्रविंदकाने त्या भुतिणीबरोबर एक आठवडाभर इंद्रलोकाच्या सुखाचा उपभोग घेतला. नंतर भुतिणींनी व्रते सुरू केल्यावर त्याला त्यांच्या बरोबर राहणे इष्ट वाटले नाही. तो आपल्या होडक्यात बसून निघून गेला.

त्याचे होडके जाता जातां आणखी एका बेटाला लागले. त्या बेटावर आठ पिशाचिनी होत्या. मित्रविंदक त्यांच्या बरोबर सुद्धा एक आठवडाभर राहिला व त्यांनी कठोर व्रत सुरू केल्या बरोबर पुन्हां आपल्या होडक्यात बसून ते बेट सोडून पुढे निघाला.

नंतर तो सोळा पिशाचिनी असलेल्या बेटावर आणि त्यानंतर आणखी एका आठवड्यानी बत्तीस पिशाचिनी असलेल्या बेटावर गेला. प्रत्येकावर तो एकेक आठवडा राहिला. नंतर शेवटी तो आणखी एका बेटावर पोचला.

या शेवटच्या बेटावर त्याला एक मोठे शहर दिसले. त्याच्या चारी बाजूला तट होता. तटाला चार दरवाजे होते. ते एक ओसाड पडलेले शहर होते. ते शहर मित्रविंदकाला नरकासारखे वाटले नाही एक सुंदर शहरच वाटले. "मी या शहरात



जाऊन या नगराचा राजा होणार!" मित्रविंदकाला वाटले.

त्या गावात मित्रविंदकाला एक माणूस दिसला. त्याच्या डोक्यावर एक तलवारीसारखी धार असलेले एक चक्र होते. ते जड होते म्हणून त्याच्या डोक्यात शिरले होते. डोक्यातून रक्ताच्या धारा वहात होत्या. त्याचे सर्व अंग साखळदंडाने बांधलेले होते. तो त्याची वेदना असह्य झाल्यामुळे कण्हत होता.

हे सर्व डोळ्यांना दिसत असूनही मित्रविंदकाला तो त्या नगराचा राजा असावा असे वाटले. ते असिधारा चक्र मित्रविंदकाला भ्रमामुळे कमळा सारखे भासले. त्याच्या अंगाला बांधलेले साखळ








दंड त्याला त्याच्या अंगावरची आभूषणे वाटली. त्याचे कण्हणे गंधर्वांच्या गाण्यासारखे सुमधुर गायन वाटले.

मित्रविंदक त्या नरकवासीच्या जवळ जाऊन म्हणाला–"काय हो? तुम्ही किती तरी दिवस झाले, ते पद्म डोक्यावर धरून बसलां आहां! मला सुद्धां काही काळ धरू द्याल का?"

"बाबा रे, हे पद्म म्हणजे कमळ नाही, तलवारीची तीक्ष्ण धारा असलेले असिधारा चक्र आहे!" तो नरकवासी म्हणाला.

"कळलं मला, मला द्यायचं नाही, म्हणून तू हे म्हणतो आहेस!" मित्रविंदक म्हणाला.

"आजपासून मी पापमुक्त झालो आहेसे वाटते? हा सुद्धा माझ्या सारखाच मातृद्रोही, आईला मारणारा असला पाहिजे! पापाचे फळ भोगण्यासाठीच हा इकडे आलेला दिसतो आहे!" असा मनात विचार करून त्या नरकवासीने ते असिधारा चक्र आपल्या डोक्यावरून काढून मित्रविंदकाच्या डोक्यावर ठेवले, आणि तेथून आनंदाने निघून गेला.

स्वर्गात इंद्र म्हणून रहात असलेले बोधिसत्व देवगणाला बरोबर घेऊन नरकांची तपासणी करीत काही काळ फिरल्यावर मित्रविंदक होता तेथे आले.

त्यांना पाहतांच मित्रविंदक रडत म्हणाला–"प्रभो! करुणा करा आणि हे चक्र मला केव्हां सोडील, सांगा!"

तेव्हां इंद्र मित्रविंदकाला म्हणाला–"तुझ्याकडे अलोट संपत्ती असूनही तुला तिचा लोभ होता. तू पिशाचिनीं बरोबर सुखाने राहलास, मानवाने ज्या तऱ्हेने जीवित चालविणे योग्य ते तुला मुळीच आवडले नाही. इतरांनी तुझ्या हिताचे म्हणून तुला जे काही सांगितले ते तुला आवडले नाही आणि तू हे चक्र स्वतः मागून घेऊन डोक्यावर ठेवून घेतलेस! तू जिवंत असेपर्यंत हे असिधारा चक्र तुला सोडणार नाही!"

मित्रविंदक त्याच्या कपाळी आलेल्या त्या दुर्दशेची कल्पना करून दुःखी झाला.





## राणा प्रताप

अकबराने आपल्या सौहार्दपूर्ण व्यवहाराने एकट्या मेवाडच्या युवराज राणा प्रताप याच्या शिवाय इतर सर्व रजपूत रजवाड्यांना वश करून घेतले. स्वतंत्र विचार असलेला साहसी व शूरवीर राणा प्रताप याने अकबरासमोर मान तुकविली नाही. म्हणून काय वाटेल ते करून मेवाडचे राज्य जिंकायचे असे अकबराने ठरविले.

अकबराने मेवाडची राजधानी चित्तोडवर या पूर्वीच स्वारी केली होती. राणा प्रतापचे वडील राणा उदयसिंग हे जंगलात पळून गेले होते. परंतु शूर सेनापतीने अकबराला चित्तोडच्या किल्ल्यात पाऊल टाकू दिले नाही.





एके दिवशी रात्री शत्रू शिबिराला वेढा घालण्याच्या प्रयत्नात असल्याचे कळताच डोंगरावरच्या तटावरून काही रजपूत वीर मशाल पेटवून पाहू लागले. तेव्हां अकबराने चटदिशी शेजारच्या सैनिकाच्या हातातून बंदूक घेऊन एका रजपूत सैनिकाला ठार केले. तो सैनिक म्हणजेच जयमल्ल होता.










म्हणून चित्तोडचा किल्ला अकबराच्या हातात आला. त्याच दिवशी सकाळी दोन हजार रजपूत वीर अपूर्व साहस दाखवून किल्ल्याबाहेर पळून गेले. त्यांच्या बायका व मुलं आपापले हात बांधून अकबराच्या सैन्याच्या शिबिराच्या वाटेनेच गेली. आपले सैनिक शत्रूच्या लोकांना कैद करून घेऊन जात असावेत असे अकबराच्या सैनिकांना वाटले.

रजपूत वीरांचे शौर्य व साहस पाहून अकबर चकित झाला आणि दिल्लीला परतला आणि त्या शूर सैनिकांचे स्मृति चिह्न म्हणून आपल्या किल्ल्याच्या समोर जयमल्लाचा घोडेस्वारच्या रूपात एक पुतळा स्थापन केला.





चित्तोडचा किल्ला मोगलांच्या हाती गेला असला तरी राणा प्रतापाने मोगलांशी युद्ध चालू ठेवले. शेवटी प्रतापचा धाकटा भाऊ शक्तिसिंह अकबराला वश झाला. एके दिवशी पर्वत शिखरावरून आपल्या लाडक्या चेतक घोड्यावरून राणा जात असता मोगल सेनापती अफझलखानाने त्याचा पाठलाग केला.



चेतक दमला होता आणि घायाळही झाला होता. तरी तो पळतच होता. कोणी हाक मारीत असल्याचा भास होऊन राणा प्रतापने मागे वळून पाहिले. "तुझा घोडा अगदी शेवटच्या घटकेला आहे, माझा घोडा घे!" पाठलाग करणारा शक्तिसिंह म्हणाला. चेतक मेल्यावर आपल्या धाकट्या भावाच्या घोड्यावरून राणा प्रतापने तेथून पळ काढला.

राणा प्रतापने त्याची राणी व मुलांसह जंगलात फार हालअपेष्टा सहन केल्या. एकदा शत्रूने राणा प्रतापच्या कुटुंबियांना वध करण्याचा घाट घातला तेव्हां जंगलातील भिल्लांनी त्यांना आश्रय देऊन वाचविले.





राणा प्रतापच्या मुलांना कंद मुळे फळे खाऊन झाडाखाली गवतावर झोपावे लागत होते. तरी देखील राणाने शत्रूसमोर मान वाकविली नाही.

एके दिवशी राणा प्रतापची मुलगी कसली तरी भुळी खात होती. तितक्यात एका रानटी मांजराने ती भुळी ओढून नेली. मुलीला रडत असलेली पाहून राणाचे डोळे पाणावले. त्यानंतर राणात मोंगलांशी सामना करण्याचा त्वेष जास्तच वाढला, त्यांच्या समोर वांकण्याची गोष्टच त्यांच्या मनात आली नाही.





असामान्य साहस व शौर्य दाखवून राणा प्रतापने मोगलांशी युद्ध केले. नंतर त्याने मेवाड राज्यातील काही परगणे मोगलांच्या हातातून परत जिंकले. मोंगलासमोर मान न वांकविणारा एकटे रजपूत घराणे म्हणून मेवाडचे घराणे प्रसिद्ध झाले.

रजपुतांच्या शौर्य साहसाचे मूर्तिमान रूप म्हणून राणा प्रताप भारताच्या इतिहासात प्रसिद्ध झाला. असा हा शत्रू समोर मान न झुकविणारा स्वातंत्र्यवीर राणा प्रताप १५९७ मध्ये अमरत्वाला प्राप्त झाला.



# न्याय देणारी कातरी

**फार** प्राचीन काळी कलिंग देश हा 'न्याय देणारा देश' म्हणून त्याची फार ख्याती होती. त्याचं कारण न्याय देणारी एक अत्यद्‌भुत त्या देशात कातरी होती. ती कातरी दोषी कोण व निर्दोष कोण हे काटेकोरपणे सांगे.

कित्येक पिढ्यान पिढ्या त्या राजघराण्यातली अत्यंत मूल्यवान वस्तू म्हणूने सर्व राजवंशीय त्या कातरीला मानीत. ती कातरी अगदी विचित्र तऱ्हेने बिनचूक न्याय निवाडा करी.

ती न्याय देणारी कातरी नेहमी राजवाड्यासमोर टांगलेली असे. वादी प्रति वाद्यांना कोणत्याही न्याय धिशाकडे आपले गाऱ्हाणे घेऊन जाण्याची गरज नसे. न्याया अन्यायाचा निर्णय ही कातरीच बिनचूककरीत असे. वादी व प्रतिवादी त्या कातरीजवळ येत. त्यांच्या त्यांच्या बाजूचे लोकही येत. कोणाच्या बाजूने न्याय होणार हे पाहणारे इतर लोकही कुतूहल म्हणून त्या कातरीजवळ एकत्र जमा होऊन उभे रहात. फिर्यादी त्याच्यावर जो अन्याय झालेला असतो कातरीसमोर निवेदन करी. त्यावेळी तो आपले दोन्ही हात एकावर एक ठेवून कात्रीच्या दोन्ही पात्यांच्या मध्य भागी धरी. त्याचप्रमाणे प्रतिवादी सुद्धां आपली बाजू मांडून आपले दोन्ही हात एकावर एक ठेवून कातरीच्या दोन्ही पात्यांत ठेवून उभा राही. दोघांपैकी जो खोटे बोले त्याचे दोन्ही हात ती कातरी खटकन कापून टाकी.

एकदां वरप्रसाद म्हणून लाभलेली न्याय देणारी ती कातरीसुद्धा बरोबर न्याय न करू शकली असाही एक प्रसंग आला. असा प्रसंगही येईल याची

श्री पां. ना. बापट



कल्पनाही कधी कोणी केली नव्हती. असे झाले की बाजारात शेजारीशेजारी व्यापार करणाऱ्या दोघां व्यापाऱ्यांत काही कारणावरून भांडण झाले. एक जण म्हणाला—"मी दूर गांवी जातांना आपल्या जवळच्या शंभर मोहोरांचे सोने दुसऱ्या व्यापाऱ्याकडे ठेवायला दिले होते. परत आल्यावर मांगू लागलो तर तो म्हणाला, त्याच्याकडे ठेवलेच नव्हते. हा काय न्याय झाला?"

दुसरा व्यापारी म्हणाला—"हा दूर गांवीं कोठे गेला की नाही, हे मला माहीतच नाही. त्याच्या जवळ शंभर मोहोरांचे सोने कधी होते की नाही, हेदेखील मी ऐकले नाही. परंतु एक गोष्ट मात्र मी शपथ घेऊन सांगतो. ह्याने शंभर मोहो-रांचे सोने म्हणून सांगून माझ्याकडे कधी ठेवले नाही. त्याने एका शब्दाने ते मला सांगितलं ही असेल तर शपथ!" त्याने आपली सफाई या शब्दात दिली.

आतां या दोघांपैकी खरा कोण आणि खोटा कोण, हे कसे सांगायचे? दोघांनी देवी देवतांच्या आणा शपथा घेतल्या होत्या.

गावातली प्रमुख दहा नागरिक मंडळी जमली. चार दिवसांचा दोघांना अवधी देण्यात आला. या अवधीत जर का दोघां मधील भांडण मिटलं नाही, तर न्याय देणाऱ्या कातरीकडे जाणं अवश्यक आहे, असे ठरले.

"माझ्याजवळ शंभर मोहारांचे सोने त्याने ठेवलेच नव्हते, असा तो थापा मारतो आहे. तो खरोखर दोषी आहे. मी सोने ठेवतो हे म्हटले व त्याने होकार दिला. ते सोने गिळंकृत करण्याचा त्याचा विचार दिसतो आहे." या शब्दात पहिल्या व्यापा-ऱ्याने ओरड केली.

परंतु न्याय देणाऱ्या कातरीचा निवाडा काय होतो, हे दुसऱ्या व्यापाऱ्याला माहीत नव्हते असे नाही. खोटे बोलणाऱ्याचे दोन्ही हात कापले जातात हे त्याने मागे कित्येकदां



डोळयांनी पाहिले होते. म्हणून त्या संकटा-तून निसटण्याच्या हेतूने त्याने प्रथमच एक युक्ती योजून ठेवली होती.

त्याला काही माहीतच नाही असा आव आणून एका वडीलधाऱ्या माण-साच्या हातातल्या सोटया सारखा एक जाडजूड सोटा हलवीत तो न्याय देणारी कातरी होती तेथे आला.

असंख्य प्रजा कात्री काय न्याय देते बघायला राजवाडयासमोर एकत्र झाली. कातरी यथास्थानी लोंबत होती.

शंभर मोहोरांचं सोन घालवून बसलेला पहिला व्यापारी त्या कातरीच्या दोन्ही पात्यांच्या मधोमध आपले दोन्ही हात ठेवून शपथ घेऊन त्याच्यावर झालेला अन्याय सांगून रडू लागला. दोघांचे मित्र आणि प्रजा कातरीकडे एकाग्र चित्ताने पहातच राहिले. परंतु कातरी थोडी देखील हलली डुलली नाही.

त्यानंतर शंभर मोहारा गडप करणाऱ्या दुसऱ्या व्यापाऱ्याची पाळी आली. तो न्याय देणाऱ्या कातरीजवळ अगदी निर्भयपणे आला आणि बाजूला उभा असलेल्या पहिल्या व्यापाऱ्याला सोटा धरायला सांगून आपले दोन्ही हात कातरीच्या दोन्ही पात्याच्या मध्ये धरून उभा राहिलाव शपथ घेऊन म्हणाला—



"मी कोणाचे सोने अपहरण केले नाही. मी मोहोरा अपहरण केल्या म्हणून त्याने माझ्यावर आरोप लावला आहे, परंतु त्या शंभर मोहोरा त्या व्यापाऱ्याजवळच कदाचित असाव्यात!"

दोघांचे मित्र आणि प्रजा कातरीकडे एक टक लावून पहात असतां एका क्षणार्धात त्याचे दोन्ही हात कापले जाणार असा सर्वांच्या मनात विश्वास असतां आणि शिवाय पहिल्या व्यापाऱ्याचे दोन्ही हात कापले गेले नाहीत हे प्रत्यक्ष पाहिले असतां हा दुसरा व्यापारीच गुन्हेगार असणार, असे सर्वांना वाटत होते. परंतु आश्चर्य! ती कातरी हालली










डुललीही नाही. मग दोघांपैकी गुन्हेगार कोण ? कोण निर्णय देणार ?

त्या देशात त्या पूर्वी असे कधी घडलेच नाही ; ही एक अत्यत्‌भुत अशी घटना होती. सर्व लोक थक्क होऊन परस्परांकडे व कातरीकडे पहात होते. दोघां व्यापाऱ्यांचे मित्र काही सुचेना म्हणून कपाळावर हात धरून बसले होते. कित्येक पिढ्या न्याय निवाडा करण्यात न चुकलेली ती कातरी एकदम आपले महत्व घालवून बसली.

अशाप्रसंगी एका वडीलधाऱ्या माणसाला एकाएकी एक गोष्ट सुचली. त्यातली गोम कोठे आहे हे त्याने ओळखले. गुन्हेगाराने केलेली लबाडी बिचाऱ्या कातरीला सुद्धा न कळण्यासारखी होती, हे त्याला कळले.

त्या लबाड व्यापाऱ्याने लबाडी करून जय मिळविला. या बाबतीत त्याने नीति अनीतीचा विचार सोडला आणि तो वाकड्या मार्गाने गेला. त्याने शपथ घेऊन दोन्ही हात कातरीच्या दोन्ही पात्यांच्या मध्ये ठेवतांना त्याने त्याच्या हातातला सोटा पहिल्या व्यापाऱ्याला धरायला दिला होता. तो सोटा परत मागून घेऊन दुसरा व्यापारी स्वत:ला निर्दोषी असल्याचे सिद्ध करून घरी निघाला होता. तो चार पावलेच गेला असेल त्याला पाठीमागून कोणीतरी हाक मारीत असल्याचे ऐकू आले, त्या वडीलधाऱ्या माणसाने तो सोटा दुसऱ्या व्यापाऱ्याच्या हातातून हिसकावून घेऊन मधोमध मोडला. आणि त्या सोटयांतून शंभर मोहोरा गळून पडतांना लक्षावधी प्रजेने आश्चर्यचकित होऊन पाहिले.

चार वडीलधाऱ्या मंडळींनी त्या शंभर मोहोरा पहिल्या व्यापाऱ्याला दिल्या आणि दुसऱ्या व्यापाऱ्याला योग्य शिक्षा सांगितली.

परंतु आजपर्यंत कधी न चुकलेली ती न्यायदेणारी कातरी मात्र सर्वांच्या नजरेतून उतरली. राजवाड्यातल्या जुन्या सामानाच्या कोठीत ती टाकून देण्यात आली.

त्या दिवसा पासून न्याय देणाऱ्या न्यायाधिशांना भरपूर काम मिळू लागले.





# लटकी मेजवानी

फार पूर्वी बगदाद शहरांत एक फार श्रीमंत वृद्ध माणूस राहात असे. त्याचा वाडा म्हणजे एखाद्या राजवाड्या-सारखा होता. त्याच्या चारी बाजूला सुंदर उद्यान होते. त्याच्याकडे अनेक नोकर चाकर होते. परंतु तो स्वभावाने फार दुष्ट होता. अभाग्य स्थितीत फाटके कपडे घालून फिरणाऱ्या गोरगरिबांना त्रास देण्यांत त्याला फार आनंद वाटे.

एकदां तो आपल्या ओटीवरच्या गादीवर बसला असतां एक गरीब भुकेला माणूस आला व त्या श्रीमंत माणसाला नम्रपणे नमस्कार केला. त्या गरीब माणसाचे नाव शक्काषिक होते. तो दुर्दैवी माणूस पोटभरण्या-साठी दारोदार भीक मागीत फिरत असे.

म्हाताऱ्या श्रीमंत माणसाने त्याला अत्यंत प्रेमाने जवळ बोलविले व विचारले— "बाबा, रे! तुला काय पाहिजे ?"

"मालक, थोडा धर्म करा! गरिबावर दया करा! दोन दिवस झाले, काही खायला मिळाले नाही. पोटात वणवा पेटला आहे!"

म्हातारा मोठ्या आवेशाने म्हणाला— "या अल्ला! मी या गावात जिवंत असतां कोणाचा जीव भुकेने कासवीस होतो आहे ? ही गोष्ट मला कदापि सहन होणार नाही."

"तुमच्या दहा पिढ्या सुखाने राहोत मालक! आतां उपासमार सहन करणे अशक्य झालं आहे!" शक्काषिक म्हणाला.

"तरमग तू माझ्या कडेच राहून आज माझ्या बरोबर जेव!" असे म्हणत म्हाताऱ्याने एका मुलाला बोलावून हात पाय धुवायला पाणी आणून द्यायला सांगितले. नंतर स्वत: त्या म्हाताऱ्याने सुजातले पाणी काढल्यासारखं केलं व लटकं लटकं हात धुवून म्हणाला—"तू सुद्धा हात धुवून घे!" शक्काषिकला म्हणाला.

त्या बिचाऱ्याने हात भिजल्यासारखा अभिनय करून लटके लटकेच हात पुसले.

परंतु हे काय नाटक चालले आहे, त्या गरीबाला कळेना.

म्हातारा चेष्टेने हे सर्व करीत असावा, आपणही तसेच करावे, असा विचार करून त्याने हात धुवून पुसल्याचे सोंग केले.

म्हाताऱ्याने नोकरांना हुकूम सोडला—"अरे, ए! टेबलावर चादर अंथरून लवकर जेवायला वाढा! बिचारा हा फार भुकेला आहे! आटपा, लवकर!"

ते ऐकून पुष्कळसे नोकर धांवपळ करीत असलेले दिसले. काही नोकर टेबलावर चादर अंथरत असल्याचा अभिनय करीत होते, तर काही जण ताटे पुसून टेबलावर ठेवीत असल्याचे आणि खाद्य पदार्थ आणून ठेवीत असल्याचा अभिनय करीत होते.

शक्काषिकच्या पोटांत डोम पेटला होता आणि त्याला ही सर्व नाटकी मेजवानी पाहून राग येत होता. परंतु त्याला काही करतां येत नव्हते. श्रीमंतांचे हे खेळ नुसते पहावयाचे असतात, त्यांना नावे ठेवणे धोक्याचे असते हे त्याला चांगले माहीत होते.

"येरे बुवा, येऊन बस, आता जेवू या! कर सुरवात!" असे म्हणत तो म्हातारा त्याच्या समोर नसलेले, परंतु असल्या सारखे सर्व खाद्य पदार्थ खात असल्या सारखा व कोणता व किती रुचकर आहे हे सांगत जणुकाही ताव मारून खात होता. तो आपल्या पाहुण्याला म्हणाला—"संकोच करू नकोस, सावकाश जेव! वाटेल ते मागून घे, बरं का? हा लाडू पहा. किती चांगला झाले आहे!

"अहो, इतके चांगले पदार्थ मी कधी खालले नव्हते या पूर्वी, ऐकले सुद्धा नव्हते!" या शब्दात त्या लटक्या मेजवानीची शक्काषिक वाखाणणी करीत होता.

म्हातारा ते सर्व खाद्य पदार्थ करणाऱ्या निग्रो संपाकिणी विषयी व तिला तो देत असलेल्या पगाराविषयी खूप वर्णन करून सांगत होता. त्याच बरोबर समोर ठेव-लेल्या मांस, अंडी व इतर पदार्थांविषयीही खूप वर्णन करून सांगत होता. त्या खाद्य-पदार्थांचे वर्णन ऐकून भुकेल्या शक्काषिकचा जीव जास्तच कासावीस होत होता.

मुख्य जेवण संपल्यावर म्हाताऱ्याने खास खास पक्वान्ने, शिरा वगैरे आणायला नोकरांना सांगितले. नोकरांनी ते सर्व पदार्थ आणून ठेवल्याचे नाटक केले.

म्हाताऱ्याने पूर्वी इतर पदार्थांचे वर्णन केले होते अगदी त्याच पद्धतीने या नव्या पक्वान्नांचे वर्णन केले आणि आपल्या पाहुण्याला ते पदार्थ कसे काय आवडले विचारू लागला.

त्यानंतर म्हाताऱ्याने फळफळावळ व पेये आणायला नोकरांना आज्ञा केली.

त्यानंतर नोकरांनी टेबलावर ठेवलेल्या सर्व थाळ्या व ताटे उचलून नेत असल्याच





अभिनय केला आणि निरनिराळी सरबते, दारूच्या बाटल्या व पेले आणून ठेवल्याचे नाटक केले.

"पी, बाबा! तुला हवं ते आणि हवं तितकं! संकोच करण्याचे मुळीच कारण नाही! ही दारू पाहिलीस का? फार जुनी, पी हवी तितकी!" या शब्दात म्हातारा आपल्या पाहुण्याला प्रोत्साहन देत होता आणि त्याच्या तोंडाला पेले भरभरून पाजीत असल्याचे सोंगही करीत होता.

इतका वेळ म्हाताऱ्याचे हे नाटक निमूट-पणे सहन करीत राहल्यावर शक्काषिक त्यानंतर मात्र गप्प राहू शकला नाही. तो एकदम उठून उभा राहिला आणि म्हा-ताऱ्याची मानगुटी आपल्या दोन्ही हातांनी धरून आवळली. तेव्हां म्हातारा जोराने ओरडला–"काय करतो आहेस रे चांडाला?" त्याच्या आवाजाने सर्व वाडा दुमदुमला.

तो म्हणाला–"मालक, मी आपला गुलाम आहे! तुम्ही ती दारू मला पाजाय-लाच नको होती! मला दारूची संवय नाही! परंतु तुम्ही पाजलीत म्हणून दारू एकदम चढली!"

ते ऐकून म्हातारा खदखदां हसून म्हणाला–"अरे, मी आतांपर्यंत किती जणांना अशा तऱ्हेने रडविले आहे! परंतु एकानेही तू दाखविलीस तितकी सहनशक्ती दाख-दिली नाही! हास्य कसे करायचे व त्याला साद कशी द्यायची हे तुझ्या इतके एकातही मी पाहिले नाही. तू मला चांगला धडा दिलास! तर मग बस! आता तुला खरी मेजवानी देतो!"

या खेपेस खरी मेजवानी झाली. खरे पदार्थ टेबलावर आले. त्या पूर्वी म्हाताऱ्याने ज्या ज्या पदार्थांचे तोंड भरून वर्णन केले होते. ते सर्व पदार्थ टेबलावर आले. ते खाऊन शक्काषिकला फार आनंद झाला.

तेव्हां पासून शक्काषिकचा जीव भुकेने कधीच कासावीस झाला नाही. त्याला आमरण पोटभर म्हाताऱ्या कडून जेवायला मिळत राहिले.





# क्रूरातिक्रूर प्राणी-माणूस

एका निर्जन रानात सर्व तऱ्हेचे पशु पक्षी रहात असत. मृगराज सिंह त्यांचा राजा होता. म्हणून त्याच्या राज्यात सर्व सुखाने रहात असत. त्या रानांत कधी कोणी माणसाने पाऊल टाकले नव्हते. त्या रानांत एक बदक झोपले असतां त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याला एक माणूस दिसला. त्या माणसाने त्या बदकाच्या पाठी-वर प्रेमाने हात फिरविला. बदक माणसा जवळ जात असतां त्याच्या कानांत कोणी तरी म्हटले–"त्या प्राण्याच्या जवळ जाऊ नकोस. सर्व प्राण्यात तो प्राणी जास्त क्रूर आहे!" ते शब्द कानावर पडतांच बदक दचकून जागे झाले आणि घाबरून वाट फुटेल तिकडे पळू लागले.

पळतां पळतां बदक सिंह राही त्या गुहे-समोर सिंहाचा युवराज छावा उभा होता तेथे येऊन पोंचले. सिंहाच्या छाव्याला त्याचे आई बाप कधी गुहे बाहेर पडू देत नसत. म्हणून तो जंगलात राही, तरी त्याला जंगलातल्या प्राण्यांची थोडी देखील माहिती नव्हती.

एक पक्षी घाबऱ्या घाबऱ्या पळत येत असलेला पाहून सिंहाच्या छाव्याने त्याला विचारले–"अरे पक्ष्या, असा घाबरून कोठे पळतो आहेस?"

"महाराज, मी एक बदक आहे, मी स्वप्नात माणसाला पाहिले आणि मनुष्य हा क्रूर प्राणी आहे असे ऐकून पळतो आहे!"

"अरे वेड्या! मी मृगराज असतांना तुला कोणत्याही प्राण्याचे भय वाटण्याचे कारणच काय? मी त्या माणसाला फाडून फेंकून देईन. मागे मला सुद्धा स्वप्नात माणूस दिसला तेव्हां सावध करण्यात आले होते. परंतु मला काही झाले नाही." असे सांगून तो सिंहाचा छावा बदक आले

श्री व्यं. ना. खरात



त्याच बाजूला जोराने चालू लागला. बदक सिंहापाठोपाठ जाऊ लागले.

ते दोघे काही अंतर चालून गेले तेव्हां त्यांना आकाशात धूळ उडत असलेली दिसली. "तो पहा, माणूस येत असावासा वाटतो आहे. तू बाजूला लपून बस!" सिंहाचा छावा म्हणाला.

परंतु जवळ आले ते एक गाढव होते. सिंहाने त्याला विचारले–"कोण रे तू? तू कोणत्या जातीचा? तू असा घाबरून कां पळतो आहेस?"

"महाराज, मी एक गाढव आहे. मनुष्य किती क्रूरपणाने मला वागवितो, तुम्हांला त्याची कल्पनाच होणे शक्य नाही. मी मोठमोठी ओझी वाहिली, किती फटके खाल्ले! मी जितके जास्त ओझे वाहिले तितके जास्त फटके मला खावे लागले. तो आतां मला ठार करील!" गाढव म्हणाले.

"मी मृगराज असतां कोणी तुझ्या केसालाही धक्का पोंचवू शकणार नाही" सिंह म्हणाला.

"क्षमा करा महाराज! त्या माणसाच्या दृष्टीस पडण्या इतकेही धैर्य माझ्यात नाही!" म्हणत गाढव निघून गेले.

पुन्हां दुरून आकाशात धूळ उडत असलेली दिसली. परंतु या खेपेस एक घोडा पळत धापा टाकीत व तोंडातून फेस काढीत येत होता. त्याला थांबवून सिंहाच्या छाव्याने त्याला त्याचे नाव, पळण्याचे कारण विचारले.

घोडा म्हणाला–"महाराज, आपल्या मालकापासून सुटका करवून घेऊन आलो आहे!"

"अरे, तू एवढा मोठा प्राणी दिसतो आहेस, एवढी शक्ती तुझ्या अंगात असतां माणसाला भिऊन पळतो आहेस?" सिंहाने विचारले,

"नाही तर काय महाराज! तो भयंकर क्रूर, आणि हुशार आहे. कित्येक दिवसां माझ्यापासून त्याने करून फुकटाची बेगारी करून घेतली. माझ्या पाठीवर स्वारी केली. मला लगाम घालून मला चाबकाने मारले. पोटांत टांचा मारल्या माझे पोट दुःखू लागलं आहे. मला ठार करून तो माझं चामडं काढायला मागे पुढे पाहणार नाही." घोडा म्हणाला. सिंहाने त्याला किती धीर दिला तरी घोडा थांबला नाही, पुढे निघून गेला.

नंतर त्याच बाजूने एक उंट धावत पळत येत असलेला दिसला. तो सुद्धा माणसाला भिऊन पळत असल्याचे कळले.

"तुम्हां सर्वांच्या रक्षणाची जबाबदारी माझी! पळू नकोस! तू तुझ्या पाठीमागून जो माणूस येतो आहे त्याचा समाचार मी कसा घेतो ते तू पहा तरी!" सिंह म्हणाला. परंतु उंट ते न ऐकतां माणसाच्या दृष्टीसही न पडतां पुढे निघून गेला. 'या प्राण्यांना माझ्या अंगात किती शक्ती आहे, याची कल्पना सुद्धा नाही,' असा विचार करून सिंह आश्चर्य करू लागला.

आणखी काही वेळाने एक म्हातारा माणूस येत असलेला दिसला. त्याच्या डोक्यावर एक टोपली होती. टोपलीत सुताराची हत्यारं होती व काही फळकुटे ही होती. सिंहाला पाहून त्याने डोक्यावरची टोपली जमिनीवर ठेवली व सिंहाला साष्टांग नमस्कार करून म्हणाला–"जय हो, महाराज! शतायु भव!" त्याच्या सर्वांगावर सुरकुत्या पडलेल्या होत्या. अशा त्या विचित्र प्राण्याला पाहून सिंह खदखदां









हसला व विचारू लागला—"कोण रे तू? कोणत्या जातीचा प्राणी?"

बदकाने माणसाला पाहिले आणि तत्काल बेशुद्ध होऊन पडले. म्हणून, ते तो माणूस असल्याचे सांगू शकले नाही.

"महाराज, मी एक सुतार आहे. सुतार जातीचा आहे. महाराजांच्या पदरी मंत्री म्हणून काम करीत असलेल्या बिबळ्या वाघाने घर बांधून दे, असा निरोप पाठविला, म्हणून त्यांच्याकडे जातो आहे!" सुतार म्हणाला.

"आमचे घर बांधून दिल्या शिवाय आमच्या मंत्र्याचं घर तू कसा काय बांधणार रे? आमचं घर पहिल्याने बांध, आणि नंतर पुढे पाऊल टाक!" सिंह रागाने म्हणाला.

"पहिल्याने बिबिळ्या वाघाचे घर बांधू द्या, त्या नंतर महाराजांना एक मोठा वाडाच बांधून देतो!" सुतार टोपली डोक्यावर घेत म्हणाला.

"सुताराच्या जातीच्या प्राण्या! मी कोण, तू ओळखलं नाहीस, वाटतं?" असं म्हणत सिंहाने पुढल्या पायाचा पंजा सुताराच्या छातीवर ठेवून त्याला थोडा धक्का दिला. बिचारा सुतार त्या लहानशा धक्क्यानेच खाली पडला.

"बरे महाराज, आपल्या हुकमाप्रमाणेच करतो." असे म्हणत सुताराने एक पिंजरा सिंह आत राहील एवढा मोठा केला आणि सिंहाला "आत जाऊन पहा, महाराज!" म्हणाला.

सिंहाने पिंजऱ्यात पाऊल टाकल्या-बरोबर सुताराने पिंजऱ्याचे दार घट्ट बंद करून घेतले आणि सिंहाला आपल्या गावी ओढून घेऊन गेला. "काय रे, सुतारा? हे काय रे, करतो आहेस?" सिंहाने सुताराला ओरडून विचारले.

"मी मनुष्य आहे, मला पाहून तू पळून जायला हवे होतेस!" असे म्हणत सुतार पोट धरून हसू लागला.






बली-चक्रवर्ती सुतल लोकात जाऊन पाताळ लोकाचा सम्राट झाला आणि नित्य-नियमितपणे विष्णूची पूजा करीत सुखाने राहू लागला. देवांना स्वर्ग व इंद्राला स्वर्गाचे राज्य प्राप्त झाले.

बली राही त्या सुतल लोकाच्या द्वारा-वर वेत्रदंड धारण करून वामन रूपांत विष्णू द्वारपालकाचे काम करीत असतां एकदां रावणाच्या मनात सुतल जिंकण्याची महत्वा-कांक्षा उत्पन्न झाली व तो सुतल लोकात गेला. हा गिड्डा आपल्याला काय अडवणार या घमेंडीत रावण प्रवेश करू लागला. तेव्हां वामनरूपातील विष्णूने विराट रूप धारण करून पायाच्या अंगठ्याने रावणाला उडविले त्या धक्क्याने रावण लंकेत जाऊन पडला.

एका काळी आपण जेथे राज्य केले आणि जेथे सर्वदा सुकाळ होता तेथे शेतात पिके वगैरे कशी निघत आहेत हे पाहाण्या-साठी बली दरवर्षी एकदा भूलोकांत अदृश्य रूपे येतो. धान्ये चांगली निघावी, त्यांना रोग होऊ नये यासाठी खतपाणी देतो. पिकांना कृमिकीटकांची बाधा होऊ नये याची काळजी वाहातो. तो येतो तेव्हां त्याच्या स्वागतार्थ दिवाळीचा सण भूलो-कात साजरा होतो. दुसऱ्या दिवशी बलि-प्रतिपदा म्हणून बलीची पूजा होते. वामनाने त्रिविक्रम रूप घेऊन आकाशाला व्याप्त केले होते त्याचे स्मरण म्हणून आकाशदीप-म्हणजे आकाशकंदील लावतात.



दक्षिणेकडील महासागरात बळी येतो त्याचे द्वार म्हणून दक्षिण दिशेला एक दीप लावतात. त्याला बलिदीप असे नाव पडले.

बलिचक्रवर्तीचे वंशज पल्लव चक्रवर्ती, त्यांनी बलीच्या नावे महाबलीपुरम येथे उत्तम शिल्पाचा नमुना असलेले एक नगर वसविले आणि कांचीपुरम येथे त्रिविक्रम वामनावताराची एक मूर्ती व देवालय निर्मिले.

बलिचक्रवर्तीचे राज्य होते तोंपर्यंत चिरडलेल्या क्षत्रिय राजांनी पुन्हां डोकी वर काढली. बळी तो कान पिळी, हाच न्याय झाला. राजकर्त्यांच्या निरंकुश कारभारामुळे प्रजेचा वाली कोणी राहिला नाही.

तेव्हां विष्णूने दशावतारांपैकी सहावा परशुरामावतार धारण केला आणि एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली.

त्या काळात सर्व क्षत्रिय राजघराण्यात थोर असा हैहयवंशी राजा कार्तिकेयार्जुन हा होता. तो सुदर्शन चक्राचा अंश म्हणून जन्मला होता.

एकदां विष्णू योगमुद्रेत असतां शंख व चक्र यांच्या मध्ये वादविवाद सुरू झाला.

"सहस्र किरणधारी सूर्याचे रज गळून पडल्यामुळे त्यातून विश्वकर्म्याने माझी निर्मिती केली. पृथ्वीवर सर्वत्र व्यापून टाकलेल्या राक्षसांचा मीच तर संहार केला. मला धारण करून विष्णूने चक्रधारी विष्णू ही कीर्ती संपादन केली! तुला नुसते ओरडण्याशिवाय काय येते रे?" सुदर्शन चक्र शंखाला म्हणाले.

तेव्हां पांचजन्य शंख म्हणाला—"होय रे, चक्र पुरुषा! एवढा गर्व करण्याचे कारण नाही! तू पृथ्वीवर एक घमेंडखोर राजा म्हणून जन्माला येशील! विष्णू मुनिकुमाराचं रूप घेऊन, लाकडे फोडायच्या एका कुऱ्हाडीसह येऊन तुझा सर्व गर्व हरण करील!" या शब्दात शंखाने शाप दिला.

तो शाप मिळाल्याने चक्रपुरुष कार्तवीर्यार्जुन नामें जन्माला आला व त्याने पृथ्वीवर चारही दिशा व्याप्त करून टाकणाऱ्या एका विस्तीर्ण साम्राज्याची स्थापना केली. तो भगवंताचा अवतार अशा दत्तात्रेयाचा भक्त व शिष्य होता. त्याच्या कृपेने कार्तवीर्यार्जुनाला अणिमादी अष्ट सिद्धी व अनेक शक्ती प्राप्त झाल्या. त्याला गरज पडे तेव्हां त्याला सर्व आयुधधारी सहस्र हातांची प्राप्ती होई," असे सूत ऋषींनी सांगतांच निमिषारण्यांतील मुनींनी सूत महर्षींना निवेदन केले—"मुनिवर्य, दत्तात्रेय हा विष्णूचा अवतारच नाही का? त्या दत्तात्रेयाची कथा ऐकण्याची फार इच्छा आहे!"





सूत महर्षींनी दत्तात्रेयाची कथा सांगायला सुरवात केली :

अत्रि मुनींनी पुत्रेच्छेने विष्णूला भगवंत मानून त्याचे स्मरण करून फार मोठी तपश्चर्या केली.

एका बाजूला ब्रह्मदेव व दुसऱ्या बाजूला महेश अशा रूपात विष्णू प्रकट होऊन अत्रि मुनींना म्हणाला—"मुनिवर्या! मी तुला दत्त म्हणून झालो आहे! आम्ही तिघेही एकच असल्या कारणाने त्रिमूर्तींच्या अंश रूपे मी तुझा पुत्र म्हणून जन्मलो. दत्तात्रेय नावाने मला सर्व ओळखतील!" असे सांगून विष्णू अंतर्धान पावला.

त्याच वेळी त्रिमूर्तींच्या अर्धांगिनी म्हणून गर्व करीत असलेल्या सरस्वती, लक्ष्मी व पार्वती यांच्या समोर येऊन नारदाने अत्रि-मुनींची साध्वी स्त्री अनसूयेच्या पातिव्रत्याचा महिमा त्रिलोकात अद्वितीय असल्याचे सहेतुक सांगितले आणि असेही सांगितले की तिने त्रिमूर्तींना व त्यांच्या अर्धांगिनींना साध्य नव्हते ते करून दाखविले.

अनसूयेने गंगेला त्रास देणाऱ्या पापांच्या भुतांचे निर्मूलन केले; नारदाने लोखंडाच्या घुगऱ्या करून तिला खायला दिल्या त्या तिने खाऊन पचवून दाखविल्या. सूर्याचा उदय थांबवून रोखून ठेवणाऱ्या सुमतीला सूर्योदय होऊ देण्यास समजावून सांगितले आणि सूर्योदयानंतर तिचा पती मरण पावला



तेव्हां अनसूयेने सुमतीच्या पतीला पुनर्जीवित करून दाखविले.

अनसूयेच्या पातिव्रत्याची थोरवी ऐकून तिघी देवी अनसूयेचा द्वेष करू लागल्या आणि तिघींनी त्यांचे त्यांचे पती आपल्या-बरोबर अनसूयेचे पातिव्रत्य भंग करून यायला पतींना पाठविले.

ब्रह्मा, विष्णू व महेश मुनिवेष धारण करून अत्रिमुनींच्या आश्रमांत गेले आणि 'भवति भिक्षान् देही!' म्हणून आश्रमा-समोर अतिथि रूपे उभे राहिले. तोंपर्यंत अत्रिमुनि तपश्चर्या पुरी करून आश्रमात परतले नव्हते. अतिथि सत्कार करण्याचा भार एकट्या अनसूयेवर येऊन पडला.

अनसूयेने त्रिदेवांचा सर्व प्रकारे अतिथि-सत्कार करून त्यांना जेवायला बसायला सांगितले.

तेव्हां कपटवेष धारण करून आलेल्या त्रिमूर्तींनी अनसूयेला म्हटले–"हे साध्वी! आमचं एक अखंड व्रत आहे, ते...ते." असे मागे पुढे करीत राहिल्यावर म्हणाले–"तू नग्न होऊन वाढलेस तरच आम्ही जेवू."

अनसूयेने "अस्सं होय? तर ठीक तसंच!" असे म्हणत त्यांच्यावर पाण्याने प्रोक्षण केले. त्या बरोबर तिघां अतिथींना अर्भक रूप प्राप्त झाले. त्यांना पाहून अनसूयेचे मातृत्व उचंबळून आले. तिने त्या तिघां तान्ह्या मुलांना मांडीवर घेऊन त्यांना दूध पाजले. त्रिमूर्ती अनसूयेच्या मांडीवरच झोपले.

अनसूयेने त्यांना पाळण्यांत झोंपविले आणि म्हणाली–"आज त्रिमूर्ती माझी मुले झाली. माझं केवढं भाग्य! सर्व ब्रह्मांडच यांचा पाळणा, चार वेद त्या पाळण्याच्या चार दोऱ्या आणि प्रणवनाद ओंकार त्यांना झोंपविणारी ओवी!" या शब्दांत तिने ओवी म्हटली.

त्याच वेळी आश्रमात कोठून तरी एक पांढरा शुभ्र बैल आला आणि दारावर येऊन उभा राहिला आणि मान हलवून काहीतरी बोलत असल्यासारखा भासला.



नंतर एक मोठा गरुड पक्षी आपले पंख फडफडवून आश्रमावर घिरट्या घालू लागला. त्यानंतर एक राजहंस चोंचीत एक कमळ धरून आश्रमाच्या उंबरठ्यात उतरला.

त्या पाठोपाठ चार रंगांची गोजिरवाणी कुत्र्याची पिल्लें शेपट्या हलवीत घरात शिरलीं. त्यांच्या बरोबर एक नाग आपली फडा काढून पुढे आला. इतक्यात महती वीणेवर नीलांबरी रागिणी वाजवीत नारद व त्याच्या पाठी-मागून सरस्वती, लक्ष्मी व पार्वती त्रिदेवी आल्या.

नारद अनसूयेला म्हणाला–"माते, या तिघी साध्वी उंबरठ्यावर त्यांच्या पतींच्या वाहनांना पाहून तिघींचे पती येथे असतील म्हणून त्यांच्या शोधार्थ आल्या आहेत. बराच वेळ झाला तरी पतिदर्शन न झाल्याने त्या पति-विरहाने विह्वळ झाल्या आहेत. त्यांचे पती त्यांना परत कर बाई!"

अनसूया तिघींना नमस्कार करून नम्र-पणे म्हणाली–"मातांनो! त्या पाळण्यात तीन तान्ही मुलें आहेत, तुमचे पती असतील तर घेऊन जा!"

तिघी देवी थक्क होऊन पाहू लागल्या. तान्ही मुलं तिन्ही एक सारखींच दिसत होती आणि गाढ झोपी गेली होती. तिघी परस्परांची तोंडे पाहून मागेपुढे करू लाग-लेल्या पाहून नारद म्हणाला–"तुम्हांला आपला पती ओळखता येत नाही का? अशा लाजू नका! लवकर उचला आपापल्या पतीला! घाई-घाईने तिघींना एकेका तान्ह्या मुलाला उचलले.

तिघी तान्ही मुलं त्रिमूर्ती होऊन प्रगट झाली. सरस्वतीने शंकराला, लक्ष्मीने ब्रह्म-देवाला आणि पार्वतीने विष्णूला उचलून घेतले होते तिघी लाजल्या आणि दूर जाऊन उभ्या राहिल्या. तेव्हां ब्रह्मा, विष्णू व महेश परस्परांना चिकटून एक झाले.

त्याच वेळी अत्रिमुनी आश्रमात परतले आपल्या आश्रमात त्रिमूर्तींना पाहून मुनि-वर्यांनी हात जोडले त्या बरोबर त्रिमूर्ती दत्तात्रेय रूप घेऊन उभे होते. मध्ये विष्णू



व आजूबाजूला ब्रह्मा आणि शंकर यांची मुखे होती. दत्तात्रेयाला सहा हात होते आणि त्या हातांत शंख, चक्र, गदा, पद्म त्रिशूल आणि कमंडल होते. खांद्यावरच्या झोळीत भिक्षापात्र लोंबत होते. अशातऱ्हेने त्रिमूर्ति दत्तात्रेय होऊन अत्रि व अनसूया यांचे पुत्र म्हणून अवतरले.

नारदाने नाद नामक्रिया रागात दत्तात्रेयाचा स्तोत्रपाठ सुरू केला. "शंकराचे वाहन नंदी हा त्या दत्तात्रेयाच्या पाठी-मागे गोऱ्हा होऊन उभा राहतो. चार वेद कुत्र्याच्या चार पिलांसारखे बरोबर राहतात. नाग साप, गरुड व हंस आजू बाजूला फिरत असतात. दत्तात्रेय सर्वदा महर्षी सारखा जंगलात हिंडत राहून एकांतात आत्मानुसंधान करीत राहातो. अनेक दिव्य शक्ती आणि अष्टसिद्धी देणाऱ्या दत्तात्रेयाची मुनी सिद्ध व ज्ञानी सर्वदा आराधना करीत राहतात. असा हा दत्तात्रेय हैहय वंशाचे आराध्य दैवत म्हणून पूजिला जातो."

कार्तवीर्यार्जुन दत्तात्रेयाची पूजा व अर्चना करून महाबलशाली झाला आणि विजययात्रेला निघाला.

जमदग्नी ऋषींच्या मुलात राम हा सर्वात धाकटा. तो नेहमी कुऱ्हाड धारण करून आश्रम आणि जनपद स्थापन



करण्यासाठी जंगले कापीत सर्वदा फिरत असे. त्याने हिमालयात राहून तपश्चर्या केली व शंकराला प्रसन्न केले. शंकराने त्याला महा शक्तिशाली असा परशु दिला. तेव्हां पासून तो परशुराम झाला. भृगु वंशात जन्मला असल्याने त्याला भार्गव राम नांवही प्राप्त झाले.

एकदां परशुरामाची आई रेणुका नदीवर स्नानाला व पाणी आणायला गेली व बराच वेळ झाला तरी परतली नाही. जमदग्नी ऋषींनी दिव्य दृष्टीने बायको काय करीत होती हे पाहिले. चित्ररथ गंधर्व अप्सरांसह जलक्रीडा करीत होता. ती जलक्रीडा रेणुका देहभान

विसरून पहात होती. त्यामुळे जमदग्नी ऋषींना फार राग आला.

बायको परत आल्यावर जमदग्नी मुनींनी आपल्या सर्व मुलांना बोलावून घेतले आणि आईचे डोके छाटून टाकायला सांगितले. परशुरामाच्या वडील भावांपैकी कोणीही आईचे डोके कापायला तयार झाला नाही. परशुराम जंगलातून फिरून परतल्यावर जमदग्नी मुनींनी त्याला त्याच्या वडील भावंडांची डोकी आणि आईचे डोके कापून टाकायला सांगितले.

परशुरामाने उलट उत्तर न देतां पित्याच्या आज्ञेप्रमाणे एका घावात सर्व भावांची डोकी व आईचे डोके छाटून टाकले. जमदग्नी ऋषी मुलावर खूष झाले व त्यांनी त्याला काय हवे ते मागून घ्यायला सांगितले.

परशुराम म्हणाला—"माझ्या सर्व भावांना व आईला पुनर्जीवित करावे!"

जमदग्नी ऋषींनी त्यांना पुनर्जीवित केले. आपल्या तपश्चर्येच्या महिम्यावर इतका विश्वास असलेल्या आणि बुद्धिमान अशा परशुरामावर ऋषी प्रसन्न झाले व आशीर्वाद देऊन म्हणाले—"परशुरामा! तू चिरंजीवी होशील!"

कार्तवीर्यार्जुन आपली विजययात्रा संपवून आपली राजधानी माहिष्मवती येथे परत येत असतां वाटेत जमदग्नी ऋषींचा आश्रम लागला. त्यावेळी राजा व त्याचे सैन्य फार भुकेले होते. जमदग्नी ऋषींकडे कामधेनूचा अंश असलेली होमधेनू होती. तिच्या साहाय्याने जमदग्नी ऋषींनी कार्तवीर्यार्जुन व त्याच्या सैन्याचे उत्तम प्रकारे आदरातिथ्य केले. त्या गाईला काय पाहिजे ते देण्याची शक्ती असल्याचे कार्तवीर्याला कळले. त्याने विचार केला अशी गाय आपल्याकडे असली तर सैन्याला रसद व पाण्याची उणीव कधीच भासणार नाही. म्हणून त्याने आपल्या सैनिकांना आज्ञा केली की त्या गाईला माहिष्मवतीला धरून घेऊन चला. जमदग्नी ऋषी गाईला अडवून धरायला आले त्यांना जमिनीवर ढकलून सैनिक गाईला धरून घेऊन गेले.






कोण्या एका गावी कालिका बाई नावाची एक कैदाशीण मांत्रिक बाई होती. ती आपल्या मंत्रबळाने कुत्र्यांना बकरे व माणसांना पालेभाजी व वनस्पती करते अशी वदंता होती. अज्ञातऱ्हेने ती जे बकरे व वनस्पती करी त्यांना एकत्र शिजवून ते ती खाई व पचवी, अशी ख्याती होती.

ही गोष्ट पाताळातील एका राक्षसाला कळली. 'असे जगावेगळे खाणे खाणाऱ्या कैदाशिणीचे रक्त किती रुचकर असेल' असा एक विचार त्याच्या मनात आला. म्हणून अशा कैदाशिणीशी लग्न करून घेऊन तिला आपल्या पाताळ लोकात घेऊन जायचे त्या राक्षसाने ठरविले. एके दिवशी तो एका सुंदर राजकुमाराचे रूप घेऊन कालिकेच्या घरी आला.

"कालिका बाई, अहो कालिका बाई! तुझ्या रूपलावण्या विषयी त्रिलोकात लोक बोलतात ते ऐकून तुझ्याशी लग्न करायचे ठरवून आलों आहे! मग काय आहेस ना तयार? काय म्हणतेस?" राक्षसाने सरळ जाऊन विचारले.

ते ऐकून कालिकेला परमानंद झाला आणि ती "हि: हि: ही!" करून खूप हसली. म्हणाली—"तू म्हणालास ते ठीकच आहे रे, पण तू मला आपल्या गावी घेऊन जाऊ शकशील का?" कालिकेने विचारले, थोडेसे हिणवीत.

"त्यात काय, तू माझ्या पाठीवर बस, क्षणभरात तुला आमच्या गावी घेऊन जाईन." राक्षस ऐटीत म्हणाला.

"ठीक! परंतु .." उभी राहून कालिका म्हणाली.

राक्षसाने कालिकेला आपल्या पाठीवर बसवून घेतले. नंतर जेमतेम तीन चार पावलें टाकली आणि त्याने जमिनीवर




जोराने लाथ मारली, आणि जमीन दुभंगली. पाताळात जायची वाट दिसली.

राक्षस पाताळ लोकात निघाला. परंतु पुष्कळ प्रयत्न करूनही आणि कित्येक दिवस चालत राहिल्यावरही, कालिकेला खाली उतरविणे किंवा खाली फेंकून देणे त्याला शक्य झाले नाही.

त्यामुळे त्या राक्षसाने मनात जे योजले होते, ते सर्व त्याच्यावरच उलटते की काय असे त्याला वाटू लागले–"ह्या पिशाच्चाच्या हातून सुटका मिळाली की पुरे रे बाबा!" असे त्याला वाटले.

तो चालतां चालतां ब्रह्मराक्षसाला आळवू लागला–"मालक, हे ओझे वाहतां-वाहतां जीव कंठापर्यंत आला आहे, ही माझ्या पाठी वरून कशी खाली उतरेल, या साठी काही युक्ती सांग!"

ब्रह्म राक्षस त्याला म्हणाला–"आतां तुला तिची भीती वाटू लागली का रे? बाबारे, तिला असे भिऊन जाणे आपल्या पुरुष जातीला किती नामुष्कीच आहे रे! तू तिला जेथून उचलून आणलीस तेथेच नेऊन टाक!" ब्रह्मराक्षसाने त्याला सल्ला दिला.

कालिकेची पीडा कशी सुटणार या विचाराने राक्षस मागे वळला तेव्हां वाटेत त्याला एक धनगर दिसला. तो राक्षसाला म्हणाला–"शाबास! हे गाढवाचे ओझे किती दिवसापासून वाहतो आहेस रे?" तो राक्षसाची थट्टा करीत म्हणाला.

राक्षस चिडून गेला. मनांत म्हणाला–"हा कोणीतरी बिलंदर दिसतो आहे! मी या कैदाशिणीला कित्येक दिवसांपासून पाठीवर घेऊन जात आहे, हे याला कसे काय कळले, बुवा!" तो त्याला म्हणाला–"बाबारे, मला थोडी मदत करशील का रे?" असे म्हणत त्याला जो त्रास होत होता तो स्पष्टच सांगून टाकला राक्षसाने.

तो धनगर म्हणाला–"त्यात काय आहे रे? तिला माझ्या पाठीवर चढव!"






"जीव वांचला!" असे म्हणत राक्षसाने त्या कैदाशिणीला धनगराच्या पाठीवर चढविले. लगेच तो धनगर दक्षिणेकडे वळून पळू लागला.

"ती कैदाशीण त्याला सोडते का? आणि तो परत काय येतो?" असा विचार करून राक्षस मेंढरांचा कळप त्याला हवा होता तिकडे वळवून घेऊन चालला.

तो दोनच पावले गेला असेल धनगर परतून समोर उभा राहिला.

"काय रे ए! त्या कैदाशिणीला माझ्या गळयात बांधून माझा कळप पळवून न्यायच्या विचारात आहेस वाटतं?" धनगराने हंसत येऊन राक्षसाला विचारले. तो म्हणाला ते जणुकाही ऐकूच आले नाही, असे सोंग करून राक्षस म्हणाला–"त्या कैदाशिणीच्या हातून तू स्वतःला कसे सोडवून घेतले रे?"

"त्यात काय रे मोठे से? दुर्दैवी पडून कित्येक मेले असे एक सरोवर जवळच आहे. त्यात फेंकून परतलो. ती माझी घोंगडी घट्ट धरून बसली होती, सोडतच नव्हती. गेली तर गेली, त्या घोंगडी सकट तिला सरोवरात फेंकले." धनगर म्हणाला.

त्याने जो उपकार केला त्याबद्दल आनंदित होऊन राक्षस त्याला म्हणाला–"मग, तू एक काम कर! मी या देशाच्या राजकन्येला पळवून नेतो. तिला मुकी आंधळी करून टाकतो. आजपासून एकतीस दिवसांनी येऊन तू त्या राज-कन्येच्या कानात म्हण–"मी मेंढरे पाळणारा धनगर आहे, मुली!" एवढेच! मी तिला सोडून जाईन. त्यानंतर तुझे भाग्य कसे पालटेल ते तूच पहा!"

'बरं' म्हणून तो निघाला. शहरात त्याने पाऊल टाकलं तर त्याला एकच एक वार्ता ऐकू आली. "राजकुमारीची वाचा जाऊन एक महिना झाला. तिला पुन्हां वाचा आणून देईल त्याला अर्धे राज्य देऊन तिच्याशी लग्न करून देणार, म्हणे राजा!"



धनगर राजधानीच्या कोटापर्यंत आला तोंपर्यंत अनेक वैद्य, हकीम व भूत पिशाच्चांना वश करणारे मांत्रिक तोंडें वांकडी करून बाहेर येत होते. धनगराचा वेष पाहून सर्वांनी तोंडे फिरविली तरी तो वैद्य म्हणून आल्या कारणाने त्याला आत सोडणे भाग होते.

तो ऐटींत, छाती वर काढून आत्म विश्वासाने आत गेला. त्याने मंत्रातंत्राचे सोंग केले आणि शेवटी राक्षसाने सांगितलेला मंत्र राजकुमारीच्या कानांत सांगितला.

राजकुमारीचें अपहरण करून घेऊन गेलेला राक्षसाने राजकुमारीला सोडून

देणाऱ्या धनगराला "हे पहा, हाच प्रयोग शेवटचा उपाय! अशा औषध पाण्याचा प्रयोग आणखी कोणावर केलास तर तुझे डोके फुटेल, म्हणून सावध रहा!" असे सांगून सावध करून गेला होता.

राजकुमारी लगेच उठून बसली आणि जोर जोराने हंसू लागली. राजवाड्यात मंगल वाद्ये वाजू लागली. धनगर त्या देशाचा राजा झाला. परंतु कथा मात्र तेथेच संपली नाही.

राक्षस आपल्या संवयी प्रमाणे पुन्हां एका राज्याच्या राजकुमारीला धरून तिला तसाच त्रास देऊ लागला. तिची वाचा सुद्धा गेली, तिचे डोळे गेले.

त्या राजाने अनेक प्रकारे औषधपाणी केले, मंत्रतंत्र करून पाहिले. काही उपयोग झाला नाही. शेवटी पूर्वी घडलेली धनगराची गोष्ट राजाने ऐकली व त्या धनगराला बोलावणे पाठविले.

बोलावणे आल्यावर धनगर घाबरला. कारण पहिल्या राजकुमारीला सोडून जातांना राक्षसाने जी गोष्ट बजावून सांगितली होती ती त्याला आठवली.

तो नवीन राजाला म्हणाला—"महाराज, मी मांत्रिक नाही. व तांत्रिकही नाही. मी वैद्य तर नाहीच नाही. एक वर

मिळाला होता, त्याच्या प्रभावामुळे मी त्या राजकन्येला बरा करू शकलो, त्या मंत्राचा प्रभाव त्या राजकन्येवर केलेल्या प्रयोगाबरोबर संपला. म्हणून मला हे जमणे शक्य नाही!" धनगर नम्रपणे म्हणाला.

ते सर्व न ऐकतां नवा राजा म्हणाला— "आमची विनंती मान्य केलीस तर ठीकच, नाहीतर युद्धाला तयार हो!" त्याने तसा निरोप आपल्या राजदूताकरवी पाठविला.

धनगर राजा संदिग्धावस्थेत पडला. व शेवटी म्हणाला—"काय वाटेल ते होवो, पाहातो!" असे सांगून निघाला.

तो किल्ल्यात गेला. त्याने पूर्वी सारखेंच मंत्रातंत्राचे सोंग केले. आणि शेवटी राजकन्येच्या कानाजवळ तोंड नेऊन जोराने ओरडला.

"हे पहा, मी सांगतो ते सावधपणे ऐक! त्या दिवशी आपण सरोवरात टाकलेली कैदाशीण कालिका मेली असेल असे वाटले होते. परंतु ती मेली नाही. जिवंत वर आली आहे! तुला शोधत येत आहे, म्हणे, गावाच्या वेशीपर्यंत आली असेल असे सांगतात, तू माझ्यावर उपकार केलास म्हणून तुला हे मी आधी सांगून ठेवतो आहे..."

त्याचे बोलणे संपलेही नव्हते! 'कैदाशीण कालिका' हे शब्द कानावर पडतांच तो राक्षस ओरडला—"बाबारे!" आणि पाताळ लोकांत पळून गेला.

राक्षसाने जेव्हां सोडले तेव्हां तत्क्षणे राजकन्येने डोळे उघडून पाहिले आणि डाळिंबाच्या दाण्यासारखे तिचे सुंदर दांत, ती हंसू लागल्यावर दिसू लागले. मुलगी चांगली झाल्याचे कळतांच वचन दिल्या-प्रमाणे राजाने आपल्या मुलीचे लग्न त्याच्याशी थाटामाटाने करून दिले.

अशा तऱ्हेने तो भाग्यवान धनगर दोन राण्यांचा पती म्हणून राज्य करू लागला.



# चांदोबा

## तुमची परंपरा ओळखा स्पर्धा

### प्रवेश पत्र मिळालीत !

एक लक्षाहून अधिक स्पर्धकांची प्रवेश पत्र मिळालीत. अशा उत्साहपूर्ण सहयोगाबद्दल आभार! बक्षिसांसाठी घोडे-दौड सुरु झाली आहे.

कदाचित ह्या अंकात आपण स्पर्धेचा निकाल बघु इच्छिणार. परंतु स्पर्धकांचा उत्साह आणि आंकडे इतके जास्त आहेत की निर्णायकांना निर्णय घेण्यास अपेक्षेपेक्षा अधिक वेळ लागणार !

आमचे निर्णायकगण ह्याच कामात लागले आहेत. पुढील अंकात स्पर्धेचा निकाल आम्ही नक्कीच प्रकाशित करणार.

कृपा करुन आम्हांस सहयोग द्यावा !





# चांदोबा


संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी


या महिन्याची वेतालकथा यमगड ही आहे. जगात सर्व संग परित्याग करणारे साधू व संन्यासीयांना सुद्धा आपल्या गरजा भागविण्यासाठी गृहस्थाश्रमी लोकांवर अवलंबून रहावे लागते. म्हणून प्रजेने त्यांच्या विषयी गैर-समज करून घेऊ नये अशा तऱ्हेने साधू संन्याशांनी वागावयाचे असते, ही गोष्ट 'साधुस्वभाव' या गोष्टी वरून स्पष्ट होईल.

## अमर वाणी

चलत्काष्ठो ज्वलत्यग्निः, क्रुद्धः सर्पो विजृंभते ।
क्रोधादेव मनुष्यस्य, शक्तेः प्रायो विजृंभणम् ॥

[ जळती लाकडे हलविली तरच जाळ होतो ; क्रोध आला तरच साप फडा काढून उभा राहतो. माणसाचा आवेश व शक्ती राग आला तरच प्रगट होतात. ]


वर्ष : ३३ ऑक्टोबर १९८३ अंक : ४

एक प्रत : २-०० :: वार्षिक वर्गणी : २४-००

# चांदोबातील नवलाई



## इंग्रजी शिकलेला जलचर प्राणी

इंग्लंडातील (अमेरिकेतील) बोस्टन शहरातील जलचर प्राण्यांच्या प्रदर्शनात 'सील' नावाचा एक जलचर प्राणी आहे. त्याने इंग्रजी भाषेतील तीन शब्द शिकून घेतल्याचे आढळले आहे. दहावे वर्ष लागलेला हा सील मासा तिकडे येणाऱ्यांना "हल्लो...इकडे या", "कसं काय"? म्हणतो. आणि कंटाळून गेला असेल तर–"जा, इकडून" असे रागावून म्हणतो. तिकडे येणाऱ्या कडूनच सील माशाने हे शिकले असावे असे तेथील अधिकारी सांगतात.

## खुनी गुन्हेगाराला पकडणारे माकड



चीन देशातील यूनान नावाच्या शहरात रस्त्यात एक माकड नाना प्रकारे खुणा करून लोकांना बरोबर चलायला खुणावू लागले. त्याच्या खुणांना ओळखून काही लोक त्याच्या बरोबर गेले. ते माकड त्या लोकांना निर्जन स्थानी घेऊन गेले. तेथे एक माणूस खून होऊन पडला होता. एवढच नव्हे, त्या माकडाने लोकांच्या मधोमध असलेल्या दोघांना पकडले. त्यानंतर झालेल्या पोलिसांच्या चवकशीत ते दोघे मरून पडलेल्या त्या माणसाचे खुनी असल्याचे आणि ते माकड खून झालेल्या व्यक्तीचे पाळलेले माकड असल्याचे कळले.

## नक्षत्रांनी धाडलेला संदेश



गेल्या वर्षी २२ जून रोजी रात्री स्पेन देशातल्या लाग्रोनो नामक गावात क्षेव्हिअर बास्क नावाचा धार्मिक शिक्षण घेणारा एक विद्यार्थी अभ्यास करीत बसला असतां त्याच्या खोलीत एक वृत्ताकार प्रकाश आला. तेव्हा त्या खोलीतला रेडिओ एक विचित्र आवाज करू लागला. क्षेव्हिअर बास्कने तो आवाज रेकॉर्ड करून घेतला. त्या आवाजाचा खोल अभ्यास केल्यावर विल्लीस्मिथ नावाचा विज्ञान शास्त्रज्ञाला आढळून आले की तो आवाज अंतरिक्षांतील ग्रहांवरून किंवा 'फ्लाइंग सासर्स' वरून आलेला असावा.

## तुम्हाला माहीत आहे का?

१. 'इमारतींचे शहर' या नावे प्रसिद्धी पावलेले शहर कोणते?

२. 'सात पर्वतांचे शहर' हे नाव कोणत्या शहराचे आहे? ते नाव त्याला कसे आले?

३. 'स्वर्ण द्वार नगर' नामक नगर ते कोणते?

४. 'तीन दिवसांचे नगर' हे नाव, कोणत्या नगराला मिळाले?

५. 'साधूंचे नगर' हे कोणत्या नगराचे नाव आहे व ते का आहे?

६. 'शंभर शिखरांचे नगर' नावाचे नगर ते कोणते?'

(समाधान : पृष्ठ ६४)



# दहा वर्षांचा आजार

श्रृंगपूर नावाच्या गावी एकच एक दुकान होते. त्याचा मालक गंपूशेट होता. त्याच्या दुकानात सर्व वस्तू मिळत लोकांची गरज पाहून गंपूशेट मालात सरमिसळ करी. ती गोष्ट माहीत असूनही कोणी गिऱ्हाईक तक्रार करीत नसे, व मुकाट्याने जो माल मिळे तो घेई. कारण गावात दुकान एकच होते व गंपूशेटच्या नाकावर सर्वदा राग असे.

एके दिवशी त्या गावात एक नवीन परदेशी माणूस आला. गंपूशेटच्या दुकानात सर्व माल सरमिसळीचा असल्याचे त्याने ओळखले व गंपूशेटला विचारले–"कायहो, या गावात सरमिसळी शिवायचा माल मिळत नाही का?"

तो प्रश्न ऐकून गंपूशेट इतके चिडले की तोंडाला आले ते त्या नवख्या माणसाला बोलले. "तू स्वच्छ निर्भेळ मालांच्या गप्पा करतो आहेस! मुळात तू कसा आहेस तुला माहीत आहे का? तुझं अंग, कपडे पहा किती घाणेरडे आहेत! खरं म्हणजे तुझा हात लागला की पुरे. हात लागलेली वस्तू घाण होऊन जाईल. मी तुझ्यावर दया करून तुला असा सोडला. शेजारच्या गावी आमचा भाचा आहे, त्याच्याशी तू असे काही बोलला असतास तर तुझी चामडीच लोळविली असती." गंपूशेट म्हणाला.

ते ऐकून मात्र परदेशी खूप संतापला. तो गंपूशेटला म्हणाला–"तु मला इतका उर्मटपणाने बोलतो आहेस! मी या देशाचा राजा विजय भास्कर महाराजांचा मंत्री रामभूषण वेष पालटून इकडे आलो आहे हे तुला कळले तर तू असे बोलला असतास का?"

ते ऐकतांच गंपूशेटला धक्काच बसला. त्याची बोबडी वळली व तो बेशुद्ध होऊन जमिनीवर आदळला.

"वसुधरा"



तो परदेशी तेथे न थांबतां गावच्या पाटलाच्या घरी गेला आणि तो कोण व कशासाठी आला असल्याचे सांगून म्हणाला—"तुला या गावाचा अधिकारी नेमले ते कशासाठी रे? गावात असल्या समाज विरुद्ध गोष्टी घडू नयेत याच साठींना? गंपूशेट दुकानदाराच्या कारवाया मी स्वत: डोळयानी पाहून आलो आहे. तो मिसळ माल विकत असल्यामुळे त्याला आणि त्याचा गुन्हां स्वत:च्या डोळयांनी पहात असून गप्प राहाल्याबद्दल तुला आतां चांगली कडक शिक्षा करतो."

गाव पाटील थोडादेखील न घाबरतां सर्व काही ऐकून घेऊन मंत्र्याला म्हणाला—

"महाप्रभू, मिसळ माल विकणंही गंपूशेटची चूक नाही. तो स्वत: होऊन काही मिसळ माल तयार करीत नाही. तो जो माल विकत घेतो तोच विकतो. मुळास पिके काढणारे शेतकरीच धान्य मिसळ करून विकतात. म्हणून गंपूशेट मिसळ माल विकत असला तरी मी त्याच्या विरुद्ध काही करीत नाही. परंतु त्याने आपल्या सारख्या थोरांमोठयांशी अशा तऱ्हेने बोलणं अक्षम्य अपराध आहे. बहुत करून आपण कोण हे त्याला कळले नसावे. म्हणजे अज्ञानाने त्याच्या हातून घडलेला हा अपराध आहे!"

ते ऐकून मंत्र्याचा पारा थोडा उतरल्या-सारखा झाला. म्हणाला—"मिसळ धान्या विषयी तू म्हणतोस ते खरे असू शकेल. परंतु त्याने गिऱ्हाइकांशी थोडे शांतपणे बोलले पाहिजे. मी मंत्री आहे ही गोष्ट कळली असो किंवा नसो त्याने थोडा आदर दाखवायला हवा होता.

मध्यंतरी पाटलाने निरोप पाठविल्या-प्रमाणे गंपूशेटने येऊन मंत्र्याचे पाय धरले व म्हणाला—"आपण कोण हे माहीत नसल्यामुळे चूक घडली. माझ्या चुकीबद्दल माफी करू नका. मला फटके देववा!"

गंपूशेटची नम्रता पाहून मंत्र्याला आनंद झाला. म्हणाला—"मी तुला माफ केले परंतु तुझ्यां दुकानात येणाऱ्या लोकांना योग्य मान देत नाहीस. त्याबद्दल मी तुला क्षमा करणार नाही. गिऱ्हाइकांनीच केली तर क्षमा केली पाहिजे. संध्याकाळी गांवकऱ्यांसमक्ष तुझी चवकशी होईल. आतां तू जा."

गंपूशेट तेथून निघाला व विचार करू लागला, या संकटातून सुटका कशी मिळ-णार? गावात त्याच्यावर सर्वांचाच राग होता. मंत्र्याने त्यांच्या समोर चवकशी केली तर आपल्याला चांगली शिक्षा होईल.

संध्याकाळ व्हायच्या आत गंपूशेट गांव-भर फिरला. त्याच्यावर ओढवलेला प्रसंग सर्वांना सांगितला आणि त्याला वाचवायला विनंती केली. त्याबद्दल मोबदला म्हणून त्याने काही जणांचं लहान मोठं कर्ज माफ केल तर काही जणांना फुकट माल दिला.

कित्येक जणांना त्याची कींव आली व मदत करण्याचे त्यांनी वचन दिले. गाव-भरात गंपूशेटचे एकुलते एक दुकान असल्या कारणाने, त्याला जर फार मोठी शिक्षा झाली तर दुसरा एखादा दुकानदार दुकान काढी पर्यंत सर्वांना कष्ट होईल अशी भीतीही काही जणांना वाटली.

त्या दिवशी संध्याकाळी गंपूशेट सर्व गांवकऱ्यांसमोर उभा राहून म्हणाला—"मी प्रेमादराने सर्वांशी बोलतो. माझा शांत



स्वभाव आहे. कोणावर कधी राग काढीत नाही. माझी प्रकृती बरोबर नसते त्याच वेळी मी कोणावर रागावतो. ही गोष्ट सर्व गावकऱ्यांना माहीत आहे."

तेथे जमलेल्या सर्व गावकऱ्यांनी गंपूशेट म्हणाला ते खरे असल्याचे मान्य केले. ते ऐकून मंत्र्याच्या मनाचे समाधान झाले व ते काही म्हणणार इतक्यांत लोकांच्या गर्दीतून वाट काढीत गंपूशेटचा नोकर धावत आला व मालकाचे पाय धरून म्हणाला—"मालक, तुमचा वाईट स्वभाव असे समजून मी चुकीची समजूत करून घेतली. एकाच वेळी रागाने आपले कपाळ फोडावे असे माझ्या मनात येई.








परंतु तुम्हांला राग येण्याचे कारण त्यावेळी तुमची प्रकृती बरोबर नव्हती हे मला कळले. म्हणून माझ्या त्या चुकी बद्दल क्षमा करावी."

गंपूशेटने नोकराला दोन्ही हात धरून प्रेमाने उभे केले. व म्हणाले–"चूक सर्वांच्याच हातून घडते तुला मी माफ केले.

मंत्री त्याला उभा करून म्हणाला–"मी तुझ्या मालकाला शिक्षा करीत नाही म्हणून तू माझं डोके सुद्धा फोडणार म्हणून विचार करतो आहेस का?"

नोकर लहान से तोंड करून म्हणाला–"नाही, मालक! आमच्या मालकांची तब्येत बरी नसते तेव्हांच ते रागवतात हे आपल्याला आतां कळले ना? मी गेली दहा वर्षे त्यांच्या पदरी काम करतो आहे. दररोज ते माझ्यावर राग काढून शिव्या देत आले आहेत. म्हणजे गेली दहा वर्षे त्यांची प्रकृती बरी नाही व कोणता तरी आजार त्यांना होता असे मानावयाचे! आजार असला म्हणजे राग यायचाच! म्हणून तुम्ही आमच्या मालका साठी काही तरी चांगल्या औषध पाण्याची व्यवस्था करा.

नोकराने म्हटल्यावर मंत्र्याला गंपूशेटच्या स्वभावाची चांगली कल्पना आली. तो नोकराकडे स्मित करुन पहात म्हणाला–"तुझ्या मालकाच्या आजाराला औषधपाणी कशाला? मीच औषध देतो. त्या औषधाचा फायदा झाला की नाही हे मला तुझ्या कडूनच कळेल."

त्यानंतर मंत्र्याने, गंपूने मिसळ माल विकू नये, यदा कदाचित त्याने विकत घेतलेल्या मालातच मिसळ असेल तर ते धान्य साफ करवून नंतर विकावे असे बजावून सांगितले. त्यानंतर गंपूशेट कसा वागतो हे कळण्यासाठी मंत्र्यांनी अधिकाऱ्यांना पाठवीत जाईन असेही सांगितले.

मंत्री निघून गेल्यावर गंपूशेट मध्ये बराच बदल झाला. आपल्या मालकाला दहावर्षां पासून ज्या आजाराचा त्रास होता तो आजार मंत्र्याने दिलेल्या औषधा मुळे एका दिवसात बरा झाल्याचे नोकर त्याच्या ओळखीच्या सर्वांना सांगू लागला.






[४]

[पद्मपाद व पिंगळ मल्लूकपर्वताकडे निघाले. काही अंतर चालून गेल्यावर पिंगळ स्नान करण्यासाठी एका तलावाच्या काठी आला. तेथे साखळ दंडांनी बांधून पडलेला मल्लूककेतू नावाचा एक भयंकर माणूस दिसला. त्याने मदत मागितली. पिंगळ त्याच्या जवळ जाणार इतक्यात पद्मपादने त्याला हाक मारली.]

पद्मपादाने हाक मारताच पिंगळने दचकून मागे पाहिले. त्याच्या हातातला दगड हातातून सुटून तलावात पडला व त्याचा मोठा आवाज झाला.

"पिंगळा! तुला तो कोण म्हणून वाटला?" पद्मपादने त्याला कठोर शब्दात विचारले.

पिंगळने एकदा मल्लूककेतूकडे पाहिले आणि मान खाली केली.

मल्लूककेतू पद्मपादकडे साशंक दृष्टीने पहात म्हणाला–"मालक, तुम्ही कोण मला माहीत नाही! हा तरुण एक पुण्यकार्य करीत होता, त्याला आपण असे कां थांबविले?"

"पुण्यकार्य होय?" असे विचारीत पद्मपाद व्यंग हास्य करून हंसला व म्हणाला–"तू कोण, हे मला माहीत नाही, असे वाटले का तुला? तू



कोण हे मलासर्व पूर्वीच कळले आहे!" भल्लूककेतू त्याचे काही उत्तर देणार इतक्यात पिंगळ मध्ये म्हणाला—"याचे नाव भल्लूककेतु, म्हणे! आपण जात आहों, त्या भल्लूक पर्वताचा हाच मालक होता, कोण्या एका मांत्रिकामुळे त्याचीही दुरावस्था झाली, म्हणे!"

"होय, कोण्या एका मांत्रिकामुळेच ह्याचीही दुरावस्था झाली आहे! तो मांत्रिक कोण, तुला माहीत आहे का पिंगळ?" पद्मपादने पिंगळला विचारले.

त्याला माहीत नसल्या सारखी नकारार्थी मान हलविली. या भल्लूककेतूला धरून येथल्या खडकाला बांधून ठेवणारा महामायिक नावाचा मांत्रिक आहे!" म्हणत पद्मपादने भल्लूककेतूकडे करड्या नजरेने पाहिले.

भल्लूककेतू ते ऐकून दातओठ चावून पद्मपादला म्हणाला—"तू कोण रे? माझ्या विषयी तुला कशीकाय माहिती आहे रे? त्या महामायिकाचा वृत्तांत तुला कोणी सांगितला रे? तू आणखी एखादा मांत्रिक तर नाहीस?"

"होय, मी मांत्रिकच आहे! माझे नाव पद्मपाद! तू भयंकर शक्तिशाली आहेस व क्रूर आहेस, तरी त्याने तुला जिंकून येथे खडकाला बांधून ठेवले आहे त्या महामायिकाच्या समाधीवर धाड घालण्यासाठी मी जात आहे!" पद्मपाद म्हणाला.

खरंच का? त्या महामायिकाची समाधी काबीज करायला जात आहेस का? ते खरे असेल तर मालक! तुम्ही नक्कीच थोर मांत्रिक असणार! त्या महामायिकाचा मी हाडवैरी आहे. म्हणून मी तुम्हांला नक्कीच पुष्कळ मदत करू शकेन. मला या बंधनातून मुक्त करा, मी सर्वकाळ तुमचा दासानुदास होऊन राहीन!" माझ्यावर विश्वास ठेवा.

"तुझ्या या गोडगोड बोलण्याने भुरळून जाण्या इतका मी खुळा नाही!" पद्मपाद म्हणाला.



पिंगळ पद्मपादजवळ येत म्हणाला—"पद्मपादा! आपण याला सोडविण्यात काही हरकत नाही, असे मला वाटते! ह्याने म्हटल्याप्रमाणे हा वागला नाही तर याच्या डोक्याची शकले होऊन जातील. याला तसा कोणी शाप दिल्याचे हा सांगत होता."

"त्याच्या त्या बोलण्यावर विश्वास करून तू संकटांत सापडणार होतास. महामायिकाजवळ मांत्रिकशक्ती असलेल्या वस्तू आपल्या हातात येईपर्यंत या भल्लूककेतूला सोडणे धोक्याचे आहे. प्रथम त्या वस्तूंवर अधिकार करून घेऊया. त्यानंतर याला आपला दास करून घेणे शहाणपणाचें होईल." पद्मपाद म्हणाला.

"तर मग मालक..." असे भल्लूककेतू काही सांगू लागला, इतक्यात पद्मपादाने त्याला गप्प रहायला सांगितले व म्हणाला—"भल्लूका! तुझ्या गोडगोड बोलण्यावर मी भुरळून जाणार नाही. महामायिकाची समाधी असलेल्या त्या पडक्या देवळात पाऊल टाकल्यानंतर मी तुला बंधन मुक्त करीन. तो पर्यंत तुला येथेच याच स्थितीत रहावे लागेल!" असे म्हणत पद्मपाद मागे वळला आणि पिंगळ त्याच्या पाठोपाठ निघाला.



पद्मपाद व पिंगळ जंगलाबाहेर आले. समोर हिरवळ असलेले मैदान होते. त्यात त्यांना त्यांची वाहने असलेली गाढवे दिसली नाहीत. पिंगळ आश्चर्यचकित होऊन चहूंकडे पाहून पद्मपादला म्हणाला—"काय रे, आपली ती पिशाच्च वाहने कोठे आहेत? ती येथे या हिरवळीवर चरत असतील असे मला वाटत होते!"

"ती गाढवांच्या रूपात असलेली पिशाच्चे होती, गाढवे नव्हती! अशा परिस्थितीत त्यांना हिरव्या गवताची गरजच काय? ती त्यांचा आहार शोधण्यासाठी आणखी कोठेतरी गेली आहेत, पण आता आपण आपल्या खाण्यापिण्याची



फिकीर करू या!" असे म्हणत पद्मपादने आपल्या पोटावर हात फिरवीत तेथे हिरव्या घोंगडी सारखी हिरवळ होती तिच्यावर उडी मारून बसला.

पिंगळसुद्धा त्याच्या जवळ जाऊन बसला. म्हणाला–"होय रे, पद्मपादा! मलासुद्धां भूक लागली आहे. आपण आपल्या खाण्यापिण्या साठी बरोबर काहीच आणलं नाही. पार विसरलो!" माझ्या लक्षातच नाही आले.

पद्मपाद पिंगळकडे पहात हसत म्हणाला– "पिंगळा, तिकडे ती पिशवी आहे ना, ती इकडे कर जरा!" असे म्हणत त्याने दूर एक पिशवी होती ती बोटाने दाखविली.

पिंगळने पिशवी घेतली आणि तीत खाद्य पदार्थ असतील असे समजून हात घालून पाहिला. परंतु त्याला तीत काही मिळाले नाही म्हणून निराश झाला. पद्म-पादने ती पिशवी घेतली व पिंगळला विचारले–"काय रे, तुला खायला काय काय हवे आहे, सांग, कोणकोणत्या भाज्या हव्या आहेत?"

किती तऱ्हेच्या भाज्या सुद्धा कारे? पोटांत आगीचा डोम उठला आहे, त्याला थंड करायला मीठ भाकर, काय मिळेल ते पुरे! त्या पिशवीत तर काही एक नाही. रिकामी पिशवी आहे!" पिंगळ म्हणाला.

पिंगळने पिशवी उघडून एकदा आत डोकावून पाहिले आणि काहीतरी मंत्र पुटपुटला. पिंगळा, आता पिशवीत पहा!" म्हणत पिशवी पिंगळच्या हातात दिली.

पिंगळने घाईघाईने पिशवीत हात घातला. त्याच्या हाताला एक गरम चांदीचे भांडे लागले. ते त्याने बाहेर काढले. त्यात कढत डोळ्याचे पारणे फेड-णारा पांढरा स्वच्छ भात होता. त्याने चकित होऊन पद्मपाद कडे एकदा पाहिले. खुशीने उड्या मारू लागला.

पद्मपाद हसत म्हणाला–"तुला हव्या असलेल्या सर्व तऱ्हेच्या भाज्या, चटण्या,



खीर वगैरे सुद्धा पिशवीत आहे. भरभर बाहेर काढून तर पहा."

दहा मिनिटांच्या आत पिंगळने पिशवी-तून पंचवीस तऱ्हेच्या भाज्या, खीर वगैरे खाद्य पदार्थ बाहेर काढले. पद्मपाद व पिंगळला खूप भूक लागली होती. दोघांनी बकाबका खाऊन घेऊन भूक भागविली. त्यानंतर काही वेळ विश्राम करून पुढल्या प्रवासाच्या तयारीला लागले.

पद्मपादने एक चिमुटभर माती घेतली व मंत्र घालून ती जमिनीवर टाकली आणि जमीन फाटली आणि तीतून गाढवांच्या रूपातील दोन्ही भूते मोठ्याने रेंकत वर आली. एकेका वाहनावर पिंगळ व पद्मपाद बसले आणि भल्लूक पर्वताकडे निघाले. लवकरच ते तेथे पोहोचले.

दोन तीन तास प्रवास केल्यावर जमीन व आकाश परस्परांना चिकटलेले दिसत होते अशा जागी काळ्या काळ्या धुराचे लोट आकाशात उडत असलेले एक दृश्य दिसले. पिंगळने त्या बाजूला बोट दाखवून विचारले–"पद्मपादा! ते दिसत आहेत ते ढग आहेत की धुराचे लोट रे?"

त्या बाजूला काही वेळ लक्षपूर्वक पाहून पद्मपाद म्हणाला–"पिंगळा! ते ढग नाहीत, धुराचे लोटही नाहीत. भल्लूक पर्वताच्या प्रदेशात त्या प्रदेशाचे रक्षण



करणारे राक्षस आहेत! बहुतेक त्यांनी आपण येत असल्याचे ओळखले असावे. आपल्याला अडवण्यासाठी प्रयत्न करीत असावेत असे मला वाटते."

पद्मपादचे बोलणे थांबते न थांबते, एवढ्यात सुमारे पन्नास एक वार अंतरावर ढगा सारखा दिसणारा धूर जमिनीवरून गोल गोल भोंवऱ्या सारखा फिरत ताडा-सारखा उंच वर आला. पिंगळ घाबरून थरथर कापत पद्मपाद कडे पाहू लागला. पद्मपादने काही तरी मंत्र म्हटला आणि तो बसला होता त्या गाढवाला त्या दिशेने पळविले तत्क्षण धूर दिसेनासा झाला. थोडा वेळ तसाच गेला.

पद्मपाद पिंगळकडे वळून म्हणाला— "पिंगळा! भिण्याचे कारण नाही! तुला स्वरक्षणासाठी म्हणून ही तलवार देतो आहे. हिच्या मदतीने तुझ्या अंगावर कोणत्याही रूपात येणाऱ्या राक्षसांना तुला ठार करतां येईल." असे म्हणत त्याने पिंगळला तलवार दिली इतक्यात त्यांच्या मध्ये असलेली जमीन हादरली. पिंगळ व पद्मपाद बसले होते ती गाढवं दोन्ही बाजूंना पळाली. तत्क्षण लांब लांब सुळे असलेला आणि सर्व अंगभर लांब लांब केस असलेला एक हत्ती मोठ्याने चीत्कार करीत पिंगळवर धावला. पिंगळ एक पाऊल ही मागे न सरकतां निर्भीकपणे आपली तलवार घेऊन हत्तीवर तुटून पडला. लगेच हत्ती असह्य वेदना झाल्या-सारखा कण्हू लागला आणि भोवऱ्या सारखा गर गर फिरत दूर पळून गेला.

"शाबास, पिंगळा! कोणत्याही तरुणाने धाडसाने करावयाची ती रीत ही आहे! ठोसा दिला की भूत ही पळत! ही म्हण काही खोटी नाही. तुला दिलेल्या तलवारीत कोणतीही मंत्र शक्ती नाही, परंतु प्रथम ती गोष्ट सांगितली असती तर तू इतके धैर्य दाखवून त्या मायावी हत्तीशी दोन हात करायला पुढे सरसावला नसतास. समजलं का, शूर धैर्यवानाला कोणी नमवू श-णार नाही!" पद्मपाद पिंगळला म्हणाला.



पिंगळने आपल्या हातातल्या तलवारीकडे आश्चर्य करीत एकदां पाहिले व पोट धरून हसत म्हणाला—"या तलवारीत खरंच का मंत्रशक्ती नाही? तरी हरकत नाही. या तलवारीने मी सहस्त्रावधी राक्षसांना तोंड देईन जय पाताळ भैरवी!"

पिंगळने दर्शविलेले धैर्य व साहस पाहून पद्मपादला फार आनंद व उत्साह वाटला. तो पिंगळकडे प्रेमाने व आपुलकीने पहात म्हणाला—"पिंगळ, आपण आतां भल्लूक पर्वता जवळ येऊन पोंचलो आहो! आपण जायचं आहे ती नदी या पर्वताच्या मध्यभागी असलेल्या दरीत आहे. पायी तेथपर्यंत जावयाचे झाले तर फार वेळ लागेल. चढणे आणि उतरणे फार कष्टाचे काम आहे. म्हणून या पिशाच्च गाढवांना पर्वतावर उडून जायला सांगून खाली उतरायला सांगतो."

पिंगळने होकारार्थी मान हलवायच्या आत दोन्ही गाढवे हवेत उडू लागली. ती पर्वत शिखरांवरून उडत हळू हळू दरीच्या आत खाली उतरली. पद्मपाद व पिंगळ दोघे आपापल्या वाहनावरून खाली उतरले. त्या पाठोपाठ दोन्ही वाहने अदृश्य झाली.

पद्मपाद नदीच्या काठावर बसून आणि हाताने पाणी हलवीत मंत्र पठन करू लागला. नदीत हळू हळू लाटा येऊ लागल्या व जोर जोराने वाहू लागल्या. पिंगळ ते दृश्य पाहून थक्क झाला. काही वेळाने पद्मपाद अलीकडे येऊन



पिंगळला 'पिशवीत ठेवलेली कांचेची बरणी घेऊन ये' म्हणाला. पिंगळ कांचेची बरणी घेऊन आला आणि ती त्याने पद्मपादसमोर ठेवली. तीत मगरीच्या पिल्लांच्या रूपे महामायिकाचे जे शिष्य होते त्यांच्याकडे जय राग दाखवीत पद्मपाद म्हणाला–"आतां तरी तुम्ही आपल्या खऱ्या रूपात प्रगट होता की नाही? की तुम्हांला जाळून भस्म करून या नदीच्या पाण्यात टाकू म्हणतां?" असे म्हणत दरडावून थोडा हुंकारला. तत्क्षण कांचेची बरणी 'ठण्ण' म्हणून फुटली व तिच्या ठिकऱ्या हवेत उडू लागल्या. काळे कुट्ट व विकृत आकृती असलेले दोन जण पद्मपादला नमस्कार करीत म्हणाले–"महा मांत्रिका! आम्ही आपले दासानुदास आहों! काय हुकूम आहे?"

"महामायिकाची समाधी आहे त्या पडक्या देवळात आम्हांला जायचे आहे. म्हणून प्रथम या नदीतलं पाणी उतरेल असे काही तरी करा!" असे करड्या आवाजात पद्मपाद म्हणाला. महामायिकाच्या शिष्यांनी परस्परां कडे पाहिले व उत्तर देण्यासाठी मागे पुढे करू लागलेले पाहून पद्मपाद डोळ्यांनी आग पाखडीत म्हणाला–"माझा हुकूम तुम्ही ऐकलात की नाही?"

महामांत्रिककाचे दोन्ही शिष्य थरथर कांपत नमस्कारार्थी पद्मपाद समोर दोन्ही हात जोडून म्हणाले–"ही नदी उतरायला हवी असेल आणि महामायिकाची समाधी असलेल्या पडक्या देवळात जायचं असेल तर पिंगळ नावाच्या तरुण कोळ्याला येथे आणावे लागेल!"

"तो बघ, तोच तो तरुण कोळी पिंगळ!" असे म्हणत पद्मपादने पिंगळकडे बोट दाखविले.

महामायिकाच्या दोघां शिष्यांनी पिंगळ-कडे आश्चर्य करीत पहात म्हटले–"महा प्रसाद! तुमच्या आज्ञेचे पालन आम्ही लगेच करतो!" असे म्हणत दोघे अदृश्य झाले. (क्रमशः)



# ब्रह्मांड

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, काही जणांना प्रतिकूल परिस्थितीत त्यांच्या अंगात असलेल्या शक्तिसामर्थ्यांचा अनुकूल लाभ न होतां त्याचा अडसरच आडवा येतो. परोपकार करण्याच्या प्रयत्नात स्वत: संकटांत सांपड-लेल्या रामशास्त्री नांवाच्या ज्योतिष्याची गोष्ट मी तुला सांगतो, लक्ष देऊन ऐक असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला."

पुष्कर नावाच्या नगरात रामशास्त्री नावाचा एक फार मोठा विद्वान ज्योतिषी होता. तो भविष्य वर्तवी ते अक्षर अक्षर खरे निघे अशी त्याची कीर्ती होती. त्याची ख्याती हळूहळू राजाच्या कानावर गेली.

## वेताळाच्या गोष्टी



महाराज विनयसेन याला साठावे वर्ष लागले. तरी त्याची तब्येत उत्तम होती व उशिरां त्याला सूर्यसेन नांवाचा मुलगा झाला. त्याचे वय आतां वीस वर्षांचे झाले होते. मुलाचा राज्याभिषेक करुन देऊन स्वत: विश्राम घ्यावा. परंतु राजाला शंभर वर्षांचे आयुष्य आहे आणि युवराज अद्याप सिंहासनावर बसण्याला योग्य नाहीत असे दरबारी ज्योतिष्यांचे म्हणणे होते.

नंतर विनयसेनाला काही दिवसांपूर्वीच एक गोष्ट कळली; युवराज सूर्यसेन भोगविलासात गुरफटत चालला आहे. त्याला इतक्या लवकर राज्यकारभाराचा भार शिरावर घेण्याची इच्छा नव्हती. म्हणून त्याने दरबारी ज्योतिष्यांवर दडपण आणून त्याला हवं होतं ते त्यांच्याकरवी वडिलांना सांगविले. अशा नाजुक प्रसंगी रामशास्त्र्यांच्या पांडित्या विषयी त्याला कळले.

विनयसेनाने रामशास्त्री आल्यावर त्यांना सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या व म्हणाला—"ज्योतिषाचार्य! अशा परिस्थितीत कोणत्याही प्रलोभनाला बळी न पडता आपण आमच्या दोघांची जन्मकुंडली पाहून खरं काय ते सांगण्याची कृपा करावी!"

रामशास्त्र्यांनी ती गोष्ट मान्य केली आणि प्रथम राजा विनयसेन याची जन्म पत्रिका पाहिली. नंतर युवराज सूर्यसेन याची जन्मपत्रिका पाहून राजाला म्हणाला—"परिस्थिती थोडी विचित्रच आहे! आजच आपल्या चिरंजीवांचा विवाह होणार आहे. आणि तो एका भिल्ल जातीच्या तरुणीशी. लग्नाचा मुहूर्त बरोबर मध्यरात्री आहे!"

विनयसेनाला काय करावे व काय बोलावे सुचेना. तरी म्हणाला—"युवराज राजधानीत भोग विलासात गुरफटल्याचे पाहून मीच स्वत: चार दिवसांपूर्वी त्यांना जंगलात शिकारीला पाठविले आहे. आपण म्हणालात ते खरे असेल तर हा विवाह थांबलाच पाहिजे!"

"तरमग, तत्क्षण आवश्यक प्रयत्न करावा, महाराज!" रामशास्त्री म्हणाले.



राजा स्वत: जंगलात निघाला. परंतु प्रवासात अनेक विघ्ने आली. वाटेत एका चोरांच्या टोळीला तोंड द्यावे लागले. नंतर घोडा एकाएकी आजारी पडला. म्हणून महाराज मध्यरात्र उलटल्यावर, ज्योतिष्याने सांगितलेल्या मुहूर्ताच्या वेळेनंतर युवराजांना भेटू शकला. तोंपर्यंत युवराजांचे लग्न उरकले होते.

त्या राजवंशाच्या चाली रीती प्रमाणे त्या विवाहामुळे वंशाची कीर्ती वाढेल असे सांगण्यात आले. विनयसेनाला त्या भिल्ल तरुणीला आपली सून म्हणून आणि भावी राजमहीषी म्हणून मानणे भाग होते.

तरी युवराजाला आपल्या विवाहाची बातमी वडिलांना कशी काय कळली या गोष्टीचे आश्चर्य वाटले. तेव्हां रामशास्त्र्यांकडून महाराजांना ही गोष्ट कळल्याचे सूर्यसेनाला नोकरांकरवी कळले.

राजधानीत परतल्यावर तो रामशास्त्र्यांना भेटला व म्हणाला—"तुमची प्रतिभा किती अत्यद्भुत आहे हे मी ऐकले आहे. तेव्हां माझ्या शिरावर आत्ताच राज्याचा भार पडणार नाही या गोष्टीची जबाबदारी तुमच्या वर! याबद्दल मी तुम्हांला मोठे इनाम देण्याचे वचन देतो!"

रामशास्त्रींनी त्याचे काहीच उत्तर दिले नाही आणि गप्प राहिले.



राजाने रामशास्त्र्यांना बोलाविले व मोठ्या संकटात सापडल्या सारखा त्यांना म्हणाला—"माझ्या मुलाने आमच्या कुळाला कलंक लावला. पुढे पुढे आमच्या कुळात काय काय घडणार आहे, हे त्या एकतर परमेश्वरालाच माहीत!"

"महाप्रभो! इतके दु:खी होऊ नका, इतकी काळजी करू नका! आपली सूनबाई लवकरच राजघराण्याला शोभेल अशीच वागेल. तिच्यामुळे आपले चिरंजीव आपल्या वंशाला थोडी कीर्ती मिळवून देतील. आपण लवकर चिरंजीवाचा राज्याभिषेक उरकून घ्यावा आणि त्याला काही दिवस राज्य कारभार कसा पहावा

याचे शिक्षण द्यावे!" रामशास्त्री म्हणाले. भिल्ल तरुणी सूनबाई झाली तरी जोपर्यंत ती राजघराण्याला शोभेलसे राहू लागत नाही तोंपर्यंत मुलाचा राज्याभिषेक करून देणे विनयसेनला योग्य वाटले नाही. तसे त्याने रामशास्त्र्यांना सांगितले आणि रामशास्त्र्यांनी तो विचार बरोबर नसल्याचे ही सांगितले. दोघांचा या गोष्टीवर काही वेळ वादविवादही झाला. शेवटी राजाने ठरविले. रामशास्त्र्यांनी सांगितलेल्या मुहूर्तावर सूर्यसेनाचा, राज्याभिषेक झाला आणि तो राजा झाला.

राजा झाल्यावर सूर्यसेनाने रामशास्त्र्यांना बोलाविले न म्हणाला–"लग्न झाल्यावर मी काही काळ बायको बरोबर आनंदात घालवायच्या विचारात होतो. तुमच्या मुळे मी त्या आनंदापासून मुकलो. याविषयी तुम्हांला काय म्हणावयाचे आहे?" त्याने हे रीतसर विचारले.

"आपल्या वडिलांची आयुर्मर्यादा आणखी एकच वर्ष उरली आहे. आपण सिंहासनावर आल्यावर निदान एक वर्ष तरी आपल्याला त्यांचा सल्ला घ्यायला संधी मिळेल, या विचाराने तसे मी केले." रामशास्त्री म्हणाले.

"सर्व गोष्टी तुम्ही म्हणतां तशा व्हायला तुम्ही काय परमेश्वर आहां काय? माझ्या आयुष्यातील आनंदाला विघ्न आले!" असे सांगून सूर्यसेनाने रामशास्त्रीला तुरुंगात टाकले. या बाबतीत विजयसेनाने किती समजावून सांगितले, परंतु सूर्यसेनाने तिकडे दुर्लक्ष केले. तेव्हां विनयसेन तुरुंगात जाऊन रामशास्त्रींना भेटला व म्हणाला–"मी विचार केला तर तुम्हांला सोडवू शकेन. परंतु मुलगा रागवेल. मी काय करावे, म्हणतां?"

"महाराज, यावेळी मला तुरुंगवास भोगण्याचा योग आहे. राजाच्या कृपेने तो त्रास चुकणार नाही, माझ्या विषयी आपण काळजी करण्याचे कारण नाही. लवकरच आपणांवर मृत्यूचे गंडांतर येणार आहे! तुम्ही आवश्यक तेवढी काळजी घेणे आवश्यक आहे. या शब्दात रामशास्त्र्यांनी विनयसेनला सावध केले.

विनयसेन मुलाला भेटून म्हणाला–"तुझं वागणं मला मुळीच आवडले नाही. रामशास्त्री एक थोर विद्वान ज्योतिषी आहेत. त्यांनी च तुझ्या होणाऱ्या विवाहाची गोष्ट सांगितली. तो विवाह थांबविण्यासाठी मी जंगलात आलो. तुझ्या बायकोमुळे आपल्या घराण्याला मोठे नाव मिळेल हे त्यांनीच सांगितले. म्हणून सूनबाई माझी लाडकी आहे. आतां माझी शेवटची घडी जवळ आली असल्याचे त्यांनीच मला सांगून तुझा राज्याभिषेक करून घेण्याची सूचना केली. त्याचा ज्योतिष शास्त्रावर पूर्ण विश्वास आहे. या शिवाय त्यांची काही चूक आहे, असे मला वाटत नाही."

वडिलांनी म्हटले ते त्याला न पटल्यासारखे तोंड करून सूर्यसेन म्हणाला–







"माझा ज्योतिष् शास्त्रावर विश्वास नाही. त्यांनी ज्योतिष् शास्त्राचे थोरपण सिद्ध करून दाखविले तर मी त्यांना सोडीन ते सिद्ध करू शकले नाहीत तर कायमच तुरुंगात ठेवीन." असे सांगून वडिलांच्या रक्षणाची उत्तम व्यवस्था करून दिली.

काही दिवसांनी रामशास्त्र्यांनी भविष्य वर्तवल्याप्रमाणे विनयसेनाच्या मृत्यूची घडी येऊन ठेपलीच. त्या दिवशी विनयसेन खोलीतून बाहेर सुद्धा गेला नाही. सर्व व्यवस्था त्याच्या खोलीतच करण्यात आली. स्वतः सूर्यसेनच बापाच्या जवळ बसला होता. राजाच्या चारी बाजूला राजवैद्य बसलेले होते. त्यांनी उत्तमोत्तम औषधे जवळ ठेवलेली होती. बापलेक सतत डोळे उघडे ठेवून पहात होते. ते फक्त त्यां दोघांना व रामशास्त्र्यांना माहीत असलेले गुपित होते.

बरोबर रामशास्त्र्यांनी सांगितलेल्या वेळेला विनयसेन एक किंकाळी फोडून पडल्या जागी गतप्राण झाला. वैद्यांनी त्याची वैद्यकी परीक्षा करून पाहिली व हृदय एकाएकी थांबल्या मुळे विनयसेन गेल्याचे जाहीर केले. झालं असं की राजा झोपला होता त्या पलंगाच्या वर जो दिव्याचा एक गुच्छासारखा समूह तेवत होता त्यातल्या एका वातीवर एक मोठी पाल आली आणि ती कशीतरी सरकून पलंगावर पडली. मृत्युभयाने थरथर कांपत असलेल्या विनयसेनला वाटलं असावे की यमानेच त्याच्यावर पाश टाकला. म्हणून त्याने किंकाळी फोडली असावी आणि हृदयक्रिया बंद पडली. तो दुर्धर प्रसंग प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहून सूर्यसेन आश्चर्यचकित झाला. तो रामशास्त्र्यांच्या कडे धावत गेला आणि म्हणाला–"मी आपली प्रतिभा व गुणवत्ता ओळखू शकलो नव्हतो. मला क्षमा करावी. आपण आपल्या ज्योतिष शास्त्रातील पांडित्याने मला सहाय्य करा!"

ते ऐकून रामशास्त्री हंसू लागले. म्हणाले–"महाराज, ज्योतिष शास्त्राबद्दल आपल्या मनांत उत्पन्न झालेला आदरभाव पाहून मला आनंद होत आहे. परंतु ज्योतिष शास्त्राच्या मदतीने तुम्हांला राज्यकारभारात काही मदत माझ्या हातून होऊ शकेल असे मला वाटत नाही."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, रामशास्त्र्यांच्या विषयी माझ्या मनात पुष्कळ शंका आहेत. त्याने राजाने दर्शविलेल्या प्रेमादराचा तिरस्कार करून निघून जावे फार मोठी चूक आहे. प्रथम ज्या सूर्यसेनाचा ज्योतिष शास्त्रावर थोडादेखील विश्वास नव्हता त्याचा त्या शास्त्रावर एकदम किती विश्वास बसला! राजाला राज्यकारभारात काही मदत करू शकणार नाही असे म्हणणे, म्हणजे खोटे बोलल्या सारखेच नाही का? या शंकांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमदित्य म्हणाला–"रामशास्त्र्यांनी ज्या ज्योतिष् शास्त्राचा अभ्यास केला होता त्यात ते खरोखरच थोर विद्वान होते, एवढेच नव्हे तर त्यांच्यात सत्यावर भक्ती ही होती. राजाला आपण काही मदत करू शकणार नाही असे रामशास्त्री म्हणाले त्यात खोटेपणा असा काहीच नव्हता. भिल्ल तरुणीशी युवराज विवाह करणार आहे हे सांगून ही वृद्ध राजा ते थांबवू शकणार नाही हे त्यांना माहीत होते. मृत्यू संबंधी भविष्य वर्तविणे तेवढे त्यांनी केले. परंतु मृत्यूला थांबविणे त्यांच्या हातात नव्हते. आधी कळले असून ही रामशास्त्री त्यांना भोगावा लागलेला तुरुंगवास टाळू शकले नाहीत. प्रथम कळलेल्या संकटांना टाळण्याची शक्ती नसल्यामुळे ज्योतिषशास्त्राचा राज्याच्या कामात काय उपयोग झाला असता? रामशास्त्रींनायाच गोष्टीची काळजी वाटत होती. म्हणून त्यांनी राजाने दर्शविलेल्या औदार्याविषयी निर्लेप वृत्ती दाखविली.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# प्रश्नातला मिस्किलपणा

नीळकंठ दीक्षित हे एक थोर विद्वान होते. त्यांच्या पांडित्याची स्तुती करून राजाने त्यांच्या मनगटात सिंहाची डोकी असलेली सोन्याची पोंची बांधली. एकदा ते पोंची घालून पंडितांच्या शास्त्रार्थाला गेले आणि परत येतांना उन्हामुळे घामाघूम झाले. परतल्यावर स्नानाला निघतांना घाईत त्यांनी हातांतली पोंची जवळच एक बाक होते त्यावर ठेवली.

दीक्षितांनी आंघोळ करून परतल्यावर पाहिले तेव्हां त्यांना एक पोंची दिसली नाही. घरातल्या लोकां जवळ त्यांनी चकवशी केली तेव्हां त्यांना कळले की त्यांचे दूरचे एक नातेवाईक श्री गंगाधर शास्त्री येऊन परत गेल्याचे कळले. ते थोडे लांब हाताचे म्हणून प्रसिद्धच होते. म्हणून ती चोरी त्यांनीच केली असावी असा संशय दीक्षितांना आला.

ते लगेच निघाले आणि गंगाधर शास्त्री रहात त्या गावी गेले आणि भेटून त्यांना आश्चर्य वाटल्या सारखे दर्शवून म्हणाले–" अरे, गंगाधरा तू सिंहाचे डोके असलेली दोन्ही पोंची उचलून आणलीस, म्हणावयाचीस ! महाराजांनी ती किती प्रेमाने घातली होती की रे माझ्या हातात ! त्यांच्या पैकी एक जरी राहिली असती तर तुझं काय बुडलं असतं रे ? "

गंगाधर शास्त्री घाबरून जाऊन म्हणाले–"हे काय रे सपशेल खोटं ! मी दोन्ही पोंची घेतली ? ही पहा, मी एकच तर उचलून आणली आहे !" त्यांनी ती पोंची काढून दाखविली.

दीक्षितांना, त्यांनी टाकलेला डाव यशस्वी झाला, या बद्दल आनंद झाला. म्हणाले–तुझी नीतिमत्ता मी ओळखत नाही का रे, गंगाधर !





# मुख्य सल्लागार

कलिंग पट्टण नगराचा राजा प्रसेनवर्मा हा होता. त्याचा मुख्य सल्लागार शिवनाथ हा एकाएकी मरण पावला. शिवनाथ हा राजाचा उजवा हात होता व तो राजाला राज्यकार्यातच नव्हे तर त्याच्या व्यक्तिगत व कौटुंबिक कार्यांतही सल्ला देत असे.

प्रसेनजितने तसे तीन मंत्री नेमले होतेच. त्यांच्यापैकी एकही जण शिवनाथच्या बरोबरीचा नव्हता. ही गोष्ट जरी खरी असली तरी ते राजाला कित्येक क्लिष्ट प्रसंगी चांगला सल्ला देत असत. म्हणून त्यांच्याच पैकी एकाला मुख्य सल्लागार म्हणून निवडावा असे ठरवून राजाने स्वतःच त्यांचे चातुर्य व समय सूचकता आदी गोष्टींची परीक्षा घ्यायचे ठरविले.

प्रसेनवर्माने सर्वात प्रथम विशाल नावाच्या मंत्र्याला बोलाविले. शिवनाथ वारल्यावर ते पद आपल्या सारख्या अनुभवी मंत्र्यालाच लाभेल असे विशाल धरून चालला होता. प्रसेनवर्मा त्याला म्हणाला– "मी तुम्हांला माझा मुख्य सल्लागार म्हणून नेमायचा विचार करीत आहे. असे पहा की शेजारचा राजा सुकेतू आपल्या राज्यावर स्वारी करण्याच्या विचाराने आवश्यक तयारीला लागला आहे. मला ही गोष्ट हेरांकडून नुकतीच कळली आहे. त्याचे सैन्यबळ आणि आर्थिकबल आपल्याहून जास्त आहे. त्याला तोंड देण्यासाठी आपण काय करावे ?"

विशाल क्षणभर विचार करून म्हणाला– "एका बलिष्ठ राजाशी आपण भांडण करण्याची गरज काय? विरोध कशाला करायचा प्रभो? त्याच्याशी संधी किंवा समेट करून घ्यावा. प्राणहानी आणि अर्थहानी झाल्या शिवाय सुटका मिळेल."

श्री ग. ना. बोखणकर



"तसे करणे म्हणजे शत्रूसमोर मान बांकविण्यासारखेच नाही का? आपल्या प्रतिष्ठेला तो एक कलंकच नाही का? त्या ऐवजी शत्रू असावध आहे हे पाहून आपण विद्युत् गतीने शत्रूवर चालून जाऊन त्याला कैद केले तर? तो आपला सामंत होऊन राहील." प्रसेनवर्मा म्हणाला.

विशाल लगेच म्हणाला–"बरोबर आहे, प्रभो! आपला विचारच योग्य आहे व तसेच करावे!"

प्रसेनवर्माने त्याला निरोप दिला आणि प्रशांत नावाच्या दुसऱ्या मंत्र्याला बोलाविले. राजाने त्याला सुद्धा विशालला सांगितले तसेच सांगितले–"आपल्या खजिन्यातली प्राप्ती दिवसे दिवस कमी होत आहे ही गोष्ट आपल्याला माहीत नाही असे नाही. तो खजिना पुन्हां कसा भरावयाचा हा विचार मला सतावतो आहे. तुम्ही अनुभवी आहां, योग्य तो सल्ला द्यावा. म्हणून मी आपणांला बोलाविले."

"त्यात काय महाराज? प्रजेवरचा कर आणखी थोडा वाढवावा. खजिना नक्कीच भरेल." प्रशांत म्हणाला.

प्रसेनवर्मा थोडे स्मित करून म्हणाला–"प्रजेवर आणखी कराचे ओझे लादले तर प्रजेच्या मनात आपल्यावर जे प्रेम व विश्वास आहे तो नाही का कमी होणार? प्रजेचे हित मनात असणाऱ्या राजाने असले बेत रचणे योग्य नाही. आपणच राज्य कारभारातला खर्च थोडा कमी केला तर खजिन्यात असलेली शिल्लक कमी होणारच नाही थोडी फार वाढेलही. असे करणे जास्त योग्य होईल की नाही याचा विचार करून आपले मत द्यावे."

प्रशांतने नम्रपणे होकारार्थी मान हलविली व म्हणाला–"आपण विचार केलात त्याला तोड नाही."

प्रसेनवर्माने प्रशांतला निरोप दिला आणि तिसरा मंत्री शंकरभट्ट याच्याकडे निरोप पाठविला. तो आल्यावर राजाने विशाल व प्रशांतला जे सांगितले होते तेच सांगितले व हेही सांगितले की मुख्य सल्लागार नेमण्याच्या विचाराने मी हा प्रश्न करीत आहे. आपल्या राज्यात दक्षिणेकडील मंडलात दुष्काळाची परिस्थिती पावसा-अभावी निर्माण होऊ लागली आहे. म्हणून दुष्काळ निवारणार्थ विहिरी खणाव्या, म्हणत आहे. आपला सल्ला काय आहे?

शंकरभट्ट एक दोन मिनिटे विचार केल्यावर म्हणाला–"महाप्रभो! दक्षिण मंडलांत दुष्काळाची परिस्थिती निर्माण झाल्यामुळे नव्हे, प्रजा आत्तांच अन्नधान्याची टंचाई असल्यामुळे घाबरली आहे, असे मी ऐकतो. या प्रसंगी त्यांना अन्नसामुग्रीची गरज आहे, त्यांची पोटे भरली पाहिजेत. आपण आतां विहिरी खणीत बसलात तर कोणकोणते प्रसंग ओढवतील. म्हणून आपण येथे जो धान्याचा सांठा भरपूर आहे त्यांतला काही भाग दक्षिणेकडे तावडतोब हलविला पाहिजे. आतां विहिरी खणीत बसण्यापेक्षा दक्षिण मंडलात जी गायत्री वाहाती नदी आहे तिला बांध बांधून सर्व दक्षिण मंडलात पाणी कालवे काढून पोचविण्यासाठी योग्य ती व्यवस्था करावी. विहिरी खणण्यासाठी जो खर्च होईल तेवढ्या खर्चात दक्षिण मंडल शस्यश्यामल होऊन जाईल."

प्रसेनवर्मा थोडा राग दाखवीत म्हणाला–"म्हणजे आमचा विचार निरुपयोगीच म्हणतां का? आमचा विचार बरोबर नाही असेच ना तुमचे म्हणणे?"











शंकरभट्ट थोडा देखील न कचरतां म्हणाला–"समयोचित नाही एवढे मात्र मला म्हणावयाचे आहे, महाराज! एक शेजारचे घर जळते आहे त्याला विझविण्यासाठी विहीर खणण्या सारखाच तो विचार होईल! मला बोलवून आपण सल्ला विचारलात, मला योग्य वाटला तो सल्ला मी दिला!"

"मला राग आणवलात तर तुमची काय गत होईल याचा काही विचार केलात का?" राजाने विचारले.

"प्रभूने क्षमा करावी! मला आपण देऊ केलेले मुख्य सल्लागाराचे पद देऊ नये! बहुतेक तुर्त चालू असलेल्या मंत्री पदावरून ही काढून टाकू शकाल!"

प्रसेनवर्माने त्याला निरोप दिला व दुसऱ्या दिवशी दरबार बोलावून शंकरभट्टला मुख्य सल्लागार म्हणून नेमले.

ते ऐकून सर्व मंत्री व दरबारी आश्चर्यचकित झाले. महाराज व शंकरभट यांच्यामध्ये झालेल्या वादविवादाची बातमी सर्वांच्या कानवर गेली होती. आतां शंकरभट्टला कठीण दंड चुकत नाही.

राजा प्रसेनवर्मा त्याच्याकडे आश्चर्याने पहात असलेल्या दरबाऱ्यांना म्हणाला–"मी केलला निर्णय तुम्हां सर्वांना आश्चर्याचा वाटत असल्याचे दिसत आहे. नव्या मुख्य सल्लागारात शिवनाथ सारखी योग्यता असावी असा माझा प्रयत्न आहे. मी कधीकधी आपल्या मताशी मत जुळत नसलेल्या व्यक्तीवर विचार केल्या शिवाय रागावतो. अशा वेळी सल्लादेणारे राज्याच्या सुरक्षतेची फिकीर करण्याऐवजी त्यांच्या पदाच्या सुरक्षिततेची काळजी करू लागले तर निश्चितच राज्याचे नुकसान होईल. या उलट समोर आलेल्या प्रसंगाला योग्य प्रकारे तोंड द्यायला निर्भीकपणे साहस करणारेच योग्य सल्लागार होत, असे माझे मत आहे. तो गुण शिवनाथ मध्ये होता व तीच लक्षणे शंकरभटात् मला आढळली. म्हणून ते पद मी त्यांना बहाल केले."





# महत्वाकांक्षी कोल्हा

फार पूर्वी एका काळी बोधिसत्व वाराणसी येथे एका थोर विद्वान पंडिताच्या घरी जन्मले. वयात येण्याच्या सुमारास त्यांनी सर्व शास्त्रांचा अभ्यास करून गावातल्या थोर विद्वानांपैकी एक अशी कीर्ती संपादन केली. राजाने त्यांचे इतके लहान वय असूनही बोधिसत्वांना आपला मुख्य पुरोहित म्हणून नेमले.

बोधिसत्व शास्त्रग्रंथांचा अभ्यास करीत असतां एक अद्भुत मंत्राचा शोध लावला. त्या मंत्राचा असा महिमा होता की कोणावर ही सर्व अधिकार मिळविणे मंत्र म्हणणाऱ्याला शक्य होते. तो मंत्र फक्त एकदा म्हटला की समोरची व्यक्तीहात जोडून "दासोहम!" म्हणत उभी राही.

त्या मंत्राचा एवढा महिमा असल्या कारणाने तो मंत्र कोणाला शिकविणे हिताचे होणार नाही, असे बोधिसत्वांना वाटत होते. तरी तो मंत्र विसरून जाता कामा नये.

त्यासाठी बोधिसत्व जंगलातल्या एका एकांत जागी गेले. तेथे एक उंच दगडावर बसून त्यांनी चहू बाजूच्या प्रदेशावर एक नजर टाकली. कोठेही त्यांना कोणी मनुष्य किंवा प्राणी दृष्टीस पडला नाही.

बोधिसत्वांनी त्या अद्भुत मंत्राचा जप मोठ्याने केला आणि सूर्यास्ताच्या सुमारास त्या दगडावरून उठून शहराकडे निघाले.

त्याचवेळी त्या दगडाच्या पाठीमागल्या ढोलीतून एक कोल्हा उडी मारून बाहेर आला अरे ए पंडितवर्या! तू ज्या मंत्राचा जप केलास तो मला पाठ झाला आहे. त्याबद्दल तुझे मी हजार वेळा आभार मानतो. असे सांगून तो कोल्हा दूर पळून गेला.

कोल्ह्यासारख्या एका क्षुद्र प्राण्याने इतका प्रभावशाली मंत्र शिकून घेतलेला



पाहून बोधिसत्वांनी त्या कोल्ह्याला काय वाटेल ते करून पकडायचे ठरवून त्याच्या पाठोपाठ धावू लागले. तोंपर्यंत खूप काळोख पडू लागला होता म्हणून बाजूच्या झाडीत कोल्हा शिरला तो सांपडला नाही.

तो कोल्हा पूर्व जन्मी ब्राह्मण कुटुंबात जन्मला होता आणि जिवंत असेपर्यंत लोकांच्या खोड्या काढी आणि दुसऱ्यांना त्रास देण्या व्यतिरिक्त काही करीत नसे. त्याला पूर्वी मानव जन्म मिळाला असल्या कारणाने त्या कोल्ह्याला मंत्रातल्या अद्भुत शक्तीचा बोध झाला.

पळून जात असलेल्या कोल्ह्याला समोरून त्याच्याहून अंगात जास्त शक्ती असलेला एक आडदांड कोल्हा दिसला. मंत्र शिकून घतलेल्या कोल्ह्याने लगेच मंत्र म्हणून त्या नव्या कोल्ह्याकडे पाहिले. त्या नव्या कोल्ह्याने या जुन्या कोल्ह्याला वांकून नमस्कार केला आणि आडवाटेने स्वत:चा जीव वांचवून पळून गेला.

अशा तऱ्हेने थोड्याच दिवसात मंत्र शिकलेला कोल्हा कोल्ह्यांचा राजा झाला.

त्यानंतर त्या कोल्ह्याने आपल्या मंत्र शक्तीचा प्रयोग करून शेकडो रानडुकरे वश करून घेतली. कित्येक वाघांना, कित्येक सिहांना व कित्येक हत्तींना वश करून घेतले. ते सर्व कोल्ह्यालाच आपला राजा मानू लागले.

त्या कोल्ह्याने एका कोल्हीणीशी लग्न करून ती आपली राणी असल्याचे जाहीर केले. काही वाघाना व काही सिहांना त्याने आपले मंत्री म्हणून नेमले. जंगलातले सर्व प्राणी कोल्ह्याला व त्याच्या राणीला आपला राजा व राणी मानून त्यांच्या सवेस नित्य हजर राहू लागले.

दोघां हत्तींना त्याने जवळजवळ उभे केले व त्यांच्या पाठीवर दोघा सिहांना उभे करून त्यांच्या पाठीवर कोल्हा राजा-सारखा जाऊन बसला. काही प्राणी त्या कोल्ह्याची बरोबरी करू शकणारा दुसरा राजा जगात कोणी नाही असे सांगून कोल्ह्याची स्तुती करू लागले.



कोल्ह्याला ती स्तुती ऐकून आनंदा बरोबर गर्व चढू लागला. "आपण या प्राण्यांचे राजे झालो आहों, एवढ्यावर मनाचे समाधान मानून घेऊन गप्प कां बसावयाचे? हे वारणासी नगर कां जिंकू नये?" असा विचारच नव्हे तर महत्वाकांक्षा कोल्ह्याच्या मनात उपजली.

काही दिवसांनी त्याने प्राण्यात सर्व श्रेष्ठ अशा सिहांना आणि त्यांच्याच सारख्या वाघवगैरे हिंस्र प्राण्यांना एकत्र करून त्यांचे सैन्य उभे केले आणि वाराणसी नगरावर स्वारी केली. त्यांना दुरून येत असलेले पाहून काशीचे नागरिक घाबरून गेले आणि घराबाहेर येऊन पळू लागले. राजाच्या कानापर्यंत ही बातमी गेली. गावात पळापळ सुरू. गोंधळ उडून गेला.

कोल्हा राजा नगराच्या दारावर येऊन धडकला. द्वारपालक घाबरून थरथर कापू लागले. कोल्हा त्यांना म्हणाला–"अरे, तुम्ही सर्वांनी पळत जाऊन राजाला सांगा की, मुकाट्याने शरण ये, नाही तर क्रूर जनावरांचे सैन्य गावात शिरेल.

पाहारेकऱ्यांच्या तोंडी ही बातमी कळल्यावर राजाला काय करावे, हे सुचेना. तेव्हां बोधिसत्व राजाला म्हणाले–"महाराज, ह्या प्रसंगातून मार्ग काढायची जबाबदारी माझ्यावर टाका.

नंतर बोधिसत्व किल्ल्याच्या तटावर जाऊन उभे राहिले आणि कोल्हा राजाला












म्हणाले–"कायरे तू नगर कसे काय जिंकणार आहेस?

कोल्हा राजा खदखदां हसून म्हणाला–ते काम तर फारच सोपे आहे. मी आपल्या सैन्यातल्या सिंहांना जोराने एकदम गर्जना करायला सांगेन. तुझे शिपाई व नागरिक ती गर्जना ऐकून भयभीत होऊन पळून जातील.

बोधिसत्वांनी विचार केला कोल्हा म्हणतो आहे ते कदाचित खरे ही होईल. म्हणून त्यांनी तटाखाली जे राजाचे सरदार वगैरे उभे होते त्यांना गावात जाऊन ताबडतोब सर्व नागरिकांना सांगितले की त्यांनी सर्वांनी कानांत कापसाचे बोळे घालून बसावे.

ते काम झाल्यावर बोधिसत्वांनी कोल्हा राजाला म्हटले की तू शहर जिंकणार आहेसना तर कर स्वारी."

दोघां हत्तीवर उभे केलेल्या दोघां सिंहांवर कोल्हा स्वार होऊन उभा होता. त्यानंतर सर्व सिंहांना एकाचवेळी गर्जना करायला आज्ञा केली. त्या पाठोपाठ आसपासचा सर्व प्रदेश हादरून जाईल एवढ्याने सिंहांनी गर्जना केली. नागरिकांनी कानांत बोळे घालून ठेवले असल्याने त्यांना सिंहाच्या गर्जना ऐकू आल्या नाहीत. परंतु त्या सिंहाना पाठीवर चढविलेले हत्तीमात्र गर्जना ऐकून घाबरून गेले व वाट फुटेल तिकडे पळू लागले. पाठीवर उभे असलेले सिंह व त्यांच्यावर स्वार झालेला कोल्हा राजा सर्व जमिनीवर आदळले. हत्तीच्या पायाखाली तुडवला जाऊन कोल्हा राजा गत प्राण झाला. काही प्राणी ही चिरडून मेले. उरले सरले ते जंगलात पळून गेले.

ही सर्व बातमी दवंडी ऐकल्यावर नागरिकांना कळली व त्यांनी कानांत घातलेले बोळे काढून टाकले. नगराच्या द्वारावर मेलेल्या जनावरांचा खच पाहून ते चकित झाले. जनावरांची कातडी नागरिकांनी काढून घेतली.

राजा बरोबर नागरिकांनी इतक्या मोठ्या संकटांतून वांचविल्याबद्दल बोधि-सत्वांचे आभार मानले.



# अकबर बादशाह-२



आग्रा शहरापासून जवळच सिक्री नावाच्या सुंदर जागी एका लहानशा टेकडीवर शेख सलीम चिस्ती नावाचा एक मुसलमान फकीर रहात असे अकबर त्याचा एक शिष्य व भक्त होता.

१५६९ साली अकबराच्या रजपूत राणीच्या पोटी एक पुत्र जन्मला. शेख सलीम याच्या आशीर्वादाने मुलगा झाला म्हणून अकबराने आपल्या या मुलाचे नाव सलीम ठेविले अकबरा-नंतर हाच मुलगा मोंगल साम्राज्याचा अधिपती झाला.





शेख सलीम चिस्ती याच्या गौरवार्थ अकबराने सिक्री येथे एक किल्ला बांधला. तेथे एक फार मोठा राजवाडा बांधला आणि सिक्री येथेच राजधानी स्थापन केली. या किल्ल्यांतून निघूनच त्याने गुजरातवर स्वारी करून तो प्रदेश जिंकला. तेव्हां पासून सिक्रीला फतेहपुर सिक्री म्हणजे विजयनगर सिक्री हे नांव मिळाले.